# श्रीमद्भवगद्गीता.

प्रथम

षडाध्यायी–भाग पहिला.

अध्याय १ ते ३.

चिंतामण गंगाधर भानु.

किंमत ३॥ रुपये.

# या पुस्तकांतील व्यवस्थेचें स्पष्टीकरण.

प्रसिद्ध केल्याप्रमाणें, मूळश्लोक अन्वयासुद्धां पदांचा अर्थ हें प्रथमतः देण्याचें योजिलें आहे व अर्थ लवकर लक्ष्यांत यावा म्हणून शब्दार्थांच्या भोंवतीं कंस घालून अर्थ निराळ्या पद्धतीनें छापला आहे. तसेंच जेथें शब्दार्थ देऊनही अर्थ लवकर लक्ष्यांत येणार नाहीं असें मला वाटलें तेथें सारांश दिला आहे. शंकराचार्यांचें समग्र भाष्य संस्कृतांत देण्याविषयीं बऱ्याच लोकांच्या सूचना आल्या त्यांस मान देऊन तेंही देण्याचें योजिलें आहे, आणि पुढें होता होईल तितका शब्दशः अर्थ सरळ भाषेंत देण्याची योजना केली आहे. जेथें असें करूनही अर्थ स्पष्ट न होईल असें वाटलें, तेथें—असे डॅश किंवा ( ) कंस घालून आचार्यांचा अर्थ स्पष्ट करण्याची खटपट केली आहे. नंतर **रामानुजाचार्य, मध्वाचार्य** इ० मतांतरें प्रकट करणाऱ्या महापुरुषांचे अभिप्राय अवश्य ठिकाणीं द्यावयाचे व त्यानंतर इंग्लिश ग्रंथांतरीं असलेले दाखले मराठींत त्या त्या ग्रंथकारांचा नामनिर्देश करून द्यावयाचे व श्लोकाची परिसमाप्ति करावयाची अशी एकंदरीनें योजना केली आहे. इतकी योजना केली तरी कांहीं स्थळें दुर्बोध राहतील अशी शंका व भीति ‘ भ्रांति धर्म मनाचा ’ या न्यायानें उत्पन्न होतातच; म्हणून समंजस मुमुक्षुवाचकांस प्रांजल बुद्धीनें अशी एकवार विनंति करून ठेवितों कीं, असा एकादा घोंटाळा क्वचित उत्पन्न झाल्यास त्यांनीं ताबडतोब कळविण्याची कृपा करावी; म्हणजे पुढील अंकांत स्पष्टीकरण येऊन एकंदर विषयाची उत्तम व्यवस्था लागेल. पूर्ण ज्ञानाच्या आभावानें किंवा नजरचुकीनें दोषरूपी चोर कधीं कधीं आंत शिरणारच; तेव्हां त्यांचाही समाचार ग्रंथ पुरा होण्याच्या आधीं घेतां यावा म्हणूनच मासिक-पुस्तकाची योजना केली आहे. असो; समग्र ग्रंथ तीन वर्षांत पुरा होईल, असा आजचा अदमास आहे. मग निदानीं काय होणार असेल तें एका सर्वज्ञ परमेश्वरास मात्र ठाऊक !

तारीख ९ नोव्हेंबर १८९८
४३१ शनवार पेठ, पुणें.

चिं. गं. भानु.

श्रीगजाननाय नमः

# प्रस्तावना.

या प्रस्तावनेंत ( १ ) भारतीय युद्धाच्या प्रसंगाची त्रोटक हकीकत, (२) अर्जुनास उत्पन्न झालेली शंका, ( ३ ) पुरुषार्थाची अवश्यकता, ( ४ ) निरनिराळे मोक्षमार्ग, ( ५ ) श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलेला मार्ग, व इष्टहेतु साध्य करून देणारें कर्तव्याचें स्पष्टीकरण, ( ६ ) प्रस्तुत पुस्तक काढण्याचा उद्देश, ( ७ ) आणि शेवटीं या पुस्तकांत योजिलेली व्यवस्था, इतक्या विषयांचा अंतर्भाव केला आहे. विषयबाहुल्यामुळें माझ्या उद्देशापेक्षां हा लेख जास्त वाढला, तथापि इतका विस्तार अवश्य आहे असें वाटल्यावरून लांब होत जाणाऱ्या प्रस्तावनेला मीं होऊनच हात आंखडला नाहीं.

## भारतीय युद्धाच्या प्रसंगाची त्रोटक हकीकत.

पूर्वी द्वापारयुगामध्यें भरतकुलोत्पन्न **शंतनु** या नांवाचा राजा कुरुक्षेत्रामध्यें राज्य करीत असे. त्याला **गंगा** नामक एका स्वर्गस्थ देवीचें दर्शन झालें उभयतांचें एकमेकांवर प्रेम जडलें. पुढें त्यांचा शास्त्रोक्त विवाह झाला. गंगा ही स्वर्गातील नदी होय. हिला शाप झाल्यामुळें ती या मृत्युलोकांत आली होती. लग्नाच्या वेळीं उभयतांमध्यें असा करार ठरला होता कीं, लग्नापासून उत्पन्न होणाऱ्या मुलांवर सर्वस्वी गंगेचा हक्क असावा, व तिच्या मताविरुद्ध कांहीं झाल्यास तिनें राजाचा त्याग करून जावें. पुढें गंगेस सात पुत्र झाले. सातांसही तिनें नदीमध्यें सोडून दिलें! आपल्यास होणाऱ्या प्रत्येक पुत्राची अशी वाट लागते, हें पाहून शंतनूस अत्यंत खेद होई. परंतु करितो काय? गंगेचें अप्रतिम सौंदर्य आणि विवाहसमयींचा करार या दोन कारणांनीं त्याला कांहीं बोलतां येईना. आठवा मुलगा झाला. त्यालाही जेव्हां गंगा पाण्यांत सोडून देऊं लागली तेव्हां राजाचा शोक अनावर होऊन त्यानें 'हा तरी मुलगा टाकूं नकोस, माझ्यानें हा शोकभार सहन करवत नाहीं' अशी तिची करुणास्वरानें विनंति केली. गंगेनें पुत्रास मारिलें नाहीं; पण ती स्वतः निघून गेली. या पुत्राचें नांव **भीष्म** होय. लहानपणापासून भीष्मानें आपल्या शौर्यानें, आपल्या बुद्धीनें व आपल्या सदाचरणानें सर्व प्रजाजनांचीं मनें

आकर्षण करून घेतलीं. पितृप्रेमानें तर त्यानें राजास आपलेसें करून ठेविलें व राजानें लवकरच भीष्माला **युवराज** पदवी दिली, आणि आपण मृगया करीत राहिला. पुढें एके दिवशीं **सत्यवती** नामक एक कुलीन परंतु गरीब स्त्री त्याच्या दृष्टीस पडली. गंगेच्या विरहानें वेडा झालेला राजा सत्यवतीचें आपण पाणीग्रहण करावें अशी इच्छा करूं लागला. सत्यवतीच्या बापास ही हकीकत कळल्यावर राजास त्यानें एकच गोष्ट सांगितली; ती ही कीं, 'माझ्या मुलीच्या पोटीं जो पुत्र होईल त्यास संपूर्ण राज्य देईन, असें वचन देत असशील तर तुला मी आपलें कन्यारत्न देतों.' राजास हें अर्थातच कबूल करवेना. भीष्म हा थोरला मुलगा; त्याच्यावर राजाचें व लोकांचें प्रेम फार; ह्मणून राजास ही अट कबूल करवेना. परंतु सत्यवतीचा ध्यासही त्यास सुटेना! येणेंप्रमाणें तो अत्यंत चिंताक्रांत झाला. युवराज भीष्मासही ही वार्ता कर्णोपकर्णी कळली. तेव्हां या महात्म्यानें आपल्या सर्व सुखांवर पाणी सोडून वडिलांस 'मी लग्नच करीत नाहीं, आपण आपली इच्छा मोकळ्या मनानें परिपूर्ण करून घ्यावी' अशा अर्थाची आग्रहपूर्वक विनंति केली व राजानेंही पुत्राचा निष्कपट आग्रह पाहून सत्यवतीशीं लग्न लाविलें. सत्यवतीस दोन पुत्र झाले. त्यांचीं नांवें **चित्रांगद** व **विचित्रवीर्य** होत. हीं मुलें लहान असतांनाच शंतनु मरण पावला ह्मणून भीष्मानें यांच्या नांवावर राज्यकारभार चालविला. प्रतिज्ञेप्रमाणें भीष्मांनीं आपलें ब्रह्मचर्य शेवटपर्यंत सोडिलें नाहींच. पुढें चित्रांगद व विचित्रवीर्य हेही अल्पवयांत मरण पावले. विचित्रवीर्यास दोन बायका होत्या, त्यांस अनुक्रमें **धृतराष्ट्र** व **पंडु** असे दोघे पुत्र झाले. धृतराष्ट्र वडील, परंतु जन्मापासून अंधळा ह्मणून पंडूस राज्यावर बसवून भीष्मांनीं राज्यकारभार चालविला; पंडूस **कुंती** आणि **माद्री** अशा दोन स्त्रिया होत्या. पंडु हा भीष्माच्या अनुमतानें राज्य करीत असतां कांहीं कारणानें त्यास वनामध्यें जाऊन तपश्चर्या करणें भाग पडलें. तेथेंच कुंतीस तीन आणि माद्रीस दोन असे पांच पुत्र झाले. **धर्म, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव** हीं त्यांचीं नांवें होत. यांसच **पांडव** ह्मणतात. हीं मुलें लहान होतीं तोंच पंडूही मरण पावला व त्याच्याबरोबर माद्री सती गेली. पुढें कुंती आपल्या पांचही मुलांस बरोबर घेऊन **हस्तिनापुरास** दाखल झाली. इकडे जन्मांध धृतराष्ट्राचेंही लग्न होऊन त्याला शंभर मुलगे व एक मुलगी झालीं,

**दुर्योधन, दुःशासन, विकर्ण** इत्यादि या शंभर भावांस ' **कौरव** अशी सामान्य संज्ञा आहे. शंभर कौरव व पांच पांडव या सर्वांचा विद्याभ्यास भीष्मांनीं यथासांग करविला. कौरवपांडवांचे प्रथमगुरु **कृपाचार्य** होत. पुढें धनुर्विद्येमध्यें पारंगत अशी ख्याति असलेल्या गुरु **द्रोणाचार्यांनीं** कौरवपांडवांस युद्धकलेमध्यें निष्णात केलें. तथापि पांडवांची आणि त्यांतही भीमार्जुनांची विलक्षण-ग्राहकशक्ति पाहून शिष्यवत्सल गुरुद्रोणांनीं त्यास धनुर्वेदाचें **रहस्यसर्वस्व** सांगितलें. पांडवांचें हें युद्धप्रावीण्य पाहून कौरवांच्या मनांत मत्सरबुद्धि उत्पन्न झाली. शिवाय पंडूचीं हीं सद्गुणीं मुलें भीष्माच्या, व धृतराष्ट्राखेरीज इतर सर्व वडील माणसांच्या, प्रेमातिशयासही पात्र झालीं; यामुळें तर कौरवांच्या मत्सराग्नीला दुप्पटच भर पडली. शेवटीं पांडवांस राज्य मिळेल, निदान राज्याचा अर्धा वांटा तरी द्यावा लागेल, ही भीति कौरवांच्या मनांत उत्पन्न झाली; व तिला **शकुनि** मामांनीं जास्तचि चेतवून ' पांडवांचा नाश करावा ' अशीही मसलत त्यांस दिली. ही मसलत ठरल्यावर कौरवांनीं भीमास विष तर घातलें, पांडवांचें राहण्याचे ठिकाणास आग तर लाविली, भीमास पाण्यांत बुडविण्याचा प्रयत्न तर केला, पांडवांनीं आपल्या सामर्थ्यानें अपार संपत्ति मिळविली, तेव्हां त्यांचे दुष्मान जे कौरव त्यांच्या पोटांत विशेषच दुखूं लागून त्यांनीं धर्मास द्युत खेळावयास तर लाविलें, पांडवांची संपत्ति तर हिरावून घेतली, त्यांच्या महासाध्वी व महापतिव्रता **द्रौपदीनामक** पत्नीचा असह्य अपमान तर केला व शेवटीं या पापभीरु; सत्वशील पांडवांस वनवासांतही पाठविलें ! इतका दुर्धर छल झाला असतांही पांडवांनीं आपलें ब्रीद सोडिलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर कौरवांवर आलेल्या संकटांचा वनवासी पांडवांनीं यथाशक्ति परिहारही केला ! असल्या पुण्यश्लोक साधूंस कांहीं दिवस अज्ञातवासही भोगावा लागला. अज्ञातवास संपला व सर्व संकटांतून मुक्त झालेल्या पांडवांनीं जगास असा एक धडा घालून दिला कीं, सद्वर्तन हाच मृत्युलोकांतील प्राण्यांचा मुख्य पुरुषार्थ आहे. संकटें येवोत, वा जावोत, सुख असो वा नसो, धीर पुरुषांनीं न्याय्य वर्तनाचा मार्ग कधींही सोडूं नये, असा उपदेश **ध्रुव, प्रल्हाद** वगैरे साधूंच्या वर्तनावरून प्राप्त होतोच; परंतु एकवचनी **रामचंद्र** आणि सत्त्वशाली **पांडव** यांच्या चरित्रांनीं हा वरील बोध जसा दृढ होतो, तसा अन्य चरित्रांनीं होत नाहीं, हें **रामायण** व **महाभारत** ग्रंथांच्या लोकमान्य-

तेवरून स्पष्ट होत आहे. असो; पांडवांनीं पुनः ' राज्याचा अर्धा वांटा, निदान वडिलोपार्जित पांच गांवें तरी द्या, ' अशी कौरवांजवळ मागणी केली. भीष्म, द्रोण, धृतराष्ट्राचा भाऊ **विदुर** या सर्वांनीं दुर्योधनादि कौरव, त्यांचे मंत्री, शकुनिमामा, अद्वितीय धनुर्धर व पांडवांशिवाय इतर सर्व लोकांशीं उदार वृत्तीनें वागणारा **कर्ण**—यांचें मन वळविण्यासाठीं आपली शर्थ केली. न्यायानें वागावें अशी इच्छा धारण करणारा परंतु पुत्रमोहानें वेडा झालेला धृतराष्ट्रही मंद व शिथिल औत्सुक्यानें दुर्योधनाचें मन वळवूं लागला. पण नाहीं; दुर्योधनानें आपला दुष्ट दुराग्रह सोडिला नाहीं. सामाचे सर्व उपाय थकले. प्रत्यक्ष श्रीकृष्णही हताश होऊन परत आले ! तेव्हां काय होईल तें होवो, तहच करावयाचा असें म्हणणाऱ्या धर्मराजाचा निरुपाय होऊन त्यानें लढाईस अनुमोदन दिलें व उभयपक्षांची सिद्धता झाली. कौरवांचा पक्ष अन्याय-मूलक होता तरी त्यांच्या पक्षास अकरा **अक्षौहिणी** लोक मिळाले. पांडवांकडे सारे सात अक्षौहिणी सैन्य होतें. एकंदर १८ अक्षौहिणी सैन्य होतें.

महाभारतांत अठरा हा आंकडा विशेष लक्ष्यांत ठेवण्याजोगा आहे. महा-भारताचीं पर्वें अठरा, सैन्य अक्षौहिणी अठरा, भारतयुद्ध झालें दिवस अठरा, श्रीकृष्णांनीं अर्जुनास गीता सांगितली अध्याय अठरा, अशी ' अष्टादश ' आकड्यांची पुनरावृत्ति महाभारतांत अनेक वेळ होते. असो; दोन्हीं सैन्यें लढाईच्या तयारीनें उभीं राहिलीं आहेत, गुरु द्रोणास नमस्कार करून दुर्यो-धन पांडवांच्या व आपल्या सैन्याचें बलाबल आचार्यांस सांगत आहे, इत-क्यांत युद्धनैपुण्यामध्यें अद्वितीय म्हणून प्रसिद्ध असलेल्या भीष्म सेना-पतींनीं सिंहनाद करून आपला जो दिव्य शंख तो वाजविला. त्या-बरोबर कौरवपांडव—सैन्यांत नौबदी, भेरी, डंके, शिंगें, शंख इत्यादि रणवाद्यांचा वीरश्रीजनक घोर महारव उत्पन्न होऊन युद्धासच सुरुवात होणार व नमनाचे बाण सुटणार इतक्यांत कोणकोणते भट ( योद्धे ) रणांगणांत सज्ज होऊन उभे राहिले आहेत हें पाहण्यासाठीं अर्जु-नानें श्रीकृष्णसारथ्यास आपला ' रथ दोन्हीं सैन्यांच्या मध्यें उभा करावा ' असें सांगितलें. मध्यस्थानावर रथ पोहोंचला. दोन्हीं सैन्यांत नजर फेंकून अर्जुन पहावयास लागला, तों सर्वत्र, कोणी आजे, कोणी चुलते, मामे, बंधु, मित्र, पुतणे, मुलगे, आप्त, गुरु वगैरे सर्व आपलाच गोतावळा त्याच्या दृष्टीस

पडला. आंतड्याची माया द्वेषापेक्षां जास्त बलवत्तर आहे, असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. आपला सर्व परिवार व गोतावळा दोन्ही सैन्यांत भरपूर भरला आहे असें पाहून दुष्ट, अन्यायी व आपमतलबी कौरवांचा समूळ निःपात करावयाचा अशी उत्कट इच्छा रात्रंदिवस बाळगणारा वीरशिरोमणी अर्जुन व्याकुळ झाला. त्याचें अमानुष धैर्य अस्तंगत झालें, त्यास जबरदस्त मोह उत्पन्न झाला, आणि केवळ राज्यलोभाकारितां, राज्यसुखासाठीं व कीर्ति मिळवावयाची ह्मणूनच, आपण कुलक्षयकारी अशा युद्धास आरंभ करीत आहोंत, हें चांगलें नव्हे, हें आचरण पापमूलक आहे, अशी त्याची खात्री झाली. त्यानें आपलें दिव्य धनुष्य अखंड भाते व अमोघ बाण खालीं टाकून दिलें; आणि बंधुबांधवांचा, भीष्मद्रोणांसारख्या महापूज्य पुरुषांचा, वध करण्याचा विचार सोडून देऊन 'भिक्षा मागण्याचा प्रसंग आला तरी बेहेत्तर पण आपण ह्या कुलविध्वंस करणाऱ्या युद्धामध्यें प्रवृत्त होणार नाहीं,' असा निश्चय केला. श्रीकृष्णांनीं 'भेंकडासारखें काय कारितोस?' असें म्हणून चिडविण्याचा प्रयत्न केला तेव्हां 'कृष्णा! सदोदित आमचा पाणउतारा करून आमचा नाश करूं इच्छिणाऱ्या दुष्ट व अधम कौरवांचा नाश करावयासाठीं युद्ध करावें अशी मनाची एकदां प्रवृत्ति होते व त्याचवेळीं भीष्मद्रोणादिक पूज्य व वंदनीय सत्पुरुषांचा व एकाच पूर्वजाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या बंधुबांधवांचा, वध करण्याचा प्रसंग येतोसे पाहून युद्ध न करितां आपणच अन्यत्र निघून जावें असेंही वाटूं लागतें; तेव्हां काय करूं? व जें करावयाचें तें कां करूं? या दोन्ही प्रश्नांचें शास्त्रोक्त व सयुक्तिक उत्तर मला सांग, नाहीं तर मी युद्ध करीत नाहीं.' असें म्हणून अर्जुन स्तब्ध झाला. त्याला उत्तर म्हणून जें कृष्णांनीं सांगितलें ती सर्वप्रसिद्ध **भगवद्गीता** होय. ह्या अनुपम भगवद्वचनास इतकें महत्त्व कां आलें याचें समाधानकारक उत्तर देण्यापूर्वी गीतेंत काय सांगितलें आहे व त्यापासून आपल्यासारख्या सर्व प्राकृत मनुष्यांनीं कोणता बोध घ्यावा हें संक्षेपानें सांगतों. वाचकांनीं कृपा करून इतकेंच ध्यानांत ठेवावयाचें आहे कीं आतां संक्षिप्तरूपानें जें गीतारहस्य मी सांगणार आहें, तें आपणां सर्वांस समजेल व ग्राह्य करितां येईल इतक्याच बेतानें सांगत आहे समग्र ग्रंथ वाचन होऊन तो ग्रंथ आपल्यास यथास्थित समजला ह्मणजे जें आपण गीतासार

काढूं तें कदाचित् प्रस्तुतच्या सारापेक्षां विशेष रुचकर व पथ्यकर होईल! नाहीं कोणीं म्हणावें ?

## पुरुषार्थनिश्चय.

हिंदुस्थानांत तत्त्वज्ञानाकडे विचारी पुरुषांची दृष्टि वेदकाळानंतर वळली असावी. वेदकाळांत यज्ञयागादि कर्में करणें व त्यापासून प्राप्त झालेल्या फलाचा उपभोग घेणें हाच काय तो प्रवृत्तिपर निवृत्तिमार्ग असे. सत्कर्मांचें फल व दुष्कर्मांची शिक्षा या लोकीं नेहमींच मिळते असें होत नाहीं ह्मणून स्वर्गनरकादि लोकांचें वास्तव्य व पुनर्जन्मांचे सिद्धांत ठरवून कर्मांचें फल येथें अगर इतरत्र, ह्या जन्मीं अगर अन्यजन्मीं मिळत असतें, असा कर्मकाळीं एक महासिद्धांत प्रस्थापित झाला. पुढें कालांतरानें कर्म करणें व उपभोग घेणें हाच मानवीजन्माचा पुरुषार्थ नव्हे, नुसत्या इंद्रियांनीं दिलेल्या ज्ञानावर, त्यांनीं केलेल्या कर्मांवर व त्यांनीं पुढें आणलेल्या विषयांच्या उपभोगावर संतुष्ट न राहतां ह्मणजे पशूप्रमाणेंच आयुष्ययात्रा न घालवितां, मनुष्यास असलेल्या शुद्ध ज्ञानशक्तींचा त्यानें उपयोग केला पाहिजे, असा पंथ निघाला. ह्या लोकांनीं कर्म ह्मणजे काय व तें प्राण्याच्या मागें कां लागलें याचा शोध करून ठरविलें कीं, कर्म हें विषयलोभापासून उत्पन्न होतें व लोभ आहे तों तें कर्म सुटत नाहीं; पुनर्जन्म तरी कर्मामुळेंच होतो; आणि आत्मा हें तत्त्व शिवाय करून बाकीचे सर्व पदार्थ प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत, प्रकृतीच सर्वकर्त्री आहे, सुखदुःख देणारी तीच, देवांकडे कसलाच संबंध नाहीं म्हणून ते नाहींत! मनुष्यानें इच्छेचा त्याग करून कर्म करण्याचें सोडून द्यावें, ह्मणजे त्यास सुखदुःखें बाधणार नाहींत, पुनर्जन्म येणार नाहीं; आणि त्याचा आत्मा शुद्ध होईल अगर त्यास मोक्ष मिळेल. हा **सांख्यमार्ग** हा नास्तिक पंथ आहे. या पंथांत कर्मच नाहीं व कर्मेच्छा नाहीं ह्मणून यांत नीतिमार्ग नाहीं. याचें कृष्णानीं परीक्षण केलें आहे तें कसें, तें पुढें सांगितलेंच आहे. **डेका** नामक फ्रेंच तत्ववेत्ता आणि जगप्रसिद्ध स्पायनोझा यांचें व **कपिलमहामुनि** यांचें तात्त्विकदृष्टीनें बरेंच विचारसाम्य आहे.

दुसरा नास्तिक पंथ **बृहस्पति, चार्वाक** इत्यादि लोकांचा. या पंथाचे लोक ह्मणतात कीं ' राजा हा आमचा ईश्वर, सुखोपभोग हा श्रेष्ठ पुरुषार्थ,

प्रत्यक्ष प्रमाण हा आमचा ज्ञानमार्ग, देह हा आत्मा आणि मरण आमचा मोक्ष होय!' इंग्लिश तत्ववेत्ता **हाब्स** हा या लोकांची उत्कृष्ट प्रतिमा होय.

**पतंजली** नामक योगमार्ग संस्थापकानें सांख्यांची बरीच पद्धति स्वीकारून त्यांच्या मतांच्या कोंदणांत पूर्ण ज्ञानी परब्रह्माचें व आत्मचिंतनानें परब्रह्माशीं एकतानता करण्याचें अशीं दोन रत्नें बसविलीं आहेत. कर्मत्याग योग्यासही कबूल आहेच. त्यानांही पुनर्जन्म नको आहे आणि मोक्ष हवा आहे. योगाभ्यासानें आपल्या देहासच काय पण सर्व चराचर वस्तूसही मनुष्य आपल्या ताब्यांत आणूं शकेल असें मानवी आत्म्याचें महत्त्व या योगशास्त्र प्रवर्तकांनीं प्रथमतःच प्रकट केलें. युरोपियन **मेस्मर** वगैरे शोधकांस हें आत्मसामर्थ्य एकोणिसाव्या शतकांत गवसलें आहे. भगवंतांनीं ह्याही मताचें परीक्षण केलें आहे; त्याची दिशा खालीं दाखविलीच आहे.

ह्या तिन्ही चाऱ्ही मार्गप्रवर्तकांनीं वैदिककर्मास झुगारून देण्याची खटपट केली; तरी चार्वाकाशिवाय इतरांस पुनर्जन्माचा महासिद्धांत कबूल होता आणि कर्म टाकून दिलें म्हणजे पुनर्जन्म सुटून मोक्ष मिळेल असें वाटत होतें. पुनर्जन्माची समजूत वैदिककाळचीच होती. पुढें वेदान्तमत अगर अद्वैतमत या आर्यभूमींत प्रकट झालें, तेव्हां वेद, सांख्य, योग इत्यादि सर्व सिद्धांतांची एकवाक्यता होऊन अद्वैतसिद्धांतांची स्थापना झाली. वैदिककर्मानें चित्तशुद्धि, सांख्यमार्गानें ज्ञान, योगानें ब्रह्मचिंतन व समाधीचा अभ्यास, उपासनेनें भक्ति, साध्य होतात असें **ब्रह्मसूत्रकार व्यास** महामुनी यांनीं ठरवून प्रकृतीला मिथ्या केलें, हें जग व आपलीं सर्व विषयज्ञानेंद्रियें असत्य आहेत, शुद्ध ज्ञानस्वरूपीं ब्रह्म एकच आहे आणि तेंच ब्रह्म आपण आहोंत, मायेच्या योगानें अगर प्रकृतीच्या साहचर्यामुळें आपलें खरें स्वरूप आपल्यास कळत नाहीं, वगैरे सिद्धांतांची व्यास ऋषींनीं स्थापना केली. या सिद्धांतांवर अत्युत्कृष्ट तऱ्हेचें भाष्य लिहून **शंकराचार्यांनीं** अद्वैतसिद्धांत सर्वमान्य केले आहेत. या सिद्धांताचा विचार करण्याचा प्रसंग आपल्यास नेहमींच येणार आहे. **प्लेटो, मालिब्रॅंच, बर्कले, हेगेल, शोपेनहार** हे युरोपियन अद्वैतवादी तत्त्ववेत्ते होत.

ज्ञानमार्गांत श्रद्धामूलक स्वतंत्र मनोवृत्तीस मुळींच अवकाश नव्हता. ही उणीव दूर करण्यासाठीं **शांडिल्य** व **नारद** यांनीं निरनिराळीं सूत्रें लिहिलीं

आहेत. ह्या भक्तिमार्गाचें पूर्ण स्वरूप कृष्णमुखानेंच प्रकट होणार असल्या-मुळें त्याविषयीं मी येथें कांहीं लिहीत नाहीं.

असो; इतक्या सामग्रीवर आतां आपण निरनिराळ्या मोक्षमार्गांच्या व त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या निरनिराळ्या नीतिमार्गांच्या कृष्णकृत परीक्षणा-कडे वळूं. अर्जुन हा कर्मवादी होता हें सांगावयास नकोच.

## मोक्षमार्गाचें परीक्षण.

मोक्षाचे जे अनेक मार्ग भारतीयुगांत प्रचलित होते, त्यांपैकीं महत्त्वाच्या मार्गांचें श्रीकृष्णानें गीतेमध्यें परीक्षण करून त्या सर्वांची एकवाक्यता केली आहे व सर्व प्रकारच्या विचारी लोकांस मोक्ष मिळविण्याचा उत्कृष्ट मार्ग दाखवून दिला आहे. हा प्रकार कसा कसा झाला आहे तें आतां संक्षेपानें सांगतों. दुसऱ्या अध्यायामध्यें भगवंतांनीं सांख्यमताचें परीक्षण केलें आहे. पंचवीस तत्त्वांवर ही सर्व चराचर सृष्टि झाली आहे असें सांगणाऱ्या कपिल-महामुनींच्या मतास सांख्यमत असें म्हणतात. कोणी **सम्यक्** ( चांगलें, खरें ) **ख्यायते** ( सांगितलें ज्यांत त्यास ) सांख्य म्हणतात. असो; सांख्यमता-प्रमाणें एकंदर २५ मूलतत्त्वें आहेत व यांपैकीं चोवीस तत्व स्थिरचर व्यापून नित्य व निरामय असणाऱ्या ( कारण येथें सत्त्वादि गुण समसमान असतात ) प्रकृतिनामक अव्यक्तापासून उत्पन्न झालीं आहेत, अगर व्यक्त-स्थितींत येऊन पोहोंचलीं आहेत. या प्रकृतीलाच वेदांती लोक माया असें म्हणतात. सांख्यांच्या मताप्रमाणें प्रकृति हीच या विश्वाच्या उत्पत्तीचें, स्थितीचें व प्रलयाचें कारण असून सर्व जें काय स्थित्यंतर होत आहे ते प्रकृ-तीच्या सामर्थ्यानें होत आहे. असो; आतां सांख्यांचीं चोविस तत्वें प्रकृती-पासून उत्पन्न झालीं आहेत तीं सांगतों. व्यक्त, ( दृश्य जग ) पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार ( consciousness याला अहंप्रत्यय हा शब्द चांगला आहे, कारण अहंकार याचा हल्लीं सामान्येंकरून गर्व असा अर्थ होतो ) पांच तन्मात्रा ( गंध, रस, रूप, स्पर्श आणि शब्द यांस तन्मात्रा म्हणतात ) पंचमहाभूतें ( पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें आहेत. ) आणि पंचविसावें तत्व आत्मा हें होय. आत्मा स्वयंभू आहे. तो कांहीं करीत नाहीं. आत्मा एकच नाहीं. ते अनंत आहेत, पण ते सर्व स्वयंभू आहेत. आत्मे नित्य आहेत आत्म्यांचा व बुद्धीचा

संयोग झाल्यामुळें व पुढें प्रकृतीच्या इतर तत्वांचाही संयोग झाल्यामुळें सुख-दुःखादि सर्व भोग आत्म्यास भोगावे लागतात. या भोगांपासून सुटण्याचा उपाय एकच आहे तो हा कीं, कर्म करण्याचा त्याग करावयाचा. सत्त्व, रज आणि तम या गुणांनीं युक्त जें ' प्रकृति ' नामक तत्त्व त्याच्या अखंड साम-र्थ्यानें जें स्थित्यंतर होत असतें त्याचा, आत्मा हा साक्षी असून सुखदुःखांचें भोक्तृत्वही त्याच्याकडे आलें आहे. तें भोक्तृत्व सोडवून घ्यावयाचें ह्मणजे त्रिगुणात्मक प्रकृति आणि निर्विकार आत्मा यांचें ज्ञानेंद्रियांनीं पूर्ण ज्ञान करून घेऊन कर्म करण्याची इच्छा टाकावयाची; म्हणजे कर्म कमी होईल, पुनर्ज-न्मांची संख्या कमी होईल आणि शेवटीं शुद्ध आत्म्याची सुटका होऊन, तो अव्यक्तास जाऊन मिळेल. हा सांख्य मताचा व तद्गत नीतीचा त्रोटक सारांश आहे. श्रीकृष्णांनीं सांख्यमतापैकीं एक दोन भाग गृहीत केले; ते असे कीं, उपाधींच्या योगानें कर्म उत्पन्न होतें व निरामय आत्म्यास जीवदशा प्राप्त होते. या दोन्ही गोष्टी कबूल केल्या तरी एक गोष्ट भगवंतास संमत नाहीं; ते ह्मणतात कीं, मुक्त होण्यासाठीं आत्मा एकदम सांख्यांच्या अव्यक्ताकडे जातो हें खरें नाहीं. सांख्यांच्या अव्यक्ताकडे अगर वेदांत्यांच्या मता-प्रमाणें परब्रम्ह स्वरूपाकडे जाण्यास एकच मार्ग आहे आणि तो साध्य होण्यास ईश्वराच्या स्वरूपाची ओळखच करून गेलें पाहिजे; नुसत्या अव्यक्तस्वरूपाचें यथार्थ ज्ञान सोपाधिक ( उपाधिसहित असणाऱ्या ) आत्म्यास होणें अत्यंत दुर्घट आहे. ह्मणून सांख्यमत जरी मोक्षाच्या मार्गाचें अवलंबन करितें. तरी तें निरीश्वर आहे व अशक्य आहे ह्मणून जीवास त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. मात्र सांख्यमतानें प्रतिपादन केलेलें कर्म, त्यामुळें आलेली सोपाधिक स्थिति व जन्ममरणाचा फेरा, इतक्या गोष्टी खऱ्या आहेत, परंतु सांख्यमताचे उपाय साध्य नाहींत; व ह्मणून तें मत मुमुक्षूंनीं घेण्यासा-रखें नाहीं असें सर्वज्ञ व भगवान श्रीकृष्ण यांचें मत भगवद्गीतेंत प्रकट झालें आहे.

पुढें **तिसऱ्या अध्यायांत** श्रीकृष्णांनीं कर्मयोगाचें परीक्षण केलें आहे. कर्मयोगी ह्मणजे कर्मानें आपलें इष्टकार्य सिद्ध होईल असें ह्मणणारे तत्ववेत्ते ह्मणतात कीं, कर्माची उत्पत्ति उपाधीपासून झाली आहे हें खरें व जन्ममरण-रूपी संसारामध्यें प्राणी पडतो तो कर्माच्या योगानें पडतो, हेंही खरें आहे. पण कर्माचा उगम व परिणाम वर सांगितल्याप्रमाणेंच आहेत, म्हणून कर्माचा

त्याग करणें श्रेयस्कर होणार नाहीं. पहा कीं, जर आपण कर्म अजीबा-तच टाकून दिलें तर आपली शरीरयात्रा चालणें दुर्घट होऊन आपल्यास उपाशी तरी मरावें लागेल अगर देहाचा अंत तरी जाणून बुजून करावा लागेल. शिवाय हस्तपादादिक कर्मेंद्रियांचें कर्म आपण तोडून टाकिलें तरी श्वासोच्छ्वास करणें, शरीरांत रुधिराभिसरण होणें, यदृच्छेनें मिळालेल्या अगर तोंडांत पडलेल्या अन्नाचें पचन होणें व निरुपयोगी झालेल्या पदार्थांचें शरी-रांतून निःसारण करणें इत्यादि गोष्टी आपण जिवंत आहोंत, तोंपर्यंत आपण 'होऊं नका' म्हणून म्हटलें तरी चालणारच. आणखी समजा कीं, आपण सर्व शारीरिक कर्मांचा त्याग केला आणि जिवंतही राहिलों तरी मनाची विचार करण्याची क्रिया चालणारच. मनाचा व बुद्धीचा धर्म, विचार कर-ण्याचा आहे व या उभयतांनीं दृश्य जगाचा विचार बिलकूल करावयाचा नाहीं असा निश्चय केला तरी आत्मविचार सोडणें त्यास अशक्य आहे. एतावता विचाररूपी कर्म होणारच शिवाय कर्माचा त्याग केला म्हणजे चांगल्या वाईट कर्मांचाही त्याग झालाच. यापासून काय निष्पन्न होतें तें पहा. पापकर्म होतें म्हणून हिंसा करावयाची नाहीं अगर कर्मच करावयाचें नाहीं असें ठरविलें ह्मणजे आईबापांचें, बायकामुलांचें, सारांश आ-पल्यावर अवलंबून असणाऱ्या जीवांचेंही पालनपोषण थकतें; ह्मणजे त्यांची उपासमार होऊन ते मरतात ! एतावता कर्मत्याग केला तरी आपल्या हातून कर्म झालेंच ! तात्पर्य हें कीं जोंपर्यंत या शरिरांत जीव आहे व तो जीव समाजांत राहत आहे, तोंपर्यंत स्वतःसाठीं अगर स्वेतरांसाठीं कर्म होणें चुकत नाहीं; म्हणून कर्म हें अवश्य आहे. आतां कोणतें कर्म विहित आहे, कोणते निषिद्ध आहे, हें आपल्या स्वतःच्या विवेकबुद्धीनें, ईश्वरप्रेरित महापुरुषांनीं वेदशास्त्रांत जे नियम घालून दिले त्याच्या साहाय्यानें आणि ज्या समाजांत आपण राहतो; ज्या कालीं राहतो, त्या समाजाच्या अगर त्या कालाच्या देशस्थितिवर्तमानाप्रमाणें आपलें कर्म आपण ठरविलें पाहिजे; आणि जें सत्कर्म ठरेल त्याप्रमाणें आचरण ठेविलें पाहिजे. हें ठरवून आपण विवे-कबुद्धीनें सदाचरण करूं लागलों म्हणजे सत्कर्मामुळें प्रसन्न होणारे देव-आपल्यास साहाय्य करितात, सर्वत्र सुबत्ता असते व आपल्यास कर्मफला-प्रमाणें स्वर्गादि उत्कृष्ट लोकांमध्यें वास करावयास सांपडून अत्यंत सुख मिळतें.

सारांश कर्म हें प्राण्याच्या पाठीमागें लागलेलें आहे; म्हणून कर्म करायाचेंच तर तें सत्कर्म तरी असावें आणि या सत्कर्माच्या सामर्थ्यानें सुखप्राप्ति करून घ्यावी असें कर्मवादी लोकांचें ह्मणणें आहे. श्रीकृष्ण ह्मणतात कीं कर्म केलें पाहिजे; प्राण्याच्या मागचें कर्म सुटत नाहीं; लोकांपुढें उत्कृष्ट उदाहरण असावें ह्मणून मला कर्म करण्याची अवश्यकता नसतांही मी कर्म करितों; मीच कर्म केलें नाहीं तर सर्व लोकांचा उच्छेद होईल; सारांश कर्म करणें आवश्यक आहे हें मला कबूल आहे. परंतु तुम्हीं कांहीं थोड्याकालपर्यंतच राहणाऱ्या इंद्रचंद्रादि देवतांवर मात्र विश्वास ठेवून त्यांस प्रिय होईल तेंच कर्म करितां, देवतांच्याही पलीकडे असणारा जो नित्य, निरामय, परमात्मा त्याकडे दृष्टि पोहोंचवीत नाहीं, यामुळें जन्ममरणाचा फेरा तुह्मांस चुकत नाहीं; सारांश तुम्ही मुक्त होत नाहीं ह्याचा विचार करा. कर्म करणें आवश्यक आहे. पण तें कर्म असें केलें पाहिजे कीं, ज्याच्यायोगानें प्राण्याचें जन्ममरण चुकेल. फार काय सांगावें? ज्या देवतांचें तुह्मी यजन करितां त्या देवतांस सुद्धां जन्ममृत्यूनें सोडिलें नाहीं; म्हणून त्यांचाही संसार सुटला नाहीं! संसार सुटावा, उपाधींपासून मुक्त व्हावें अशी जर तुमची इच्छा असेल तर त्या निर्विकार, निरंजन अशा परमात्मस्वरूपाचा जेणेंकरून लाभ होईल अशा तऱ्हेचें कर्म तुम्हांस निष्कामबुद्धीनें व फलाची आशा न धरितां केवळ कर्तव्य म्हणूनच केलें पाहिजे. सुख होवो वा दुःख होवो, आपलें कर्तव्य आपण निर्लोभ मनानें करावयाचें व तें कर्म परमेश्वरास अर्पण करावयाचें असा निग्रह केला तरच मोक्षाचा मार्ग सुलभ होईल. येथें खरा पुरुषार्थ कोणता, व नीतीची दिशा कोणती, हें ठरविलें.

कर्मसंन्यास नामक मोक्षमार्गाचें परीक्षण करण्याचें फारसें कारण उरलें नाहीं. कारण कर्मयोग व सांख्ययोग ( ज्ञानयोग ) यांतच त्या मताचा निकाल झाला आहे व कर्मसंन्यास अगर कर्मत्याग अशक्य आहे असें ठरविलें आहे; म्हणून श्रीकृष्णांनीं त्या मार्गाचा स्वतंत्र असा फारसा विचार केलेला भगवद्गीतेंत आढळत नाहीं.

सांख्यमत जोरावर झालें असें पाहून **जैमिन्यादि** कर्मयोग्यांनीं ज्ञानमार्गाचा आश्रय केला व वेदविहित व शास्त्रविहित जीं जीं कर्में आहेत, त्यांचें

स्वरूप, त्यांचीं अंतःस्थ कारणें, त्यांच्या योगानें प्राण्यांच्या मनावर होणारा सत्परिणाम, यांचा शोध करण्यास आरंभ केला. या मार्गाचे अनुयायांस **पूर्वमीमांसानुयायी** असें म्हणतात. वेदविहित कर्मांनीं चित्तशुद्धि होते, सबब तीं कर्में केलींच पाहिजेत व मुक्त होण्यासाठीं कर्मफलाची आशा टाकलीच पाहिजे; असें या ज्ञानकर्मयोगीसंन्याशांचें म्हणणें आहे. जप व तप इत्यादिकांचे साहाय्यानें व अनेक प्रकारचे ज्ञानपूर्वक अंतर्यज्ञ व प्राणयज्ञ यांच्या साहाय्यानें इष्टसिद्धि होईल असें हे लोक म्हणतात. या ज्ञानमार्गी कर्मिष्ट लोकांच्या जिज्ञासेबद्दल श्रीकृष्ण भगवान त्यांची स्तुति करितात व त्यांस सांगतात कीं, केवळ जपतपांच्या मागें न लागतां व केवळ अंतःकरणांतील वृत्तीचा मात्र शोध करून तेथेंच न थांबतां, या लोकांनीं परमेश्वरापर्यंत पोहोंचण्याचा मार्ग शोधून काढावा. नुसत्या ज्ञानमार्गाच्या पाठीमागें लागलें तर ईश्वराचा शोध लागावयाचा नाहीं आणि तो शोध लागला असतां जें इंद्रियातीत ज्ञान मिळतें व जें अनिर्वाच्य सुख मिळतें, त्यांचाही बोध व अनुभव संपादन होणार नाहीं. हल्लींच्या काळींही जे शास्त्री सृष्टीचें निरीक्षण करून भौतिकशास्त्रांतील सिद्धांतामध्यें भर घालीत आहेत व मानसिकजगाचा शोध लावून मनाच्या अलौकिक शक्तींस सूर्यदर्शन देण्याच्या खटपटी करीत आहेत, सारांश जे असल्या ज्ञानयोगाच्या अभ्यासांत निमग्न आहेत, त्यांनींही श्रीभगवताच्या वाक्यापासून बोध घ्यावा आणि केवळ वरील शोधांवरच संतुष्ट न होतां परमेश्वराचें स्वरूप विचारानें तरी कळून येईल असें त्याच्या श्रमांचें धोरण असावें; असें केलें तरच जन्माचें सार्थक्य होऊन अमरत्व प्राप्त होईल आणि मोक्षसिद्धि आपल्या घरीं चालत येईल.

योगाचा अभ्यास करून आपलें शरीर व आपलें मन आपल्या ताब्यांत आणिलें असतां कर्मयोगामध्यें ज्या अडचणी आल्या होत्या त्या नाहींशा होऊन सांख्ययोगाचा इष्टहेतु साध्य करितां येईल असें **पातंजल**मतानुयायी योगी लोकांचें म्हणणें आहे. प्राणायाम, समाधि, इत्यादिकांच्या योगानें मनाचें आकलन करितां येतें व पद्मासन, मयूरासन इत्यादि हटयोगांत निर्णीत केलेल्या शारीरिक तंत्रांच्या योगानें शरीरासह मन आपल्या स्वाधीन होतें; याप्रमाणें हटयोगानें व राजयोगानें शरीर व मन या दोहोंस आपल्या ताब्यांत आणल्यावर शरीरांत व मनांत गुप्त असलेले सर्व ज्ञानमार्ग आपल्यास अवगत

होऊन सर्व कर्मांचा संन्यास करितां येतो असें योगशास्त्रांत सांगितलें आहे. श्रीकृष्ण म्हणतात कीं मोक्ष मिळण्यासाठीं या मार्गांत सांगितलेला मनोनिग्रह व प्राणायाम, समाधि वगैरेंचा अभ्यास, ह्या गोष्टी चांगल्या आहेत. तथापि अभ्यासयोग एकाच जन्मांत साध्य होणें कठिण आहे. शिवाय योगमार्गांत अनेक मोह व अनंत अडचणी येतात व येण्याचा संभव आहे. सबब श्रीकृष्ण म्हणतात कीं, समाधीमध्येंच परमेश्वराचें ध्यान भक्तिपूर्वक करितां यावें अशा तऱ्हेची योगमार्गानें सवड काढली तर एका जन्मांतच मोक्षाचा लाभ होण्याचा संभव आहे. शरीराचा मनावर व मनाचा शरीरावर जो परिणाम होतो तो परिणाम भगवंतास कबूल असून तो शोधून काढल्याबद्दल योगी लोकांची भगवंतांनीं स्तुति केली आहे.

जातां जातां भगवंतांनीं देहात्मवादी अगर नास्तिक लोकांच्या मतांचाही थोडक्यांत विचार करून मरण हाच मोक्ष नव्हे व सुख हाच पुरुषार्थ नव्हे, असें सांगितलें आहे.

याप्रमाणें त्या वेळीं प्रचलित असलेल्या श्रेष्ठ अशा मोक्षमार्गांचें निःपक्षपातबुद्धीनें परीक्षण करून सृष्टीच्या सुस्थितीसाठीं व सर्व प्राण्यांस मोक्ष मिळवितां येईल असा, एक उत्कृष्ट मार्ग कृष्णांनीं प्रकट केला आहे. ह्या मार्गाचें स्पष्टीकरण करीत असतां वर जे कित्येक मार्ग सांगितले आहेत, त्यांत जेथें जेथें सत्याचा भाग दिसला, तो तो भाग आदरानें स्वीकारून उज्ज्वल आणि उदात्त अशा भक्तिमार्गाचें सातव्या ते बाराव्या अध्यायापर्यंत भगवंतांनीं सुंदर विवरण केलें आहे. सांख्ययोगांत सांगितलेली प्रकृतिपुरुषाची जोडी श्रीभगवंतानीं घेतली आहे व दृश्य जगाचें अपूर्णत्व व क्षणभंगुरत्व आणि प्रकृतीचें व पुरुषाचें चिरस्थाइत्व ह्यांचा व निष्कामकर्मांचा अंगीकार करून, ब्रह्मानुभव घ्यावयाचा असेल तर परमेश्वराचे मार्गानें गेलें पाहिजे असें सिद्ध केलें आहे. नंतर कर्म करणें अवश्य आहे असें गृहीत करून जें जें कर्म करावयाचें तें ईश्वरबुद्धीनें केलें पाहिजे असें ठरविलें. नंतर ज्ञानकर्मयोगांपैकीं चिकित्सामूलक आत्मशुद्धीचा अंगीकार करून तें ज्ञान परमेश्वराच्या चरणापर्यंत नेऊन पोहोंचवावें असें ठरविलें आहे. शेवटीं योगाभ्यासाला परमेश्वरदृष्टीचा मार्ग दाखवून त्यांत सांगितलेल्या मनोनिग्रहाचा व नित्याभ्यासाचा स्वीकार केला आहे. सारांश उपाधींच्या योगानें अवश्य झालेल्या कर्मांस पर-

भेश्वरचरणीं अर्पण करावें आणि आपल्या ज्ञानशोधाची व समाधीची तंद्री परमेश्वरस्वरूप ओळखण्याकडे मात्र लावावी; आणि पुढें निरुपद्रवी झालेल्या उपाधींसहवर्तमान आत्म्याचें नित्य, शुद्ध बुद्ध व मुक्त असें जें स्वरूप तें ओळखून घेऊन उपासनेच्या साहाय्यानें परमेश्वराशीं एकवट होऊन जावें व शेवटीं परब्रह्मस्वरूपांत लीन होऊन प्राण्याचा मुख्य पुरुषार्थ जो मोक्ष त्याची प्राप्ति करून घ्यावी असा सरळ, सोपा व सुलभ मार्ग मनुष्यांस दाखवून दिला आहे. म्हणजे ज्ञानपूर्वक केलेलीं सर्व विहित कर्में परमेश्वराला समर्पण करून योगाभ्यासाच्या द्वारानें परमेश्वरचिंतन रात्रंदिवस चालू ठेवावयाचें हा भगवंताचा सोपा मार्ग आहे हें मुमुक्षूंस समजून येईलच. असो; हा मार्ग विस्तारानें सातव्या अध्यायापासून बाराव्या अध्यायापर्यंत सांगितला आहे. सातव्यामध्यें विज्ञानयोगाचें लक्षण सांगून परब्रह्माच्या परा व अपरा अशा ज्या दोन प्रकृति त्यांचीं लक्षणें प्रतिपादित केलीं आहेत; आणि नंतर जगांत जेथें उत्कृष्टपणा दिसेल तेथें तेथें परमेश्वराची विभूति आहे असें कथन केलें आहे. ज्ञानीभक्तांच्या भक्तीचाही येथें निर्देश करून निरनिराळ्या सात्त्विक, राजस व तामस भक्तांस काय काय लाभ होतात त्यांचें वर्णन व ज्ञानपूर्वक केलेल्या मूर्तिपूजेचें मंडन याच अध्यायांत केलें आहे. आठव्या अध्यायांत भक्तीशीं योगाचा संयोग झाला असतां ती कशी फलप्रद होते, आणि मरण-समयीं मनाची व विचाराची स्थिति कशी असावी; यांचें वर्णन आहे; नवव्यामध्यें राजगुह्य योगाचा प्रस्ताव करून परब्रह्माच्या स्वरूपाचें, मायेच्या स्वरूपाचें व धर्माचें यथार्थ विवेचन केलें आहे, त्याचप्रमाणें परमेश्वराचें स्वरूपही या अध्यायांत सांगून त्याचें सर्वव्यापित्व कसें आहे ह्याचें प्रतिपादन केलें आहे; आणि शेवटीं भक्तिपुरःसर आणि ज्ञानपुरःसर सत्कर्म करणाऱ्या भक्तांस मुक्ति कशी मिळते याचेंही सुंदर वर्णन आहे. दहाव्यामध्यें परमेश्वराच्या अनंत विभूतींचें दिग्दर्शन केलें आहे. अकराव्यामध्यें विश्वरूप दाखवून परमेश्वरानें अर्जुनास, दुर्योधनादि दुष्टांचा संहार त्यांच्या त्यांच्या दुर्वर्तनानें पूर्वीच कसा झाला होता, हें प्रत्यक्ष दाखविलें आहे. आणि बाराव्यामध्यें परब्रह्माची उपासना कठीण आहे, व परमेश्वराची उपासना सुसाध्य आहे असा विषय आणून खऱ्या व निष्काम भक्तीचें महात्म्य वर्णिलें आहे.

येथपर्यंत कोणत्या तत्त्वांच्या आधारावर मोक्षमार्गाची आंखणी होणें शक्य

आहे असें सांगून नंतर श्रीकृष्ण भगवान मनुष्याचें वर्तन कसें असतें व तें कसें असावें याविषयीं विचार करितात. हा विचार कसा केला आहे तें आतां थोडक्यांत सांगतों. तेराव्या अध्यायापासून अठराव्या अध्यायापर्यंत प्रकृति आणि पुरुष यांच्यामधील फरक, सत्त्व, रज, ह्या गुणत्रयींचें लक्षणांसह स्वरूपवर्णन; संसाराचें क्षणभंगुरत्व आणि परम पुरुषाचें महत्त्व; गुणत्रयीच्या कमी अधिक प्रमाणानें उत्पन्न होणारे निरनिराळे स्वभाव; श्रद्धा, आहारविहार, यज्ञ, दान इत्यादिकांचे सात्त्विक, राजस व तामस असे निरनिराळे प्रकार; कर्मत्यागाचा निषेध; सात्त्विक, राजस व तामस कर्तव्यकर्मे; तीन प्रकारचीं ज्ञानें, बुद्धि आणि सुखें; आणि शेवटीं कर्तव्यकर्मापासून प्राप्त होणारा पुरुषार्थ; इत्यादि अनेक रमणीय व नीतिशिक्षक विष यांचा सुयुक्तिक व समंजस असा ऊहापोह झाला आहे. आणि गीतेच्या शेवटीं निष्कामबुद्धीनें, एकानिष्ठेनें, ज्ञानपूर्वक आणि परमेश्वरास समर्पण करण्याच्या हेतूनें स्वतःस योग्य अशा स्वधर्माचें परिपालन केलें असतां कोणत्याही स्थितींतील सूज्ञ प्राणी ब्रह्मपदाला पोहोंचतो असा सिद्धांत सांगून विषयाची परिसमाप्ति केली आहे. अठराव्या अध्यायांत भगवान म्हणतातः—

‘ अर्जुना !

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु । अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्मामि मा शुच

मद्रूपीं मन मद्भक्त यजी वंदी मलाच तूं । मातेंची पावसी सत्य प्रतिज्ञा करितों सख्या ॥

**वामन पंडित ’**

हें वाक्य भगवद्गीच्या वाचकांनीं जर ज्ञानपूर्वक आणि भक्तिपूर्वक लक्षांत वागवून त्याप्रमाणें यथासांग आचरण केलें तर इहलोकींचे व परलोकींचे सर्व पुरुषार्थ साध्य होऊन अंतीं भगवान म्हणतात त्याप्रमाणें मोक्ष मिळेल यांत संदेह नाहीं.

याप्रमाणें मोक्षाचे निरनिराळे मार्गांची यथार्थता पाहून खरा मोक्षमार्ग कोणता व तो साध्य होण्यासाठीं आपल्यापाशीं जीं साधनें उपलब्ध आहेत त्यांचा उपयोग कसा करावयाचा, वगैरे महत्त्वाच्या गोष्टी भगवद्गीतेंत सांगितल्या आहेत इतकें झालें.

## गीतेचें महत्त्व.

येथपर्यंत गीतेंत काय सांगितलें आहे याचा विचार झाला. गीता हा ग्रंथ

केवळ तत्त्वज्ञानाचा मात्र नसून गीतेमध्यें मनुष्यानें हरएक प्रसंगीं कसें वागावें व वागण्याचे नियम कोणत्या तत्त्वांच्या आधारावर घालून ठेवावे याचा विचार सांगितला आहे, म्हणून या निरुपम ग्रंथास इतकें महत्व आलें आहे. 'ज्ञानाचे पर्यवसान मोक्ष' असा हिंदुतत्त्ववेत्त्यांचा सिद्धांत आहे म्हणून कोणत्याही विषयाचा हिंदुलोक तात्विक व गंभीर दृष्टीनें विचार करूं लागले ह्मणजे त्या विषयाच्या ज्ञानापासून मनुष्याच्या पाठीशीं लागलेल्या उपाधिजन्य कर्मांचा विनियोग मोक्षप्राप्तीकडे कसा होईल हें बघण्याकडे त्यांचें लक्ष असतें. गीताशास्त्रांतही, तत्त्वदृष्टीच्या द्वारानें मोक्षाचा विषय आला आहे म्हणूनच त्या भगवत्प्रणीत ग्रंथास इतकें महत्त्व आलें आहे. या विषयाचा ऊहापोह करण्याचा प्रसंग इतका मनोहर आहे, उपदेष्ट्याचें काम सर्व जगाचें कल्याण निष्कामबुद्धीनें करणाऱ्या परमेश्वरस्वरूपी श्रीकृष्णांकडे आल्यामुळें या ग्रंथाविषयीं इतकी श्रद्धायुक्त पूज्यबुद्धि होत, विषयाची मांडणी इतकी सुबोध झाली आहे, एकंदरीनें सर्वगुणसंपन्नत्व या ग्रंथाचे ठायीं इतकें परिपूर्ण रीतीनें भरलेलें आहे, कीं त्या वेळच्याचशा काय परंतु त्या कालानंतर उत्पन्न झालेल्या व होणाऱ्या सर्व लोकांस व विशेषत: सुविचारी तत्वज्ञांस या बिनमोल ग्रंथानें तल्लीन करून सोडलें आहे, व सोडीलही. हिंदुस्थानांत जें कांहीं अत्युत्कृष्ट ग्रंथ झाले त्यांतच तीन ग्रंथ पहिल्या पायरीचे आहेत अशी समजूत आहे **उपनिषदें ब्रह्मसूत्रें** आणि **भगवद्गीता** हे ते तीन ग्रंथ होत. न्यायमूर्ती तेलंग यांचें असें ह्मणणें आहे कीं, हा ग्रंथ उपनिषत्कालींच किंवा थोडा आगेमागे असा झाला असावा. हें मत खरें किंवा तदितर आहे हें बघण्याचें हें स्थळ नव्हें. मला एवढेंच ह्मणावयाचें आहे कीं, अतिप्राचीनकाळापासून तों आजपर्यंत या ग्रंथाची महती अव्याहत चालत आलेली आहे. वर जी ग्रंथत्रयी सांगितली तीस **प्रस्थानत्रयी** ह्मणतात. या प्रस्थानत्रयीवर ज्यानें स्वतंत्र भाष्य लिहिलें त्यासच **आचार्य**त्वाची पदवी मिळत जात्री असा पूर्वकाळीं संप्रदाय असे. या कारणामुळें **जगद्गुरुशंकराचार्य**, विशिष्टाद्वैती **रामानुज**, द्वैतवादी **मध्व**, त्याप्रमाणें **वल्लभाचार्य** इत्यादि अनेक बुद्धिकुशल महापुरुषांनीं आपलें चातुर्यसर्वस्व ही प्रस्थानत्रयी स्पष्ट करण्यामध्यें खर्च केलें आहे. अलीकडेही **ज्ञानेश्वर** महाराजांनीं आपल्या प्रासादिक वाणीनें गीतारहस्याची फोड करून सांगितली आहे; महा-

पंडित **वामन** यांनींही आपली भगवद्गीतेविषयींची प्रेमबुद्धि **यथार्थदीपिकेच्या** द्वारानें प्रकट केली आहे; भक्तिपंथाचे अध्वर्यू **तुकाराममहाराज;** कविवर्य **मोरोपंत** यांनींही गीतेचा अर्थ स्पष्ट करण्यासाठीं अभंग व आर्या इत्यादि मनोहर-महाराष्ट्रीय सरस्वती देवीस प्रेमानें आळविलें आहे; आणि दोहानामक मनोहर वृत्तामध्यें रामभक्त प्रसिद्ध **तुलसीदास** महाराजांनीं गीतेच्याद्वारें हिंदुस्थानी भाषेस गौरव आणिलें आहे. असो; अगदीं अलीकडे रा. ब. **पाळंदे** वगैरे कवींनीं साकी वृत्तास गीतेच्या अर्थानें सुशोभित केलें आहे. सारांश ज्याला म्हणून बुद्धि आहे व त्या बुद्धीचा मुमुक्षु लोकांस उपयोग व्हावा अशी ज्याची इच्छा आहे त्यानें गीताग्रंथ स्पष्ट करण्याचा प्रयत्न अद्यापीही चालविला आहे. गुजराथेंतील प्रसिद्ध भाषाज्ञानी **द्वीवेदी**—जे आपल्या राष्ट्राच्या नष्टचर्यामुळें नुकतेच कैलासवासी झाले—त्यांनीं गीतेवर उत्कृष्ट पुस्तक गुजराथी भाषेंत लिहिलें आहे, तसेंच बंगाल्यांत, मद्रासेकडे, किती ग्रंथ झाले आहेत याचा अंदाजही बरोबर करवत नाहीं. शिवाय **मधुसूदनी, शंकरानंदी, श्रीधरी नीलकंठी, परमार्थप्रपा** इत्यादिकांचा मीं उल्लेख केला नाहींच आहे! आणि शेवटीं इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, इटालियन, ग्रीक व लॅटिन भाषांत या ग्रंथांचीं भाषांतरें झालीं आहेत त्या संबधानेंही मीं येथें अवाक्षर काढीत नाहीं! तात्पर्य हें आहे कीं, हा ग्रंथ सर्व बुद्धिमान् पुरुषांच्या बुद्धीला विषयच होऊन बसला आहे. शिवाय आपल्या या लहानशा महाराष्ट्र देशांत गीतेचा पाठ भक्तिपुरःसर करणारे किती तरी भाविक लोक सांपडतील! शेवटीं सांगावयाचें हें कीं फार प्राचीन काळापासून सर्वांच्या भक्तीला व पूज्यतेला विषय होऊन बसलेला जो गीताग्रंथ त्याची जी ही इतकी महती झाली आहे ती या भगवत्प्रणीत ग्रंथांत अनंत काळपर्यंत अबाधित्वानें अखंड राहणाऱ्या सत्य सिद्धांताचा व नीतिमीमांसेचा उत्कृष्ट विचार झाला आहे, म्हणूनच झाली आहे. हें तत्त्व जर निर्मळ मनाचे वाचकांस पूर्णपणें अवगत होईल व या ग्रंथाविषयीं ज्ञानपूर्वक भक्ति उत्पन्न होईल तर वरील त्रोटक विवेचनाचें सार्थक्य झालें असें मी समजेन.

## प्रस्तुत प्रयत्नाचा उद्देश.

असल्या सर्वतोपरी महत्त्वाच्या ग्रंथांचें व त्यावरील अद्वैतमत प्रतिपादक शांकरभाष्याचें यथामति भाषांतर करून हा ग्रंथ लिहितां वाचतां

येणाऱ्या सर्व महाराष्ट्रीय मुमुक्षूंच्या हातीं पडावा ह्या इच्छेनें मीं हें महत्प्रयासाचें, परंतु मनास आनंद देणारें काम पतकरिलें आहे. हें काम पतकरण्याचा उद्देश काय हें थोडक्यांत सांगतों. ' कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें याविषयीं सद्यःकाळीं सर्वत्र घोंटाळा झालेला दिसत आहे. पूर्वी जीं कर्तव्यें ह्मणून मानलीं जात असत त्यांच्याविषयीं अनेक कारणांनीं अश्रद्धा उत्पन्न होऊन अमुक गोष्ट कां करावी व अमुक गोष्ट कां करूं नये याबद्दल प्रत्येक समंजस मनुष्यास आपल्या मनाशीं व इतर लोकांबरोबर वादविवाद करण्यास सिद्ध झाला आहे. पूर्व संस्कारांच्या योगानें कांहीं गोष्टी जरी हौसेनें करितो, तथापि कांहीं राजभयास्तव व लोकभयास्तव करितो, त्या त्या कर्तव्याचें स्वरूप, गुणधर्म व उत्पत्तिमीमांसा न कळल्यामुळें केवळ समाजाचा क्षोभ होऊं नये ह्मणून तो समाजप्रणीत कर्तव्यें करितोसा दिसतो; म्हणजे त्याचें आचरण सामान्यतः समाजास क्षोभ उत्पन्न होईल असें बाह्यतः तरी नसतें. पण अंतर्यामामध्यें प्रत्येक विचारी मनुष्याचा घोंटाळा होऊन गेलेला आहे; कोणता पुरुषार्थ साध्य करावयाचा त्याचा निश्चय न झाल्यामुळें मनास एक करावेसें वाटत आहे व समाज अन्य मार्गानें जा म्हणून सांगत आहे. शिवाय कांहीं कारणामुळें व पण विशेषतः हिंदुधर्माचें व हिंदु तत्त्वज्ञानाचें पूर्ण अज्ञान उत्पन्न झालें असल्यामुळें व मनामध्यें त्यांवर अश्रद्धा उत्पन्न झाल्यामुळें आर्यकालीन लोकांच्या समुहास जें समाजाचें संघटित स्वरूप प्राप्त झालें होतें, तें आजमित्तीस प्रायः नाहींसें होऊन—निदान समाजस्वरूप लुप्त तरी होऊन—बसलेलें आहे. हल्लींच्या जमावांत प्रत्येक व्यक्ति मानसिकरीत्या निरनिराळी झाली असून ती ती व्यक्ति आपल्या मात्र सुखाच्या पाठीमागें लागलेली दिसते. समाजाच्या विरुद्ध कोणी फारसें जात नाहीं, याचें कारण फक्त जमावांतील अनेक व्यक्तींची भीति हें होय. खरी निष्कपट प्रीति आज हिंदुसमाजांत वास्तव्य करीत आहे असें दिसत नाहीं. दुसऱ्याचें नुकसान बिनबोभाट करितां येईल तर आपल्या फायद्यासाठीं—आपल्या मनाच्या तरी, समाधानासाठीं—तें करण्यास आज किती लोक तयार होतील याचा अंदाज सुद्धां करवत नाहीं ! आपण आपला धर्म पाळतोंसें दिसतें, आपण पूर्वजांविषयीं केव्हां केव्हां अभिमान प्रकट करितोंसेंही दिसतें, तें देवावर अगर पूर्वजांवर

अतिरिक्त भक्तिं आहे ह्मणून नव्हे, तर ती भक्ति जिव्हेनें प्रकट केली असतां सद्यःकालीं आपल्यास कोणता फायदा होईल या धोरणावर सामान्यतः प्रकट केली जात आहे.

वर केलेलीं विधानें सर्वांशीं खरीं आहेत असें मी ह्मणत नाहीं. पण लिहिण्यास दुःख वाटतें कीं, हीं विधानें सामान्यतः खरीं आहेत, असें ह्मणण्याचा अप्रिय प्रसंग माझ्यावर येऊन पडला आहे. दुःखांत सुख इतकेंच आहे कीं, हिंदुजातीच्या जीवज्योतीचा उगम उत्तम पायावर स्थापित झाला असल्यानें ती जाति कधीं नाहींशी होईल अशी शंका सुद्धां येत नाहीं. हें विधान अवास्तव नाहीं; याचें प्रत्यंतर पहावयाचें झाल्यास हल्लींच्या सर्वतोपरि दीन झालेल्या स्थितींतसुद्धां कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें ह्याबद्दल प्रत्येक व्यक्तीच्या मानसिक रणांगणावर जें प्रखर युद्ध चाललें आहे तेंच होय. आज या युद्धाला कोठें आरंभ मात्र झाला आहे. आणि अशी आशा करण्यास सबळ कारणें आहेत कीं जसजसा ज्ञानाचा प्रकाश विशेष फांकत जाईल तसतशी कर्तव्यसीमा वाढत जाऊन पुरुषार्थस्वरूप यथास्थित कळूं लागेल, व निष्कामबुद्धीनें सात्त्विक कर्तव्य करण्याविषयीं उत्साह उत्पन्न होईल. हल्लींच्या जमावास समाजस्वरूप येऊन सर्व व्यक्ति प्रेमाकर्षणानें बद्ध होऊन जातील, आणि शेवटीं आमची जाति सुरक्षित ठेवून तिचे हातून विश्वाच्या उद्धाराचें महत्कार्य घडून यावयाचें आहे तेंही सफल होईल. ही आशा सृष्टिक्रमावरून उघड रीतीनें दिसून येणाऱ्या ईश्वरी संकेतानुरूप आहे असें मला वाटतें. ‘ इहलोकीं मनुष्यानें कोणता पुरुषार्थ साध्य करावयाचा, तो साध्य करण्याची सर्वांस सुलभ सुसाध्य अशी नीति कोणती व हीच नीति सर्वांत श्रेष्ट कां आहे. ! ’ इत्यादि अत्यंत महत्त्वाच्या विषयांचा या ईशप्रणीत ग्रंथांत सोपपत्तिक विचार आहे; ह्मणून या ग्रंथाचें रहस्य या ग्रंथाचें स्पष्टीकरण करण्यासाठीं अनेक बुद्धिमान महापुरुषांनीं केलेलीं भाष्यें व टीका आणि या ग्रंथांतील सिद्धांतांस इतर देशांतील कांहीं महापुरुषांच्या विचारांचा पुरावा इत्यादि विषय प्रस्तुतच्या मासिक पुस्तकांत आणावे आणि खऱ्या पुरुषार्थाचें स्वरूप ठरवून व कर्तव्यबुद्धि जागृत करून ती निश्चित व दृढ करावी या उद्देशानें, मीं हा प्रयत्न करण्याचा संकल्प केला आहे. ‘आपण कोण, आपण आलों कोठून,

आपल्या सभोंवतीं दिसतें हें काय आहे आणि आपल्यास जावयाचें कोठें ?' इत्यादि अनेक गूढ प्रश्न प्रत्येक विचारी मनुष्यांच्या मनांत घोळत असतात. ह्या प्रश्नांस सयुक्तिक व समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं तर त्या मनुष्याची रात्रंदिवस तळमळ होत असते. '**कस्त्वं**' ( तूं कोण ? ) '**कुत आयातः**' ( कोठून आलास ! ) *whence oh whither* ( कोठून आलों आणि कोठें जावयाचें ? ) ह्या प्रश्नांस जर हल्लींच्या माझ्या प्रयत्नानें कांहीं सयुक्तिक उत्तर मिळेल तर मनाची वरील तळमळ नाहींशी होऊन गाढ निद्रेमध्यें घोरत पडलेली आपली कर्तव्यबुद्धि जागृत होईल असें मला वाटत आहे; म्हणून या कष्टमय दुस्तर महासागरामध्यें परमेश्वराच्या दयालुत्वावर पूर्ण भरंवसा ठेवून मीं उडी घातली आहे; आणि फलाची विशेषशी अपेक्षा न ठेवतां केवळ आपलें कर्तव्य म्हणून ही गोष्ट आपल्या अल्पमतीनें साध्य करावयाची खटपट चालविली आहे. असो; ज्या परमेश्वरानें केवळ इच्छामात्रेंकरून हें अखिल जग निर्माण केलें व कांहीं प्रयोजन नसतांही जो या जगाची सुस्थिति असावी म्हणून मुमुक्षुजीवांस अनेक प्रकारें साहाय्य करीत आहे असें स्पष्ट दिसतें, त्या सर्वज्ञ प्रभूच्या कृपालवावर समग्र भिस्त ठेवून व त्याचें अनन्यभावानें स्मरण करून मीं आपलें कर्तव्य करावयास लागतों.

चिं. गं. भानु.

श्रीगणेशाय नमः

# श्रीमद्भगवद्गीता.

## आचार्यांचा उपोद्घात.

### श्रीवासुदेवाय नमः

श्रीवासुदेवास नमस्कार असो.

**ॐनारायणः परोऽव्यक्तादण्डमव्यक्तसंभवम् ॥**
**अण्डस्यान्तस्त्विमे लोकाः सप्तद्वीपा च मेदिनी ॥ १ ॥**

श्रीपरब्रह्म नारायण जो आहे तो अव्यक्ताच्या ( स्पष्ट न झालेले विश्वाचें आदि*तत्त्व; यालाच कोणी माया ह्मणतात. ) पलीकडचा आहे. अव्यक्ताहून नारायण श्रेष्ठ आहे. तें एकच तत्त्व सर्व विश्व भरून राहिलेलें आहे. त्या अव्यक्तापासून हिरण्यगर्भ नांवाचें अंड ( ब्रह्मांड ) उत्पन्न झालें. या अंडामध्येंच सप्तस्वर्ग, सप्तपातालें व जिच्यावर जंबू आदिकरून सात द्वीपें आहेत अशी पृथ्वी, हीं उत्पन्न झालीं—सारांश सर्व ब्रह्मांडाचा उत्पादक व नायक श्रीनारायण त्याचें स्मरण करून आचार्यांनीं हें मंगलाचरण केलें आहे. मंगलाचरण केलें असतां सर्व विघ्नांचा निरास होऊन शास्त्रोक्त अशा इष्ट कार्याची सिद्धि होते.—

स भगवान्सृष्टवेदं जगत्तस्य च स्थितिं चिकीर्षुर्मरीच्यादीनग्रे सृष्ट्वा प्रजापतीन्प्रवृत्तिलक्षणं धर्मं ग्राहयामास वेदोक्तम् । ततोऽन्यांश्च सनकसनन्दनादीनुत्पाद्य निवृत्तिलक्षणं धर्मं ज्ञानवैराग्यलक्षणं ग्राहयामास ।

---

* *Homogeneous matter.*

त्या भगवंतानें हें अखिलब्रह्मांड उत्पन्न केलें. नंतर ह्या ब्रह्मांडाची व्यवस्था चांगल्या प्रकारची राहावी या हेतूनें प्रथमतः **मरीच्यादिक** प्रजापती उत्पन्न करून त्यांस वेदप्रणीत प्रवृत्तिधर्माची ( कर्ममार्गाची ) दीक्षा दिली. आणि कर्ममार्ग पृथ्वीवर सुरू करावा अशी आज्ञा केली. नंतर दुसरें **सनकसनंदनादिकांस** उत्पन्न करून त्यांस निवृत्तिमार्गाचा ( ज्ञानमार्गाचा, आत्मानात्मविचार करितां येतो अशा अध्यात्मज्ञानाच्या धर्माचा ) उपदेश केला. आत्मस्वरूपाचें ज्ञान होणें आणि इच्छाजन्य कर्मापासून मार्गे फिरणें अशीं या निवृत्तिधर्माचीं लक्षणें आहेत.—हा वैराग्य उत्पन्न करणारा ज्ञानमार्ग शिकवून परमेश्वरानें सनकादिकांच्या करवीं निवृत्तिपंथ पृथ्वीवर सुरू करविला.

> द्विविधो हि वेदोक्तो धर्मः । प्रवृत्तिलक्षणो निवृत्तिलक्षणश्च । जगतः स्थितिकारणं प्राणिनां साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मो ब्राह्मणाद्यैर्वर्णिभिराश्रमिभिश्च श्रेयोर्थिभीरनुष्ठीयमानः । दीर्घेण कालेनानुष्ठानतॄणां कामोद्भवाद्धीयमानविवेकविज्ञानेहतुकेनाधर्मेणभिभूयमाने धर्मे प्रवर्धमाने चाधर्मे जगतः स्थितिं परिपिपालयिषुः स आदिकर्ता नारायणाख्यो विष्णुर्भौमस्य ब्रह्मणो ब्राह्मणत्वस्य रक्षणार्थं देवक्यां वासुदेवादंशेन किल संबभूव । ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मस्तदधीनत्वाद्वर्णाश्रमभेदानाम् ।

वेदामध्यें दोन प्रकारचा धर्म सांगितला आहे. एक प्रवृत्तिमार्ग व दुसरा निवृत्तिमार्ग; ( म्हणजे कर्ममार्ग पहिला व ज्ञानमार्ग दुसरा असे दोन प्रकारचे धर्म वेदानें प्रणीत केले आहेत, किंवा सांगितले आहेत. )—आतां धर्म म्हणजे काय याचें आचार्य उत्तर सांगतात.--जगाची व्यवस्था जेणेंकरून उत्तमप्रकारची चालते व ज्याच्या योगानें प्राण्यांस उत्तमप्रकारचे साक्षात् सुख मिळून शेवटीं मोक्ष मिळतो तो धर्म होय. या धर्माचें परिपालन कल्याणेच्छु ब्राह्मणादि चारही वर्णांनीं व ब्रह्मचारी गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यासी या चारही आश्रमांतील लोकांनीं चालविलें होतें. परंतु पुष्कळ काळ लोटल्यानंतर वर्णाश्रमांतील लोकांमध्यें कामविकार अगर स्वार्थाची इच्छा उत्पन्न झाल्यामुळें त्यांची विचारशक्ति व अनुभवज्ञान हीं दोन्हीं कमी कमी होत जाऊन अज्ञानानें धर्माचा र्‍हास होत

चालला व अधर्माचा प्रसार होऊं लागला. ही स्थिति पाहून जगाची स्थिति व पोषण हीं दोन्हीं उत्तम असावीं अशी इच्छा सदोदित बाळगणाऱ्या व सर्वांचें आदिकारण असणाऱ्या जगन्नायक नारायणाला अवतार घ्यावा अशी इच्छा झाली. आणि त्या नारायण नामक विष्णूनें वसुदेवापासून देवकीच्या उदरांत जन्म घेतला. हा अवतार नारायणाच्या एका अंशानें मात्र झाला. अवतार घेण्याचें कारण वर सांगितलेंच आहे कीं मोठ्या व अतिविस्तृत ब्रह्माचें म्हणजे ब्राह्मणत्वाचें रक्षण करण्यासाठीं परमेश्वरानें जन्म घेतला. ब्राह्मणत्वाचें रक्षण केलें म्हणजे अर्थातच दोन्ही प्रकारच्या वेदप्रणीत धर्मांचें रक्षण केल्यासारखें होतें. ब्राह्मणत्वामध्येंच सर्व वर्णांच्या व आश्रमांच्या धर्मांचा अंतर्भाव होत असतो व त्याच्या स्वाधीनच वर्णाश्रम असतात ह्मणून ब्राह्मत्वाचें रक्षण करण्याविषयीं परमेश्वराचा संकल्प झाला.

स च भगवाञ्ज्ञानैश्वर्यशक्तिबलवीर्यतेजोभिः सदा संपन्नस्त्रिगुणात्मिकां वैष्णवीं स्वां मायां मूलप्रकृतिं वशीकृत्याजोऽव्ययो भूतानामीश्वरो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावोऽपि सन्स्वमायया देहवानिव जात इव लोकानुग्रहं कुर्वन्निव लक्ष्यते । स्वप्रयोजनाभावेऽपि भूतानुजिघृक्षया वैदिकं हि धर्मद्वयमर्जुनाय शोकमोहमहोदधौ निमग्नायोपदिदेश । गुणाधिकैर्हि गृहीतोऽनुष्ठीयमानश्च धर्मः प्रचयं गमिष्यतीति । तं धर्मं भगवता यथोपदिष्टं वेदव्यासः सर्वज्ञो भगवान्गीताख्यैः सप्तभिः श्लोकशतैरुपनिबबन्ध ।

जो सदासर्वदा, ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बळ, तेज व वीर्य या सहा गुणांनीं ओतप्रोत भरलेला आहे, त्या भगवंतानें आपल्या स्वाधीन असणारी जी मूळप्रकृति ( इलाच आदिमाया म्हणतात ) तिला वश करून घेतलें. ही माया त्रिगुणात्मक ह्मणजे सत्त्व, रज व तम या तिन्ही गुणांनीं भरलेली आहे. ह्याप्रमाणें त्रिगुणात्मक आदिमायेला वश करून घेऊन परब्रह्म भगवान मनुष्याप्रमाणें देह धारण केल्यासारखें दाखवून व जन्म घेतल्यासारखें करून लोकांवर अनुग्रह करण्याचीं कृत्यें केल्यासारखें दाखविते झाले ! असें म्हणण्याचें कारण उघड आहे. पहा; ज्याला जन्म

नाहीं, मरण नाहीं, जो सर्वांचा कर्ता व करविता, जो नित्य, शुद्ध, बुद्ध, आणि मुक्त आहे; म्हणजे जो सर्वकाल राहणारा आहे, जो सर्वज्ञ आहे, जो स्फटिकासारिखा निर्मळ आहे व निर्लेप आहे आणि जो सदाच मुक्त आहे, व पुनः षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा भगवंतानें जन्म घेऊन व देह धारण करून लोकांवर अनुग्रह करावा, वगैरे गोष्टी संभवत नाहींत. म्हणून मायेच्या साहायानें देह धारण केल्यासारखें करून वगैरे म्हटलें आहे. जन्म न असणाऱ्यानें जन्म घेतला असा भास होणें, ही माया होय. (मायेलाच भ्रांति वगैरे नांवें आहेत.) असो; या भगवंताला स्वतः कर्म करण्याचें कांहीं कारण नसतांही केवळ प्राणीमात्रांवर दया करण्याच्या हेतूने वैदिक धर्मद्वयाचा उपदेश श्रीकृष्णांनीं अर्जुनास केला. या वेळीं अर्जुन हा शोक व मोह यांच्या समुद्रांतच जणू काय बुडून गेला होता. त्याला तारण्यासाठीं व त्याच्या अनुषंगानें सर्व त्रैलोक्यांतील लोक तरतील या बुद्धीनें हा उपदेश केला आहे. अर्जुनासच उपदेश करण्याचें कारण हें कीं, चांगल्या गुणी माणसाला धर्माचा उपदेश केल्यावर तो त्यास समजला व त्याप्रमाणें तो चालायला लागला म्हणजे धर्माचा प्रसार लवकर होतो.—उच्चस्थानीं दिवा लावला म्हणजे जसा सर्वत्र प्रकाश पडतो त्याप्रमाणेंच बुद्धिमान् मनुष्यास उपदेश केला म्हणजे तो उपदेश पुष्कळांस केल्याचें श्रेय येतें.—असो. सर्वज्ञ व भूत—भविष्य—वर्तमान जाणणारे वेदव्यासांनीं, अर्जुनास कृष्णांनीं जो ह्या धर्माचा उपदेश केला त्याचेच सातशें श्लोक केले आहेत; व भगवंताच्या उपदेशाचे सर्व सार आणिलें आहे.—त्या श्लोकांस गीताशास्त्र असें म्हणतात.

तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं दुर्विज्ञेयार्थम् । तदर्थाविष्करणायानेकैर्विवृतपदपदार्थवाक्यार्थन्यायमप्यत्यन्तविरुद्धानेकार्थत्वेन लौकिकैर्गृह्यमाणमुपलभ्याहं विवेकतोऽर्थनिर्धारणार्थं संक्षेपतो विवरणं करिष्यामि ।

ह्या गीताशास्त्रांत सर्व वेद व वेदांत यांच्या रहस्याचा ( वेदांतसाराचा ) संग्रह झाल्यामुळें तें शास्त्र समजण्यास अति कठिण झालें आहे. या शास्त्रांचा अर्थ स्पष्ट करावा ह्मणून आजपर्यंत अनेक प्राचीन व्याख्यानकारांनीं* गीतेच्या

*व्याख्यान म्हणजे—' पदच्छेदः पदार्थोक्तिर्विग्रहो वाक्ययोजना ।
आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् ' ॥

श्लोकांतील पदें ( शब्द ) शब्दार्थ वाक्यार्थ सांगून व असा अर्थ कां, असा कां नाहीं, असल्या शंकांचे समाधान करून जरी एकंदर ग्रंथाचें हृद्गत उत्तम तऱ्हेनें सांगितलें आहे, तथापि सामान्य लोकांच्या समजुती अज्ञानानें व खोट्या ज्ञानानें मलीन झालेल्या असल्यामुळें त्यांच्या मनांत एकाच श्लोकाचे अनेक अर्थ किंवा एकाच ग्रंथांतील श्लोकांचे परस्परविरुद्ध अर्थ येतात व त्यामुळें एकंदर ग्रंथाचें रहस्य त्यांस समजत नाहींसें झालें आहे, हें मला माहीत असल्यामुळें मी आतां थोडक्यांतच संगतवार आणि एकाच तत्त्वावर स्थापित केलेलें असें, अर्थ स्पष्ट करणारें एक भाष्य करावयास लागतो.— हें भाष्य वाचल्यावर सामान्य वाचकांचा गोंधळ होतो तो नाहींसा होऊन गीतारहस्य त्यांस उत्तम प्रकारें समजेल.

तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्यात्यन्तोपरमलक्षणम् । तच्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठारूपाद्धर्माद्भवति । तथेममेव गीतार्थधर्ममुद्दिश्य भगवतैवोक्तम्—

'स हि धर्मः सुपर्याप्तो ब्रह्मणः पदवेदने ' इत्यनुगीतासु ।

तत्रैव चोक्तम्—

"नैव धर्मी न चाधर्मी न चैव हि शुभाशुभी ।

यः स्यादेकासने लीन स्तूष्णीं किंचिदचिन्तयन् "

"ज्ञानं संन्यासलक्षणम् " इति च ।

इहापि चान्त उक्तमर्जुनाय—'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' इति । अभ्युदयार्थोऽपि यः प्रवृत्तिलक्षणो धर्मो वर्णाश्रमांश्चोद्दिश्य विहितः स देवादिस्थानप्राप्तिहेतुरपि सन्नीश्वरार्पणबुद्ध्याऽनुष्ठीयमानः सत्वशुद्धये भवति फलाभिसंधिवर्जितः। शुद्धसत्वस्य च ज्ञाननिष्ठायोग्यताप्राप्तिद्वारेण ज्ञानोत्पत्तिहेतुत्वेन च निःश्रेयसहेतुत्वमपि प्रतिपद्यते। तथा चेममेवार्थमभिसंधाय वक्ष्यति ' ब्रह्मण्याधाय कर्माणि ' ' योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ' इति ।

ह्या गीताशास्त्राचा उद्देश थोडक्यांत सांगावयाचा ह्मणजे अत्युत्कृष्ट जो मोक्ष तो मिळावा व सहेतुक संसार ह्मणजे पापपुण्यात्मक कर्मांच्या योगानें

उत्पन्न होणारा जो संसार त्याचा समूळ विनाश व्हावा असा आहे. हा इष्ट हेतु अगर पुरुषार्थ साध्य करून घ्यावयाचा असेल तर आपण जीं जीं कर्में करितों तीं तीं निष्कामबुद्धीनें व ईश्वराला अर्पण करण्याच्या हेतूनें करून नंतर आत्मज्ञानाचे ठायीं अनन्य निष्ठा ठेवावयांस पाहिजे. गीताशास्त्रांत हेंच तत्त्व सांगितलें आहे. ह्या तत्त्वास अनुलक्षून प्रत्यक्ष भगवानच '*अनुगीता' नामक गीतेमध्यें बोलले आहेत:—

'ब्रह्मपदाची प्राप्ति करून देण्याला हाच एक धर्म कायतो समर्थ आहे.

पुन: अनुगीतेमध्येंच म्हटलें आहे:—

'जो धर्माप्रमाणें वागत नाहीं, किंवा अधर्माप्रमाणेंही वागत नाहीं; ज्याला शुभाशुभ ( चांगलें अगर वाईट ) असें कांहींच नाहीं; जो एकासनावर बसून वाचा, नेत्र, कर्ण इत्यादि इंद्रियांचे व्यापार नष्ट करितो व जो अंतः-करणाचेही सर्व व्यापार नाहींसे करितो तोच ब्रह्मस्वरूपामध्यें अंतर्भूत होऊन जातो' ( ह्मणजे जो रात्रंदिवस ब्रह्मचिंतनाचे पाठीमागें लागला त्याचे सर्व प्रकारचे व्यापार बंद होतात, त्याला धर्माची किंवा अधर्माची गरज न राहून चांगलें वाईट हें निवडीत बसण्याचीही आवश्यकता राहत नाहीं. असा ज्ञानी मनुष्य जिवंत असतांनाच मुक्त होतो व देहत्याग झाल्यानंतर जेथें अत्यंत आनंद आहे अशा ब्रह्मस्वरूपामध्यें जाऊन मिळतो. )

आणखी एकदा म्हटलें आहे. 'कर्माच्या फळाची अपेक्षा न ठेवून उत्पन्न झालेलें जें ज्ञान तें ब्रह्मज्ञान' ( त्याच्या योगानें मोक्षप्राप्ति होते. कर्म टाकून देणें यालाही संन्यास ह्मणतात. कर्म न करणें व कर्मफलाची अपेक्षा न ठेवणें, यांत पुष्कळ फरक आहे; तरी दोहोंस संन्यास म्हणतां येतें. )

येथेंही गीताशास्त्राच्या शेवटीं शेवटीं श्रीभगवंतांनीं अर्जुनास ( अध्याय १८ श्लोक ६६ मध्यें ) सांगितलें आहे कीं, 'सर्व प्रकारचें धर्माचा त्याग करून मला मात्र अनन्यभावानें शरण ये.' तसेंच ब्राह्मणक्षत्रियादि चार वर्ण आणि मागें सांगितलेलें चार आश्रम, या सर्वांचें कल्याण होण्यासाठीं स्थापन केलेला जो प्रवृत्तिधर्म ( कर्मयोग ) सांगितला आहे, त्याच्या योगानें स्वर्गलोकाची प्राप्ति होते व होईल हें खरें. तथापि फलाची अपेक्षा ( इच्छा ) न ठेवतां सर्व

---

* ही गीता भगवंतांनीं अर्जुनास भारतीयुद्ध आटपल्यावर सांगितली.

कर्म ईश्वरास अर्पण केलें तर याच कर्ममार्गाचें योगानें अंतःकरणाची शुद्धि होते. ( आपलें मन निर्मळ होतें ) चित्तशुद्धि झालेल्या मनुष्यास आत्मज्ञानाचे ठिकाणीं निःसीम भक्ति उत्पन्न झाल्यावर तें समजण्याची योग्यता प्राप्त होऊन त्या ज्ञानरूपी भक्तीच्या व अधिकाराच्या द्वारानें आत्मज्ञान प्राप्त होतें; आणि आत्मज्ञानाचें संपादन झालें ह्मणजे अत्यंत आनंदाचें स्थान जो मोक्ष तोही प्राप्त होतो; ( सारांश, मी अमुक कर्म करीत आहे, त्याचें मला अमुक फल मिळावें, ही आशा सोडून देऊन आपण सर्व कर्मे परमेश्वरास समर्पण केलीं ह्मणजे आपलें मन निष्पाप होऊन व आत्मज्ञान मिळण्याचा अधिकार प्राप्त होऊन तेंही ( आत्मज्ञान ) होतें व पुढें मोक्ष मिळतो. एवंच कर्ममार्ग अनुसरला असतांही वर सांगितल्याप्रमाणें निष्काम कर्मीही मोक्षास अधिकारी होतो. ) ह्याच अर्थ दृढ करण्यासाठीं भगवान ह्मणतातः—' सर्व कर्मे ब्रह्माला अर्पण करून, ( भ. गी. अध्याय ५ श्लोक १० ) ' सर्व प्रकारची आसक्ति सोडून देऊन योगी लोक आत्मशुद्धीसाठीं कर्म करितात ( भगवद्गीता अध्याय ५ श्लोक ११ ).

इमं द्विप्रकारं धर्मं निःश्रेयसप्रयोजनं परमार्थतत्त्वं च वासुदेवाख्यं परं ब्रह्माभिधेयभूतं विशेषतोऽभिव्यञ्जयद्विशिष्टप्रयोजनसंबन्धाभिधेयवद्गीताशास्त्रम् । यतस्तदर्थे विज्ञाते समस्तपुरुषार्थसिद्धिरित्यतस्तद्विवरणे यत्नः क्रियते मया ।

याप्रमाणें हा दोन प्रकारचा वेदोक्त धर्म ( प्रवृत्तिमार्ग व निवृत्तिमार्ग ) अत्युत्तम रीतीनें सांगणारें हें गीता शास्त्र आहे. याच्या योगानें वासुदेव नामक उत्कृष्ट सत्यवस्तूचा लाभ होऊन शेवटीं मोक्ष मिळतो. असो. या गीताशास्त्राचा विशेष उद्देश काय आहे, संबंध कसा आहे, व नांव काय इत्यादि सर्व सांगितलें. ( कोणताही ग्रंथ लिहितांना तो लिहिण्याची अवश्यकता, त्याचा संबंध त्याचें नांव व तो वाचण्यास अगर ऐकण्यास अधिकारी कोण, हें सांगण्याचा प्रघात आहे. या चतुष्टयास ' अनुबंधचतुष्टय ' असें नांव आहे. हें गीताशास्त्र ऐकण्याचा सर्वांसच अधिकार आहे ह्मणून अधिकाऱ्यांचा आचार्यांनीं उल्लेख केला नाहीं. ) आतां धर्म, अर्थ, काम मोक्ष हे चारही पुरुषार्थ, ह्या गीताशास्त्राचा अर्थ समजला असतां साध्य होतात म्हणून त्या उत्तमोत्तम शास्त्राचा अर्थ स्पष्ट करण्याचा प्रयत्न मी करीत आहें.

# अथ प्रथमोऽध्यायः ।

धृतराष्ट्र उवाच—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

**पदांसह अन्वय व अर्थ**

**धृतराष्ट्र विचारतो, संजय** ( संजया ) **धर्मक्षेत्रे** ( पवित्र आहे जेथील स्थल, धर्माचरण करण्यास जी उत्तम जागा, अशा ) **कुरुक्षेत्रे** ( कुरुक्षेत्रामध्यें) **समवेताः** (जमलेले असे ) **युयुत्सवः** ( युद्ध करण्याची इच्छा धारण केलेले) **मामकाः** ( दुर्योधनप्रभृति माझे पुत्र व त्यांचे स्नेही ) **पांडवाश्चैव** ( आणि धर्मादि पंडूचे मुलगे व त्यांचे स्नेही हे ) **किं अकुर्वत** ( काय करिते झाले बरे ? )—कौरवपांडवांची गांठ पडल्यावर त्यांनीं काय केलें ?

**संजय उवाच—**

---

१ कौरवपांडवांच्या भारती युद्धाचा वृत्तांत व्यासाच्या आज्ञेनें संजय नामक सूतपुत्रानें जन्मांध धृतराष्ट्रास सांगितला आहे. जसजशी हकीकत झाली, तसतशी दिव्यदृष्टि संजयानें धृतराष्ट्रास निवेदन केली आहे. भारतांतच गीतेचा अंतर्भाव होतो म्हणून गीतावृत्तांतही संजयानेंच धृतराष्ट्रास सांगितला आहे.

२ कुरुक्षेत्र हें यमुना व सरस्वती या दोन नद्यांच्या मध्यें आहे. आर्यलोकांची वसति येथें पुष्कळ दिवसांपासून आहे. जगाच्या—निदान—हिंदुस्थानच्या इतिहासाची उलथापालथ करणाऱ्या अनेक लढाया येथें झाल्या, त्या इतिहासज्ञांस विदित आहेतच.

३ **मामकाः** ( माझे ) असें धृतराष्ट्रानें म्हटलें आहे. त्यावरूनच पुष्कळ टीकाकार असा तर्क काढतात कीं, पांडवांस तो शत्रुप्रमाणें लेखीत असे. ह्याचप्रमाणें धर्मक्षेत्र य शब्दावर व्याख्यान देतांना ‘ धर्मक्षेत्रामध्यें गेल्यामुळें दुर्योधनानें राज्याचा अर्धा वांटा धर्मास दिला कीं काय अशी भीति व धर्मराजानें आपला वारसाईचा हक्क सोडून दिला कीं काय अशी शंका धृतराष्ट्रास उत्पन्न झाली असावी, व या संशयानें घेरला गेल्यामुळें त्यानें हा प्रश्न विचारला असावा ! ’ असेंही कित्येक टीकाकार म्हणतात. या असल्या टीका म्हणजे निवळ पांडित्याचें प्रदर्शन होय, तेव्हां असल्या ओढून ताणून आणलेल्या अर्थाला मान न देतां जेथें संदर्भास अनुकूल असा अर्थ असेल व जेथें मनास विशेष चटका लाव-णारा अर्थ दिसेल तेथील स्थलांचा मात्र उल्लेख करण्याचें योजिलें आहे.

संजय म्हणालाः—

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ॥**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

**तदा** ( त्यावेळीं ) **पांडवानीकं** ( पांडवांची सेना ) **व्यूढं** ( युद्धासाठीं *व्यूह बांधून उभी राहिली आहे, अशी ) **दृष्ट्वा तु** ( भित्रेपणानें पाहून ) **राजा दुर्योधनः** ( दुर्योधन राजा ) **आचार्यं उपसंगम्य** ( गुरु द्रोणाजवळ जाऊन ) **वचनं** ( बोलणें, पुढील शब्द ) **अब्रवीत्** ( बोलता झाला. )

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ॥**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

**दुर्योधन म्हणालाः—आचार्य ! तव** ( तुझ्या ) **धीमता** ( बुद्धिमान् अशा ) **शिष्येण** ( शिष्य अशा ) **द्रुपदपुत्रेण** ( द्रुपदाचा पुत्र धृष्टद्युम्न त्यानें ) **व्यूढां** ( युद्धासाठीं व्यूह रचून तयार केलेली ) **एतां** ( ह्या ) **पाण्डुपुत्राणां** ( पांडवांच्या ) **महतीं** ( मोठ्या ) **चमूं** ( सेनेला ) **पश्य** ( पहा. ) दुर्योधनानें गुरुद्रोणास पांडवांची ती मोठी सेना दाखवून त्या सेनेचा अधिपति तुझाच शिष्य धृष्टद्युम्न आहे असें सांगितलें. तुझा शिष्यच सेनापति आहे यावरून आपल्यास जय मिळणें सुकर आहे असें दुर्योधन सुचवित आहे. **मधुसूदनी-टीकाकार** असा गूढार्थ काढतात कीं ' हे पांडवांच्या गुरो ! ही तुझी प्रिय शिष्यांची सेना पहा. हिचा अधिपति, तुला मारण्यासाठीं उत्पन्न झालेला तुझा शिष्य धृष्टद्युम्न आहे ! तो बुद्धिमान् आहे; कारण तुझ्या वैऱ्याचा पुत्र असूनही त्यानें तुझ्याकडून विद्या संपादन केली ! परंतु आपला वध करणारा जो द्रुपदपुत्र त्यास तूं विद्या शिकविलीस त्या तुला काय म्हणावें बरें ?' हा अर्थ येथें देण्याचें कारण इतकेंच आहे कीं आमचे विद्वान टीकाकार शब्दांची छाननी करून किती खोल अर्थ काढतात हें दाखवावयाचें आहे. स्वार्थासाठीं तक्षकासारखी धडपड करणारा व शकुनीमामाच्या तालमींत तयार झालेला आणि सर्व कपटविद्येंत निष्णात असा राजा दुर्योधन जीव जाणार

---

* सैन्याची जी एक विशेष व्यवस्था असते तिला व्यूह म्हणतात. युद्धशास्त्रांत नानाप्रकारचे व्यूह सांगितले आहेत. पांडवांनीं या वेळीं वज्रव्यूह रचिला होता असें महाभारतांत सांगितलें आहे.

किंवा राहणार अशा आणीबाणीच्या वेळीं गुरु द्रोणाचें मन प्रसन्न करून घेण्याच्या ऐवजीं त्यास या वेळेला वरील मर्मभेदक शब्द बोलला असेल तर त्याच्या सारखा मूर्ख कोणीच नसेल असें मला वाटतें. तात्पर्य घ्यावयाचें इतकेंच कीं बहुधा सरळ अर्थ घेणें हेंच अनेक प्रसंगीं इष्ट असतें.

**अत्र शूरा महाष्वेसा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**

पुढें दुर्योधन पुनः सांगतोः—

**अत्र** ( या शत्रुसैन्यामध्यें ) **शूराः** ( शूर ) **महेष्वासाः** ( मोठीं आहेत इष्वास ह्मणजे धनुष्यें ज्यांचीं असे ) **युधि** ( व रणांगणामध्यें ) **भीमार्जुनसमाः** ( भीम व अर्जुन यांच्या तोडीचे )—असे वीर पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें सांगतों.—**युयुधानः** ( सात्यकी ) **विराटः च** (विराट) **द्रुपदः** ( द्रुपदराजा ) **महारथः*** ( दहा हजार धनुर्धाऱ्याबरोबर एकदम युद्ध करणारा व धनुर्विद्येमध्यें प्रवीण असणारा त्यास महारथ म्हणतात. येथें द्रुपदराजालाच हें विशेषण लावलें आहे असें नाहीं. सात्यकी, विराट वगैरे सगळ्यांकडेच ह्या विशेषणाचा संबंध लावावा. )

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥**

**धृष्टकेतुः** ( चेदि राजा ) **चेकितानः** हे राजा, **काशीराजाः** हे वीर्यशाली राजे, **पुरुजित्** व **कुंतिभोज** हे उभयतां बंधु, **शैब्यराजा** हे सर्व नरश्रेष्ठ महावीर;

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान्**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

महापराक्रमी **युधामन्यु** व **उत्तमौजा,** त्याचप्रमाणें **सुभद्रातनय** अभिमन्यु, **द्रौपदीचे प्रतिविंध्यादि** पांच पुत्र हे **सर्व महारथी**—पांडवसेनेमध्यें दृष्टीस पडत आहेत.—

---

* एको दश सहस्राणि योधयेद्यस्तु धीर्यवान ।
शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥

दुर्योधनानें पांच पांडवांचीं नांवें सांगितलीं नाहींत, कारण तीं जगद्विश्रुतच होतीं. शिवाय त्यांच्या प्रीत्यर्थ व त्यांनीं उपस्थित केलेलें हें युद्ध होतें. पांड्य, घटोत्कचादि वीरांचा अंतर्भाव 'च' शब्दांत होतो.

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

**आणखी दुर्योधन ह्मणतोः—**

**द्विजोत्तम !** ( ब्राह्मणश्रेष्ठा ! ) **अस्माकं** ( आमच्याकडचे ) **तु** ( ही ) **विशिष्टाः** ( जे विशेष नांव घेण्यासारखे आहेत ) **तान्** ( त्यांना ) **निबोध** ( जाण. त्यांपैकीं कांहीं नांवें सांगतों तीं ऐक. ) **मम** ( माझ्या ) **सैन्यस्य** ( सेनेचे ) **नायकाः** ( जे सेनापती आहेत ) **तान्** ( त्यांना ) **ते** ( तुझ्या ) **संज्ञार्थं** माहितीसाठीं; ( संज्ञार्थं याचा अर्थ 'आमच्या सेनेंत अनेक महावीर आहेत, त्यांपैकीं कांहींचीं नांवें मासल्याकरितां, उदाहरणासाठीं, असाही करावा. **ब्रवीमि** ( बोलतों, सांगतों. ) --आपण सर्वज्ञच आहांत; पण मी माझ्या समाधानासाठीं हीं नांवें सांगतों. असा द्विजोत्तम या शब्दापासून परंपरेनें अर्थ निघूं शकतो.

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

**दुर्योधन सांगतोः—**

**भवान्** ( आपण ) **भीष्मश्च** ( आणि पितामह भीष्म ) **कर्णश्च** ( आणि अंगराजा कर्ण ) **समितिंजयः कृपः** ( रणामध्यें नेहमीं जय मिळविणारा कृपाचार्य ) **अश्वत्थामा, विकर्ण तथैव चः** ( त्याचप्रमाणें ) **सौमदत्ति, भूरिश्रवा बाल्हिक** राजा असे महावीर आपल्या सैन्यांत आहेत. '**तथैव चः**' या ठिकाणीं '**जयद्रथ**' असाही कोठें पाठ आहे.

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

**अन्ये च** ( आणखीही दुसरे ) **शूराः** ( शूर ) **मदर्थे त्यक्तजीविताः**

( माझ्यासाठीं प्राण देण्यास तयार झालेले म्हणजे प्राणांपेक्षांही माझें जास्त हित पाहणारे अगर प्राण देऊन माझें हित साधणारे ) **नानाशस्त्रप्रहरणाः** (अनेक प्रकारचीं शस्त्रें धारण करणारे; शस्त्र म्हणजे ज्यानें जखम होते तें. प्रहरण म्हणजे ज्यानें धक्का बसतो असें गदेसारखें आयुध.) **बहवः** (पुष्कळ आहेत) **सर्वे** (हे सर्वजण) **युद्धविशारदाः** ( युद्धाच्या शास्त्रामध्यें निष्णात, पंडित, आहेत. )

## अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
## पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

**दुर्योधन आचार्यास सांगतोः—**

**अस्माकं** ( आमचें ) **इदं** ( हें—अकरा अक्षौहिणी सैन्य— ) **पर्याप्तं** ( शत्रूचा पराभव करण्यास समर्थ आहे व ) **भीष्माभिरक्षितं** (भीष्मासारख्या महाधनुर्धरानें रक्षण केलेलें असें हें सैन्य आहे. ) **एतेषां** ( ह्या शत्रूंचें ) **तत्** ( तें; मागें सांगितलेलें ) **बल** (–सात अक्षौहिणी–सैन्य ) **अपर्याप्तं** ( आमचा पराभव करण्यास असमर्थ आहे व पुनः ) **भीमाभिरक्षितं** ( भीमासारख्या जडबुद्धीनें त्याचें आधिपत्य स्वीकारलें आहे. ]

ह्या श्लोकांचे अनेक अर्थ अपर्याप्त व पर्याप्त यांच्या अर्थांतराप्रमाणें होतात. अपर्याप्त याचे अपुरते, अशक्त व अनियामित, अमर्याद असे अर्थ होतात. याच्याच उलट पर्याप्त याचे अर्थ होतात. शिवाय तत् म्हणजे काय, ' अपर्याप्त ' कोणीकडे घ्यावे, वगैरे वाद पंडितांस योग्य आहेत. तात्पर्य घ्यावयाचें तें इतकेंच आहे कीं ' आमचें बल पांडवांचा पराभव करण्यास समर्थ असून आमच्या सैन्याचा नायक सकल धनुर्धरांत श्रेष्ठ आहे.

## अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः
## भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥११॥

**दुर्योधन शेवटची विनंति करितोः—**

**सर्वेषु** ( सर्व, सगळ्या ) **अयनेषु** ( उभे राहण्यासाठीं नेमून दिलेल्या स्थानावर ) **यथाभागं** ( आपापल्या नेमलेल्या जागीं ) **अवस्थितः** ( उभे

राहिलेले असे ) **भवन्तः सर्व एव हि** ( आपण सर्वही जणांनीं ) **भीष्ममेव** ( भीष्म सेनापतीलाच ) **अभिरक्षन्तु** ( रक्षण करण्यासाठीं सर्व प्रकारें झटावें. )

याचा इत्यर्थ इतकाच आहे कीं सेनेच्या सर्व उपनायकांनीं आपापल्या नियमित स्थानांवर खबरदारीनें उभे राहून भीष्म सेनापतींचें रक्षण करावें. कारण उघडच आहे कीं, सेनापतींचें रक्षण झालें म्हणजे आपल्यासारख्या तेजस्वी ब्राह्मणांच्या आशीर्वादानें आमचे सर्वांचें व आमच्या सेनेचें रक्षण होईल.

**तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥**

**राजा दुर्योधन भ्यालेल्यासारखा दिसत आहे असें पाहून:—**

**तस्य** ( दुर्योधनास, ) **हर्षं संजनयन्** ( हर्ष, आनंद, धीर व उत्साह उत्पन्न व्हावा अशी इच्छा करणारा ) **कुरुवृद्धः** ( सर्व कौरवकुळा-मध्यें वयानें वडील असणारा ) **पितामहः** ( व सर्व कौरवांचा आजोबा, भीष्म ) **प्रतापवान्** ( शत्रूस ताप देण्यामध्यें अति कुशल जो भीष्म तो ) **उच्चैः** ( मोठ्यानें ) **सिंहनादं विनद्य** ( सिंहासारखी गर्जना करून ) **शंखं** ( रणवाद्य विशेष, शंख ) **दध्मौ** ( फुंकिता वाजविता झाला. )— सिंहगर्जना करणें व शंख वाजविणें ह्या युद्धांतील विशेष चाली होत.—

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः।**
**सहसैवाभ्यहन्यंत स शब्दस्तुमलोऽभवत् ॥ १३ ॥**

**ततः** ( तदनंतर ) **शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः** ( हजारों शंख, भेरी, झांजा, शिंगें हीं सर्व ) **सहसैव** (एकदम, एककालींच ) **अभ्य-हन्यन्त** ( वाजविलीं गेलीं. हजारों रणवाद्यांचें एकच रणघोर वादन सुरू झालें. ) **सः शब्दः** ( तो शब्द ) **तुमुलः** ( फार मोठा, कानठळ्या बस-विणारा व भयंकर ) **अभवत्** ( झाला. )—सेनापतीनें शंख वाजवून सूचन केल्याबरोबर सर्व कौरवसैन्यांत रणवाद्यांची महाघोर गर्जना सुरू झाली: हें नीटच झालें.—

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ।**
**माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥**

**इकडे पांडव सैन्यांतः—**

**ततः** ( तदनंतर ) **श्वेतैर्हयैः** ( पांढऱ्या शुभ्र घोड्यांनीं ) **युक्ते** ( युक्त असणाऱ्या ) **महति** ( मोठ्या व बळकट ) **स्यंदने** ( रथामध्यें ) **स्थितौ** ( बसले आहेत दोघेजण ) **माधवः** ( लक्ष्मीपती श्रीकृष्ण ) **पाण्डवश्च** ( आणि पंडुकुमर अर्जुन हे उभयतां ) **दिव्यौ** ( दिव्य, अमानुष, स्वर्गीच्या लोकांस शोभणारे ) **शंखौ** ( शंख ) **प्रदध्मतुः** ( वाजविते झाले. )

## पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
## पौण्ड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥

**हृषीकेशः** ( इंद्रियांचा स्वामी श्रीकृष्णपरमात्मा, कुरळे केश असणारा असाही हृषीकेश याचा अर्थ आहे. ) **पाञ्चजन्यं** ( पंचजन नामक राक्षसाच्या अस्थीपासून निर्माण केलेला पांचजन्य नांवाचा शंख ) **धनंजयः** ( सर्व राजे लोकांस जिंकून धन आणणारा अर्जुन ) **देवदत्तं** ( अग्नीनें प्रसन्न होऊन दिलेला देवदत्त नामक शंख ) वाजविता झाला. **भीमकर्मा** ( राक्षसांचा नाश करण्याचें भयंकर काम करणारा ) **वृकोदरः** ( लांडग्यासारखें आहे खाणें आचाट म्हणून बलवान् आहे जो भीम तो ) **पौण्ड्रं** ( नांवाचा शंख ) वाजवूं लागला.

## अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
## नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

**कुन्तीपुत्रः** ( देवांपासून वर घेऊन जिनें पुत्रांस जन्म दिले अशा कुंतीचा पुत्र ) **युधिष्ठिरः अनन्तविजयं** ( स्थिरपणानें युद्ध करणारा धर्मराजा यानें अनंतविजय नांवाचा ) **नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ** ( व नकुल सहदेव यांनी सुघोष आणि मणिपुष्पक नांवाचे ) शंख वाजविले.

## काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।
## धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥

**परमेष्वासः** ( अति मोठें आहे धनुष्य ज्याचें असा ) **काशिराजा,** महारथ **शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट,** अजिंक्यपत्रें मिळविलेला **सात्यकी.—**

## द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
## सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥

**द्रुपदराजा, द्रौपदीचे पांच** मुलगे, मोठे लांब हात आहे ज्याचे असा आजानुबाहु, सुभद्रातनय, **अभिमन्यु**, ह्या सर्वांनीं **पृथिवीपते** ' हे पृथ्वीच्या राजा ' ( धृतराष्ट्रा ! )—निरनिराळे शंख वाजविले.

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

**सः** ( तो ) **घोषः** ( गंभीर आवाज ) **धार्तराष्ट्राणां** ( धृतराष्ट्राचे मुलगे दुर्योधन दुःशासनादिक त्यांची व त्यांच्या सैनिकांची ) **हृदयानि** ( अंतःकरणें ) **व्यदारयत्** ( फाडून टाकिता झाला. ) **तुमुलः** ( तो महाघोर आणि कर्कश आवाज ) **नभश्च पृथिवीं चैव** ( आकाश आणि पृथिवी ह्या दोन्हींमध्यें ) **व्यनुनादयन्** ( आवाज भरून त्याचा भयंकर प्रतिध्वनि उठे असें करणारा--तो घोष होता).--सर्व पृथ्वीमंडल आणि नभोमंडल दणाणून सोडणारा तो पांडवसैन्यांतील शंखांचा आवाज दुर्योधनपक्षीयांचीं अंतःकरणें भयानें घाबरून सोडता झाला. कौरव भ्याले पांडव भ्याले नाहींत इतकें येथें सांगावयाचें आहे.

**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पाण्डवः ।**
**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ॥ २० ॥**

**अथ** ( यानंतर ) **धार्तराष्ट्रान्** ( धृतराष्ट्राच्या पुत्रांचे सैनिक ) **व्यवस्थितान्** ( भीतिदर्शक शंखनाद झाला असतांही आपआपल्या स्थानीं युद्धासाठीं उभे आहेत ) **दृष्ट्वा** ( असें पाहून ) **कपिध्वजः** ( मारुती आहे ध्वजावर ज्याच्या असा ) **पाण्डवः** ( अर्जुन ) **शस्त्रसंपाते** ( शस्त्रांचा प्रहार ) **प्रवृत्ते** ( करण्याची तयारी झाल्यावर ) **धनुः** ( आपलें धनुष्य ) **उद्यम्य** ( उचलून, ) **महीपते** ( हे धृतराष्ट्राजा ! ) **हृषीकेशं** ( इंद्रियप्रवर्तक जो परमात्मा श्रीकृष्ण त्याप्रत ) **इदं** ( हें ) **वाक्यं** ( बोलणें ) **तदा** ( त्यावेळीं ) **आह** ( अर्जुन--बोलला )

**अर्जुन उवाचः—**

अर्जुन म्हणाला :—

**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेच्युत ॥ २१ ॥**

**अच्युत** ( केव्हांही विकार न पावणाऱ्या व नित्य आणि अव्ययरूपानें राहणाऱ्या, कृष्णा ! ) **उभयोः** ( दोन्हीही ) **सेनयोः** ( सैन्यांच्या ) **मध्ये** ( मध्यभागाचे ठायीं ) **मे** ( माझा ) **रथं** ( रथ ) **स्थापय** ( नेऊन ठेव ).

अर्जुन पुढें म्हणालाः—

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥**

**यावत** ( म्हणजे;-किंवा तोंपर्यंत ठेव कीं जोंपर्यंत, असाही अर्थ आहे.-पहिला चांगला. ) **एतान्** ( ह्या ) **योद्धकामान्** ( युद्धाची इच्छा धारण करणाऱ्या ) **आवस्थितान्** ( युद्धासाठीं सिद्ध होऊन उभे राहिलेल्या-वीरांस- ) **अहं** ( मी ) **निरीक्षे** ( पाहतों )—आणि—**अस्मिन्** ( ह्या ) **रणसमुद्यमे** ( युद्धाच्या तयारींत, समरसमारंभांत ) **कैः मया सह** ( कोणाबरोबर मला, किंवा माझ्याबरोबर कोणाला ) **योद्धव्यं** ( लढावयाचें आहे—तेंही पाहतों— ).

आणखी ह्मणालाः—

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥**

**ये एते** ( जे हे ) **अत्र** ( येथें ) **समागताः** ( एकत्र जमले आहेत )—आणि—**युद्धे** ( लढाईमध्यें ) **दुर्बुद्धेः** ( दुष्टबुद्धीच्या ) **धार्तराष्ट्रस्य** ( धृतराष्ट्रपुत्र जो दुर्योधन त्याचें ) **प्रियचिकीर्षव** ( हित करण्याविषयीं इच्छा धारण करणारे, मर्जी सुप्रसन्न करून घेणारे आहेत, अशा ) **योत्स्यमानान्** ( युद्धाची इच्छा धरून आलेल्या—वीरांस—) **अहं** ( मी ) **अवेक्षे** ( पाहतों )

**संजय उवाच—**

संजय धृतराष्ट्रास सांगता झालाः—

**एवमुक्तो हृषिकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरूभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**

**भारत** ( भरतकुलामध्यें उत्पन्न होऊन त्याच कुलामध्यें बंधु-वधाचें पाप होत आहे हें पाहणाऱ्या—नव्हे—ऐकणाऱ्या धृतराष्ट्रा ! ) **गुडाकेशेन** ( गुडाका=निद्रा तिचा ईश--स्वामी, निद्रास्वामी, स्वाधीननिद्र, निरलस अशा अर्जुनानें पिंगट-वर्णाचे केश होते ज्याचे अशा अर्जुनानें, असाही अर्थ आहे.—पहिला बरा. ) **एवं** ( याप्रमाणें ) **उक्तः** ( बोल्लेला ) **हृषीकेषः** ( श्रीकृष्ण ) **उभयो सेनयोः मध्ये** ( दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं ) **भीष्मद्रोणप्रमुखतः** ( भीष्म व द्रोण यांच्या समोर ) **सर्वेषां च महिक्षिताम्** ( व सर्व राजांच्याही समोर ) **रथोत्तमम्** ( उत्तम, अग्निदेवतेनें दिलेला दिव्य, रथ ) **स्थापयित्वा** ( नेऊन, स्थापन करून )

**उवाच पार्थ पश्यैतान्समेवतान्कुरूनिति ॥ २५ ॥**

**उवाच**(—श्रीकृष्ण—बोलला ) **पार्थ**(पृथेच्या मुला-अर्जुना ! ) **एतान्** (हे) **समवेतान्** ( सैन्यासह एकत्र मिळालेल्या ) **कुरून्** ( कौरवास ) **पश्य** (पहा) **इति** ( याप्रमाणें---श्रीकृष्ण बोलला— ).

**तत्रापश्यस्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।**
**आचार्यान्मातुलान्भ्रातॄपुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥**
**श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥ २६ ॥**

**अथ** ( हें श्रीकृष्णांनीं सांगितल्यावर.- ) **पार्थः** ( अर्जुन ) **तत्र** ( तेथें ) **स्थितान्** ( आपआपल्या जाग्यावर उभे राहिलेले ) **पितॄन** ( पित्याच्या योग्यतेचे भूरिश्रव्यासारखे चुलते ) **पितामहान्** ( भीष्म, सोमदत्तादि आजोबा ) **आचार्यान्** ( द्रोण, कृपाचार्य प्रभृति गुरु ) **मातुलान्** ( शल्य शकुनि वगैरे

मामा) **भ्रातॄन** (दुर्योधनादि बंधु) **पुत्रान्** (दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मण वगैरे पुत्रासारखे पुतणे) **पौत्रान्** (लक्ष्मण वगैरेंचे मुलगे, नातू) **सखीन्** (अश्वत्थामादि स्नेही) **तथा श्वशुरान्** (त्याचप्रमाणें दुर्योधनाचे सासरे वगैरे, तसेच) **सुहृदः** (कृतवर्मा, भगदत्तप्रभृति मित्र)---याचप्रमाणें आपल्या सैन्यांतीलही नातेवाईक-- **उभयोः सेनयोरपि** (दोन्ही सैन्यांत) आपले नातेवाईक व इष्टमित्र--**अपश्यत्** (पाहता झाला.) अर्जुनास सर्वत्र आपला गोतावळा--दृष्टीस पडला.--

**तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बन्धूनवस्थितान् ।**
**कृपया परयाऽऽविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ॥ २७ ॥**

**तान्** (त्या) **सर्वान्** (सगळ्या) **अवस्थितान्** (उभे राहिलेल्या) **बन्धून्** (बंधु वगैरे बांधवास) **समीक्ष्य** (काळजीपूर्वक पाहून) **सः** (तो) **कौन्तेयः** (कुंतीपुत्र अर्जुन) **परया** (अत्यंत) **कृपया** (दयेनें) **आविष्टः** (पूर्ण भरला जाऊन, कृपेनें वश करून घेतला आहे, असा झाल्यामुळें **विषीदन्** (खेदयुक्त होत्साता) **इदं** (हें) **अब्रवीत्** (बोलता झाला.)—आपला सर्व गोतावळाच येथें आला आहे त्याची या युद्धांतील मृत्युकुंडांत आहुति पडणार असें पाहून अर्जुन कृपेनें व्याकुळ झाला आणि म्हणाला—

**अर्जुन उवाच—**

अर्जुन बोलला.—

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ।**
**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ॥ २८ ॥**

**कृष्ण** (हे कृष्णा !) **इमं** (हा) **युयुत्सुं** (युद्ध करावयाची इच्छा धरून सिद्ध झालेला) **स्वजनं** (बांधववर्ग) **समुपस्थितं** ) एकत्र रणांगणामध्यें उभा राहिलेला) **दृष्ट्वा** (पाहून) **मम** (माझीं) **गात्राणि** (गात्रें, अवयव) **सीदन्ति** (विकल होतात) **मुखं च** (आणि तोंडही) **परिशुष्यति** (सुकून जातें. —अंगांत ग्लानता येणें व तोंडचें पाणी पळणें हीं चिन्हें भय आणि शोक यांचीं आहेत. आणखी कांहीं चिन्हें खालच्या श्लोकांत सांगितलीं आहेत.—

**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥**
**गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ॥२९॥**

**च** ( आणि ) **मे** ( माझ्या ) **शरीरे** ( अंगावर, अंगाला ) **वेपथुः** ( कंप--उत्पन्न होतो-- ) **रोमहर्षश्च जायते** ( रोमांचही उत्पन्न होतात, उभे राहतात. ) **हस्तात्** ( हातांतून ) **गाण्डीवं** ( अग्नीनें दिलेलें हें गांडीव धनुष्य ) **स्रंसते** ( खालीं गळून पडतें ) **त्वक्चैव** ( अंगाचें कातडेंही ) **परिदह्यते** ( तापून भाजतें आहे; माझें सर्व अंग भाजतें आहे. )

**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः**
**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ॥ ३० ॥**

**अवस्थातुं** ( उभें रहावयाला ) **न च शक्नोमि** ( माझ्या अंगांत शक्ति नाहीं. ) **मे मनश्च** ( माझें मनही ) **भ्रमति इव** ( जसें कांहीं फिरायालाच लागलें आहे. ) **केशव** ( केशी राक्षसाला मारणाऱ्या कृष्णा ! ) **च** ( आणि ) **विपरीतानि** ( विलक्षण, अशुभ, अमंगल ) **निमित्तानि** ( चिन्हें, शकुन ) **पश्यामि** ( मला दिसत आहेत. )—सारांश या युगामध्यें हजारों भाऊबंद मरणार असें पाहून अर्जुनास फार खेद झाला:—

अर्जुन पुनः म्हणतो:—

**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥**

**च** ( आणि ) **स्वजनं** ( आमच्या आप्तइष्टमित्रांस ) **आहवे** ( युद्धामध्यें ) **हत्वा** ( मारून ) **श्रेयः** ( कल्याण ) **न अनुपश्यामि** ( उत्पन्न होईल असें मला दिसत नाहीं. )—येथें अगर परलोकीं आमचें कांहीं कल्याण होईल असें मला वाटत नाहीं, हा भावार्थ. याचें स्पष्टीकरण पुढील श्लोकांत आहे.—

**न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।**
**किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥**

**कृष्ण** ( भक्तांस आकर्षण करणाऱ्या कृष्णा ! ) **न विजयं, न राज्यं, न सुखानि च काङ्क्षे** ( मला जय नको, राज्य नको, व सुखोपभोगही नकोत. ) **गोविन्द ! नः** ( आम्हांला ) **राज्येन** ( राज्य मिळवून ) **किं**

( काय )—उपयोग आहे ?—आम्हांला त्याचा काय उपयोग ?—**वा** ( अ-थवा ) **भोगैः जीवितेन किं** ( सुखोपभोग अगर आयुष्य तरी काय कामाचें आहे ? )

—जय मिळाला म्हणजे राज्यप्राप्ति, राज्यलोभानें सुख आणि सुखानें आयुष्यवृद्धि ह्या गोष्टी ( ह्या आशा ) मनुष्याला कर्म करण्यास प्रवृत्त करितात. सर्व मनुष्यांचा यच्चयावत् व्यापार अगर उद्योग या सुखाकरितां व विशेषतः आयुष्यवृद्धीसाठीं होत असतो. सर्वांसच लढाया मारावयाच्या नाहींत, किंवा राज्येंही मिळवावयाचीं नाहींत हें खरें आहे; तेव्हां जय ह्मणजे आपल्या कामांत सिद्धि मिळवून यश संपादणें आणि राज्य ह्मणजे संपत्तीचा लाभ करून घेऊन उपभोग घेणें असे अर्थ केले ह्मणजे सामान्य मनुष्याला कर्म करण्याची प्रवृत्ति होते ती वरील कारणांनींच होते, हें उघड दिसून येईल. अर्जुनानें ह्या सर्व गोष्टी, हीं सुखें, मला नकोत असें म्हटलें आहे. तेव्हां आयुष्यही ज्याकरितां पाहिजे म्हणजे ज्यासाठीं जगावयाचें असें कांहीं तरी बलवत्तर कारण शोधून काढल्याशिवाय अर्जुनाच्या मनाची शांति होणारी नव्हती व तो युद्धास प्रवृत्तही होणारा नव्हता. याउपर भगवान् श्रीकृष्ण काय कारण शोधून काढतात तिकडे आपण सावधान चित्तानें लक्ष देऊं या. भगवंताच्या उत्तराला दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापासून सुरुवात व्हावयाची आहे.—

हे सर्व कां नको याचें कारण अर्जुन सांगतोः—

**येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥२३॥**

**येषां** ( ज्याच्या ) **अर्थे** ( साठीं ) **राज्यं भोगाः सुखानि च** ( राज्य, पुष्कळ प्रकारचे भोग, व सुखें ) **काङ्क्षितं नः** ( आम्हांला हवीं अशीं वाटतात ) **ते इमे** ( ते हे सर्व–आप्तइष्टमित्र– ) **प्राणान्** ( पंचप्राण ) **धनानि च** ( आणि धनसंपत्ति ) **त्यक्त्वा** ( सोडून देऊन युद्धे या समर-भूमीमध्यें ) **अवस्थिताः** ( येऊन उभे राहिले आहेत. )

ते कोण ह्मणशील तर ऐकः—

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबन्धिनस्तथा ३४**

**आचार्याः** ( गुरु ) **पितरः** ( वडिल पुरुष ) **पुत्राः** ( मुलगे वगैरे ) **तथैव च** ( त्याचप्रमाणें ) **पितामहाः** ( आजोबा ) **मातुलाः** ( मामा ) **श्वशुराः** ( सासरा ) **पौत्राः** ( नातु, ) **श्यालाः** ( मेव्हणे, ) **तथा** ( तसेंच ) **संबन्धिनः** ( इतर आप्त व इष्टमित्र )--हे येथें लढण्यासाठीं आले आहेत. हे सर्व मेले तर आम्हांला राज्याचा काय उपयोग? सुख कसलें? किंवा जिवंत तरी कशाला रहावयाचें? आपण सुख भोगितों तेव्हां आपल्यास आनंद होतोच; पण तें आपलें सुख पाहून सुखी होणारे निदान आपण सुखी आहोंत असें पाहणारे लोक असल्याशिवाय सुखाचा खरा उपभोग घ्यावयास सांपडत नाहीं, हा सामान्य अनुभव आहे.—

अर्जुन जोरानें म्हणतोः—

**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

**मधुसूदन** (मधु राक्षसाचा नाश करणाऱ्या कृष्णा!) **घ्नतः अपि** (यांनीं मला ठार मारिलें तरी) **एतान्** (ह्यांस) **त्रैलोक्यराज्यस्य हेतोः अपि** (त्रैलोक्याचें सर्व राज्य मिळत असलें तरी) **हन्तुं** (ठार मारण्याला) **न इच्छामि** (मी इच्छा करीत नाहीं.) **महीकृते किं नु** (मग पृथ्वीच्या राज्यासाठीं तर नाहींच ठार मारणार.)—मी मेलों तरी हरकत नाहीं; इतकेंच काय? पण त्रिलोकीचें राज्य मिळालें तरी मी आपल्या बंधुबांधवांस ठार मारणार नाहीं. कारण त्यांस मारून आम्हांस ह्या लोकीं सुख होणार नाहीं.—

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाऽऽश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

**जनार्दन** (पापी पुरुषांस दंड करणाऱ्या व शत्रूंस त्रास देणाऱ्या कृष्णा!) **धार्तराष्ट्रान्** (धृतराष्ट्राच्या दुर्योधनादिक मुलांस) **निहत्य** (मारून) **नः**

(आम्हांला) **का** (कोणतें) **प्रीतिः** (समाधान; आनंद) **स्यात्** (होईल बरें ? )–मूर्खजनांस उचित जो क्षणभंगुर सुखाचा भोग त्याच्यासाठीं बंधुवर्गास मारून आम्ही चिरकाळ नरकवास भोगण्याचें साधन मात्र करून ठेवूं ! समाधान तर नाहींच; पण दुःख मात्र अत्यंत होईल.—**एतान्** (ह्या) **आततायिनः** (घरें जाळणें, विष घालणें, खून करणें, चोरी करणें दुसऱ्याची जमीन अगर बायको लाटणें, हीं कर्में करणाऱ्या लोकांस आततायी म्हणतात. सारांश अघोर व समाजविध्वंसाचीं कर्में करणाऱ्या दुष्टांस) **हत्वा** (मारून) **अस्मान्** (आम्हांला) **पापमेव** (पापमात्र) **आश्रयेत्** (लागेल. )–ह्या पापी पुरुषांस मारून त्यांचें पातक मात्र आम्हीं आपल्या शिरावर घेतल्यासारखें होईल. किंवा आपल्या बांधवांस मारून आम्ही मात्र वर सांगितलेलीं अघोर पापें करून दुराचरणाचें श्रेय घेऊं !– '**आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्** ' (आततायी भेटला असतां त्यास एकदम मारावा) असें अर्थशास्त्र सांगतें. पण '**अहिंसा परमो धर्मः** ' (अहिंसा हा उत्कृष्ट धर्म आहे.) असें **धर्मशास्त्र** म्हणतें; शिवाय '**अर्थशास्त्राच्च बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः**, (अर्थशास्त्रापेक्षां,—व्यवहारशास्त्रापेक्षां–धर्मशास्त्र हें जास्त महत्वाचें आहे. ) म्हणून मी यांस मारीत नाहीं:–

म्हणून अर्जुन म्हणतोः—

**तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥**

**तस्मात्** (म्हणून) **स्वबान्धवान्** (आमचे बंधु) **धार्तराष्ट्रान्** (धृतराष्ट्राचे पुत्र, त्यांस ) **हन्तुं** (मारण्यास) **वयं** (आम्ही) **अर्हा** (योग्य) **न** (नाहीं. )–आम्हाला असें करणें योग्य नाहीं.–**माधव** (लक्ष्मीच्या, जें चांगलें आहे त्याच्या, धवा, स्वामी ! **हि** (म्हणून) **स्वजनं** (आमचेच भाऊबंद जे त्यांस) **हत्वा** (मारून ) **सुखिनः** (सुखी ) **कथं स्याम** (कसें होऊं बरें ? आपला संबंध नाहीं अशा सामान्य पापी मनुष्याला सुद्धां मारणें योग्य नाहीं; मग दुर्योधनादि बंधु आमच्याच कुळांतले आहेत; त्यांस मारून आम्हांला कसें बरें सुख होईल ?—

अर्जुन आणखी म्हणतोः—

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥**

**हे जनार्दन ! यद्यपि** (जरी) **एते** (हे) **लोभोपहतचेतसः** (लोभानें नष्ट झाली आहे विवेकबुद्धि ज्यांची असे दुर्योधनादिक) **कुलक्षयकृतं** (कुलाच्या क्षयानें उत्पन्न होणारा, कुलाचा क्षय केला असतां लागणारा) **दोषं** (दोष) **च** (आणि) **मित्रद्रोहे** (मित्रमंडळीचा द्वेष केल्यानें) **पातकं** (होणारें पाप) **पश्यन्ति न** (पाहत नाहींत, जरी यांना हें किती मोठें पातक आपण कारितों आहों हें समजत नाहीं)--तथापि--**कुलक्षयकृतं** (कुलक्षयानें लागणारें) **दोषं** (पाप) **प्रपश्यद्भिः** (समजणाऱ्या) **अस्माभिः** (आमच्याकडून, आम्हांला) **अस्मात्** (ह्या) **पापात्** (पापापासून) **निवर्तितुम्** (पाठीमागें होण्याला, परावृत्त होण्याला) **कथं न ज्ञेयं** (कसें बरें समजूं नये ?)--त्यांना समजलें नाहीं म्हणून ते वेड्यासारखे वागतात; ते क्षम्य आहेत. पण हें पाप समजणारे जे आम्हीं, त्या आम्हीं सुद्धां या अघोर कृत्याला पराङ्मुख होऊं नये कीं काय ?—अज्ञ पुरुषापेक्षां ज्ञानी पुरुषासच दुष्कर्माचें शासन उग्र असावें असें नीतिशास्त्र सांगतें ना ?—

—कुलक्षयाचे दोष पहा.—

अर्जुन कुलहत्येच्या पातकांची परंपरा सांगतोः—

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

**कुक्षलये** (कुलक्षय झाला असतां, कुलधर्म--चालविणाऱ्या लोकांचा संहार झाला असतां,--) **सनातनाः** (पुराणकालापासून चालत आलेले) **कुलधर्माः** (कुलाचे धर्म, मूळ पुरुषापासून चालत आलेले कुलाचार) **प्रणश्याति** (नष्ट होतात;) आणि **धर्मे नष्टे** (धर्म नाहींसा झाला म्हणजे) **अधर्मः** (अधर्म,

धर्मभ्रष्टता ) **उत** ( ही ) **कृत्स्नं** ( सगळ्या ) **कुलं** ( कुलाला ) **अभिभवति** ( जिंकून टाकतो, सर्व कुलामध्यें भ्रष्टाकारही सुरू होतो. )

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥४१॥**

हे **कृष्ण** ! **अधर्माभिभवात्** ( अधर्म जोरावला असतां, ) **कुलस्त्रियः** ( कुलीन स्त्रिया ) **प्रदुष्यन्ति** ( --पुरुषांचें दुराचरण पाहून त्याही--अमंगल आचरण करूं लागतात ) आणि--**वार्ष्णेय** ( वृष्णिकुलांत जन्म पावलेल्या कृष्णा ! ) **स्त्रीषु दुष्टासु** ( स्त्रिया अनाचारी, पतित झाल्या म्हणजे ) **वर्णसंकरः** ( जातीची भेसळ ) **जायते** ( उत्पन्न होते )

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियः ॥४२॥**

**संकरः** ( ही भेसळ, कालवाकालव--) **कुलघ्नानां** ( कुलक्षय करणाऱ्यांचें ) **च** ( आणि ) **कुलस्य** ( त्या कुलांतील लोकांचें ) **नरकायैव** ( नरकाकडे---गमन करविते. )--सारांश या दोघांसही नरकप्राप्ति होते.--**हि** ( कारण ) **एषां** ( ह्या दोघांचेही ) **पितरः** ( मेलेले पूर्वज ) **लुप्तपिंण्डोदकक्रियाः** ( लुप्त, नाहींशा, झाल्या आहेत पिंडदान आणि तर्पण इत्यादि क्रिया ज्यांच्यासंबंधानें असे ) **पतन्ति** ( नरकांत जाऊन पडतात ).---म्हणजे कुलक्षय व वर्णसंकर झाल्या कारणानें व श्राद्धपक्षादिक क्रिया करावयास कोणी नसल्यामुळें, पूर्वज नरकास जातात आणि मग कुलहत्या करणारे व कुलभ्रष्ट झालेले लोक हे सर्वही नरकास जातात.

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥४३॥**

**वर्णसंकरकारकैः** ( वर्णसंकर उत्पन्न करणाऱ्या ) **एतै** ( ह्या ) **कुलघ्नानां दोषैः** ( कुलक्षय करणाऱ्या लोकांच्या पातकांनीं ) **शाश्वताः** सनातन चालत आलेले ) **जातिधर्म** ( जातीचे धर्म ) **च** ( आणि ) **कुलधर्माः** ( कुलधर्म ) **उत्साद्यन्ते** ( नाहींसे होतात )

—एक कुलालाच करावयास लागणाऱ्या विधीस कुलधर्म ह्मणतात. आणि सर्व जातीला आवश्यक अशा नित्यनैमित्तिकांस जातिधर्म ह्मणतात. म्हणजे प्रत्येक कुलांतील पुरुषांस जातीचे व वर्णाश्रमाचे धर्म पाळून शिवाय कुलधर्मही पाळावे लागतात—

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥**

हे—**जनार्दन—उत्सन्नकुलधर्माणां** ( नष्ट झाले आहेत कुलधर्म ज्यांचे अशा ) **मनुष्याणां** ( मनुष्यांचें ) **वासः** ( वास्तव्य, राहण्याचें ठिकाण ) **नियतं** ( निश्चयानें अर्थातच, अवश्यक रीतीनें ) **नरके** ( नरकामध्यें ) **भवति** ( होतें ) **इति** ( ह्याप्रमाणें ) **अनुशुश्रुम** ( आम्हीं गुरुपासून ऐकिलें आहे. )

--कुलक्षयाच्या पातकाविषयीं आमच्या पूर्वजांच्या मनांत केवढी जबरदस्त भीति होती बरें ? ग्रीस, रोम इत्यादि जुन्या आर्य लोकांत हीच समजूत दृष्टीस पडते. समाजाला स्थैर्य देण्याला ह्या समजुतींचा फारच मोठा उपयोग होतो.—

अर्जुन पश्चात्ताप पावून शेवटीं ह्मणतोः—

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यतः ॥ ४५ ॥**

**अहो** ( अरेरे ! ) **बत** ( पहा ) **वयं** ( आम्हीं ) **महत्पापं** ( महापातक, अघोर पातक ) **कर्तुं** ( करण्यास ) **व्यवसिताः** ( प्रवृत्त झालों आहोंत ) **यत्** ( म्हणजे ) **राज्यसुखलोभेन** ( राज्य मिळाल्यावर जें सुख मिळेल त्याच्या आशेनें ) **स्वजनं** ( आपल्याच बंधुबांधवांस ) **हन्तुं** ( मारण्यासाठीं ) **उद्यताः** (—आम्ही—तयार झालों आहोंत ! )--काय सुखाची ही जबरदस्त तृष्णा कीं जिच्या पाठीमागें लागून सुख मिळविण्यासाठीं आह्मी आपल्याच कुलगोताला मारायाला तयार झालों ! धिक्कार असो या सुखतृष्णेला !—

शेवटीं विरक्तीचें भाषण अर्जुन करित आहे तें पहाः—

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥**

**यदि** ( जर ) **शस्त्रपाणयः** ( शस्त्रें आहेत हातांमध्यें ज्यांच्या असे ) **धार्तराष्ट्राः** ( धृतराष्ट्रपुत्र ) **अप्रतीकारं** ( उलट शस्त्र न उगारणाऱ्या, सूड न उगविणाऱ्या ) **अशस्त्रं** ( --व--शस्त्रच धारण न करणाऱ्या ) **मां** ( मला ) **रणे** ( या समरभूमीवरच ) **हन्युः** ( मारून टाकतील ) **तत्** ( तर ) **मे** ( माझें ) **क्षेमतरं** ( अधिकच कल्याण ) **भवेत्** ( होईल )

—मी आतां निःशस्त्र होतों. स्वतःचा प्राण वांचविण्याची देखील मी खटपट करणार नाहीं. मला जरी दुर्योधनादिकांनीं ठार मारिलें तरी उत्तमच होईल.—

**संजय उवाच—**

संजय धृतराष्ट्रास सांगतोः—

## एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
## विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

**एवं** ( याप्रमाणें ) **उक्त्वा** ( बोलून )—आणि—**सशरं** ( बाणासहित असलेलें जें ) **चापं** ( धनुष्य तें ) **विसृज्य** ( हातांतून खालीं टाकून ) **शोकसंविग्नमानसः** ( शोकानें व्यापून टाकिलें आहे चित्त ज्याचें, शोकमोहांनीं पराभव झाला आहे ज्याचे बुद्धीचा असा, ) **अर्जुनः** ( अर्जुन ) **संख्ये** ( युद्धामध्यें युद्धभूमीवर,—दोन्ही सैन्य पहात असतां—) **रथोपस्थे** ( रथाच्या मध्यें, रथांतील आसनावर ) **उपाविशत्** ( बसला; सैन्य पाहण्यासाठीं उभा राहिला होता तो खालीं बसला. )

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

( याप्रमाणें श्रीमद्भगवद्गीता नामक उपनिषदांमधील श्रीकृष्णार्जुनसंवादांत उत्पन्न झालेल्या वेदांतांतील योगशास्त्रांत ‘ अर्जुनास झालेला विषाद ’ या नांवाचा **प्रथम अध्याय संपला.** )

# अथ द्वितीयोऽध्यायः।

**संजय उवाच.**—

अर्जुनास अशा तऱ्हेचें वैराग्य उत्पन्न झालेलें ऐकून हर्षमुख झालेल्या धृतराष्ट्राचा मोह घालविण्यासाठीं संजय ह्मणाला:—

**तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्।**
**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः॥१॥**

**तथा** (आप्त, इष्टमित्रांचा नाश होत असल्यामुळें) **कृपयाऽऽविष्टं** (कृपा ह्मणजे 'हे माझे' अशी जी माया किंवा स्नेहविशेष किंवा करुणाविशेष, त्यानें आविष्ट ह्मणजे व्याकूळ झालेल्या अशा) **अश्रुपूर्णाकुलेक्षणं** (अश्रूंनीं भरून गेल्यामुळें दिसत नाहीं ज्याच्या डोळ्यांस, किंवा चंचल झाले आहेत डोळे ज्याचे अशा.) —आणि—**विषिदतं** (माझ्या हातून हा एवढा वध होऊन कुलक्षय होणार ह्मणून खिन्न झाला आहे अशा) **तं** (त्या अर्जुनाला) **मधुसूदनः** (मधु राक्षसाचा नाश करणारा श्रीकृष्ण) **इदं** (पुढील) **वाक्यं** (वाक्य) **उवाच** (बोलता झाला.)

***श्रीभगवानुवाच**— (श्री भगवान् म्हणाले):—

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन॥२॥**

---

*'ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः।
वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना॥

(समग्र ऐश्वर्य, धर्म, यश, संपत्ति, वैराग्य आणि मोक्ष ह्यांस '**भग**' असें ह्मणतात.) तें ज्यांस आहे तो **भगवान्** होय.—

**ह्याचप्रमाणें**—

उत्पत्तिं च विनाशं च भूतानामागतिं गतिम्।
वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो 'भगवानिति'॥

(प्राणिमात्रांची उत्पत्ति आणि नाश. भावि संपत्ति आणि विपत्ति, ज्ञान आणि अज्ञान ह्या सर्वांचीं कारणें जो जाणतो त्यास भगवान् म्हणावें)

**अर्जुन** ( हे गौरवर्ण अर्जुना! ) **अनार्यजुष्टं** ( आर्य ह्मणजे श्रेष्ठ, मुमुक्षु मोक्षास जाऊं इच्छिणारे, त्यांनीं ज्याचा स्वीकार केला नाहीं असे, किंवा अनार्य लोकांनीं ज्याचा स्वीकार केला आहे असें ) **अस्वर्ग्यं** ( स्वर्गलोकांस न नेणारें, किंवा स्वर्गास जाऊं इच्छिणाराला अयोग्य )--आणि--**अकीर्तिकरं** ( अपकीर्ति उत्पन्न करणारें ) **इदं** ( हें ) **कश्मलं** ( कृष्णवर्ण पातक किंवा मोह ) **त्वा** ( सर्व क्षत्रियांत श्रेष्ठ व शंकराबरोबर युद्ध करणाऱ्या तुला ) **विषमे** ( ऐन लढाईच्या अति भयंकर प्रसंगीं, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं ) **कुतः** ( कोठून ) **समुपस्थितं** ( उत्पन्न झालें ? )

--या तुझ्या वेडगळ मोहानें व भीतीनें तुला मोक्ष मिळणार नाहीं, स्वर्ग मिळणार नाहीं व कीर्तिही मिळणार नाहीं; असलें वेड तुझ्यासारख्या धीर पुरुषाच्या डोक्यांत कोठून शिरलें ? हा भावः—

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

**पार्थ** ( इंद्रप्रसादानें कुंतीच्या पोटीं झालेल्या अर्जुना ! ) **क्लैब्यं** ( धैर्य, ओज आणि तेज ह्यांचा भंग करणारा हा भित्रेपणा त्याला ) **मा गमः स्म** ( जाऊं नको--ह्मणजे भेकडपणाला वश होऊं नको. ) **एतत्** ( हा असा नेभळेपणा ) **त्वयि** ( निवातकवच, कालखंज वगैरे राक्षसास मारणाऱ्या तुला ) **न उपपद्यते** ( शोभत नाहीं, योग्य नाहीं. )--म्हणून--**क्षुद्रं** ( अधोगतीस नेणारी किंवा कमीपणा आणणारी ) **हृदयदौर्बल्यं** ( अंतःकारणाची दुर्बलता ) **त्यक्त्वा** ( टाकून देऊन ) **परंतप** ( शत्रूंस जर्जर करून त्रास देणाऱ्या हे अर्जुना ! ) **उत्तिष्ठ** ( तूं ऊठ ) श्रेष्ठ असें आपलें कर्तव्यकर्म करीत असतां किरकोळ गोष्टीकडे लक्ष न देणें हें शाहण्या माणसाचें काम आहे, असें श्रीकृष्ण सुचवितात.--

**अर्जुन उवाच—**

या भगवंताच्या बोलण्याला अर्जुन प्रत्युत्तर देता झालाः—

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥**

हे **मधुसूदना! अहं** ( मी ) **भीष्म द्रोणं च** ( ज्यांनीं माझ्यावर अनंत उपकार केले आहेत त्या भीष्मद्रोणांशीं ) **संख्ये** ( युद्धामध्यें ) **कथं** ( कसा ) **इषुभिः** ( बाणांनीं ) **प्रतियोत्स्यामि** ( उलट युद्ध करूं, त्यांच्यावर बाण कसें टाकूं? ) **अरिसूदन** ( अरि--सुदर्शनचक्र त्याच्या योगानें शत्रूंचा नाश करणाऱ्या कृष्णा! ) **पूजार्हौ** ( हें उभयतांही मला वंदनीय, पूज्य,-आहेत.-) पुष्पादिकांनीं पूजा करायाची सोडून भीष्मद्रोणांवर माझ्यानें प्रखर बाण कसे टाकवतील? हा भाव.—

अर्जुन आपला अभिप्राय सांगतोः--

**गुरूनहत्वा हि महानुभावान्**
**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**
**हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव**
**भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥५॥**

**महानुभावान्** ( मोठे आहेत आत्मे ज्यांचे अगर श्रुत, अध्ययन तप, आचरण वगैरे मान्य आहे ज्यांचे अशा ) **गुरून् हि** ( आचार्यांस, श्रेष्ठ पुरुषांस ) **अहत्वा** ( न मारतां, न मारल्यामुळें, मारलें नाहीं म्हणून ) **इह लोके** ( ह्या लोकींच ) **भैक्ष्यं भोक्तुमपि** ( आमच्यासारख्या क्षत्रियांस निषिद्ध जी भिक्षावृत्ति ती चालविण्याची पाळी आल्यास तीही ) **श्रेयः** ( चांगली आहे; तीही मला पत्करेल ) **अर्थकामान्** ( द्रव्याचा लोभ ज्यांस उत्पन्न झाला आहे अशा ) **गुरून्** ( गुरूंस, ) **हत्वा** ( मारून ) **इहैव** ( येथें सुद्धां--परलोकाची तर गोष्ट राहूंदेच. पण येथें मृत्युलोकींसुद्धां--) **रुधिरप्रदिग्धान** ( रक्तानें माखलेलीं अशीं ) **भोगान्** ( सुखें—सुख कसलें दुःखच—) **भुञ्जीय** ( भोगावयास लागतील नाहीं बरें? ) येथील सुखें मिळविण्याला सुद्धां आह्माला, अत्यंत रक्तस्राव करावा लागेल. मग स्वर्गांतील शुद्ध सुख कोठून मिळणार? हा भाव. कसाही गुरु झाला तरी तो वंदनीयच होय त्याला मारून दुःखच पैदा होणारना? म्हणून मी भिक्षावृत्ति पत्करितों; पण गुरूंबरोबर लढत नाहीं.——

( **अर्थकामन्** हें कोणी '**भोगान्**' याचें विशेषण कारितात आणि

असा अर्थ सांगतात कीं 'भीष्मद्रोणादिकांस मारून फार तर येथें अर्थ आणि काम साधतील ह्मणजे पैसे मिळतील व चैन करावयास सांपडेल हें खरें, पण धर्म आणि मोक्ष हे मुळींच साध्य होणार नाहींत' असें अर्जुनाचें म्हणणें आहे. शंकरानंद 'अर्थकामान्' हें 'गुरून्' या पदाचेंच विशेषण करून धर्मोपदेशक असा त्याचा अर्थ करितात. एकंदरीनें पहिला अर्थच चांगला दिसतो.)

आणखी पुनः—

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो**
**यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषाम-**
**स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥**

**च** ( आणि ) **नः** ( आह्माला ) **कतरत्** ( कोणतें ) हिंसाशून्य भिक्षावृत्ति, किंवा क्षत्रियधर्मानें विहित असें युद्ध, यांपैकीं कोणतें ) **गरीयः** ( मोठें, योग्य आहे ) **एतत्** ( हें ) **न विद्मः** ( समजत नाहीं. )--शिवाय युद्धाला आरंभ केला तरी--**यद्वा जयेम** ( आह्माला जय मिळेल ) **यदिवा नो जयेयु** ( किंवा--आमचे शत्रु आह्मांस जिंकितील हेंही समजत नाहीं ! बरें जय झाला तरी तो पराजयासारखाच, दोहोंची फलश्रुति एकच आहे. ) कारण--**यानेव** ( ज्यांना मात्र) **हत्वा** ( मारून ) **न जिजीविषामः** ( आह्माला जगण्याची इच्छा नाहीं ) **ते धार्तराष्ट्राः** ( तेच धृतराष्ट्राचे पुत्र, आमचे भाऊबंद ) **प्रमुखे** ( युद्धासाठीं आमच्या समोर ) **अवस्थिताः** ( उभे राहिले आहेत ! )

याप्रमाणें युद्ध करावें कीं नाहीं, केलें तर जय मिळेल कीं नाहीं आणि जय मिळाला तरी सुख मिळेल कीं नाहीं, असा जबरदस्त संशय अर्जुनास प्राप्त झाला आहे.

सारांश अर्जुन सांगता झालाः—

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**

**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः** ( कार्पण्य ह्मणजे स्वजनांविषयीं अनुकंपा व दोष म्हणजे त्यांच्या वधानें उत्पन्न होणारें पाप, या दोहोंच्या योगानें उपहत म्हणजे दूषित अगर झांकून गेला आहे स्वभाव म्हणजे अंतःकरण ज्याचे असा ) --आणि म्हणून--**धर्मसंमूढचेताः** ( धर्म म्हणजे आपलें कर्तव्य, ज्याच्या संबंधानें घोंटाळा झाला आहे मनाचा ज्याच्या असा मी ) **त्वां** ( तुला ) **पृच्छामि** ( विचारतों ). **यत्** ( जें ) **श्रेयः** ( कल्याणदायक कर्तव्य ) **स्यात्** ( असेल ) **तत्** ( तें ) **मे** ( मला ) **निश्चितं** ( निश्चित करून, खास ठरवून ) **ब्रुहि** ( सांग ) **ते** ( तुझा ) **अहं** ( मी ) **शिष्यः** ( शिष्य आहें ) **त्वां** ( तुझ्याकडे ) **प्रपन्नं** ( आलेल्या ) **मां** ( मला ) **शाधि** ( शिकीव. )

—मी घोंटाळून गेलों आहें, म्हणून माझें कल्याण ज्यानें होईल असें माझें खरें कर्तव्य मला सांग. मी तुला शरण आलों आहें. हा भाव.—

'कार्पण्य म्हणजे आत्मवस्तूचेंअज्ञान असें उपनिषदांत सांगितलें आहे. '**यो वा एतदक्षरमविदित्वाऽस्माल्लोकात्प्रैति स कृपणः**' ( अक्षर असा जो परमात्मा याला न जाणतां जो या लोकांतून जातो तो कृपण होय. ) धर्म म्हणजे परब्रह्म. '**श्रेय**' म्हणजे निःश्रेयसपद ( मोक्षपद ) असे या शब्दांचे अर्थ घेऊन वेदांतपर अर्थ कित्येक टीकाकारांनीं केला आहे. चवथ्या ओळींतील अर्थान्वयेंच '**अधीहि भगवो ब्रह्मेति**' असें वरुणाला भृगुऋषि ह्मणाला आहे. हा वेदांतपर अर्थ इतक्यांतच घ्यावा कीं नाहीं हा वादग्रस्त विषय आहे. सबब याचा विचार येथें करितां येत नाहीं.

सारांशः—

**नहि प्रपश्यामि ममापनुद्या-**
**द्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं**
**राज्यं सुराणामपि चाऽऽधिपत्यम् ॥ ८ ॥**

**यत्** ( जें ) **इन्द्रियाणां** ( इंद्रियांचा ) **उच्छोषणं** ( शोषण करणारा, ताप देणारा जो ) **मम** ( माझा ) **शोकं** ( शोक, दुःख ) **अपनुद्याम्** ( निवारण करील, नाहींसें करील. असें कांहीं ) **न प्रपश्यापि** ( मला तर दिसत नाहीं ) **भूमौ** ( पृथ्वीवर ) **असपत्नं** ( निर्वैर )—व—**ऋद्धं** ( समृद्ध, संपन्न ) **राज्यं** ( राज्य ) **अवाप्य** ( मिळाल्यावर, मिळालें तरी ) आणि **सुराणां** ( देवांचें ) **आधिपत्यमपि** ( स्वामित्वहि मिळालें तरी )—सुद्धां माझा शोक हरणारा उपाय मला दिसत नाहीं—**हि** ( ह्मणून ) कृष्णा ! मला तूं निश्चित उपाय सांग, असा पाठीमागच्या श्लोकाशीं अन्वय करावा.—अर्जुनास खरें वैराग्य बाणलें होतें असा तिसऱ्या व चवथ्या ओळीवरून **मधुसूदनी** टीकाकार गूढार्थ काढितात. भावार्थ स्पष्ट आहे कीं या 'युद्धांत जय मिळाला व त्रैलोक्याचें राज्य मिळालें तथापि कुलहत्येपासून होणाऱ्या पापाचें क्षालन करील असा मला उपाय दिसत नाहीं. '—

**संजय उवाच—**

संजय धृतराष्ट्रास सांगता झालाः—

## एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
## न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥९॥

**एवं** ( याप्रमाणें ) **हृषीकेशं** ( इंद्रियस्वामी व सर्वशक्तिमान् परमेश्वराशीं ) **उक्त्वा** ( बोलून ) **परंतप** ( शत्रूस ताप देणाऱ्या धृतराष्ट्रा ! ) **गुडाकेशः** ( निद्रास्वामी, निरलस अर्जुन ) **' न योत्स्ये '** ( मी युद्ध करीत नाहीं ) **इति** ( असें ) **गोविन्द** ( गो ह्मणजे वाणी तिचा प्रवर्तक जो सर्वज्ञ कृष्ण त्याला) **उक्त्वा** ( सांगून ) ह ( खरोखर ) **तूष्णीं** ( स्तब्ध ) **बभूव** ( झाला ).

**मधुसूदनीकार** या श्लोकाचा वैराग्यपर अर्थ लावून अर्जुन निष्क्रिय झाला असें ह्मणतात.

**आनंदगिरी** 'अर्जुन शोकातिशयानें स्तब्ध झाला' असें ह्मणतात. —'गोविंद आणि हृषीकेशी' या नांवावरून सर्वज्ञ परमेश्वराचें सामर्थ्य सांगून अर्जुनास तोच उपदेशक श्रेष्ठ आहे असें सुचविलें.—

संजय म्हणता झाला:—

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्नीव भारत।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमीदं वचः॥ १०॥**

**भारत** (धृतराष्ट्रा!) **उभयोः सेनयोः मध्ये** (दोन्हीं सैन्यांच्या मध्यें असून) **विषीदन्तं** (युद्ध करण्याच्या उत्साहानें येऊन आयत्या वेळेस खिन्न झालेल्या) **तं** (अर्जुनाला) **प्रहसन्निव** (थट्टा, उपहास केल्यासारखें दाखवून, अनुचित आचरण करणारा जो अर्जुन त्याला लज्जासागरांत ढकलण्याच्या हेतूनेंच व उपहासपूर्वक हंसणारे) **हृषीकेशः** (श्रीभगवान्) **इदं वचः उवाच** (याप्रकारें [खालीं सांगितल्याप्रमाणें] बोलते झाले.)--येथें संगति लावण्याकरितां जोडलेली प्रस्तावना संपली आणि येथून **गीतेस** आरंभ झाला.—

**श्रीभगवानुवाच**—

---

# आचार्यांची विशेष* प्रस्तावना.

अत्र च–'दृष्ट्वा तु पाण्डवानीकं' इत्यारभ्य 'न योत्स्य इति

---

* लढाईची तयारी होऊन आतां शस्त्रास्त्रांच्या विसर्जनास सुरवात होणार, इतक्यांत अर्जुनास उपरति होऊन तो युद्धापासून पराङ्मुख झाला. हें पाहून भगवंतांनीं अठरा अध्याय गीता सांगितली अशी पौराणिक आख्यायिका आहे. सिंहनाद होऊन शंख भेरी इत्यादिकांचा घोर आणि प्रचंड रव सुरू झाला आहे, शस्त्रास्त्र खणाणूं लागलीं आहेत अशा वेळीं अर्जुनासारख्या युद्धशास्त्रकुशल आणि युद्धापासून होणारे परिणाम उत्कृष्ट रीतीनें समजले आहेत, असें उद्योगपर्वातच दाखविणाऱ्या महावीराला उपरति व्हावी हें आश्चर्यकारक आहे; आणि उभय सैन्यांतील वीर भांडण्यास तयार झाले असतांही ते स्तब्ध झाले, श्रीकृष्णांनीं स्वस्थ मानसेंकरून परमार्थ विषयाची फोड करून सांगितली आणि अर्जुनानें ती शांतमनानें ऐकिली, हें तर विशेषच आश्चर्यकारक आहे असें कोणासही वाटण्याचा संभव आहे. अठरा अध्याय गीता सांगणें व ऐकणें संभवतात कशीं हा प्रश्न लहानपणापासून निराळेंच कांहीं ऐकण्याच्या संवयीमुळें सोपासा वाटतो, परंतु निसर्गतः तो अतिशय महत्वाचा आहे. अर्थातच या प्रश्नाचें कांहीं निराकरण होईल असें कित्येक वाचकांस वाटलें असावें इतकेंच नव्हे, तर एक दोन सद्गृहस्थांनीं अशा प्रकारचे उद्गारही काढले आहेत. इतरांप्रमाणेंच मलाही हा प्रश्नाचें गूढ होतें व अद्यापिही

गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूवह' इत्येतदन्तः प्राणिनां शोक मोहादि-

अंशतः आहे, तथापि के० वा० रघुनाथशास्त्री पर्वते यांनीं आपल्या सुंदर 'भाषाविवृत्तींत' दुसऱ्या कोणा करवीं ध्वनित करविल्याप्रमाणें दाखविलें आहे असें दिसतें. त्यावरून केवळ ग्रंथाच्या स्तुत्यर्थ ह्या उत्कृष्ट व सर्वव्यापी गीताशास्त्रामध्यें कृष्णार्जुनसंवादाची योजना केली असावी, किंवा युद्धकाळीं श्रीकृष्णांनीं आपल्या योगसामर्थ्यानें कुशाग्रबुद्धीच्या अर्जुनास थोडक्या शब्दांमध्यें शास्त्राचें रहस्य समजावून दिलें असावें व पुढें ह्या रहस्याचा विस्तार व्यासऋषींनीं केला असावा; किंवा कृष्णार्जुन हे बोलण्यामध्यें गुंतले आहेत म्हणून व सकल वीरांमध्यें श्रेष्ठत्वानें वागणारा जो अर्जुन त्याच्यावर आपणच होऊन एकाएकीं हल्ला केला असतां क्षत्रिय धर्मास कलंक लागेल आणि अर्जुन क्रोधसंतप्त झाला असतां सर्व वीरांचें एका पाशुपत अस्त्रानेंच कदन करून टाकील, या भीतीनें कौरवसेना-समूह चित्रासारखा तटस्थ उभा राहिला असावा; अशांपैकीं कोणता तरी एक भाग झाला असावा अशी कल्पना करून गेल्या अंकांतील प्रस्तावनेमध्यें या चमत्कारिक परंतु मनोरंजक प्रश्नाचा उलगडा करण्याच्या कामीं मीं तटस्थपणाचें व्रत पत्करिलें होतें. लढाईची तयारी झाली असतांही उभयपक्षांकडील सेनानीं वादविवाद करीत होते म्हणून दोन्ही सैन्यें तटस्थ राहिलीं व लढाई झाली नाहीं असा प्रसंग ग्रीसच्या इतिहासांत एकदां आला आहे; तसेंच पर्शियाच्या सैन्याविरुद्ध लढाई करण्यासाठीं अथीनियन व स्पार्टन लोक आपापल्या सैन्याचे व्यूह बांधून उभे राहिले असतां एक चमत्कारिकच प्रश्न निघून लढाईच्या जागेवरून ग्रीक लोकांचें सैन्य मागें हटलें असा प्याटियाच्या लढाईंतही चमत्कार घडून आला होता. तात्पर्य, लढाईला सज्ज झालेले व सेनानीचे वीरश्रीजनक भाषणानें प्रोत्साहन पावलेले वीर नेहमीं लढाई ठोकतातच असा नेम नाहीं, हें रोमच्या विरुद्ध तिलांजुली घेतलेल्या हानिबाल नामक जगद्विजयी वीराशीं लढतांना रोमन लोकांच्याही अनुभवास आलेलें होतें. हा सर्व प्रकार ध्यानांत असल्यामुळें व भारतीयुद्धांतील अलौकिक स्तब्धतेचा सयुक्तिक उलगडा अद्यापपर्यंत सांपडला नसल्यामुळें मी स्तब्ध राहिलों होतों. आतां लिहिण्यास आनंद वाटतो कीं, सर्व भगवद्गीता सुमारें एकुण ऐंशी श्लोकांत भगवंतांनीं अर्जुनास सांगितली व त्यांतलि मुख्य सिद्धांतास अनुलक्षून त्रि-कालज्ञ व्यास ऋषींनीं सर्व गीताशास्त्र निर्माण केलें, असा **आकर** (?) नामक ग्रंथांत उल्लेख असल्याविषयीं माझे चुलतबंधु ती. रा. नरसो गणेश ऊर्फ रावसाहेब भानु पेन्शनर मामलेदार मिरज हे कळवितात. रावसाहेब भानु ह्यांची शोधकबुद्धि आणि संग्रहलालसा, इंग्लिश भाषा शिकल्यामुळें आपण सर्व तऱ्हेनें विद्वान झालों असें समजणाऱ्या अधुनिक पंडितांनीं लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. असो; रावसाहेब भानूंनीं गीतेंतील सर्व सिद्धांत-भूत श्लोकांचें टिप्पण माझ्याकडे पाठवून दिलें आहे व ते श्लोक मुख्य सिद्धांतासारखे आहेत असें आज दिसत आहे. हे असे सिद्धांतभूत श्लोक कोणते ते यथाप्रसंगीं सागण्यांत

संसारबीजदोषोद्भवकारणप्रदर्शनार्थत्वेनव्याख्येयो ग्रन्थः* ।

येतीलच. हे श्लोक सांगितल्यावर शोधक लोकांच्या विचारास एकप्रकारचें वळण लागेल. सारांश, अशा तऱ्हेनें या गूढ प्रश्नाचा निकाल समाधानकारक रीतीनें झाल्यास एक आनंदाची गोष्ट झाली. आणि प्रस्तुतचें मासिक पुस्तक प्रसिद्ध करण्याचे जे अनेक हेतु आहेत, त्यांतील एक सिद्धीस गेला म्हणून या मासिक पुस्तकाच्या संपादकास एक प्रकारचा अभिनव आनंद उत्पन्न होईल. हें निराळें सांगावयास नकोच आहे. ह्या कामीं सर्व वाचकांनीं शोध करण्याचें मनांत आणून खटपट केल्यास व त्या खटपटीचे फळाचा आस्वाद मला चाखूं दिल्यास एकंदरीनें जो सत्परिणाम घडून येईल त्याचें आजच विवरण करीत बसत नाहीं.

* गीतेमध्यें काय सांगितलें आहे त्याच्या, वेदांतमतास अनुसरून असणाऱ्या सारांशाचें आचार्यांनीं ह्या प्रस्तावनेंत निरूपण केलें आहे. ह्या निरूपणांत काय सांगितलें आहे त्याचें तात्पर्य वाचकांच्या सोईसाठीं येथें देतों. हें तात्पर्य वाचलें असतां आचार्यांचें रहस्य स्थूलमानानें समजेल असें वाटतें. आचार्यांनीं प्रथमतः अर्जुनास शोक व मोह कसे प्राप्त झाले व त्यांचा परिणाम स्वकर्तव्य करण्यामध्यें पराङ्मुखता उत्पन्न करण्याकडे कसा झाला; हें सांगून प्राणीमात्रास संसारामध्यें शोक मोह उत्पन्न झाल्यामुळें सर्व जीव स्वकर्तव्यापासून कसे परावृत्त होतात याचेंही दिग्दर्शन केलें आहे. ही कर्तव्यपराङ्मुखता नाहींशी व्हावी म्हणून अर्जुनास निमित्तमात्र पुढें उभा केला व सर्व प्राण्यांस संसारतापापासून मुक्त करण्यासाठीं भगवंतांनीं ही गीता सांगितली असें आचार्य म्हणतात. आतां गीतेंत काय सांगितलें आहे असा प्रश्न निघतो त्याचें उत्तर आचार्य असें देतात. मोक्ष मिळण्याची ज्याला इच्छा असेल, त्यानें सर्व कर्मांचा संन्यास करावा. [ कर्म आपल्या हातून झालें तरी त्याच्या फलाविषयीं कोणत्याही प्रकारची आशा न ठेवितां तें तें कर्म परमेश्वराच्या ठायीं समर्पण करावें असा संन्यास या शब्दाचा अर्थ आहे. ] याप्रमाणें कर्मसंन्यास करून ब्रम्हज्ञान मिळविण्याची खटपट केली व तें ज्ञान प्राप्त होऊन स्वानुभव मिळाला ह्मणजे मुक्ति मिळते. कर्म करावें व ज्ञानही मिळवावें ह्मणजे मुक्ति साध्य होईल, असें कर्मठ लोकांचें म्हणणें आहे तें विरोधात्मक आहे. फलप्राप्तीच्या आशेनें कर्म करणें आणि फलाशा न ठेवितां निष्क्रिय अशा परब्रम्हाचें ज्ञान संपादन करून घेणें; [ अथवा कर्मयोग आणि ज्ञानयोग ] या परस्परविरोधी गोष्टी आहेत असें गीतेचाच आधार दाखवून आचार्यांनीं श्रौतस्मार्त कर्म केलें पाहिजे, असा आग्रह धरणाऱ्या कर्मठांच्या मनाचें सयुक्तिक खंडण केलें आहे; आणि कर्मठ लोकांचेंच मत खरें आहे असें धरल्यास गीतेंतलि सिद्धांतवाक्यास कसा विरोध येतो हेंही दाखविलें आहे. शेवटीं जनकादिक राजर्षी व कृष्णासारखे पूर्ण ज्ञानी हे कर्म करितात तें चित्तशुद्धीसाठीं अगर लोकोपकारार्थ करितात असें गीतेंतील आधार दाखवून सिद्ध केलें आहे; आणि असा सिद्धांत काढला आहे कीं मोक्षप्राप्ति होते ती केवळ शुद्धज्ञानानें मात्र होते.

हा आचार्यकृत प्रस्तावनेचा सारांश सांगितला. आचार्य हे वेदांतमताचे उत्कृष्ट प्रस्थापक होते व त्यांनीं सर्वमतांचें शास्त्रानें व युक्तीनें खंडण करून मोक्ष मिळवून

ह्या गीताशास्त्रांत 'पांडवांची सेना पाहून' (अध्याय १ श्लोक २) येथपासून आरंभ करून 'गोविंदा! मी युद्ध करीत नाहीं, असें म्हणून—अर्जुन—स्तब्ध राहिला.' (अध्याय २ श्लोक ९) येथपर्यंत झालेल्या ग्रंथाचा मथितार्थ असा काढावयाचा कीं, प्राण्यांस जे शोक, मोह (शोक म्हणजे मनास होणारा संताप आणि मोह म्हणजे तारतम्यशून्यता) वगैरे दोष (विकार) उत्पन्न होतात तेच दुःखमय असणाऱ्या संसाराला उत्पन्न करितात आणि या दोषांचें कारण अविद्या (अज्ञान अगर माया) आहे; हें दाखविण्यासाठीं ह्या भागाची योजना केलेली आहे.--ह्मणजे संसार (जन्ममरण) उत्पन्न होण्याला कारण शोक आणि मोह होत. या शोकमोहांचें कारण अविद्या आहे. सारांश, मायेच्या योगानें जीवास शोक आणि मोह होतात आणि शोकमोहामुळें जीव संसारांत पडतो; असें पूर्वग्रंथावरून सांगण्याचा उद्देश आहे.—

---

देणाऱ्या सर्व धर्मांचें व तत्वज्ञानाचें एकीकरण केलें आहे, इतकेंच नव्हे, तर मानवी प्राण्यांचें ज्ञान वाढून त्यानें आणखी कितीही नवीन मतें काढलीं किंवा धर्म निर्माण केले, तथापि त्या सर्वांचा अंतर्भाव वेदांताच्या आचार्यसिद्धान्तांमध्यें करितां येईल इतक्या विस्तृत पायावर वेदांतमताची स्थापना आचार्यांनीं केली आहे. पुढील ज्ञानानें वेदांतसिद्धांताची मांडणी फार तर निराळ्या तऱ्हेनें करावी लागेल; पण त्यांतील सिद्धांताला बाध येणार नाहीं अशी वेदांताची योग्यता आहे. अशी सर्वव्यापी व देश, स्थल प्रसंगांनीं अबाधित राहणाऱ्या वेदांतमताची वाचकांस ओळख करून देणें व या सिद्धांताची आणि पाश्चिमात्यांच्या आधुनिक वेदांताची एकवाक्यताच आहे, हें सविस्तर रीतीनें दाखवून देणें अगत्याचें काम आहे. परंतु भगवद्गीतेसारख्या छोटेखानी मासिक पुस्तकांत वेदांतमताची उत्पत्ति कशी व केव्हा झाली, त्याचा इतर मतांशीं काय संबंध आहे, अद्वैत मतानें सृष्टीमध्यें दिसणाऱ्या अनंत चमत्कारांचा उलगडा कसा होतो, तसेंच मनुष्याच्या चंचल मनाला ह्या मताच्या परिशीलनानें कसें स्थैर्य येतें, यच्चयावत ज्ञानाचें पर्यवसान अद्वैतामध्येंच कसें होतें, आणि अद्वैतमताचा स्वीकार केल्यावर आचरणाचे मार्ग कोणते वगैरे अति महत्वाच्या विषयांवर विस्तारानें लिहिणें किंवा लिहितां येणें अत्यंत अवघड आहे, म्हणून या विषयावर निराळेंच एक पुस्तक लिहिण्याचा माझा विचार आहे. अर्थातच आचार्यांच्या गीतेवरील भाष्यामध्यें जे जे विषय येतील त्यांची फोड प्रस्तुत मासिकपुस्तकांत होईलच; पण ज्याला या विषयांवर विस्तृत विवेचन पाहिजे आहे; व असे पुष्कळ जिज्ञासु व मुमुक्षु गृहस्थ आहेत हें मला माहीत आहे–त्यांच्या सोईसाठीं व माझ्या मनाच्या समाधानासाठीं वर लिहिल्याप्रमाणें मी प्रयत्न करणार आहे. हा प्रयत्न केव्हां व कसा प्रकट करावयाचा याची सूचना योग्यवेळीं करीन इतकें सांगून हें अगत्याचें विषयांतर आटोपतो.

तथा ह्यर्जुनेन राज्यगुरुपुत्रमित्रसुहृत्स्वजनसंबन्धिबान्धवेष्वहमेषां ममैत इत्येवं प्रत्ययनिमित्तस्नेहविच्छेदादिनिमित्तावात्मनः शोकमोहौ प्रदर्शितौ ' कथं भीष्ममहं संख्ये ' इत्यादिना । शोकमोहाभ्यां ह्यभिभूतविवेकविज्ञानः स्वत एव क्षत्रधर्मे युद्धे प्रवृत्तोऽपि तस्माद्युद्धादुपरराम । परधर्मं च भिक्षाजीवनादिकं कर्तुं प्रववृते ।

त्याचप्रमाणें येथेंही पहा कीं, ' हें माझें राज्य, हे माझे गुरु, हे पुत्र, मित्र, स्नेही, भाऊबंद आप्त वगैरे माझे, व 'मी यांचा,' अशा प्रकारच्या मायेनें उत्पन्न झालेले जे शोक, मोह वगैरे विकार( संयोग झाला असतां सुखप्राप्ति होणें, वियोग झाला असतां शोक होणें, बंधूस मारण्याचें आपल्या कपाळीं आलें ह्मणून आपण पातक करितों असें वाटणें--) व 'भीष्मास मी युद्धांमध्यें कसें बाण मारूं? असें ह्मणून अर्जुनानें आपले मनोविकार प्रकट केले. भीष्माला मारण्यासाठीं माझ्या हातून कसे बाण सुटतील? ( हे माझे आजोबा, मी यांचा नातू, वगैरे प्रश्नावरून अर्जुनास 'हें माझें व मी यांचा' अशा प्रकारची माया उत्पन्न झाली होती व तिच्या योगानें त्यास शोक मोह उत्पन्न झाले होते, हें स्पष्ट दिसत आहे.) तसेंच या प्रस्तुतच्या शोकमोहांनीं त्याच्या विवेकबुद्धीवर ( तारतम्यशक्तीवर) इतका पगडा बसविला होता किंवा चांगलें वाईट निवडून काढणाऱ्या बुद्धीला इतकी दडपून टाकिली होती कीं, क्षत्रियधर्मास विहित (योग्य) जें युद्ध, त्याला आपण स्वतः होऊनच सिद्ध झाला असतांही.— क्षात्रधर्माप्रमाणें योग्य जो कौरवांचा नाश, तो करण्याला आपण होऊनच प्रवृत्त झाला असतांही--ह्या युद्धापासून तो परत फिरला. भाऊबंद आणि वडील माणसें, गुरु वगैरे आपल्या हातून मरणार, असें पाहून त्याला युद्धाचा तिरस्कार उत्पन्न झाला व मी युद्ध करीत नाहीं असें तो म्हणूं लागला. इतकेंच नव्हे, तर भिक्षेनें आपलें पोट भरून जिवंत राहवयाचें हा जो दुसऱ्या जातीचा धर्म, तो परधर्म घेण्यासही (भिक्षेचा अंगीकार करण्यासही) तयार झाला !--सारांश स्वतः योग्य कर्तव्य न करितां भलतीच गोष्ट करूं लागणें ह्याला मोह ह्मणतात. वरील शोक आणि हा मोह यांच्याचमुळें प्राणी संसारांत पडून जन्ममरणादिक दुःख पावतात, असें सांगून आचार्य मुख्य विषयाकडे वळतात.—

तथा च सर्वप्राणिनां शोकमोहादिदोषाविष्टचेतसां स्वभावत एव स्वधर्मपरित्यागः प्रतिषिद्धसेवा च स्यात् । स्वधर्मे प्रवृत्तानामपि तेषां वाङ्मनःकायादीनां प्रवृत्तिः फलाभिसंधिपूर्विकैव साहंकारा च भवति। तत्रैवं सति धर्माधर्मोपचयादिष्टानिष्टजन्मसुखदुःखसंप्राप्तिलक्षणः संसारोऽनुपरतो भवतीत्यतः संसारबीजभूतौ शोकमोहौ । तयोश्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञानान्नान्यतो निवृत्तिरिति तदुपादिदिक्षुः सर्व-लोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तिकृत्याऽऽह भगवान्वासुदेवः—अशो-च्यानित्यादि ।

ह्याचप्रमाणें शोकमोहादिक विकारांच्या योगानें ज्यांचीं मनें व्याकुळ झालीं आहेत, शोकमोहांनीं ज्यांचीं अंतःकरणें सर्वस्वी आपल्या स्वाधीन करून ठेविलीं आहेत असेच सर्व प्राणी आहेत; ह्मणून स्वाभाविकपणानेंच त्यांच्या हातून स्वधर्माचा त्याग (कर्तव्यपराङ्मुखता) आणि अधर्माचा अंगीकार (निषिद्धाचरण) हीं होतात. स्वधर्माप्रमाणें जरी ते कांहीं अंशीं चालत असले, तथापि त्यांच्या जिव्हेची, मनाची व शरीराची (तनुमनवाणींची) प्रवृत्ति (व्यापार) फळाच्या आशेनें उत्पन्न झालेली असते--ह्मणजे धर्माप्रमाणें चाल-णारे लोकसुद्धां शास्त्रोक्त आचरण करितात त्याचें मूळ कारण शोधूं गेल्यास आपल्यास 'अमुक फळ मिळावें' 'आपल्यावर अमुक संकट येऊं नये' अशा आशाळभूतपणाच्या बुद्धीनें ते--शास्त्रोक्तमार्गानें चालतात.--शिवाय 'मी हें कर्म करितों' अशी अहंकारबुद्धि (मीपणा) ह्या लोकांत पूर्णपणानें भरलेली असते ती निराळीच. याप्रमाणें फळाची आशा आणि मीपणा या दोन गोष्टींचा प्राण्यांच्या मनावर पूर्ण पगडा बसला असल्यामुळें त्यांच्या शुभ किंवा अशुभ कर्मानुसार त्यांस देवलोकांत, मनुष्यलोकांत अगर पशुपक्ष्यादि कोटींत सुखदुः-खांच्या उपभोगासाठीं (केलेलें कर्म भोगण्यासाठीं) अनेक जन्म घ्यावे लाग-तात, ह्मणजे त्यांस अनंतकालपर्यंत जन्ममरणांच्या फेऱ्यांत पडावें लागतें. आणि त्यांच्या मागचा संसार कधींच सुटत नाहीं. हें असें आहे ह्मणून शोक-मोहादि विकार हे संसारास कारण आहेत. (शोकमोह झाले असतां आपलें दुःख नष्ट व्हावें या हेतूनें मनुष्य कर्म करितो, त्या कर्माचें फल त्याला पुढच्या जन्मीं भोगावें लागतें, पुनः कर्म करितो, पुनः घेतो, असा चौऱ्यायशींचा फेरा त्याच्या पाठीमागें अनंतकालपर्यंत लागतो असें सांगण्याचा भाव आहे.) असो.

ह्या शोकमोहांचा नाश करावयाचा असेल तर त्याला एकच मार्ग आहे तो हा कीं, जें काय आपण कर्म करितों, आपल्यास करावें लागतें, अगर जें करणें आपलें कर्तव्य आहे तें सर्व कर्म व त्याचें फल या दोन्हींचाही संन्यास केला पाहिजे. ह्मणजे तें सर्व कर्म व त्याचें फल हीं ब्रह्मार्पण करावयाचीं; आणि नंतर आत्मज्ञान (ब्रह्मज्ञान) करून घ्यावयाचें--हाच मार्ग आहे.--ह्या मार्गा-चाच उपदेश करण्याच्या हेतूनें भगवान वासुदेवांनीं अर्जुनास निमित्तासाठीं मात्र पुढें केलें; आणि सर्व लोकांस हें पुरुषार्थाचें मुख्य तत्त्व कळावें यासाठीं बोलण्यास आरंभ केला कीं, 'ज्यांचा शोक करणें योग्य नाहीं त्यांचा तूं शोक करीत आहेस वगैरे' (अर्जुनासच उपदेश केला असें नव्हे, तर सर्व प्राणी-मात्रांस हा उपदेश केला आहे असें सांगण्याचा उद्देश आहे.)

तत्र केचिदाहुः, सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञाननिष्ठामात्रादेव केव-लात्कैवल्यं न प्राप्यत एव किं तर्ह्यग्निहोत्रादिश्रौतस्मार्तकर्मस-हिताज्ज्ञानात्कैवल्यप्राप्तिरिति सर्वासु गीतासु निश्चितोऽर्थ इति। ज्ञापकं चाऽऽहुरस्यार्थस्य--'अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि' 'कर्मण्येवाधिकारस्ते' 'कुरु कर्मैव तस्मात्त्वम्' इत्यादि।

आतां कांहीं--टीकाकार--असें म्हणतात कीं, सर्व कर्मांचा व कर्मफलांचा संन्यास करून नुसतें आत्मज्ञान मिळविलें तरच मोक्ष मिळतो, कैवल्यप्राप्ति (ब्रह्मप्राप्ति) होते असें नाहीं; तर मग मोक्षाला साधन काय म्हणून विचारलें तर तें सांगतात कीं, अग्निहोत्र वगैरे श्रौत व स्मार्त कर्में करून आत्मज्ञान मिळविलें ह्मणजे मोक्ष मिळतो, असें हें खरें तत्त्व सर्व गीतामध्यें सांगितलें आहे. 'असें कशावरून?' असें विचारल्यास ते आपल्या अर्थाचें समर्थन करण्यासाठीं हे श्लोक पुढें आणितात; 'जर तूं हें धर्मोक्त युद्ध केलें नाहींस' (अ. २ श्लोक ३३) 'कर्म मात्र करण्याचा अधिकार तुला आहे' (अ० २ श्लोक ४७) 'ह्मणून तूं कर्मच कर' (अ० ४ श्लोक १५). आणखीही पुष्कळ श्लोक ते दाखवितात;--पण हे वरील श्लोक त्यांचें ह्मणणें काय आहे तें समजण्यास पुरे आहेत.--

हिंसादियुक्तत्वाद्वैदिकं कर्माधर्मायेतीयमप्याशङ्का न कार्या, कथं क्षात्रं कर्म युद्धलक्षणं गुरुभ्रातृपुत्रादि हिंसालक्षणमत्यन्तक्रूरमपि स्वधर्म

इति कृत्वा नाधर्माय, तदकरणे च 'ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि' इति ब्रुवता यावज्जीवादिश्रुतिचोदितानां पश्वादिहिंसालक्षणां च कर्मणां प्रागेव नाधर्मत्वमिति सुनिश्चितमुक्तं भवतीति ।

हेच लोक आणखी असें ह्मणतात कीं:—वैदिक धर्मामध्यें यज्ञयागादिक क्रिया करतांना पशूंची हिंसा करावी लागते ह्मणून या वेदोक्त कर्माच्या योगानें अधर्म होईल अशीही शंका घेण्याचें कारण नाहीं. कारण क्षत्रियाचा धर्मच युद्ध करण्याचा आहे. त्या युद्धांत आपले गुरु, भाऊ, पुत्र यांची हिंसा होते व एकंदरीनें क्षत्रियास क्रूर कर्में करावीं लागतात. तरी तो त्यांचा स्वधर्म आहे ह्मणून त्याच्यापासून अधर्म ( पाप ) उत्पन्न होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर आपला स्वधर्म जें युद्धकर्म तें क्षत्रियानें केलें नाहीं 'तर तुझा स्वधर्म आणि कीर्ति या उभयांचा नाश होऊन तुझ्या पदरांत पापाचें गांठोडें मात्र पडेल' ( अध्याय २ श्लोक ३३ ) असें भगवंतानींच सांगितलें आहे. तेव्हां हें सांगितलें ह्मणून आह्मी असाही सिद्धांत काढितों कीं, 'जोंपर्यंत जीव आहे तोंपर्यंत अग्निहोत्राचें पालन करावें' वगैरे वेदोक्त वचनांवरून ज्या कर्मांत पशूंची हिंसा होणार अशीं कर्में अधर्माचीं नाहींत,—असें भगवंताच्या वरील वाक्यावरूनच हें स्पष्ट होत आहे. स्वधर्माप्रमाणें आचरण केलें असतां पाप नाहीं असें भगवंतांनीं सांगितलें, यावरूनच यज्ञासाठीं पशूंची हिंसा करणें अधर्माचें नाहीं असाच सिद्धांत निघतो.—हें कर्मठ लोकांचें ह्मणणें आहे व हिंसा झाली तरी वेदोक्त कर्में पापजनक नाहींत असें त्यांनीं ठरविलें आहे.

यावर आचार्य ह्मणतात:

तदसत्, ज्ञानकर्मनिष्ठयोर्विभागवचनाद्बुद्धिद्वयाश्रययोरशोच्यानित्यादिना भगवता यावत् 'स्वधर्ममपि चावेक्ष्य' इत्येतदन्तेन ग्रन्थेन यत्परमार्थात्मतत्त्वनिरूपणंकृतं तत्सांख्यं, तद्विषया बुद्धिरात्मनो जन्मादिषड्विक्रियाभावादकर्ताऽऽत्मेति प्रकरनार्थनिरूपणाद्या जायते सा सांख्यबुद्धिः सा येषां ज्ञानिनामुचिता भवति ते सांख्याः ।

या कर्मयोगी लोकांचें हे ह्मणणें खोटें आहे.—हे लोक अज्ञानामुळें ह्मणतात कीं कर्म आणि ज्ञान यांच्या योगानें मोक्ष मिळतो, पहा:— ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा या दोन्हींस दोन निरनिराळ्या बुद्धींची आवश्यकता आहे.

ज्ञाननिष्ठा सांख्यज्ञानामुळें सिद्ध होते आणि कर्मनिष्ठा योगाच्या ज्ञानानें सिद्ध होते. भगवंतांनीं अ. २ श्लो. ११ पासून अ. २ श्लो. ३१ पर्यंत आत्याचें जें परमार्थतः आत्मतत्वनिरूपण केलें आहे ( आत्म्यासंबंधानें जे शेवटचे खरे सिद्धांत सांगितले आहेत, ) त्यास **सांख्यज्ञान** असें ह्मणावें;—आणि हें सर्व प्रकरण उत्कृष्ट समजून घेतलें ह्मणजे या प्रकरणांतील अर्थाच्या अनुरोधनानें ‘ आत्म्याला जन्ममरण, क्षयवृद्धि वगैरे षड्विकार नाहींत, आत्मा हा अकर्ता ( कर्म न करणारा, कांहींएक न करणारा असा ) आहे ’ अशी जी सांख्यज्ञानविषयक बुद्धि उत्पन्न होते तिला **सांख्यबुद्धि** ह्मणतात आणि हें ज्ञान ज्या विवेकी-पुरुषास होतें त्यांस **सांख्य** असें ह्मणतात.

एतस्या बुद्धेर्जन्मनः प्रागात्मनो देहादिव्यतिरिक्तत्वकर्तृत्वभोक्तृत्वाद्यपेक्षो धर्माधर्मविवेकपूर्वको मोक्षसाधनानुष्ठाननिरूपणलक्षणो योगः, तद्विषया बुद्धिर्योगबुद्धिः सा येषां कर्मिणामुचिता भवति ते योगिनः ।

ही वर सांगिलतेली बुद्धि उत्पन्न होण्यापूर्वी आत्मा हा शरीरापासून निराळा आहे, आत्म्यालाच **कर्तृत्व** ( कर्म करण्याचें सामर्थ्य ) **भोक्तृत्व** ( उपभोग घेण्याचें किंवा सुख दुःख भोगण्याचें सामर्थ्य ) वगैरे आहेत अशी समजूत ज्यांत अवश्य आहे असा जो मार्ग, त्याचप्रमाणें धर्म कोणता, अधर्म कोणता ( शास्त्रविहित काय, शास्त्रामध्यें निषिद्ध काय आहे ) याविषयीं तारतम्यानें विचार करणें ज्यांत अवश्य आहे, आणि मोक्षप्राप्त करून देणारीं जीं साधनें आहेत तीं अनुकूल करून घेण्यासाठीं कोणतीं कोणतीं कर्में केलीं पाहिजेत हें ज्यांत सविस्तर रीतीनें सांगितलें आहे, असा जो मार्ग त्यास **योग** किंवा **कर्ममार्ग** ह्मणावें, याला लागणारी जी बुद्धि तिला **योगबुद्धि** ह्मणावें, आणि ही बुद्धि ज्यांस बरी वाटते असे जे कर्मठ त्यांस **योगी** ह्मणावें. ह्याप्रमाणें दोन प्रकारचीं ज्ञानें, आणि दोन प्रकारच्या बुद्धि असतात, असें भगवंताच्या सांगण्यावरूनच सिद्ध झालें मग ज्ञान व कर्म यांचा समुच्चय कसा होईल ? पुनः

तथा च भगवता विभक्ते द्वे बुद्धी निर्दिष्टे—‘ येषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ’ इति । तयोश्च सांख्यबुद्ध्याश्रयां ज्ञानयोगेन निष्ठां सांख्यानां विभक्तां वक्ष्यति—‘ पुरा वेदात्मना मया प्रोक्ता ’ इति । तथा च योगबुद्ध्याश्रयां कर्मयोगेन निष्ठां विभक्तां

वक्ष्यति–कर्मयोगेन योगिनाम्' इति। एवं सांख्यबुद्धिं योगबुद्धिं चाऽऽश्रित्य द्वे निष्ठे विभक्ते भगवतैवोक्ते ज्ञानकर्मणोः कर्तृत्वाकर्तृत्वैकत्वानेकत्वबुद्ध्याश्रययोरेकपुरुषाश्रयत्वासंभवं पश्यता।

त्याचप्रमाणें भगवंतांनीं सांगितलें आहे कीं, ह्या दोन बुद्धि परस्परांहून निराळ्या आहेत—'याप्रमाणें हें तुला सांख्यज्ञान सांगितलें; आतां योगज्ञान सांगतों तें ऐक' (अ० २ श्लोक ३९) हा श्लोक पाहिला म्हणजे भगवंतांचा अभिप्राय स्पष्ट दिसेल व ज्ञानबुद्धि व कर्मबुद्धि या निराळ्या आहेत हें स्पष्ट होईल. या दोन साधनांपैकीं सांख्यज्ञानानें साध्य होणारें सांख्यांचें विज्ञानरूपी आत्मचिंतन वेगळें आहे व तें कर्मयोगापासून निराळें आहे असें पुढील श्लोकांत भगवान दाखवितात.–हे पापशून्य अर्जुना!–मीं–वेदस्वरूपी सर्वज्ञ ईश्वरानें मागेंच सांगितलें आहे कीं, या लोकांत ब्रह्मसाधनाचे दोन निराळे मार्ग आहेत. पहिला सांख्यांचा. यांत ज्ञानरूपी जो आत्मा त्याचें चिंतन करून मोक्ष मिळवावा असा मार्ग आहे (अ. ३ श्लो. ३) तसेंच योगबुद्धीच्या (कर्मज्ञानाच्या) आश्रयानें राहणारें जें कर्ममार्गाचें निराळें साधन तें दुसरें साधन आहे. यांत कर्मरूपी योगानें आत्मस्वरूपाचें चिंतन करावयाचें (आत्मनिष्ठ व्हावयाचें) व पुढें मोक्ष मिळवावयाचा असा क्रम आहे.—याप्रमाणें सांख्यज्ञान आणि योगज्ञान अशीं दोन निरनिराळीं ज्ञानें सांगून दोन्ही साधनें (निष्ठा) निरनिराळीं आहेत, असें भगवंतांनींच सांगितलें आहे. कारण भगवंतास असें स्पष्ट दिसलें कीं, 'आत्मा कर्ता आहे,' 'आत्मा कर्ता नाहीं,' 'आत्मा एक नाहीं,' 'आत्मा एक आहे,' अशीं दोन्ही परस्परविरुद्ध ज्ञानें एका पुरुषाला एकेच वेळीं असूं शकणें संभवनीय नाहीं—ह्मणजे कर्मकांडामध्यें आत्मा कर्ता आहे व आत्मा एक नाहीं अशीं बुद्धि असते व ज्ञानमार्गांत आत्मा कर्ता नाहीं व आत्मा एकच आहे अशी बुद्धि असते. ह्मणून कर्मज्ञान व सांख्यज्ञान हीं एकमेकांशीं विरुद्ध आहेत. असें पाहूनच भगवंतानीं या ज्ञानांचा विभाग केला. उघडच आहे कीं हीं एकमेकांस विरुद्ध असणारीं ज्ञानें एका मनुष्याला एकाच वेळीं असणें संभवत नाहीं; ह्मणून मोक्षमार्ग सांगतांना विरुद्ध ज्ञानाचें स्पष्टीकरण करणें अवश्य होतें. ज्ञानकर्मांचा समुच्चय होणें शक्य नाहीं, हें उपनिषद्वाक्यांवरूनही सिद्ध करून दाखवितात.—

यथैतद्विभागवचनं तथैव दर्शितं शातपथीये ब्राह्मणे— ' एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तो ब्राह्मणाः प्रव्रजन्ति ' इति सर्वकर्मसंन्यासं विधाय तच्छेषेण ' किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोकः' इति । तत्रैव च—' प्राग्दारपरिग्रहात्पुरुष आत्मा प्राकृतो धर्मजिज्ञासोत्तरकालं लोकत्रयसाधनं पुत्रं द्विप्रकारं च वित्तं मानुषं दैवं च तत्र मानुषं वित्तं कर्मरूपं पितृलोकप्राप्तिसाधनं विद्यां च दैवं वित्तं देवलोकप्राप्तिसाधन सोऽकामयत ' इत्यविद्याकामवत एव सर्वाणि कर्माणि श्रौतादीनि दर्शितानि । ' तेभ्यो व्युत्थाय प्रव्रजन्ति ' इति व्युत्थानमात्मानमेव लोकमिच्छतोऽकामस्य विहितम् । तदेतद्विभागवचनमनुपपन्नं स्याद्यदि श्रौतकर्मज्ञानयोः समुच्चयोऽभिप्रेतः स्याद्भगवतः

—हा येथें जसा ज्ञानमार्गाचा आणि कर्ममार्गाचा भेद सांगितला आहे; तसाच भेद शतपत ब्राह्मणामध्येंही सांगितला आहे—पहा—कर्मफलाविषयीं उदाशीन असणारे व आत्मज्ञान मिळविण्याविषयीं इच्छा करणारे मुमुक्षु ब्राह्मण कर्मांचा संन्यास करितात. ' याप्रमाणें सर्व कर्मांचा संन्यास सांगून पुनः त्याचें पुष्टीकरण करण्याच्या हेतूनें शतपत ब्राह्मणांतच असें म्हटलें आहे. ' बाह्यविषय जे पुत्र वगैरे ते घेऊन आह्माला काय करावयाचें आहे ? यांच्या योगानें आम्हाला आत्मज्ञान होणार नाहीं व ब्रह्मप्राप्तिही होणार नाहीं ' —यावरून स्पष्ट दिसेल कीं ज्ञानाचा शेवट काय तो मोक्ष आहे.—( बृहदारण्यक उपनिषद ६।४। २२ )--याच उपनिषदांत दुसऱ्या ठिकाणीं सांगितलें आहे:—' अज्ञानी मनुष्य लग्न होण्यापूर्वी व धर्माधर्म काय आहे हें समजून घेतल्यानंतर, आपल्यास पुत्र असावा व दोन प्रकारचे धन असावें अशी इच्छा धारण करितो. पुत्र असला म्हणजे देव, पितृ व मनुष्य असे तिन्ही लोक साध्य होतात आणि मानवी व दैवीधन असले म्हणजे मानवी धनानें शास्त्रोक्त कर्म करून पितृलोक साध्य होतो आणि दैवी धन असलें म्हणजे देवलोक साध्य होतो.---म्हणजे तर्पण, श्राद्धपक्ष इत्यादि मानवी कर्म केलें म्हणजे पितृलोक मिळतो व अग्निहोत्र, यज्ञयाग केले म्हणजे इंद्रलोक वगैरे मिळतात असें प्राकृत पुरुषास वाटतें. '---' म्हणून—' मला बायको असावी, पुत्र असावे, अशी

इच्छा तो धारण करितो.' (बृ० ३।४।१७)—याप्रमाणें जो अज्ञानी आहे व म्हणूनच ज्याला कर्मफलाची आशा आहे; (ह्मणजे त्यास आत्मज्ञान झालें नाहीं व हें मिळावें, तें मिळावें, अशी इच्छा व आशा नष्ट झाल्या नाहींत; ) त्या अज्ञ आणि कामी पुरुषालाच–चित्तशुद्धीसाठीं–श्रौतस्मार्त कर्में सांगितलीं आहेत असें स्पष्ट झालें. तसेंच 'कर्मफलाविषयीं उदासीन असल्या-मुळें देवलोक, मनुष्यलोक, पितृलोक ह्यांच्या प्राप्तीचीं जीं दैववित्त, मानुषवित्त व पुत्रप्राप्ति हीं साधनें त्यांविषयीं पूर्ण निरपेक्ष होऊन ते लोक कर्में टाकून देतात व संन्यासी होतात ( अरण्यांत जातात ) ' ह्यावरून आशाशून्य व ब्रह्मज्ञान मिळवून मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूस कर्म करणें हें सांगितलें नाहीं हेंही उघडच झालें.

या मागील विवरणावरून हें स्पष्ट होईल. कीं गीताशास्त्रामध्यें कर्म आणि ज्ञान हीं दोन्ही प्रत्येक पुरुषानें एक काळींच साध्य करून घ्यावीं, असा जर भगवंताचा अभिप्राय ( इष्ट हेतु ) असता तर कर्मनिष्ठा व ज्ञान-निष्ठा अशा दोन निष्ठा विरक्त करून सांगितल्या हा विभाग अयोग्य ( वेड्या-सारखा ) झाला असता.–सारांश कर्ममार्ग आणि ज्ञानमार्ग निराळे आहेत असें सांगणेंच भगवंतास इष्ट असल्यामुळें त्यांनीं या दोन मार्गांचे निरनिराळे विभाग करून दाखविले आहेत. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग ह्या दोन्हींमार्गांचे अनु-सरण मनुष्यांनीं एका काळींच करावें असें त्यास इष्ट असतें तर त्यांनीं कर्म-ज्ञान आणि सांख्यज्ञान असे दोन विभागच केले नसते. पण त्यांनीं हे विभाग केले आहेत म्हणून ज्ञान आणि कर्म हीं एकत्र व्हावींत असा त्यांचा हेतु नाहीं हें स्पष्ट झालें.—पुनः—

> न चार्जुनस्य प्रश्नः उपपन्नो भवति 'ज्यायसी चेत्कर्मणस्ते' इत्यादिः । एकपुरुषानुष्ठेयत्वासंभवं बुद्धिकर्मणोर्भगवता पूर्वमनुक्तं कथमर्जुनोऽश्रुतं बुद्धेश्च कर्मणो ज्यायस्त्वं भगवत्यध्यारोपयेन्मृषैव 'ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः' इति ।

ज्ञान आणि कर्म एकत्र करावयाचीं असा भगवंताचा भाव होता असें म्हटलें तर 'कर्मापेक्षां ज्ञान मोठें आहे, असें जर तुझें मत असेल तर कृष्णा ! मला घोर कर्म करावयास कां लावतोस ?' ( अ० ३ श्लोक १ ) असा जो

अर्जुनानें प्रश्न केला तो सुसंगत दिसत नाहीं. ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही एका पुरुषाच्या ठायीं संभवत नाहींत. असें जर भगवान बोललेच नाहींत व अर्जुनानेंही तसें ऐकिलें नाहीं तर 'कर्मापेक्षां बुद्धि मोठी असें तुझें मत आहे.' असा खोटा व भलताच आरोप अर्जुनास तरी कसा करितां येईल?—ज्ञान आणि कर्म यांचे विभाग करून आणि ज्ञान व कर्म एका पुरुषास साध्य होणार नाहींत असें सांगून कर्मापेक्षां ज्ञान मोठें आहे असें जर भगवंतांनीं सांगितलेंच नसेल तर अर्थातच अर्जुनाचा तिसऱ्या अध्यायांतील प्रश्न विसंगत होतो या अर्जुनाच्या प्रश्नावरूनही भगवंतास ज्ञान आणि कर्म यांचा विभागच इष्ट आहे असें सिद्ध झालें.—

आचार्य पुन प्रतिपक्षाचें खंडन करितात:—

> किंच यदि बुद्धिकर्मणोः सर्वेषां समुच्चय उक्तः स्यादर्जुनस्यापि स उक्त एवेति—'यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम्' इति कथमन्यतरविषय एव प्रश्नः स्यात्। न हि पित्तप्रशमार्थिनो वैद्येन मधुरं शीतं च भोक्तव्यमित्युपदिष्टे तयोरन्यतरत्पित्तप्रशमनकारणं ब्रूहीति प्रश्नो भवति।

आणखी; ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं साध्य करून घ्यावीं असा सर्वांसच भगवंतांनीं गीतेमध्यें उपदेश केला असेल तर अर्जुनासही तोच उपदेश केला असला पाहिजे. आतां हें जर खरें असेल म्हणजे ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही करावयाचीं असा जर अर्जुनास उपदेश झाला असेल तर 'या दोहोंपैकीं मोक्षदायक खरा मार्ग कोणता तो मला निश्चित करून सांग' (अ० ५ श्लो० १) असा अर्जुनानें भगवंतास कसा प्रश्न केला असता? आपलें पित्त नाहींसें व्हावें अशी इच्छा करणाऱ्या रोग्याला वैद्यानें जर 'गोड आणि थंड पदार्थ खा म्हणजे तुझें पित्त बसेल' असें सांगितलें तर कोणी रोगी वैद्यास फिरून असें विचारतो काय? कीं, 'या दोहोंपैकीं कोणत्यानें पित्त बसतें तें मला सांग?'

—सारांश दोहींतून चांगला मार्ग कोणता असा अर्जुनाचा प्रश्न आहे. यावरूनच भगवंतास ज्ञानमार्ग व कर्ममार्ग निराळे दाखवावयाचे आहेत व ज्ञानकर्मांचा समुच्चय त्यांस अभीष्ट नाहीं हें स्पष्ट आहे.—

अथार्जुनस्य भगवदुक्तवचनार्थविवेकानवधारणानिमित्तः प्रश्नः कल्प्येत, तथाऽपि भगवता प्रश्नानुरूपं प्रतिवचनं देयं, मया बुद्धिकर्मणोः समुच्चय उक्तः किमर्थं त्वमित्थं भ्रान्तोऽसीति । न तु पुनः प्रतिवचनमननुरूपं पृष्टादन्यदेव 'द्वे निष्ठे मया पुरा प्रोक्ते' इति वक्तुं युक्तम् ।

आतां कदाचित् कोणी आक्षेपक ( कर्मठ ) असें म्हणतील कीं भगवंतांनीं सांगितलेल्या उपदेशाच्या रहस्याकडे अर्जुनाचें चांगलेंसें लक्ष नसल्यामुळें त्यानें हा असा प्रश्न केला असेल. बरें, असेंही गृहीत धरूं. पण पुढें काय होतें तें पहा. हा प्रश्न ऐकून भगवंतांनीं तरी अर्जुनाच्या प्रश्नास योग्य असें ह्मणजे 'अरे! ज्ञान आणि कर्म ह्यांचा समच्चय मीं सांगितला असून तूं असला चमत्कारिक प्रश्न विचारतोस तेव्हां तुला भ्रांति वगैरे झाली आहे कीं काय?' असें अर्जुनाच्या प्रश्नास योग्य असें उत्तर द्यावयाचें होतें. (त्याच्या प्रश्नास योग्य असा ताशेरा झाडायाचा होता.) पण तसें तर कांहीं नाहीं. आणि हा आक्षेपक म्हणतो त्याच्या अगदीं विरुद्ध व त्याला अप्रस्तुत असें--'मीं पूर्वी दोन प्रकारच्या निष्ठा सांगितल्या आहेत' असें भगवंतानीं ह्मणणें योग्य आणि सयुक्तिक नव्हते.—पण भगवान योग्य आणि सयुक्तिक तेंच बोलले असलें पाहिजेत--सारांश अर्जुनाचा प्रश्न व भगवंताचें उत्तर हीं दोन्हीं विसंगत नाहींत व ह्या दोहोंवरूनही ज्ञान आणि कर्म यांचा विभागच ईश्वरास इष्ट आहे असें सिद्ध होतें.—

नापि स्मार्तेनैव कर्मणा बुद्धेः समुच्चयेऽभिप्रेते विभागवचनादि सर्वमुपपन्नम् ।

आतां कोणी म्हणेल कीं वेदोक्त कर्म राहूंद्या, पण स्मृतीनें सांगितलेल्या कर्मांचें (क्षत्रियानें युद्ध करावें वगैरे नियमांचें) व ज्ञानाचें एकीकरण करणें तरी निदान भगवंताच्या मनांत असेल. कारण त्यांनीं 'अर्जुना जर तूं हा धर्म्यसंग्राम करणार नाहींस' (अध्या० २ श्लोक ३३) असें अर्जुनास म्हटलें आहे.--आचार्य म्हणतात पण तसाही भगवंताचा अभिप्राय दिसत नाहीं. कारण ज्ञान आणि कर्म यांचा भेद भगवंतांनीं स्पष्ट केला आहे तो या तुमच्या म्हणण्यावरून बाधित होईल. म्हणून मोक्ष मिळविण्याचे वेळीं स्मार्तकर्मही ज्ञानयोगाबरोबर येऊं शकत नाहीं.

किंच क्षत्रियस्य युद्धं स्मार्तं कर्म स्वधर्म इति जानतः 'तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव' इत्युपालम्भोऽनुपन्नः । तस्माद्गीताशास्त्रे ईषन्मात्रेणापि श्रौतेन स्मार्तेन वा कर्मणाऽऽत्मज्ञानस्य समुच्चयो न केनचिद्दर्शयितुं शक्यः ।

आणखी; युद्ध करणें हा स्मृतीनें सांगितलेला क्षत्रियांचा स्वधर्म आहे असें अर्जुनास माहीत असतांही 'केशवा ! मला घोर कर्म करण्याला ( लढाई करण्याला ) कां उत्तेजन देतोस ?' ( अ० ३ श्लो० १ ) असा अर्जुनानें कृष्णाचा उपदेश ऐकल्यावर जो प्रश्न केला आहे तोही वेडयासारखा होत नाहीं काय ? यावरून ज्ञान प्राप्त झालें असतां स्मार्तकर्मांची आवश्यकता नाहीं व स्मार्तकर्म आणि ज्ञान हीं दोन्ही एकाच मुमुक्षु पुरुषांचीं कर्तव्यें नाहींत असें सिद्ध होतें.—म्हणून मुमुक्षूनें कर्मफलत्याग करावा असेंच भगवंतांनीं सांगितलें असलें पाहिजे.

सारांश—या वरील प्रतिपादनावरून लक्षांत येईल कीं--या गीताशास्त्रामध्यें आत्मज्ञानाचा आणि श्रौतस्मार्तादि कर्मांचा समुच्चय सांगितला आहे असें कोणालाही सयुक्तिक रीतीनें दाखवितां येणें शक्य नाहीं.

आत्मज्ञान प्राप्त झालें असतांही कांहीं ज्ञानी लोक कर्म करितांना दिसतात, त्याचा उलगडा आचार्य करितातः—

यस्य त्वज्ञानाद्रागादिदोषतो वा कर्माणि प्रवृत्तस्य यज्ञेन दानेन तपसा वा विशुद्धसत्त्वस्य ज्ञानमुत्पन्नं परमार्थतत्त्वविषयमेकमेवेदं सर्वं ब्रह्माकर्तृ चेति, तस्य कर्मणिकर्मप्रयोजने च निवृत्तेऽपि लोकसंग्रहार्थं यत्नपूर्वं यथा प्रवृत्तस्तथैव कर्मणि प्रवृत्तस्य यत्प्रवृत्तिरूपं दृश्यते न तत्कर्म येन बुद्धेः समुच्चय स्यात् ।

आतां ज्या एखाद्या पुरुषानें आपल्या स्वतःच्या अज्ञानामुळें अगर कामक्रोधादि विकारांस वश झाल्यामुळें श्रौतस्मार्त कर्म करण्यास आरंभ केला, पुढें यज्ञाच्या, दानाच्या किंवा तपाच्या सामर्थ्यानें ज्याची चित्तवृत्ति शुद्ध झाली ( अंतःकरणांतील पापरूपी मळ नाहींसा होऊन सद्वस्तूच्या, ब्रह्माच्या ज्ञानाची इच्छा झाली ) व 'हें सर्व एकच ब्रह्म आहे आणि तें कर्मशून्य आहे' असें शेवटचें खरें ज्ञान ज्यास झालें, त्या पुरुषाला ब्रह्मज्ञान झाल्यावर कर्म करण्याचें जरी

कारण उरलें नाहीं व जरी त्याची कर्मफलाशा नष्ट झाली ( फलाच्या आशेनें आपण सामान्य पुरुष कर्म करितों ह्मणून फलाशेस कर्मप्रवर्तक असें म्हटलें आहे. ) तरी लोककल्याणासाठीं तो पुरुष कर्म करीत राहील. पूर्वी—आस्थापूर्वक—जसें हा सर्व कर्म यथासांग करीत असे, तसेंच ज्ञान झाल्यावरही त्यानें कर्म चालू ठेविल्यामुळें तो कर्ममार्गांत आहे असें जरी दिसतें, तथापि त्याच्या ह्या कर्माला तुम्ही म्हणतां त्या अर्थानें कर्म ह्मणतां येत नाहीं.—तुम्ही कर्म करिता तें पुढें चांगली गति मिळावी ह्मणून करिता, अशा आशेनें ज्ञानी पुरुष कर्म करीत नाहीं.—म्हणून ह्या ज्ञानी पुरुषामध्यें ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय दिसला, तथापि वर जो आह्मीं सिद्धांत केला आहे त्यास बाध येत नाहीं.—कारण येथें या पुरुषाचें कर्म फलाशाविरहित आहे.

यथा भगवतो वासुदेवस्य क्षात्रकर्मचेष्टितं न ज्ञानेन समुच्चीयते पुरुषार्थसिद्धये तद्वत्तत्फलाभिसंध्यहंकाराभावस्य तुल्यत्वाद्विदुषः। तत्त्वविच्चु नाहं करोमीति मन्यते न च तत्फलमभिसंधत्ते। यथा च स्वर्गादिकामार्थिनोऽग्निहोत्रादिकामसाधनानुष्ठानायाऽऽहिताग्नेः काम्य एवाग्निहोत्रादौ प्रवृत्तस्य सामिकृते विनष्टेऽपि कामे तदेवाग्निहोत्राद्यनु तिष्ठतोऽपि न तत्काम्यमाग्निहोत्रादि भवति।

भगवान वासुदेवानें युद्धकर्म केलें तरी पुरुषार्थसिद्धीसाठीं ( धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ आहेत. जन्मास येऊन हे चारही पुरुषार्थ साध्य झाले तर मनुष्याच्या जन्माचें सार्थक्य होतें. ह्मणून पुरुषार्थसिद्धीसाठीं असें म्हटलें. ) भगवंतांनीं ज्ञानाचा आणि कर्माचा समुच्चय केला असें होत नाहीं, कारण, षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताला कर्म करण्याची जरूरी नाहीं; त्याचप्रमाणें फलाविषयीं ज्याचा अभिमान नष्ट झाला व त्याबरोबरच अहंकार नष्ट झाला, त्या विद्वान पुरुषानें ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय केला असेंही म्हणतां येणार नाहीं. तत्त्ववेत्ता जो आहे,—ज्यास ज्ञान झाल्यामुळें खरें काय आहे हें समजलें आहे.—तो ‘ मी कांहीं करीत नाहीं ’ असें मानतो व फलाची आशाही सोडून देतो. याचप्रमाणें आपल्यास स्वर्ग प्राप्त व्हावा या आशेनें एखाद्यानें अग्नीची प्रतिष्ठापना करून स्वर्गप्राप्तीसाठीं अग्निहोत्र घेतलें आणि हेंच काम्य ( स्वर्ग मिळावा या इच्छेनें आरंभिलेलें ) कर्म करीत असतां व

अधें अधिक तें कर्म झाल्यावर त्याची स्वर्गप्रातीची इच्छाच नष्ट झाली तरीही त्यानें अग्निहोत्राचें वगैरे अनुष्ठान पुढें तसेंच चालू ठेविलें ह्मणून त्याचें तें कर्म काम्य आहे असें आपणांस ह्मणतां येत नाहीं. तसेंच तत्त्ववेत्त्याचें आहे.— सारांश ज्ञानी पुरुषाला कर्म करण्याची जरूरी नाहीं. परंतु त्यानेंही जर कर्म निष्कामबुद्धीनें केलेंच तर तें कर्म त्याच्या पुरुषार्थसिद्धीच्या ह्मणजे मोक्षाच्या आड येत नाहीं.—

तथा च दर्शयति भगवान् 'कुर्वन्नापि' 'न करोति न लिप्यते,' इति तत्र तत्र । यच्च 'पूर्वैः पूर्वतरं कृतम्' 'कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः' इति तत्तु प्रविभज्य विज्ञेयम् । तत्कथम्, यदि तावत्पूर्वे जनकादयस्तत्त्वविदोऽपि प्रवृत्तकर्माणः स्युस्ते लोकसंग्रहार्थं 'गुणा गुणेषु वर्तन्ते' इति ज्ञानेनैव संसिद्धिमास्थिताः, कर्मसंन्यासे प्राप्तेऽपि कर्मणा सहैव संसिद्धिमास्थिता न कर्मसंन्यासं कृतवन्त इत्येषोऽर्थः ।

आम्हीं ह्मणतो याला आधार भगवंताचीं हीं वाक्येंच पहाः—'करित असतांही' 'करित नाहीं व बद्ध होत नाहीं' (अ० ५ श्लोक १०) आणखीही पुष्कळ वाक्यें योग्य स्थळीं दाखवितां येतील. आतां 'ज्याप्रमाणें पूर्वीच्या लोकांनीं कर्म केलें तसेंच तूं कर' (अ० ४ श्लो० १५) 'जनकादिक राजे मोक्षाची अगर शुद्ध स्वरूपाच्या ज्ञानाची सिद्धि कर्मानेंच करिते झाले' (अ० ३ श्लो० १५) इत्यादि जीं वाक्यें आहेत, त्यांचा पुढील विभागानें अर्थ करून तीं समजून घ्यावींत. हा विभाग कसा करावयाचा तें सांगतों. पूर्वकालिक जनकादि राजे ब्रह्मज्ञानी होते असें समजूं. ब्रह्मज्ञानी असूनही जर ते कर्माला प्रवृत्त झाले असतील तर 'केवळ ज्ञानेंद्रियें जीं आहेत तींच आपआपल्या विषयांकडे वळतात' (डोळा हें ज्ञानेंद्रिय पदार्थ पाहण्याचें काम सहज करीत आहे, आत्म्याचा त्यांत कांहीं संबंध नाहीं ह्मणजे आत्म्याला ह्या इंद्रियाच्या पाहण्याशीं अगर पाहिलेल्या पदार्थांशीं तात्त्विक दृष्टीनें कांहीं एक कर्तव्य नाहीं) असें समजून व केवळ लोककल्याणासाठीं (लोकांस आपआपल्या धर्माप्रमाणें चालण्याला उत्तेजन देण्यासाठीं) आपल्यास कर्म केलें पाहिजे असें ध्यानांत ठेवून राहिले.—इंद्रियांचा विषयाशीं संबंध घडून कर्म घडतें तें मिथ्या आहे, सद्वस्तूचा (ब्रह्माचा)

त्यांत संबंध नाहीं, असें ज्ञान त्यांस प्राप्त झालें ह्मणूनच ते मोक्षपदाला गेले, अथवा पूर्णत्वाला पावले.—कर्माचा संन्यास करावयाची वेळ प्राप्त झाली असतांही निष्काम कर्म करून ते मोक्षपदाला पावले कर्माचा त्याग त्यांनीं केला नाहीं इतकाच याचा अर्थ आहे.—सारांश, मोक्षपद प्राप्त करून घेण्याला कर्माची ह्या ज्ञानीपुरुषांना आवश्यक्यता नसतांही त्यांनीं कर्म केलें इतकाच अर्थ आहे.—

अथ न ते तत्त्वविद ईश्वरसमर्पितेन कर्मणा साधनभूतेन संसिद्धिं सत्त्वशुद्धिं ज्ञानोत्पत्तिलक्षणां वा संसिद्धिमास्थिता जनकादय इति व्याख्येयम् ।

आतां ते ब्रह्मज्ञानी नव्हते असें समजलें तर या जनकादि राजांनीं जीं श्रुतिस्मृतींनीं सांगितलेलीं कर्में केलीं तीं ईश्वराचे ठायीं समर्पण केल्यामुळें व ह्या ईश्वरार्पित कर्मांच्या साधनानें, त्यांस संसिद्धि, ह्मणजे चित्तशुद्धिद्वारा ब्रह्मज्ञान उत्पन्न करणारी सिद्धि, प्राप्त झाली असा अर्थ करावा.—तात्पर्य हें:—जनकादिक ज्ञानी असतील तर त्यांचें कर्म लोकांसाठीं होतें व निष्काम होतें असें आपण समजावें; ते ज्ञानी नसतील तर त्यांनीं सर्व कर्में ईश्वरास समर्पण करून अंतःकरणशुद्धिद्वारा ब्रह्मज्ञान मिळाविलें असें आपण समजावें. एवंच मोक्ष मिळवावयाला कर्माची गरज नाहीं व म्हणून ज्ञान व कर्म यांचा समुच्चय होणें अशक्य आहे असा सिद्धांत ठरला:—

एतमेवार्थं वक्ष्यति भगवान्सत्त्वशुद्धये कर्म कुर्वन्तीति । 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः' इत्युक्त्वा सिद्धिं प्राप्तस्य च पुनर्ज्ञाननिष्ठां वक्ष्याति 'सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म' इत्यादिना ।

'यागी लोक चित्तशुद्धीसाठीं कर्म करितात' ( अ० ५ श्लो० ११ ) ह्या आम्हीं सांगितलेला दुसरा अर्थ भगवान सांगतात: 'आपण स्वधर्मोक्तमार्गानें परमेश्वराचे भजन करून नंतर केलेलीं कर्में परमेश्वरास समर्पण करून ज्ञान प्राप्त होण्यास योग्य अशी सिद्धी मिळवितात.' ( ज्ञान मिळविण्यास ते योग्य होतात. ( अ० १८ श्लोक ४६ ), असें सांगून पुनः 'ही सिद्धि प्राप्त झालेल्या मनुष्यानें ज्ञान मिळवावें.' ( अ० १८ श्लोक ५० ) हे भगवंताचेंच प्रतिपादन आहे.—यावरून सिद्धि प्राप्त झालेल्या मनुष्यास ज्ञाननिष्ठा ( ब्रम्हचिंतन ) अवश्य आहे असें भगवंतांनींच सांगितलें आहे.—तात्पर्य संसिद्धि

याचा, एकंदरीनें जनकादिकांच्या कर्माचा व संसिद्धीचा बरोबर अर्थ झाला; हाच अर्थ आहे, दुसरा नाहीं असें सहजच सिद्ध झालें.—

तस्माद्गीतासु केवलादेव तत्त्वज्ञानान्मोक्षप्राप्तिर्न कर्मसमुच्चितादिति निश्चितोऽर्थः यथा चायमर्थस्तथा प्रकरणशो विभज्य तत्र तत्र दर्शयिष्यामः ।

वरील विवेचनावरून या गीताशास्त्रांत सांगितलेल्या सिद्धांतांचा असा निश्चित अर्थ ( सिद्धांत ) झाला आहे कीं, मनुष्यास मोक्ष मिळविणें आहे तो केवळ तत्त्वज्ञानानेंच ( ब्रह्मज्ञानानेंच ) मिळावयाचा आहे ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयानें तो मिळणें अशक्य आहे, हें ठरलें. असो; आम्हीं ठरविलेला हा अर्थ खरा आहे हे निरनिराळ्या प्रकरणामध्यें जेथें जेथें प्रसंग येईल तेथें सिद्ध करूनही दाखवूं.

येथें आचार्यांची विशेष प्रस्तावना संपली. आता आचार्य मुख्य विषयाकडे वळतात.

तत्रैवं धर्मसंमूढचेतसो महीत शोकसागरे निमग्नस्यार्जुनस्यान्यत्राऽऽत्मज्ञानादुद्धरणमपश्यन्भगवान्वासुदेवस्ततोऽर्जुनमुद्दिधारयिषुरात्मज्ञानायावतारयन्नाह—

अर्जुनाला धर्माच्या ( कर्तव्याच्या ) संबंधानें भ्रांति पडली आहे व शोकसागरांत तो निमग्न झाला ( बुडाला ) आहे असें पाहून त्याचें कल्याण व्हावें व त्याचा उद्धार व्हावा अशी इच्छा धारण करणाऱ्या—अनुकंपी—भगवंतांनीं पाहिलें कीं, आत्मज्ञानाचा उपदेश केल्याशिवाय त्या दीन व शोकमोहग्रस्त अर्जुनाचा उद्धार होणें शक्य नाहीं, म्हणून त्यांनीं आत्मज्ञानाचा अवतार करण्यासाठीं अर्जुनाला म्हटलेः—

**श्रीभगवानुवाच—**

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ॥**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥**

श्रीभगवान म्हणालेः—

**त्वं** ( तूं ) **अशोच्यान्** ( शोक करण्यास योग्य नाहींत अशाविषयीं ) **अन्वशोचः** ( शोक करितां झाला आहेस ) **च** ( आणि ) **प्रज्ञावादान्** ( शा-

हाण्या माणसांचीं वचनें ) **भाषसे** ( म्हणतो आहेस, सांगतो आहेस. ) **पन्डितः** ( शाहणे लोक, तत्वज्ञानी ) **गतासून्** ( गेले नाहींत प्राण ज्यांचे अशांविषयीं, ) **च** ( आणि ) **अगतासून्** ( गेले आहेत प्राण ज्यांचे अशाविषयीं; जिवंत माणसाविषयीं ) **अनुशोचन्ति न** ( शोक करीत नाहींत. )—ज्यांविषयीं शोक करणें उचित नाहीं, अशांविषयीं शोक करून पुनः शाहाणपणाच्या व नीतीच्या गोष्टी सांगत आहेस ! अरे ! पंडित असतात ते मेलेल्या माणसांबद्दल किंवा जिवंत माणसांबद्दल कधीं रडत बसलेले पाहिले नाहींत.—

अशोच्यानित्यादि । न शोच्या अशोच्या भीष्मद्रोणादयः सद्वृत्तत्वात्परमार्थरूपेण च नित्यत्वात्, तानशोच्यानन्वशोचोऽनुशोचितवानसि ते म्रियन्ते मन्निमित्तमहं तैर्विनाभूतः किं करिष्यामि राज्यसुखादिनेति । त्वं प्रज्ञावतां बुद्धिमतां वादांश्च वचनानि च भाषसे । तदेतन्मौढ्यं पाण्डित्यं च विरुद्धमात्मनि दर्शयस्युन्मत्त इवेत्यभिप्रायः । यस्मागतासून्गतप्राणान्मृतानगतासूनगतप्राणाञ्जीवतश्च नानुशोचन्ति पण्डिता आत्मज्ञः पण्डाऽऽत्मविषया बुद्धिर्येषां ते हि पण्डिताः “ पाण्डित्यं निर्विद्य ” इति श्रुतेः । परमार्थतस्तु नित्यानशोच्याननुशोचस्यतो मूढोऽसीत्यभिप्रायः ॥ ११ ॥

—भीष्मद्रोणादि जे आहेत त्यांच्याविषयीं शोक करण्याचें कारण नाहीं. कारण त्यांचें आजपर्यंतचें आचरण वेदशास्त्रोक्त आहे व त्यांच्याविरुद्ध एक ब्रसुद्धा काढितां यावयाचा नाहीं. दुसरें कारण असें कीं परमार्थदृष्टीनें पाहिलें असतां ( आत्मानात्मविचार करून पाहिलें असतां ) ते नित्यच आहेत.—हें कसें तें बाराव्या श्लोकांत स्पष्ट होईल.—एतावता आचरणानें शुद्ध असल्यामुळें व परमार्थदृष्टीनें ते अमर असल्यामुळें त्यांविषयीं शोक करणें तुला शोभत नाहीं. पण अशाविषयीं तूं शोक करितोस कीं ‘ ते माझ्यासाठीं ( माझ्या हातून ) मरतील, त्यांच्याशिवाय मी राज्यादिक सुखें कशीं भोगूं ? ’ शिवाय बुद्धिमान लोकांप्रमाणें लांब लांब नीतीच्या गोष्टीही सांगतो आहेस ( पहा अ० १ श्लो० ३६ ते ४५ ). सारांश येणेंप्रमाणें तूं मूर्खपणा आणि त्याच्याच विरुद्ध असणारा शहाणपणा एकाच वेळीं आपल्यामध्यें दाखवितो आहेस. ( एकदम शाहण्यासारखें व वेड्यासारखें बोलतो आहेस. ) यावरून उन्मत्तासारखी ( वेड्यासारखी ) तुझी वृत्ति झाली

आहे हेंच खरें. कारण पंडित ह्मणजे आत्म्याविषयीं ज्यांना पूर्ण ज्ञान झालें आहे ते लोक मेलेल्यांचा आणि जिवंत लोकांचा शोक करीत नाहींत. बृहदारण्यकांमध्यें ( पहा ५।५।१ ) 'पण्डा ह्मणजे आत्मज्ञानविषयक बुद्धि. ही ज्यांस आहे ते पंडित होत.' असा पंडित शब्दाचा अर्थ आहे तो माझेंच म्हणणें समर्थन करितो. खरोखरच पाहिलें असतां नित्य जे आहेत ( ज्यांना जन्ममरण वगैरे कोणताही विकार नाहीं. ) त्यांच्याविषयीं शोक करून तूं आपला मूर्खपणा मात्र प्रकट करीत आहेस, सारांश 'तूं मूर्ख आहेस' असें म्हणण्याचा भगवंताचा अभिप्राय आहे. ॥ ११ ॥

**रामानुज—गतासून्=देहान्** ( ज्यांत प्राण नाहीं किंवा आत्मा नाहीं असे देहाविषयीं व ) **अगतासून् आत्मनः** ( आत्म्याविषयीं ) असा अर्थ करून पुढें ) '**आत्मा हि न जन्माधीनसद्भावो न मरणाधीनविनाशश्च तस्य जन्ममरणयोरभावात्**'—आत्मा हा जन्म घेऊन उत्पन्न होणारा, किंवा मरण पावून विनाश पावणारा नाहीं, कारण त्याला जन्ममरण दोन्ही नाहींत, तो नित्य आहे ह्मणून त्याविषयीं शोक करण्याचें कारण नाहीं असें ह्मणतात. तसेंच '**देहस्त्वचेतनः परिणामस्वभावस्तस्योत्पत्तिविनाशयोगः स्वाभाविक इति सोऽपि न शोकस्थानमित्यभिप्रायः**'—देह हा अचेतन ( जड ) असून तो विकारवश ( बदलणारा ) असतो ह्मणून उत्पत्ति विनाश ( जन्ममरण ) हें त्याला सहजच आहेत. यास्तव देहाविषयींही शोक करण्याचें कारण नाहीं असा अर्थ आहे असें ह्मणतात.

**मध्वमतानुसारि सत्यानंद स्वामी—प्रज्ञावादान्**=केवलं स्वमनीषोत्थवादान् ( केवळ आपल्या मनामधूनच उत्पन्न झालेलें तर्काडंबर ) असा अर्थ करितात. ॥ ११ ॥

कुतस्तेऽशोच्या यतो नित्याः, कथं?—

**न त्वेवाहं जातु नाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

**अहं** ( मी ) **तु एव जातु** ( कधीं देखील ) **न आसं न** ( न होतों असें नाहीं, नव्हतो असें नाहीं ) **त्वं** ( तूंही व ) **इमे जनाधिपाः** ( हे राजे ) **न**

(न्व्हतां असें नाहीं)-आपण सगळे पूर्वीं कधीं न्व्हतों असें नाहीं, ह्मणजे आपण अनादि आहोंत.—**सर्वे वयं** ( आपण सगळे ) **अतःपरं भविष्यामः- न चैव** (पुढेंही असणार नाहीं असेंही व्हावयाचें नाहीं.—तात्पर्य—पुढें सर्व- काल जिवंत राहूं ह्मणजे आपण सर्व अनंत आहोंत.—अनादि व अनंत असे आपण सर्व आहोंत.

न त्वेव जातु कदाचिदहं नाऽऽसं कित्वासमेवातीतेषु देहोत्पत्तिविनाशेषु नित्य एवाहमासामित्यभिप्रायः । तथा न त्वं नासीः कित्वासीरेव । तथा नेमे जनाधिपा नाऽसन्कित्वा- सन्नेव । तथा न चैव न भविष्यामः किंतु भविष्याम एव सर्वे वयमतोऽस्माद्देहविनाशात्परमुत्तरकालेऽपित्रिष्वपि कालेषु नित्या आत्मस्वरूपेणेत्यर्थः । देहभेदानुवृत्त्या बहुवचनं नाऽत्म- भेदाभिप्रायेण ॥ १२ ॥

**भाष्यार्थः**—ते शोकास्पद कां नाहींत? नित्य आहेत ह्मणून. कशावरून नित्य आहेत?—प्रत्यक्ष भगवान सांगतातः—मी कधीं न्व्हतों असें कधींच झालें नाहीं, ह्मणजे मी नेहमींच होतों. माझ्या पूर्वींच्या शरीराचा जरी उत्पत्ति विनाश झाला तथापि, ह्मणजे मला अनेक शरीरें आलीं व गेलीं तरी मी नित्य असल्यामुळें नेहमींच असतों झालों हा अभिप्राय.—तसेंच तूं न्व्हतास किंवा हे राजे न्व्हते असें कधींच झालें नाहीं.—ह्मणजे सगळे तुम्हीही अनादि काला- पासून आहांतच.—ह्याप्रकारें आपण पुढें कधीं नाहींसें होऊं असेंही व्हाव- याचें नाहीं.—ह्मणजे पुढेंही सर्वकाल आपण असूंच. ह्या देहाचा नाश झाल्यावर पुढें सुद्धां आपण असूं. सारांश, भूतभविष्यवर्तमान ह्या तिन्ही काळा- मध्यें आपण आत्मस्वरूपानें सर्वकाळ नित्य ( अविनाशी असे ) राहूं— आचार्य ह्मणतात.—येथें बहुवचनी सर्व आपण असें जें म्हटलें आहे तें देह पुष्कळ ह्मणून अनेकवचन परमेश्वरांनीं योजिलें आहे; आत्मे निरनिराळे आहेत अशा भावानें योजिलें नाहीं. ॥ १२ ॥

**रामानुजांनीं** ह्या शेवटच्या वाक्यावर पुष्कळ खरमरित टीका केली आहे ते म्हणतातः—‘ सर्वेश्वर भगवान श्रीकृष्ण यानें आपला आत्मा व इतरांचे जीवात्मे यांच्यामध्यें जो फरक केला आहे तो पारमार्थिक ह्मणजे खरा आहे.

कारण ( १ ) अज्ञानानें वेडा झालेल्या अर्जुनास परमार्थज्ञानाचा उपदेश करण्याचे वेळीं 'मी, तूं, हे सगळे' असा भेद करून दाखविणें हें बरोबर जुळत नाहीं. कारण अशा वेळीं परमेश्वरानें खोटा भेदाभेद निर्माण केला नसता. पण भेद केला आहे यावरून परमात्मा आणि जीवात्मा यांमध्यें नित्य भेद आहे, असें सिद्ध होतें. श्रुतीही अशीच आहे. '**नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान्**' ( पुष्कळ असे जे नित्य जीवात्मे आहेत त्या सर्वांच्या इच्छा, एक व नित्य असा परमात्मा पूर्ण करितो. ) ( २ ) सर्वत्र भगवंतानें हा भेद अज्ञानाला वश होऊन केला असेल असेंही संभवत नाहीं. ( ३ ) ह्या 'मिथ्या' उपदेशानें अर्जुनाच्या मनांत भलताच सिद्धांत शिरणे संभवनीय आहे. याप्रमाणेंच आणखी चारपांच कारणें देऊन परमात्मा व जीवात्मा हे भिन्न आहेत असें सिद्ध केलें आहे ॥ १३ ॥

तत्र कथमिव नित्य आत्मेति दृष्टान्तमाह—

आत्मा नित्य कसा तें एका दृष्टांतानें सांगतात.—

# देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
# तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

**देहिनः** (ज्याला देह आहे अशा आत्म्याच्या) **अस्मिन्** (ह्या) **देहे** (देहामध्यें) **कौमारं** (बालपण) **यौवनं** (तरुणपण) **जरा** (म्हातारपण) **यथा** (ज्याप्रमाणें)—असतात—**तथा** (त्याप्रमाणेंच ) **देहान्तरप्राप्तिः** (--आत्म्याला—निरनिराळ्या देहाची प्राप्ति—होते—**तत्र** (तेथें--असें झालें ह्मणून—) **धीरः** ( शहाणा माणूस ) **न मुह्यति** (मोह पावत नाहीं. )

देहिन इति । देहोऽस्यास्तीति देही तस्य देहिनो देहवदात्मनोऽस्मिन्वर्तमाने देहे यथा येन प्रकारेण कौमारं कुमारभावो बाल्यावस्था यौवनं यूनो भावो मध्यमावस्था जरा वयोहानिर्जीर्णावस्थेत्येतास्तिस्रोऽवस्था अन्योन्यविलक्षणास्तासां प्रथमावस्थानाशे न नाशो द्वितीयावस्थोपजनने नोपजननमात्मनः किं तर्ह्यविक्रियस्यैव द्वितीयतृतीयावस्थाप्राप्तिरात्मनो दृष्टा यथा तथा तद्वदेव देहादन्यो देहान्तरं तस्य प्राप्तिर्देहान्तरप्राप्तिरविक्रियस्यैवाऽऽत्मन इत्यर्थः । धीरो धीमांस्तत्रैवं सति न मुह्यति न मोहमापद्यते ॥ १३ ॥

ज्याला देह आहे तो देही; असा देह असणारा देही जो आत्मा त्याला या चालू ( प्रकृत ) देहामध्येंच ज्याप्रमाणें कुमारभाव ( बाळपण ) यौवन ( मध्यावस्था, तारुण्य ) जरा ( शक्तीची हानि होऊन आलेला म्हातारपणा ) अशा तीन निरनिराळ्या व एकाहून एक अत्यंत भिन्न अशा अवस्था प्राप्त होतात. त्यांत बाळपण ह्मणजे पहिली अवस्था, संपते तेव्हां आत्म्याचा नाश होत नाहीं व दुसऱ्या ह्मणजे मध्यावस्थेचा जन्म झाला ह्मणून आत्म्याचा नवीन जन्म होतो असेंही नाहीं. तर आपल्यास काय दिसतें? आपणांस असें स्पष्ट दिसतें कीं आत्म्याला जें दुसरें व तिसरें अवस्थांतर प्राप्त होतेंसें दिसतें (वास्तविक तीं देहालाच प्राप्त होतात, पण आत्मा तोच आहे अशी आपली खातरी असते.) त्यांत तो आत्मा ज्याप्रमाणें अविक्रिय ( विकार अगर फेरबदल न झालेला असा ) राहतो, त्याचप्रमाणें दुसराही देह आत्म्यास प्राप्त झाला तरी तो आत्मा अविक्रियच राहिला पाहिजे; अथवा अविक्रिय आत्म्यालाच ती अन्यदेहाची प्राप्ति झाली पाहिजे असा अर्थ होय. असें झालें असतां ( अन्य देह प्राप्त झाला असतां ) बुद्धिमान् मनुष्य मोह पावत नाहीं.—खरेंच आहे. मुख्य वस्तु आत्मा आहे. तो आत्मा जशाचा तसाच राहतो असें समजल्यावर शहाणा मनुष्य क्षणभंगुर देहासाठीं कशाला शोक करील?—॥१३॥

**रामानुज** यावरून असा सिद्धांत काढतातः—आत्मा नित्य आहे, तथापि पूर्वजन्मांतील कर्माकर्मांच्या संचयानें त्यास देहबंध झालेला असतो; तो सुटावा यासाठीं आपआपल्या वर्णाश्रमास युक्त अगर उचित असें शास्त्रोक्त कर्म निष्कामबुद्धीनें करावें व हें शास्त्रोक्त कर्म करीत असतां जीं सुखदुःखें प्राप्त होतील तीं कर्मसमाप्तीपर्यंत अगर देहपात होईपर्यंत मुकाट्यानें सहन करावीं.—शंकराचार्य ज्ञानमार्ग सांगत आहेत व गीतेचा उद्देशही तसाच आहे अशी ज्यांची खातरी आहे, त्यांस हें ज्ञानशून्य कर्माचें ह्मणणें कबूल होणार नाहीं हें उघडच आहे.—

**मधुसूदनी टीकेंत**—'देहमात्रं चैतन्यविशिष्टमात्मा' ( देहाच्या आकाराचा व ज्ञानयुक्त असें आत्म्याचें लक्षण आहे ) असें म्हणणारे **लौकायतिक** यांचें खंडण करून आत्मा हा विभु ( सर्वव्यापि ) आहे असें या श्लोकांत सिद्ध केलें आहे. सर्वव्यापि असणें ह्मणजेच नित्य असणें असा वेदांती लोकांचा सिद्धांत

आहे.—आत्मा नाश पावत नाहीं हें सिद्ध करण्यास ते पुष्कळ प्रमाणें आणितात, त्यांतील एकच येथें सांगतों, तें हें. जन्म पावल्याबरोबर मूल स्तनपान करावयास लागतें; त्याला कोणी शिकवीत नाहीं आणि दुग्धपान तर तें करितें. यावरून पूर्वदेहामध्यें खाण्यापिण्याची क्रिया करीत असणारा आत्माच नवीन देहांत आला असला पाहिजे; ह्मणून तो जन्म पावत नाहीं व मरत नाहीं. यावरूनच वेदांती आत्मा नित्य आहे, असें ठरवितात.—

या प्रमाणासंबंधानें आलीकडील अनुभवजन्यप्रमाणशास्त्रानुयायी (अनुभवानें सिद्ध झालेल्या प्रमाणांच्या नियमाअन्वयें शोध करणारा तत्त्ववेत्ता) इतकेंच म्हणेल कीं मुलास खाण्यापिण्याची जी क्रिया करिता येते ती शक्ति उदरामध्यें जन्म होतांनाच मातापितरांकडून मिळालेली असते. दोघांचेंही ह्मणण्यांत खरा अंश हा आहे कीं पूर्वजन्मामुळें ही शक्ति आपल्यास प्राप्त होते. आतां पूर्वजन्म ह्मणजे आत्म्याचा देहांतरांतील अनुभव अगर पूर्वजांचा अनुभव हा कायतो प्रश्न आहे. 'आत्मा वै पुत्रः' (पुत्र हा आपलाच आत्मा होय) हा सिद्धांत आत्म्याचें नित्यत्व व बापापासून पुत्राकडे येण्याचें त्याचें आनुवंशिकत्व ( Heredity ) दाखवितो! मूळच्या खऱ्या सिद्धांताचें हें आधुनिक स्पष्टीकरण होय.--दोहींमध्यें आत्माच नित्य आहे. पूर्वींचे लोक पूर्वकर्मासह आत्मा प्रकट होतो असें ह्मणत व हल्लीं, अनुवंशिक संस्कारासह (आई बापांचे गुण घेऊन) वंशजाचा आत्मा प्रकट होतो असें म्हणतात; हाच कायतो भेद आहे. ॥ १३ ॥

> यद्यप्यात्मविनाशानिमित्तो मोहो न संभवति नित्य आत्मेति विजानतस्तथाऽपि शीतोष्णसुखदुःखप्राप्तिनिमित्तो मोहो लौकिको दृश्यते सुखवियोगनिमित्तो दुःखसंयोगनिमितश्च शोक, इत्येतदर्जुनस्य वचनमाशङ्क्याऽऽह--

जरी आत्म्याचा नाश होईल असा 'आत्मा नित्य आहे' असें जाणणारास मोह (तारतम्याचा अभाव) उत्पन्न होणार नाहीं, तरी थंडी, ऊन, सुख दुःख प्राप्त झालें असतां मोह उत्पन्न होतो असें व्यवहारांत नेहमीं दिसतें. सुखाचा वियोग झाला ह्मणजे व दुःखाचा संयोग (प्राप्ति) झाला ह्मणजे प्रत्येकाला शोक होतो असें लौकिकांत ( व्यवहारांत ) दिसतें.—सारांश आत्म्यासंबंधानें नाहीं तरी इतर कारणांनीं

शोक हा मनुष्याचे पाठीमागें लागलाच आहे व भीष्मादिकांच्या समागमसुखाचा वियोग झाल्यामुळें शोक व अधर्मरूपी दुःखाची जोड होणार ह्मणून शोक होत आहे अशी अर्जुन शंका घेईल ह्मणून ह्मणतात.--

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ॥**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥१४॥**

--कारण--**कौन्तेय** ( हे कुंतिपुत्रा ! ) **मात्रास्पर्शाः** ( मात्रा=इंद्रियें त्यांचे स्पर्श=विषयांशीं जवळ येणें--इंद्रियांचे विषयांशीं संयोग--) **शीतोष्णसुखदुःखदाः** ( थंडीचें ऊष्णाचें सुखाचें व दुःखाचें भान उत्पन्न करणारे आहेत. ) **तु** ( खरोखर ) **आगमापायिनः** ( --ते--येणारे व जाणारे आहेत. ) **अनित्या** (--ह्मणून--क्षणभंगुर आहेत ). **भारत** ( अर्जुना ! ) **तान्** ( त्यांस ) **तितिक्षस्व** ( सहन कर. ) --आपल्यास शीतउष्णांचें अगर सुखदुःखाचें भान होतें तें विषयांचा इंद्रियांशीं संयोग होतो तेव्हां होतें. ह्मणजे एकादी सुंदर वस्तु डोळ्यानें पाहिली किंवा सुंदर गाणें कानानें ऐकिलें तर सुख होतें, वाईट वस्तु पाहिली किंवा ऐकिली तर दुःख होतें.--तात्पर्य हें सुखदुःखं होतें तें इंद्रियांस होतें. आत्म्यास होत नाहीं. शिवाय हीं सुखदुःखें चिरकाल रहाणारीं आहेत, असेंही नाहीं. केव्हां येतात व केव्हां जातात ! तेव्हां केवळ इंद्रियांस मात्र स्पर्श करणारीं आणि तींही चिरकाल स्पर्श करणारीं नव्हेत, अशीं सुखदुःखें आहेत, त्याबद्दल शहाण्या माणसानें शोक करूं नये जें येईल तें सहन करावें हाच तत्त्वज्ञांचा मार्ग आहे.--

मात्रास्पर्शा इति । मात्रा आभिर्मीयन्ते शब्यादय इति श्रोत्रादीनीन्द्रियाणि, मात्राणां स्पर्शाः शब्दादिभिः संयोगास्ते शीतोष्णसुखदुःखदाः शीतमुष्णं सुखं दुःखं च प्रयच्छंतीति । अथवा स्पृश्यन्त इति स्पर्शा विषयाः शब्दादयः, मात्राश्च स्पर्शाश्च शीतोष्णसुखदुःखदाः शीतं कदाचित्सुखं कदाचिद्दुःखं तथोष्णमप्यनियतरूपं, सुखदुःखे पुनर्नियतरूपे यतो न व्यभिचरतोऽतस्ताभ्यां पृथक्शीतोष्णयोर्ग्रहणम् । यस्मात्ते मात्रास्पर्शादय आगमापायिन आगमापायशीलास्तस्मादनित्या अतस्तान्शीतोष्णादींस्तितिक्षस्व प्रसहस्व, तेषु हर्षं विषादं च कर्षीरित्यर्थः ॥ १४ ॥

ज्यांच्या योगानें आपण शब्दादि ( शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे विषय ) भोजतों ( समजतों ) त्या मात्रा ह्मणजे इंद्रियें होत. या इंद्रियांचे विषयांशीं जे संयोग होतात त्यांच्या योगानें आपल्यास अमुक थंड आहे, अमुक ऊन आहे, अमुक सुखकारक आहे, दुसरें दुःखकारक आहे असें भान होतें किंवा स्पर्श याचा अर्थ विषय ( इंद्रियांनीं जाणण्याचे पदार्थ ) असा करून इंद्रियें आणि त्यांचे विषय आपल्यास सुखदुःख वगैरे देतात असाही अर्थ करावा. आतां थंड पदार्थानें कधीं ( उन्हाळ्यांत ) सुख होतें, कधीं ( हिंवाळ्यांत ) दुःख होतें; उष्णाचाही असाच प्रकार आहे; सारांश, शीत आणि ऊष्ण यांपासून सुखच होईल किंवा दुःखच होईल असें अगर तीं सुखरूपी अगर दुःखरूपीं आहेत असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. पण सुखदुःखाचें तसें नाहीं. त्यांचें स्वरूप ठरलेलें आहे. म्हणून शीत, उष्ण व सुखदुःख हीं निराळींच ध्यावीं.—हा केवळ समास कसा सोडावयाचा याचा प्रश्न आहे.—आतां, इंद्रियें आणि त्यांचे विषय वगैरे आतां आहेत, घटकेनें नाहींत; आतां नाहींत, घटकेनें येतील; असें येणारे जाणारे आहेत. म्हणजे ते चिरकाल राहणारे नाहींत म्हणून शीतोष्णादिकांस सहन कर. शीतोष्ण किंवा सुखदुःखें प्राप्त झालीं असतां हर्ष शोक करूं नकोस, हा अर्थ होय. ॥ १४ ॥

**मधुसूदनीकार** ‘ नित्य जो तूं त्या त्वां अनित्याचा शोक करणें उचित नाहीं ’ असें ह्मणतात.

**ज्ञानेश्वराची** एकच ओवी स्पष्टीकरणार्थ देतों.—‘ देखे शब्दाची व्याप्ति । निंदा आणि स्तुति । तेथ द्वेषाद्वेष उपजती । श्रवणद्वारें ॥’ आणखी एक— ‘ हे विषय तरी कैसे । *रोहिणीचें जळ जैसें । कां स्वप्नींचा आभासे भद्रजाती ॥ १४ ॥’

शीतोष्णादिन्सहतः किं स्यादिति शृणु—

शीतोष्ण जो सहन करितो त्याचें काय होतें तें सांगतों ऐकः

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

**पुरुषर्षभ** ( हे पुरुषांमध्यें ऋषभा श्रेष्ठा ! अर्जुना ! ) **समदुःखसुखं** ( सम

---

* रोहिणीचें जळ = मृगजळ.

म्हणजे सारखीं आहेत दुःखसुखें ज्याला अशा, अथवा सुखदुःखें प्राप्त झालीं असतां ज्याला हर्ष शोक उत्पन्न होत नाहींत अशा ) **यं** ( ज्या ) **धीरं** ( धी ह्मणजे बुद्धि आहे ज्याला अशा बुद्धिमान् ) **पुरुषं** ( पुरुषाला ) **एते** (शीतोष्णादि विषय ) **न व्यथयन्ति** ( व्यथा उत्पन्न करीत नाहींत, विकार उत्पन्न करीत नाहींत; ) **सः** ( तो पुरुष— ) **अमृतत्वाय** ( अमरत्व प्राप्त होण्यास ) **कल्पते** ( योग्य आहे. )—ज्याला शीतोष्णादि विषयांपासून सुखदुःखादि विकार उत्पन्न होत नाहींत, तोच धीर पुरुष मोक्षाला योग्य आहे असा भाव आहे.—

यं हीति । यं हि पुरुषं समदुःखसुखं समे दुःखसुखे यस्य तं समदुःखसुखं सुखदुःखप्राप्तौ हर्षविषादरहितं धीरं धीमन्तं न व्यथयन्ति न चालयन्ति नित्यात्मदर्शनादेते यथोक्ताः शीतोष्णादयः स नित्यात्मदर्शननिष्ठो द्वंद्वसहिष्णुरमृतत्वायामृत भावाय मोक्षाय कल्पते समर्थो भवति ॥ १९ ॥

ज्या पुरुषाला सुखदुःखें सारखींच वाटतात अथवा सुखदुःखें प्राप्त झालीं असतां हर्ष, खेद, आनंद, शोक उत्पन्न होत नाहींत, अशा ज्या बुद्धिमान् पुरुषाला नेहमीं अविनाशी अशा ब्रह्मसुखाचा, स्वस्वरूपाचा समागम होत असल्यामुळें वर सांगितलेलें थंडी, ऊन वगैरे विकार उत्पन्न करणारे विषय वश करीत नाहींत.--सारांश नेहमीं अविकारी स्वस्वरूपाच्या अनुभवाचा लाभ होत असल्यामुळें जगांतील विषयांच्या योगानें ज्या बुद्धिमान्, ज्ञानी मनुष्याला सुखदुःखांपासून विकार उत्पन्न होत नाहींत,—तो पुरुष सदैव आत्मनिष्ठ आणि शीतोष्णादिकांस सहन करणारा असतो; ह्मणून जेथें मरणाचें अस्तित्व नाहीं अशी मोक्षपदवी प्राप्त होण्यालाही समर्थ होतो.--तात्पर्य, अशा आत्मनिष्ठ पुरुषाला मोक्ष मिळविण्याची योग्यता प्राप्त होते. '**एतदमृतमयमेतद्ब्रह्म**' ( छांदोग्य ४।१५ ) अमृत ह्मणजे ब्रह्म असा अर्थ ठरविण्यालाही आधार आहे.— ॥१९ ॥

**मधुसूदनीकार**--'पुरुष' शब्दाची '**पूर्णत्वेन पुरि शयानं**' (पूर्णपणानें पुरी, देहनामक नगरामध्यें, निजणारा म्हणजे सर्व शरीरभर पसरलेला) अशी व्युत्पत्ति देऊन '**पुरुषः स्वयंज्योतिर्भवतीति श्रुतेः**' ( पुरुष हा

स्वयंप्रकाश आहे अशी श्रुति सांगते. ) असे पुरुष शब्दावर व्याख्यान देतात. तसेंच '**स वा अयं पुरुषः सर्वासु पूर्षु पुरिशयो नैतेन किंचनानावृतं नैतेन किंचनासंवृतमिति श्रुतेः**, ( सर्व पुरीमध्यें शयन करणारा हा पुरुष होय, याला कोणतीही गोष्ट माहीत नाहीं, ठाऊक नाहीं असें नाहीं ) असाही श्रुतीचा आधार दाखवितात. पुरुष शब्द एकवचनांत आहे; ह्मणून त्याच्या-योगानें अनेक आत्मे आहेत असें ह्मणणाऱ्या सांख्यमताचा भगवंतांनीं निरास केला हा गूढार्थ होय ! ' धीरं ' शब्दाची व्याख्या पहा, **धियमीरयतीति स धीरः, धीप्रेरकः, धीसाक्षी** ( बुद्धिशक्तीला प्रेरणा करणारा, बुद्धीचा साक्षी ह्मणजे धीर होय ) मोक्षाचें थोडक्यांत लक्षण पहाः—

'**स्वस्वरूपभूतब्रह्मात्म्यैक्यज्ञानेन सर्वदुःखोपादानतदज्ञाननिवृत्युपलक्षितो निखिलद्वैतानुपरक्तस्वप्रकशपरमानंदरूपः**' ( आपल्या स्वस्वरूपाच्या अनुभवानें ब्रह्म आणि आत्मा एकच आहे असें ज्ञान झाल्यामुळें सर्व अज्ञान आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या दुःखांचा जेथें लय होतो आणि द्वैतभावाचा विकार पूर्णपणानें नाहींसा झाल्यामुळें,स्वस्वरूपज्ञानाच्या श्रेष्ठ आणि नित्य अशा आनंदाचें रूपच होऊन बसतो तो मोक्षच होय.

**शंकरानन्द** ' विषयग्रहणापासून बुद्धीला मागें वळविणारा परावृत्त करणारा तो धीर असें म्हणतात.

**रामानुजा**चार्य म्हणतातः—**अवर्जनीयदुखं सुखवन्मन्यमानोऽमृतत्वसाधनतया स्ववर्णोचितं युद्धादिकर्मानभिसंहितं फलं कुर्वन्**' ( अपरिहार्य दुःखाला सुखाप्रमाणेंच मानून मोक्ष मिळविण्यासाठीं आपआपल्या वर्णाश्रमास विहित असें फलाशा न ठेवतां युद्धादिक कर्म करणारा तो धीर पुरुष होय ) असें म्हणतात !

**मध्वाचार्यांनीं ' पुरु ( ब्रह्म ) सरति ( जानाति ) स पुरुषः '** ( ब्रह्म जाणतो तो पुरुष ) अशी व्युत्पत्ति दिली आहे !

**वामन पंडित** म्हणतातः—देहींच उठला फोड । तो खाजवितां वाटे गोड । खाजवितां उठती मोड । तिडिकांचे त्यांतुनी ॥ ऐसें भोग सुखीं सुख । भोग दुःखीं दुःख । मानितो तों आणिक । कोटी दुःखें उपजती ॥ फोडा खाजवूं हे असोशी । धैर्य धरून जो सोशी । व्यथा न देति तयासी । बरा

होय ॥ ऐसा सुखदुःखीं सम । धैर्ये राहे साधकोत्तम । त्यास विषयेंद्रिय-समागम ॥ व्यथा न करी ॥ १५ ॥

इतश्च शोकमोहावकृत्वा शीतोष्णादिसहनं युक्तं, यस्मात्—

या शिवाय आपल्या मनांतून शोक मोह टाकून देऊन शीतोष्ण सहन करणें तुला योग्य आहे; कारणः—

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

**असतः** (जें मिथ्या आहे त्याला, देहासारखें किंवा सुखदुःखासारखें दृश्य आहे त्याला) **भावः** (असणेपणा, सत्ता, आस्तित्व) **न विद्यते** (असत नाहीं) **सतः** (जें खरें आहे त्याला, आत्म्याला किंवा ब्रह्माला) **अभाव** (नाहींपणा, नास्तित्व) **न विद्यते** (असत नाहीं)--सारांश, दृश्याला आस्तित्व नाहीं आणि सद्वस्तूला नाश नाहीं.—**तत्त्वदर्शिभिः** (सत्यच पाहणारे ब्रह्मज्ञान्यांनीं) **अनयोः उभयोः अपि** (या दोहोंचाही) **अन्तः** (सत्यासिद्धांत) **दृष्टः**, (पाहिला आहे). तात्पर्य हें कीं, ब्रह्मनिष्ठ पंडितांनीं या दृश्याचा आणि सद्वस्तूचा पक्का शोध करून कायमचा सिद्धांत काढला आहे कीं दृश्य सत्य (नित्य) नाहीं आणि सद्वस्तु असत्य (नाशवंत) नाहीं.—

नासत इति । नासतोऽविद्यमानस्य शीतोष्णादेः सकारणस्य न विद्यते नास्ति भावो भवनमास्तिता । न हि शीतोष्णादि सकारणं प्रमाणैर्निरूप्यमाणं वस्तु संभवति ।

शीत आणि ऊष्ण इत्यादि जीं कार्यें आहेत ह्मणजे ज्यांची उत्पत्ति कारणापासून झाली असे जे सर्व दृश्य पदार्थ त्यांना व त्यांच्या कारणांना कायमचें अस्तित्व नाहीं.-- हें कसें त्याचा निकाल आचार्य आतांच (६१ व्या पृष्ठांत) करतील:—कारण, ज्याला ज्याला म्हणून कारण आहे तें तें सर्व कार्यरूपी दृश्य पदार्थ व त्याचें स्वरूप हीं दोन्हीं (प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, ह्या) प्रमाणांनीं पाहूं गेल्यास-- तीं सर्व-नाहींत असाच सिद्धांत ठरतो ! किंवा हे सर्व दृश्य पदार्थ प्रमाणांनीं सिद्ध होणारे आहेत; ह्मणून त्यांचें अस्तित्व संभवत नाहीं !

विकारो हि सः विकारश्च व्यभिचरति, यथा घटादिसंस्थानं चक्षुषा निरूप्यमाणं मद्व्यतिरेकेणानुपलब्धेरसत्, तथा सर्वो

विकारः कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसत् । जन्मप्रध्वंसाभ्यां प्रागूर्ध्वं चानुपलब्धेः । मृदादिकारणस्य च तत्कारणव्यतिरेकेणानुपलब्धेरसत्त्वम् । तदसत्त्वे च सर्वाभावप्रसङ्ग इति चेत् । न, सर्वत्र बुद्धिद्वयोपलब्धेः सद्बुद्धिरसद्बुद्धिरिति । यद्विषया बुद्धिर्न व्यभिचरति तत्सत् यद्विषया बुद्धिर्व्यभिचरति तदसदिति सदसद्विभागे बुद्धितन्त्रे स्थिते सर्वत्र द्वे बुद्धि सर्वैरुपलभ्येते समानाधिकरणे ।

—हें सर्व दृश्य जगत उत्पन्न झालें आहे ह्मणजे उत्पन्न होण्यापूर्वी तें नव्हतें आणि प्रलय झाल्यानंतर तें असणार नाहीं.—मूळ स्थितीमध्यें विकार होऊन उत्पत्तिस्थिती लयाला पावणाऱ्या सर्व दृश्य वस्तूंला कायमचें अस्तित्व नसतें. पहा, घटासारखे—नामरूप असणारे—दृश्यांची आपल्या नेत्रांनीं आपण आंत बाहेरून चौकशी केली तर आपल्यास आढळून येईल कीं घटाला कारण जी माती, ती नसली तर घटाची उत्पत्तीच होणार नाहीं; म्हणजे घटाला कायमचें अस्तित्व नाहीं. त्याचप्रमाणें कारण नाहींसें झालें असतां नष्ट होणारें सर्व दृश्य हेंही असत् असें आपल्यास म्हटलें पाहिजे.--कारण उत्पत्ति होण्याच्या पूर्वी आणि नाश झाल्यानंतर या दृश्याला ( कार्याला ) अस्तित्व असत नाहीं—ज्याला कायमचें अस्तित्व असत नाहीं, अगर जें सर्वकाळीं आणि सर्व देशीं असूं शकत नाहीं, तें सत्य नव्हे, मिथ्या आहे; असा वेदांताचा सिद्धांत आहे:—ह्याचप्रमाणें घटादिकांचें कारण मृत्तिका वगैरे त्यांचीं हीं कारणें नाहींशीं झालीं म्हणजे मृत्तिका वगैरेचेंही अस्तित्व नष्ट होतें. याप्रमाणें कारणाचें कारण, त्या कारणाचें कारण अशी लांबच लांब माळका लाविली आणि सर्व कारणें व कार्यें नष्ट केलीं तर ज्याला कायमचें अस्तित्व आहे असें कांहींच राहणार नाहीं; अशी शंका कोणी घेईल ती बरोबर नाहीं. कारण जें जें म्हणून दृश्यजात आहे किंवा कल्पनेला गोचर आहे, त्या सर्व ठिकाणीं दोन प्रकारची चैतन्यवृत्ति (Consciousness) अस्तित्वांत येते. एक 'आहे' असें सांगणारी चैतन्यवृत्ति आणि दुसरी नाहीं असें सांगणारी चैतन्यवृत्ति. अशा ह्या दोन प्रकारच्या चैतन्यवृत्ति आहेत. ह्मणजे एक सद्वस्तूचें ज्ञान करून देणारी व दुसरी मिथ्या वस्तूचें ज्ञान करून देणारी अशा ह्या वृत्ति आहेत. ज्या विषयापासून चैतन्यवृत्ति कधींही ढळत नाहीं तो विषय सत् आणि ज्या विषयापासून चैतन्यवृत्ति ढळते तो विषय असत् अगर मिथ्या असा दोहींमध्यें

फरक आहे. याप्रमाणें दोन प्रकारच्या वृत्ति आणि सत्य व मिथ्या असे दोन प्रकारचे विषय सर्वत्र एका ठिकाणींच नेहमीं सर्वांस उपलब्ध होतात. चैतन्या-मुळें हा भेद झाला आहे हें स्पष्टच आहे—आचार्यांच्या म्हणण्याचें तात्पर्य थोडक्यांत असें आहे:—कोणतीही वस्तु आपण पाहिली असतां येथें दोन प्रकारच्या स्थितींचें आपल्यास ज्ञान होतें उदाहरणार्थ घट घेऊं, घटाचें नाम रूप व त्याचें कारण हीं आपल्यास घट पाहिल्यावर व आमळसा विचार केल्या-वर समजतात. पण या नामरूपाचें व घटाचें कारण जी मृत्तिका तिचें नाम-रूप व कारण यांचा विचार करूं लागलों व ह्या इंद्रियांस व बुद्धिगोचर होणाऱ्या स्थितीच्या मागें काय आहे याचाही शोध करूं लागलों म्हणजे नाम-रूप आणि कारण या उपाधिसहित असणाऱ्या दृश्याच्या पलीकडे उपाधिशून्य उपाधिरहित अगर निरूपाधिक असें कायमचें राहणारे कांहीं असावें असें वाटूं लागतें पुढें आपला आत्मा, जो इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार व चैतन्य यांच्या पलिकडे आहे व ज्या आपल्याच आत्म्याचें ज्ञान आपल्यास इंद्रियें वगैरेकडून न होतां केवळ स्वानुभवावरूनच तो आहे अशी आपल्यास ओळख पटते त्या-चप्रमाणें दृश्यजगताच्या पाठीमागें सत्स्वरूप अगर ब्रह्म आहे अशी आपल्या आत्मस्वरूपावरूनच आपली खतरी होते तेव्हां घटाचे नामरूप व कारण हे दृश्य आणि त्याच्या पलीकडे असणारी स्थिति ती सत् किंवा ब्रह्म असे दोन विभाग सहज झाले. दृश्याचें ज्ञान आपल्यास इंद्रियें, मन व बुद्धि यांच्या योगानें होतें व दृश्याचा आभास ज्यावर होतो त्या ब्रह्माचें ज्ञान—नव्हे ओळखच --आत्म्याच्या स्वस्वरूपाच्या अनुभवावरून होतें. म्हणून एकंदरीनें सत् आणि असत् असे दोन विभाग झाले व त्या विभागांचें ज्ञान देणारीं साधनें हीं दोन प्रकारचीं झालीं. ज्याला वेदांती लोक माया, अविद्या, प्रकृति अशीं नांवें देतात त्याचें ज्ञान इंद्रियाच्या द्वारानें व मनाच्या द्वारानें बुद्धीस मिळते; बुद्धीच्या दरबारांत त्या त्या विषयज्ञानाची व्यवस्था लागून त्याला व्यवस्थित स्वरूप येतें आणि विचारशक्तीच्या सामर्थ्यानें त्या ज्ञानाला सत्यत्व येतें असा भास होतो हें ज्ञान सद्वस्तूचें नसतें म्हणून खरें नाहीं असें वेदांत्यांचें मत आहे; हें ज्ञान अपूर्ण आहे असें युरपियन वेदांत्यांचें (अद्वैतवाद्यांचें) मत आहे. आत्मानु-भवानें सद्वस्तूचा परिचय झाला म्हणजे ज्ञानाची परमावधि होऊन आत्मा तीच सद्वस्तु अगर ब्रह्म, आणि ब्रह्म तोच आत्मा असा अनुभव येतो; आणि

इंद्रियें, मन, बुद्धि, विचारशक्ति यांकडून मिळालेल्या दृश्य जगाच्या ज्ञानाला व दृश्य जगाला पूर्णता येते असें शोपेनहारनामक जर्मन अद्वैतवाद्याचें मत शांकरमताशीं पुष्कळच बरोबर जुळतें; हें ज्यास ठाऊक नाहीं त्यांस कळविलें असतां एक प्रकारचा आनंद, समाधान व अभिमान उत्पन्न होईल असें जाणून ही विशेष माहिती दिली आहे. सांख्यमताचा अगर आचार्यांच्या मताप्रमाणें अद्वैतमताचा मुख्य विचार ३३ साव्या श्लोकांत आटपेल, त्यावेळीं स्पायनोझा, कांट, हेगेल व शोपेनहार इत्यादिक तत्त्ववेत्त्यांच्या विचारांचा सारांश देण्याचें योजिलें आहे, तेथें हाच अभिमानजनक विषय अधिक दृढ होईल.—

न नीलोत्पलवत्सन्घटः सन्पटः सन्हस्तीति । एवं सर्वत्र । तयो-र्बुद्ध्योर्घटादिबुद्धिर्व्यभिचराति । तथा च दर्शितम् । न तु सद्बुद्धिः । तस्माद्घटादिबुद्धिविषयोऽसन्व्यभिचारात्, न तु सद्बुद्धिविषयोऽव्यभि-चारात् । घटे विनष्टे घटबुद्धौ व्यभिचरन्त्यां सद्बुद्धिरपि व्यभिचरतीति चेत् । न, पटादावपि सद्बुद्धिदर्शनात् । विशेषणविषयैव सा सद्-बुद्धिः सद्बुद्धिवद्घटबुद्धिरपि घटान्तरे दृश्यत इति चेत् । न पटादावदर्शनात् ।

—आतांच वर सांगितलें आहे कीं कोणताही पदार्थ पाहिला असतां तेथें दोन प्रकारच्या चैतन्यवृत्ति निर्माण होतात, किंवा त्यांचा उद्बोध होतो या दोन चैतन्यवृत्तींचे विषय, एक पदार्थांतील सद्वस्तू आणि दुसरे पदार्थाचें दृश्यस्वरूप हीं होत. ह्यांपैकीं एक खरें आणि दुसरें मिथ्या आहे. दोन्हीं खरीं नाहींत. दोन्हीही एकच असतील अशी शंका व्यर्थ आहे. कारण तीं एकच असतीं तर दोन ज्ञानें होणें अशक्य झालें असतें, दोहोंमध्यें कांहींच संबंध नसता तर दोहोंचें वास्तव्यही एका ठिकाणीं संभवलें नसतें. पण ती दोन्हीं एका ठिकाणीं असतात व दोन ज्ञानें आपल्यास होतात, ह्मणून तीं दोन आहेत हें उघड झालें. तसेंच एक असून भिन्न आहेत असें ह्मणणें विरोधात्मक आहे. दृश्य हें सद्वस्तूचें एक विशेषण आहे असाही प्रकार नाहीं. तर मग दृश्य आणि सद्वस्तु हीं दोन्ही एकच पदार्थांत राहतात, एक नाहींत, भिन्न नाहींत, एक दुसऱ्याचें विशेषणही नाहीं, तर यांचा संबंध तरी काय

आहे? ह्याचें उत्तर आचार्य देतात.--नील कमलामध्यें निळेपणा हा जसा कमळाचा गुण आहे त्याप्रमाणें असणारा घट, असणारा पट, असणारा हत्ती (घट आहे, पट आहे, हत्ती आहे, ) यांत 'असणारा' किंवा 'आहे' हा शब्द घटपटादिकांचें विशेषण नाहीं तर असणेंपणा हा, नित्य असणारी सद्वस्तु आहे; हिच्यावर घटापटादि विशेष दृश्याचा अभास आहे.--असणेंपणा हें ब्रह्म किंवा सद्वस्तु होय. ह्या ब्रह्मावर दृश्यांचा आभास मायेच्या योगानें उत्पन्न होतो असें वेदान्ती ह्मणतात; व इंद्रियें, मन, बुद्धि आहेत म्हणून हा आभास अगर अपूर्णज्ञान होतें असें युरोपियन वेदान्ती म्हणतात. तात्पर्य एकच आहे तें हें कीं कोणताही पदार्थ पाहिला असतां दोन प्रकारचीं चैतन्यवृत्ति, दोन प्रकारचीं ज्ञानें एका ठिकाणींच अनुभवास येतात. एक सद्वस्तूचें ज्ञान आणि दुसरें नाम, रूप, कारण इत्यादि दृश्याचें ज्ञान अगर ज्ञानाभास. हीं ज्ञानें अगर चैतन्यवृत्ति एकस्वरूपींही नाहींत, अत्यंत भिन्नही नाहींत, एकमेकांचीं विशेषणें नाहींत, तर सद्वस्तूच्या ठिकाणीं व सद्वस्तूच्या ज्ञानाच्या ठिकाणीं दृश्याचा व दृश्यज्ञानाचा आभास होतो, अशी खरी स्थिति आहे. दृश्य नाहींसें होतें म्हणून दृश्यज्ञान नेहमीं एकसारखें रहात नाहीं.--असो; याप्रमाणेंच सर्वत्र पदार्थांचे ठिकाणीं सद्वस्तूचें व दृश्याचें ज्ञान होतें. ज्या चैतन्यवृत्तींच्या योगानें हीं भिन्न ज्ञानें होतात, त्यांपैकीं घटादिकरून दृश्य तेवढें घेणारी चैतन्यवृत्ति चंचल होते, नाहींशी होते ती कशी हें मागें सांगितलेंच आहे. आतां सद्बुद्धि किंवा सद्वस्तु पाहणारी चैतन्यवृत्ति स्थिर असते, कधींही नष्ट होत नाहीं. ह्मणून (१) घट वगैरेचें ज्ञान होतें त्या चैतन्यबुद्धीला (इंद्रिय, मन, बुद्धि वगैरेला) गोचर जे घटपटादि पदार्थ, ते सर्व असत् ह्मणजे मिथ्या होत. कारण घट नष्ट झाला ह्मणजे घटबुद्धिही नष्ट होते.--आणि ज्या विषयासंबंधानें तो विषय घेणारी बुद्धि नष्ट होते. तो विषय मिथ्या असतो, असें आपण पूर्वीच ठरविलें आहे.--तसेंच (२) सद्बुद्धीचा विषय सद्वस्तु होय. सद्वस्तु नित्य असल्यामुळें व तिचा नाश होण्याचा संभव नसल्यामुळें सद्बुद्धि स्थिर राहते. चंचल होत नाहीं, ह्मणून सद्वस्तु असत् ह्मणजे मिथ्या नाहीं. यावर अशी शंका घेण्यांत येते कीं, घट नष्ट झाला म्हणजे घटबुद्धि चंचल किंवा नष्ट होते, तेव्हांच सद्बुद्धि सुद्धां चंचल किंवा नष्ट व्हावी.--आचार्य उत्तर देतात:--तसें

नाहीं कारण घट नष्ट झाला तरी पट वगैरे इतर पदार्थ असतात, तेथें सद्बुद्धि कायमच असते. सारांश सद्बुद्धीचे विषय विशेष पदार्थ नाहींत, तिच्या ज्ञानाचा विषय 'असणेंपणा' हा आहे आणि तो असणेंपणा पदार्थांच्या नाशानें नाहींसा होणें शक्य नाहीं.—कारण सर्व पदार्थ नाहींसे झाले तथापि 'मी आहें' ही जी प्रज्ञा ती कधींही नष्ट होत नाहीं. शेवटीं ब्रह्मामध्यें 'आहे' ही प्रज्ञा राहणारच ! प्रसिद्ध फ्रेंच डेका यानें 'मी आहे' या अनुभवावरूनच आपले तत्त्व सिद्धांत तयार केले. म्हणून सद्बुद्धि नष्ट होण्याचा संभव नाहीं.--यावर शंका येते ती अशीः—सद्बुद्धि कायम असून असणेंपणा हा जसा पट वगैरे वस्तूंमध्यें आढळतो, तसेंच एक घट नष्ट झाला तरी दुसरा घट असतो तेथें तर घटबुद्धि उत्पन्न होते ! तेव्हां सद्बुद्धी 'कायम आहे' असें म्हणतां, त्याचप्रमाणेंच घटबुद्धिही 'कायम आहे' असें म्हणा. आचार्य म्हणतात—नाहीं; घटबुद्धि कायमची नाहीं, कारण पट वगैरे पदार्थांमध्यें घटबुद्धीला कोठें रिघाव होतो ?--म्हणजे पट पाहून पटबुद्धि झाली म्हणजे घटबुद्धि नष्ट होते—सारांश सगळे घट नाहींसे केले म्हणजे घटबुद्धीही नाहींशीच झाली पाहिजे. तसें सद्बुद्धीचें नाहीं. हें सर्व दृश्य जग नाहींसें झालें तरी सद्बुद्धी राहणारच. कारण असणेंपणा किंवा ब्रह्म याला नाश नाहीं, म्हणून सद्बुद्धीलाही नाश नाहीं. तेव्हां सद्बुद्धीला गोचर होणारा विषय मात्र नित्य आणि बाकीचे सर्व विषय अनित्य असा सिद्धांत आचार्यांनीं काढिला आहे.—

> सद्बुद्धिः पि नष्टे घटे न दृश्यत इति चेत् । न, विशेष्याभावात् । सद्बुद्धिर्विशेषणविषया सति विशेष्याभावे विशेषणानुपपत्तौ किं विषया स्यात्, न तु पुनः सद्बुद्धेर्विषयाभावात् । एकाधिकरणत्वं घटादिविशेष्याभावे न युक्तमिति चेत् । नेदमुदकमिति मरीच्यादावन्यतराभावेऽपि सामानाधिकरण्यदर्शनात् । तस्माद्देहादेर्द्वंद्वस्य च सकारणस्य सतो न विद्यते भाव इति ।

यावर शंका घेतात ती अशीः— घट नाहींसा झाला म्हणजे सद्बुद्धि तरी कोठें असते? सारांश ती दिसत नाहीं ह्मणून नष्ट होते आणि ह्मणून तिचा विषय जें ब्रह्म तेंही नष्ट होतें. आचार्य म्हणतात तसें नाहीं. घट नष्ट झाल्यावर सद्बुद्धि दिसत नाहीं याचें कारण दृश्य पदार्थाचा अभाव हें होय.

सद्बुद्धीचा विषय असणेंपणा हा होय. असणेंपणा हा पदार्थामध्यें ज्ञानगोचर होतो. तेव्हां पदार्थच नष्ट झाल्यास त्याचें विशेषण जो असणेंपणा, त्या असणेंपणाचें ज्ञान होण्यास मार्ग नसतो. सद्बुद्धीला गोचर होणारा विषय जो घटस्थित असणेंपणा तो नाहींसा झाला ह्मणून सद्बुद्धीचा उदय होत नाहीं असें नव्हे, तर तिचा विषय जो असणेंपणा तो दाखविणारा पदार्थच नसतो ह्मणून सद्बुद्धीचा तेथें उदय होत नाहीं इतकेंच कायतें आहे. आतां असा आक्षेप घेतां येईल कीं घटादिकांचा नाश झाला असतां घटबुद्धि तर नष्ट होतेच आणि सद्बुद्धीही अंतर्धान पावते, तेव्हां दृश्य मिथ्या अगर नाशवंत पदार्थांचा व सत्य आणि नित्य वस्तूचा एकाच पदार्थामध्यें संबंध लावणें हें योग्य नाहीं. कारण व्यवहारांत पाहिलें असतां दोन खऱ्या गोष्टींचाच संबंध असणें योग्य होतें. सबब सत्यत्व आणि मिथ्यात्व याचा एकाच पदार्थावरून बोध होतो हें म्हणणें सोडून द्या. आचार्य म्हणतातः—नाहीं. आम्ही ह्मणतों तसा संबंध व्यवहारांत अनेक वेळ घडून येतो. पहा 'हें उदक नाहीं' असें मृगजळ वगैरे पाहिलें असतां व उदकाचा तेथें अभाव असतो तरी 'हे' ही सत्यवस्तु व उदक ही मिथ्यावस्तु या दोहींचा आरोप एकाच मृगजळावर आपण नेहमीं करितों कीं नाहीं?—तात्पर्य एकाच वस्तूमध्यें दोन निरनिराळ्या बुद्धीस गोचर होणारे विषय असणें सहजच आहे. यांपैकीं एक विषय सद्बुद्धीला गोचर होणारा, सत् ह्मणजे खरा व असणेंपणा 'असणारा' असतो व दुसरा विषय असद्बुद्धीला गोचर होणारा ( नामरूपात्मक असून ) तो नाशवंत असतो;' असें आचार्यांचें ह्मणणें आहे.-- ह्मणून ते ह्मणतात, शरीर वगैरे सुखदुःख वगैरे विषय सकारण आहेत, सकारण वस्तु नाशवंत असतात; तो अतएव देह वगैरे नाशवंत आहेत ह्मणजे असत् आहेत, असताला असणेंपणा नसतो. तेव्हां असताला असणेंपणा नाहीं हें भगवंताचें ह्मणणें यथार्थच आहे. आचार्यांनीं येथें दिलेले सिद्धांत हे आहेत. जो पदार्थ सकारण आहे तो उत्पन्न होतो ह्मणजे तिन्ही काळीं असत नाहीं आणि म्हणून त्याच्या संबंधानें तो 'सत्' आहे असें ह्मणतां येत नाहीं. ब्रह्माला जन्मास्थितिलय नसल्यामुळें तें तिन्हीकाळीं असतें आणि म्हणूनच तें सत् आहे, व तें कधींही नाहींसें होत नाहीं. हे दोन्ही सिद्धांत कसे सिद्ध करावयाचे तें त्यांनीं दाखविलेंच आहे. हें सर्व सांगण्याचा उद्देश हा आहे कीं देहादिक जे असत

आहेत, त्यांच्याविषयीं शोक करण्याचें कारण नाहीं आणि आत्मा सत् आहे तेव्हां त्याचा नाश होणें शक्यच नाहीं. ह्मणून 'ज्यांच्यासाठीं शोक करणें उचित नाहीं' वगैरे अ० २ श्लोक ११ मध्यें म्हटलें आहे.—

तथा सतश्चाऽऽत्मनोऽभावोऽविद्यमानता न विद्यते सर्वत्राव्यभिचारादित्यवाचाम । एवमात्मानात्मनोः सदसतोरुभयोरपि दृष्ट उपलब्धोऽन्तो निर्णयः सत्सदेवासदसदेवेति त्वनयोर्यथोक्तयोस्तत्त्वदर्शिभिः । तदिति सर्वनाम सर्वं च ब्रह्म तस्य नाम तदिति तद्भावस्तत्त्वं ब्रह्मणो याथात्म्यं तद्द्रष्टुं शील येषां ते तत्त्वदर्शिनस्तैस्तत्त्वदार्शिभिः त्वमपि तत्वदार्शिनां दृष्टिमाश्रित्य शोकं मोहं च हित्वा शीतोष्णादीनि नियतानियतरूपाणि द्वंद्वानि विकारोऽयमसन्नेव मरीचिजलवन्मिथ्याऽवभासत इति मनासि निश्चित्य तितिक्षस्वेत्यभिप्रायः ॥१६॥

–ज्याप्रमाणें असताला ( नाशवंताला ) अस्तित्व नाहीं.—त्याचप्रमाणें सद्वस्तु जो आत्मा त्याचा अभाव होणें अगर तो नाहींसा होणें ( सारांश त्याचा नाश होणें ) हें शक्य नाहीं. कारण तो सर्व व्यापि आहे, त्याचा अभाव कोठें आहे असें नाहींच आम्हीं आत्मा अविनाशी आहे असें म्हणतों त्याचें कारण आत्म्याचें सर्व व्यापित्व होय. याप्रमाणें आत्मा व अनात्मक गोष्टी ( आत्मा नव्हे असें दृश्य जग ) ह्या अनुक्रमें नित्य आणि अनित्य गोष्टींचा निर्णय तत्व जाणणाऱ्या तत्त्वज्ञांनीं स्वानुभवानें ( श्रुति व युक्ति यांच्या साहाय्यानें असें मधुसूदनीकार म्हणतात. ) काढून 'सत् तें सत्' व 'असत् तें असत्' असा सिद्धांत काढिला आहे. 'तें' हें सर्वनाम सर्व जें 'ब्रह्म' त्याचें नांव आहे. त्या ब्रह्माचा भाव म्हणजे ब्रह्माचें खरें स्वरूप; हें जाणण्याचें ज्यांचें शील आहे ते तत्त्वदर्शी अगर तत्त्ववेत्ते होत. म्हणून हे अर्जुना! तूंही ह्या तत्त्वज्ञांच्या दृष्टीचा आश्रय कर; आणि शोकमोहांचा त्याग करून शीतोष्णादि अस्थिरस्वरूपीं विषयांस ( अ० २ श्लोक १४ व त्यावरील आचार्यांचें भाष्य पहा. ) विकार आहेत, हे सर्व नाशवंत आहेत, मृगजळाप्रमाणें खरें भासणारे मात्र आहेत, असें मानून—असा मनाचा निश्चय करून—ह्या शीतोष्णादिकांस व सुखदुःखादिकांस सहन करण्याची शिक्षा घे,—संवय करून घे—

**मधुसूदनी टीकाकार**—'असत्' याचें थोडक्यांत पण सुंदर असें लक्षण देतात. **'यत्कालतो देशतो वस्तुतो वा परिछिन्नं तदसत्'** ज्याला ह्मणून काळाची, देशाची अगर पदार्थाची मर्यादा आहे तें सर्व असत् होय. कालाच्या योगानें, आकाशाच्या योगानें व दुसऱ्या वस्तूच्या योगानें ज्याला मर्यादा उत्पन्न होते तें असत् होय.

आचार्यांनीं 'सत् व असत्' यांवर जे विस्तृत व्याख्यान दिलें आहे, तें विशिष्टाद्वैती **रामानुजास** आवडलें नाहीं असें दिसतें! ते म्हणतातः—**'असतः देहादेः'** ( असताचें ह्मणजे देहादिकांचें—आस्तित्व नसतें-- ) पुनः ह्मणतातः— **विनाशस्वभावो ह्यसत्त्वम् । अविनाशस्वभावाश्च सत्वम् । अत्र सत्कार्यवादस्यासंगतत्वान्न तत्परोऽयं श्लोकः । देहात्मस्वभावाज्ञानमोहितस्य तन्मोहशांतये ह्युभयोर्नाशित्वानाशित्वरूपस्वभावविवेक एव वक्तव्यः ।** (असत्त्व म्हणजे ज्याचा नाश होणें हा धर्म आहे ते. ज्याचा नाश होणें हा धर्मच नाहीं, जे अविनाशीं आहे तें सत्त्व होय. या सोळाव्या श्लोकांत सत् ह्मणजे ब्रह्म, कार्य ह्मणजे दृश्यजग हा जो वाद उत्पन्न केला आहे तो अप्रस्तुत होय. देह आणि आत्मा यांच्या धर्माविषयीं अज्ञान असल्यामुळें अर्जुनास मोह प्राप्त झाला त्याची शांति (समाधान) करण्यासाठीं देह नाशवंत आहे, आत्मा नाहीं, हा एवढा तारतम्याचा भाग येथें सांगितला असता म्हणजे बस्स होतें. रामानुजाचार्यांच्या ह्या आक्षेपाला उत्तर द्यावयाला आचार्य जिवंत नव्हते; नाहीं-तर आचार्यांनीं त्यांचा समाचार घेतला असता. असो; देहादिक नाशिवंत कां याचें समाधानकारक उतर द्यावयाचें म्हणजे कार्यकारणाचा व सद्वस्तूचा विचार अवश्यच उत्पन्न होतो, ह्मणून आचार्यांचें हें विषयांतर अप्रस्तुत नाहीं असें मला वाटतें.

**ज्ञानदेवांनीं** एक सुंदर उपमा दिली आहे तेवढी येथें घेतोः--सलिलीं पय (दूध) जैसें । एक होऊन मिनलें ( मिळालेलें ) असे । पारि निवडून राजहंसें । वेगळे कीजे ॥ तत्त्वज्ञांस राजहंसाची उपमा कशी सुंदर शोभते आहे ?

**वामन पंडितांचा** एकच उताराः—माती जैशी घटीं ॥ कीं तंतु जैसा पटीं । कारणें असतीं शेवटीं । नसोचि कार्य ॥ ऐशी प्रपंचीं ब्रह्मसत्ता । उघडी देखती गा तत्त्वतां । तत्त्वदर्शी याकरितां । ह्मणिजे यांतें ॥ प्रपंच इंद्रियां भासे ।

बुद्धीस नुसतें ब्रह्म असे । मृगजळ दृष्टी दिसे । उष्ण असे बुद्धीतें । एवं प्रपंच दृश्य सावकार । हें असत्, यांत निर्विकार । ब्रह्म देखती, सार । असारींही १६

## निष्काम कर्म आणि मुक्ति.

खिस्ती प्रेषित म्हणतातः----अहंकार हाच सर्व प्रकारच्या पापांचें मूळ व मध्यस्थान आहे. स्वार्थत्याग केला, अहंकाराला जाळून टाकिलें, तरच ईश्वरापाशीं जाऊन आपल्यास सरूपता नामक मुक्ति मिळेल. निष्कामता, आशाशून्यता, तितिक्षा (जें जें प्राप्त होईल तें तें उत्साहबुद्धीनें सहन करण्याची शक्ति) आणि कर्तव्यजागरूकता (ईश्वराच्या ज्या आज्ञा आहेत त्या पाळण्याविषयींची दक्षता) इतके गुण अंगांत असून तदनुसार वर्तन झालें तरच नरजन्माचें सार्थक्य होतें.

कर्म केल्यानें मुक्ति मिळते असें पिलाजियस मत होतें. चांगलें दिसेल तेंच चांगलें, असेंच वरील गृहस्थाचें म्हणणें असेल तर कांहीं म्हणणें नाहीं. पण कर्म करण्याचा अंतस्थ हेतु पाहिला असतां आपल्यास दिसून येईल कीं कोणीही मनुष्य कर्म करितो त्यांत त्याचा स्वार्थसाधनाचा हेतु असतो. हाच एक हेतु धारण केला म्हणजे ईश्वराचें आपल्यास विस्मरण होतें; नंतर आपण पापी होतों व पुढें पतित होतों.----सारांश करावेंच लागतें म्हणून निर्लोभमनानें कर्म केलें व ईश्वरावर निष्ठा ठेविली तरच ईश्वराच्या पायापाशीं आपल्यास जातां येईल. ईश्वरचरणीं दृढ निष्ठा हें मुख्य कर्तव्य आहे. कर्मानें, सकाम कर्मानें मुक्ति मिळत नाहीं:--( डाबिनकृत धर्मक्रांतीचा इतिहास भाग १ ).

खिस्तीशक सुरू होण्याच्या सुमारास जे ग्रीक तत्त्ववेत्ते विद्यमान होते त्यांपैकीं कांहींजणांचें मत वाचण्यासारखें आहे. ते म्हणतातः— ईश्वराची उपासना सात्विक आणि निष्ठाशुद्ध ज्ञानमार्गानेंच केली पाहिजे. केवळ कर्म करण्यानें ईश्वर प्रसन्न होत नाहीं कर्माचा व ऐहिक उपाधींचा संन्यास केल्याखेरीज, व चित्तशुद्धि होईल असें प्रायश्चित्त घेतल्याखेरीज, मुक्ति नाहीं. शरीराच्या पिंजऱ्यांत कोंडला गेलेल्या आत्म्यास जर मुक्ति मिळवून द्यावयाची असेल तर दृश्य विषयांचा सर्वस्वी त्याग केला पाहिजे. ( वुइंडलबॅंडकृत तत्त्वज्ञानाचा इतिहास. )

**प्लेटो** नामक एक प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्ता होऊन गेला. हा एक प्रकारचा अद्वैतवादी होता. फिडिये नामक एका संवादरूपी ग्रंथांत त्यानें आत्म्याचें

अमरत्व सिद्ध केलें आहे. त्याचा सारांश इतकाच आहे कीं, या जगामध्यें मनुष्याचा मुख्य पुरुषार्थ हा आहे कीं, ' ज्या एक आणि अद्वितीय ' ब्रह्मा-पासून आपण उत्पन्न झालों तिकडे पुनश्च आपलें जाणें होईल अशी प्रत्येक मनुष्यानें खटपट केली पाहिजे. मर्त्यलोकांतील मृत्यु हा खरोखर आपल्या देहाचा व इतर दृश्यांचा मृत्यु आहे. पण वस्तुतः देहत्याग करण्याची वेळ आली व इतर दृश्य नष्ट झालें ह्मणजेच आत्म्याचें खरें स्वरूप प्रकट होतें. ज्ञानी मनुष्याच्या आत्म्यानें आपलें स्वस्वरूप ओळखण्याचा हाच समय आहे. ही ओळख पटली ह्मणजे आत्मा परब्रह्मरूपाला जाऊन मिळतो ( आत्मा हा ईश्वराच्या संन्निध नेहमीं राहण्यासाठीं जातो असाही अर्थ होईल. ( प्लेटोकृत फिडियो व केर्डची धर्मोत्क्रांति पहा ).

आत्मा अमर आहे हें द्वैतवादी खिस्तास ( ल्यूकचें व माथूचें शुभवर्तमान पहा ) व निर्वाणवादी बुद्धासही कबूल आहे. मृत्यूचासुद्धां मृत्यु ह्मणजे निर्वाण होय !

**कांट** हा तत्त्ववेत्ता १८ व्या शतकाचे अखेरीस व १९ व्या शतकाच्या अवलीस विद्यमान होता. यूरपमध्यें आलीकडे जे उत्तम तत्त्ववेत्ते होऊन गेले त्यांचा **कांट** हा मुगुटमणीच होय. तो ह्मणतो:—

आपला आत्मा अमर आहे, असें मानल्याखेरीज कोणत्याही धर्माचें अस्तित्व स्थापन करितां यावयाचें नाहीं. कारण नीतीचें उत्कृष्ट स्वरूप मनुष्याच्या एका जन्मामध्यें साध्य होणें अत्यंत अशक्य आहे. आपण दृश्य जगाचें ज्ञान नाहींसें करून टाकिलें तरी व आपला अहंकार, बुद्धि, ज्ञान व इंद्रियें यांस रजा दिली तरी आपल्याजवळ ' आत्मा ' या नांवाची सद्वस्तु शिलक राहते आणि ती अदृश्य अशा ब्रह्माचा परिचय आपल्यास करून देते. हा परिचय होतांक्षणींच ईश्वरत्व, स्वतंत्रता आणि अमरत्व या त्रयींचा आपल्यास साक्षा-त्कार होतो. ( केर्डकृत ' धर्मोत्क्रांति ' भाग १ व २ पहा ).

**स्पायनोझा** हा सतराव्या शतकांतील अतिश्रेष्ठ द्वैतवादी होता. प्रधान आणि पुरुष यांपासून सर्व दृश्य जग झालें असें याचें मत आहे. तथापि याचे बरेच सिद्धांत अद्वैतमतास अनुलक्षून आहेत. असो; आत्मा नित्य आहे असें यानेंही ठरविलें आहे. ही ठरविण्याची पद्धति पहा:--आत्मा ही सद्वस्तु आहे

सद्वस्तूचा नाश होत नाहीं असें सृष्टीच्या नियमावरून आपल्यास दिसतें, सृष्टीचे नियम ईश्वरकृत आहेत; आणि म्हणूनच ते अविनाशी आहेत आतां हें उघडच आहे कीं अविनाशी नियमाचें आकलन करणारें जें मन तेंही अविनाशीच असलें पाहिजे ! देहपाताबरोबरच कल्पनाशक्ति, स्मरणशक्ति, स्नेह, प्राण्याचे विशेष गुण हे सर्व नष्ट होतात; परंतु पुरुष व प्रधान समजण्याची ज्ञानशक्ति मात्र कायम राहते. ( मार्टिनोकृत नीतिमीमांसा भाग १ पहा ? ) *

---

* इंग्लिश विद्येचा आधुनिक पद्धतीनें शिक्षणक्रम सुरू झाल्यावर व संस्कृत भाषेंतील उत्कृष्ट ग्रंथाचा अभ्यास विश्वविद्यालयामध्यें सुरू झाल्यावर जीं कांहीं विद्वद्रत्नें उदयास आलीं त्यामध्यें संस्कृत भाषेमध्यें विशेष नैपुण्य मिळविलेल्या विद्वानांपैकीं कै. काशिनाथ त्र्यंबक तेलंग हे एक होते हें वांचकांस सांगण्याची जरूरी नाहीं. डा० भांडाकर, प्रो० काथवटे, वगैरेप्रमाणेंच नामदार तेलंग यांनीं संस्कृत ग्रंथावर अत्यंत परिश्रम केले होते. न्यायमूर्ती तेलंग यांचा विद्याक्षितिजावर उदय होऊन ते स्वप्रकाशानें सर्व हिंदु लोकांस प्रकाशित करून त्यास स्थैर्य देऊं लागणार तों निर्घृण मृत्यूनें तेलंग यांस आमच्यांतून काढून नेलें ! असो; या संस्कृत पंडितानें अनेक नामांकित ग्रंथ केले आहेत त्यांतच एका ग्रंथानें भगवद्गीतेला इंग्लिश कवितेचा रमणीय पोषाख घातला आहे व हा नेपथ्यविधि करीत असतां एक भली मोठी प्रस्तावना लिहून त्यांत 'गीता हा ग्रंथ खिस्तप्रणीत धर्माच्या प्रेरणेनें झाला आहे काय ! '

या प्रश्नाचा ऊहापोह यथासांग केला आहे. बाह्यप्रमाणांच्या व अंतःप्रमाणांच्या आधारांनीं गीता ग्रंथ खिस्त जन्माच्या पूर्वी कैक शतकें रचला गेला असावा असा नामदार तेलंग यांनीं सिद्धांत ठरविला आहे. तेव्हां खिस्ती धर्मानें प्रणीत केलेलीं धर्मतत्वें व विशेषतः भक्तियोगाचीं तत्वें गीतेनें घेतलीं नाहींत इतकेंच नव्हें, तर कदाचित् ' गीता ग्रंथाच्या अध्ययनानेंच प्रेरित होऊन महासाधु ख्राइस्टनें भक्तियोग आपल्या शिष्यवर्गास सांगितला नसेलना ! ' अशी जबरदस्त शंका मनामध्यें येते ! असो; हें खंडन सर्वमान्य होऊन बसल्यावर व गीताशास्त्र हें बायबल नामक पवित्र पुस्तकांतून निघणें शक्य नाहीं अशी खातरजमा झाल्यावर खिस्ती धर्माचा प्रसार करूं पाहणाऱ्या दीक्षितांपैकीं कांहीं सद्धर्मप्रेरित उपाध्यायांनीं असें बोलण्याचा घाट घातला आहे कीं, गीताशास्त्रांतील कांहीं तत्वें मानवी प्राण्याला दुराचरण करण्यास प्रवृत्त करणारीं आहेत ! हें त्यांचें तर्कावडंबर केवळ गीताशास्त्राच्या अज्ञानानें उत्पन्न झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या त्यांच्या वितंडवादाचा मी यथोचितस्थळीं विचार करणार आहेच. प्रस्तुतच्या श्लोकावर बिशप काल्डवेल नामक धर्मोपदेशकाची पुढील टीका " पौरस्त्यांचीं पवित्र पुस्तकें त्यांचें वर्णन आणि परीक्षण " नामक मद्रास येथें निघणाऱ्या ग्रंथमालेंतील ' भगवद्गीता ' ना-

( पुढें चालू )

किं पुनस्तद्यत्सदेव सर्वदैवास्तीति, उच्यते—
सत् तें काय आहे कीं जें सदांसर्वकाळ असतें ? असें विचारशील तर ऐक:—

मक १८९५ सालीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांत ५७ पृष्ठांवर आढळते. बिशप काल्डवेल म्हणतातः—" समजा, एखाद्या आरोपीनें न्यायाधीशासमोर 'आपण जाणून बुजून खून केला' असें सांगितलें " आणि पुढें कृष्णानें सांगितलेल्या सिद्धांताचा आधार दाखवून म्हणाला, " अहो ! पुढें चौकशी कसूची करतां ? आत्मा मारीत नाहीं व मरत नाहीं. तो नित्य व अविनाशी आहेना ? शिवाय जो जन्माला आला तो मरणारच आणि मेला तो जन्मही पावणारच ! तेव्हां मी कोणाला मारिलेंही नाहीं; तो मरणारच होता; व मीं त्याला मारलें असलें तरी तो पुनः जन्माला येणारच. म्हणून मी तुम्हांस सांगतों कीं ही चौकशी पुरे करा. आत्मा अमर आहे व जन्ममरण चुकत नाहीं असें माहीत असणाऱ्या पंडितांनीं अशी वेड्यासारखी चौकशी करीत बसूं नये ! " हा आरोपीतर्फे युक्तिवाद करून बिशप मजकूर एक महासिद्धांत ठरवितात कीं हा गीतेंतील तत्ववाद न्यायाधीशास, वादीच्या पक्षास, व सर्व समाजास पसंत पडणार नाहीं इतकेंच नव्हे, तर त्यांची विवेकबुद्धि व सदाचारबुद्धि या दोन्ही संतप्त मात्र करील ! सारांश, या कृष्णकृत तत्ववादानें चोर, शिनळ आणि खुनी लोकांस दुराचरण करण्याची उत्तम संधी सांपडेल ! एवंच व्यवहारांत वेदांताचा उपयोग करूं लागले कीं, वेदांतमताचा पाया ढासळून सर्व समाजाची इमारत खालीं ढासळते ! बिशपसाहेबांच्या या एकपक्षी वकीलीस काय ह्मणावें हें मलाही समजत नाहीं. आचार्यास काश्मीरच्या राजानें अशाच तऱ्हेचा कांहीं प्रश्न विचारला होता, डा. जान्सन यानें बर्कले नामक वेदांतमती तत्ववेत्याला खोटें पाडण्यासाठीं त्यांचेंच मस्तक भिंतीवर आपटलें, वगैरे गोष्टी बहुश्रुत वाचकांस अवगत आहेतच. तात्पर्य काय आहे या स्थूल बुद्धीच्या लोकांस वेदांतमताचें अर्धवट ज्ञान झाल्यामुळें त्यांच्या हातून अशा चुका होतात. वरील उदाहरणांत आक्षेपीच्याच उपक्रमाप्रमाणेंच त्याला फांशीं देतां येईल असें बिशपमहसुफास कसें सुचलें नाहीं कोण जाणें ? भगवंताच्या ज्या श्लोकांवर भिस्त ठेऊन बिशपमजकुरांनीं खुनी मनुष्याची तरफदारी चालविली आहे, त्याच श्लोकांच्या आधारानें खुनी मनुष्याचा आत्मा 'अमर' च राहणार आहे, मग त्या बेट्याला फांशीं देण्याला काय हरकत आहे ? 'देह नाशवंत आहे' म्हणून केव्हां तरी जाणारच ? मग या नाशवंत पदार्थाची इतकी कींव साहेबांस कां यावी बरें ! साहेबांच्या मनाचा ठाव मी घेतला नाहीं हें खरें; पण वर दिलेल्या उताऱ्यावरून त्यांचा आशय बाहेर पडला आहे तो असा तर नसेल ना कीं गीतेसारखा उत्कृष्ठ ग्रंथ आपल्या 'पवित्र व अमोलिक ख्रिस्तीशास्त्रांतून' निघाला असें सिद्ध करितां येईना, तेव्हां आंबट द्राक्षासंबंधीं न्यायाप्रमाणेंच 'हा ग्रंथच भिकार आहे' अशी साहेबांनीं आपली समजूत करून घेतली

# अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ॥
# विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

आणि जगाच्या तारण्यासाठीं त्यांनीं ती प्रकट केली ! असो, वेदांतमताचें पूर्ण आकलन होण्यास चित्ताच्या उत्कृष्ट शुद्धतेची तयारी करावी लागते, नित्य कोणतें अनित्य कोणतें हें समजून घ्यावें लागतें; पृथ्वीवरील व स्वर्गातील क्षणभंगुर सुखापासून मनाला पराङ्मुख करावें लागतें; स्वाभाविक रीतीनें वास करणारी जी अहंवृत्ति तिचा पूर्णत्वानें त्याग करावा लागतो, आणि शमदमाच्या योगानें मोक्ष मिळविण्याची इच्छा उत्पन्न करून घ्यावी लागते, ( शंकराचार्यकृत ब्रह्मसूत्रावरील भाष्य अध्याय १ पाद १ सूत्र १ पहा ) म्हणजे इतकी तयारी प्रथमतः अवश्य करावी लागते, हें बिचाऱ्या संस्कृतानभिज्ञ बिशप साहेबास व त्यांच्या खुनी पक्षकारास काय ठाऊक ? गीतेप्रमाणें आचरण करणारा ज्ञानी मनुष्य वरील तिन्ही अगर पंचमहापातकें करणार नाहीं असें मी खातरीनें सांगतों. साहेबांची टीका वेदांतपद्धति चागल्या रीतीनें न समजल्यामुळें अवतीर्ण झाली आहे म्हणून ती विचारांत घेण्यासारखी नाहीं. असो; कोणत्याही पद्धतीवर किंवा सिद्धांतरूपी महावाक्यावर टीका करण्याचें धाडस करण्याच्या अगोदर ती पद्धती व ते सिद्धांत उत्कृष्ट समजून घेणें अत्यंत इष्ट आहे; हा सर्वमान्य सिद्धांत जर युरोपियन आक्षेपक व एतद्देशीय आक्षेपक नेहमीं इमानानें लक्षांत ठेवतील, तर धर्मसंबंधीं अगर इतर विषयांवरील वादविवादास पुष्कळसा संक्षेप मिळेल असें मला वाटतें. असो, स्पेन्सरसाहेबांची केवल नीतितत्त्वें आणि गीतेंतील सात्विक बुद्धिवाद या दोन्हींमध्यें अतिशय एकवाक्यता आहे असें साहेबमहशुफांस सांगून, आरोपीतर्फेचें आपलें बोलणें त्यांनीं परत घ्यावें असें मी त्यांस व त्यांच्या प्रकाशकांस सविनय सुचवितों.

वरील टीप लिहून गेल्यावर क्यापटन जेकबकृत' 'वेदान्तसाराची' इंग्रजी तिसऱ्या आवृत्तीची प्रत मला वाचण्यास मिळाली. त्यांत वेदांतसंबंधानें बऱ्याच गैरसमजुतीच्या वृथा कल्पना गोंवून दिलेल्या मला आढळल्या. परंतु प्रस्तुत त्या एकीकडे ठेवून देतों आणि कै. तेलंग यांनीं डा० लोरिन्सर यांचें केलेलें जें सणसणित खंडन त्यावर प्रतिखंडन ह्मणून जेकब साहेब यांनीं प्रो. वेबर साहेबांचे विचार प्रकट केले आहेत तिकडे वळतों. प्रो. मजकुरास डा. लोरिन्सरचें मत जरी 'अतिशयोक्तीचें' दिसतें, तथापि 'कृष्णभक्तीच्या उदयाचा उगम खिस्ती धर्मामध्येंच असला पाहिजे' असा त्यांनीं आपल्या अभिप्रायाचा शेरा एकंदर प्रश्नावर ठोकून दिला आहे ! साहेब महशुफांनीं पांच कारणें आपले मताचे पुष्ट्यर्थ दिलीं आहेत. (पहा Hindu Panthiesm पृष्ठ ३६ ) त्या सर्वांचा मथितार्थ म्हणून इतकाच आहे कीं 'शुद्ध भक्तीचें बीज पालेस्टाईन क्षेत्रांत खाईस्ट हस्तें प्रथमतः पेरलें गेलें व त्याचा विस्तार तदनंतर सर्व जगभर पसरला! कृष्णाची योग्यता वाढली ती ख्रिस्तप्रणीत धर्माचा उदय झाल्यानंतर वाढली, कृष्णाच्या आईचे जे सोहाळे सुरू झाले ते खाईस्टच्या

**येन** ( ज्यानें ) **इदं सर्वं** ( हें सर्व ) **ततं** ( व्याप्त केलें आहे ) **तत् तु** ( तें तर ) **अविनाशि** ( नाश होणारें नव्हे, असें ) **विद्धि** ( जाण ) **अस्य**

---

मातृप्रभावामुळें होत!' भक्तीचें खरें रहस्य ख्राइस्ट मुखानें मात्र या कर्मभूमीवर अवतीर्ण झालें हें मत खरें मानलें म्हणजे लागलींच आम्ही पतित होतों, निर्बुद्ध होतों, चांगल्या वस्तु दुसऱ्याकडून घेणारे होतों असें माझें मत नाहीं. तथापि जी गोष्ट होणें वस्तुगत्याच संभवनीय नाहीं, तिच्या विषयीं ह्मणजे भक्तिपंथ ख्रिस्तोक्तच आहे, असें मानण्याविषयीं युरोपियन ख्रिस्ती पंडितांचा इतका आग्रहातिरेक कां असावा हें मला समजत नाहीं.

ख्रि. श. पूर्वी पांचव्या शतकांत प्रकट झालेल्या सर्वगामि बौद्ध धर्मांचें नांव सुद्धां जर त्यावेळीं प्रचलित असणाऱ्या सर्व प्रमुख पंथांचा विचार करणाऱ्या गीतेमध्यें नाहीं, तर गीताकथन ५ व्या शतकाच्या पूर्वी झालें असलें पाहिजे असें मानावयास नको काय? **मासानां 'मार्गशीर्षोऽहं'** असें भगवान आपल्या विभूति सांगतांना दहाव्या अध्यायांत म्हणतात. 'हें म्हणण्याचें कारण काय?' असा प्रो. बा. गं. टिळक यांस प्रश्न येऊन त्यांनीं व पुढें कै. शं. बा. दीक्षित यांनीं ( भारतीय ज्योतिःशास्त्र पृ. १२५ व १३३–१३६ आणि ओरिआन पहा. ) निरानिराळ्या मार्गांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, शालिवाहन शकाच्या पूर्वी सुमारें ४,००० वर्षांपूर्वी मार्गशीर्ष मासालाच संवत्सराचा पहिला मास म्हणत असावे! अर्थातच गीता झाली त्या काळांत वर्ष मोजण्याची हीच पद्धति असावी व वसंतही त्यावेळीं मार्गशीर्ष महिन्यांत येत असावा, कारण भगवानच **'ऋतुनांकुसुमाकरः'** असें त्याच म्हणजे अ. १० श्लोक. ३५ मध्यें म्हणतात.–**मार्गशीर्ष वसंतसंपात शकापूर्वी ४००० या कालीं होता,** असें कै. दीक्षित सप्रमाण सिद्ध करितात, तेव्हां वरील वेबरसाहेबाचें ह्मणणें खरें धरिलें तर भगवंताच्या उक्तींची वाट काय लावावयाची! शिवाय कर्म उपासना आणि ज्ञान हे परमार्थ साधनाचे मार्ग असें उपनिषदांवरून दिसतें; आणि उपासना हा शब्द अत्यंत प्राचीन मानलेल्या उपनिषदांत शेकडों वेळां आलेला दिसतो; आतां उपनिषदें वेदांगकालाच्या उत्तरमर्यादेंत म्हणजें शकाच्यापूर्वी निदान ५०० वर्षें या कालांत झालीं असावीं, असा दीक्षित यांचा अभिप्राय आहे पहा भा. ज्यो. पृ. १३६ ). म्हणून मला प्रश्न करणें इष्ट वाटतें कीं कै. तैलंग यांनीं दिलेल्या अंतःप्रमाणावरून प्रो. टिळक व दीक्षित यांच्या ज्योतिषीगणितांवरून कै. कुंटे यांचे मतावरून ( See Vicissitudes of Aryan Civilixation P 418 ) व शेवटीं वे० शा० नंदुर्गीकर संस्कृत अध्यापक न्यू. इं स्कूल यांच्या रघुसर्गातील प्रस्तावनेवरून महाभारत व तदंतर्गत गीता हे ग्रंथ जर ख्रिस्तीशकापूर्वी निदान पांचव्या शतकांत निर्माण झाले, असावे असें सिद्ध होतें, तर गीता व कृष्णभक्ती ख्रिस्तावतार झाल्यानंतर व ख्राइस्ट-संस्कारांनींच अवतीर्ण झाल्या असाव्या असें आग्रहपूर्वक म्हणण्यांत काय अर्थ आहे? ख्रिस्ती लोकांस ख्रस्तीप्रणित 'नवा करार' जितका पूज्य वाटतो तितकीच पूज्यता 'ख्रिस्तमतानें संस्कृत झालेल्या गीतेसही आहे' असें कांहीं

( ह्या ) **अव्ययस्य** ( विकार होत नाहीं अशा—आत्म्याचा—) **विनाशं** ( नाश ) **कश्चित्** ( कोणीही **कर्तुं** ( करण्यास ) **न अर्हति** ( योग्य नाहीं. —समर्थ नाहीं ) तात्पर्य हें आहे कीं, ज्या सद्वस्तूनें हें सर्व दृश्य विश्व व्यापून टाकिलें आहे, ती वस्तु नाश होण्यासारखी नाहीं. तिचा नाश होणें शक्य नाहीं. कारण अशी कोणतीही स्वतु या विश्वांत नाहीं, कीं जिच्या योगानें या अविकारी सद्वस्तूचा नाश होईल. सारांश ही वस्तु अविनाशी आहे.

अविनाशीति । अविनाशि न विनष्टुं शीलमस्येति । तुशब्दोऽसतो विशेषणार्थः । तद्विद्धि विजानीहि । किंयेन सर्वमिदं जगत्ततं व्याप्तं सदाख्येन ब्रह्मणा साकाशमाकाशेनेव घटादयः । विनाशमदर्शनमभावमव्ययस्यन व्येति, उपचयापचयौ न यातित्यव्ययं तस्याव्ययस्य नैतत्सदाख्यं ब्रह्म स्वेन रूपेण व्येति व्यभिचरीत निरवयवत्वाद्देहादि-

---

आग्रही ख्रिश्चियन्सनीं म्हटलें तर तें हिंदुलोकांला व गीतेला दूषण नसून कै. प्रो. द्विवेदी म्हणतात त्याप्रमाणें भूषण आहे! पण याविषयीं इतका आग्रह क। ? जन्ममरणाच्या तापत्रयांतून मुक्त होण्याविषयीं आतूर झालेला पुरुष सत्कर्मै करून उपासना करून अगर ज्ञानसंपादन करून मुक्त होण्याची खटपट करितो. हा प्रयत्न सर्वत्र आणि सर्वदा सुरू आहे. आतां असें तर नाहीं कीं सत्याचा प्रकाश पश्चिमेकडेच पाडावा आणि पूर्वेकडे बिलकुल पाडूं नये असा पक्षपात सर्ववत्सल परमेश्वराच्या येथें आहे ! तेव्हां कधीं कधीं कर्मसादृश्याचे, मनोवृत्तिसादृश्याचे व विचारसादृश्याचे चमत्कार अनेक ठिकाणीं दिसून येतात यांत काय नवल आहे ? पण हें न समजून एखाद्या अभिनव पंडितानें मृच्छकटिक नाटकांतील शकाराचें व सिंबेलाइन नाटकांतील मुराररावाचें मूर्खत्वसादृश्य व लोभसादृश्य पाहून जर असा सिद्धांत काढिला कीं, 'शूद्रकनामक लबाड कवीनें कविश्रेष्ठ शेक्स्पीयरच्या अमोलिक नाटकांतून शकाराची भूमिका अजीबात चोरून घेतली असावी.' ! तर किंवा ' शोपनहार व हर्टूननामक आधुनिक जर्मन तत्ववेत्यांचा सगळ्याचा सगळा अद्वैतपर मजकूर सातव्या शकांतलि शंकराचार्यानें लुबाडून घेतला असावा.' तर आपण असल्या वावदूकास काय ह्मणूं बरें ? असो; तात्पर्य इतकेंच ध्यावयाचें कीं, कित्येक युरोपियन पंडित ममत्वाभिमानाला वश होऊन तांबड्या समुद्राच्या पश्चिमेकडील देशांत उत्कृष्ट असें कांहींच नसावयाचें असा खोटा समज करून घेतात आणि सत्यप्रिय पंडितांच्या उपहासाचें विषय होऊन बसतात ! 'माता' या शब्दांत हिंदुलोकांस प्रिय असें किती गौरव सांठवून ठेविलें आहे याची कल्पना विदेशीयांस होणें कठिण म्हणूनच मेरीच्या अनुषंगानें देवकीपूजा सुरू झाली असें ते म्हणूं शकतात. असो.

वत् । नाप्यात्मीयेनाऽऽत्मीयाभावाद्यथादेवदत्तो धनहान्या व्येति न त्वेवं ब्रह्म वेत्यतोऽव्ययस्यास्य ब्राम्हणो विनाशं न कश्चित्कर्तुमर्हति, न कश्चिदात्मानं विनाशयितुं शक्नोतीश्वरोऽपि । आत्मा हि ब्रम्ह स्वात्मनि क्रियाविशेषात् ॥ १७ ॥

नाश पावणें हा ज्याचा स्वभाव नाहीं ते अविनाशी होय. 'तु' शब्द श्लोकामध्यें घातला आहे त्याच्या योगानें अस्ताचा परिहार होतो. त्याला वेगळें काढतां येतें.—अर्जुना ! ज्या 'सत्' नामक ब्रह्मानें हें सर्व जग व सर्व आकाश व्यापून टाकिलें आहे, आकाश जसें घटादि सर्व पदार्थांस व्यापून टाकितें, तसें ज्या ब्रह्मानें आकाशासहित सर्व जगास व्यापून टाकिलें आहे, तें ब्रह्म ओळखण्यास शीक.—अर्जुना ! ज्याच्यामध्यें जास्ती होत नाहीं व कमीही होत नाहीं, अशा या अव्ययाचा विनाश करण्याला प्रत्यक्ष ईश्वरसुद्धां समर्थ नाहीं.—मग इतराची तर कथा काय ?—तसेंच ह्या 'सत्' नांवाच्या ब्रह्माला आपल्या स्वरूपाच्या योगानेंही अगर दुसऱ्या एखाद्या अंगभूत अवयवाच्याही योगानें विकार उत्पन्न होत नाहीं, कारण त्या ब्रह्माला अवयवच नाहींत. एवंच बाहेरून व आंतून ब्रह्मामध्यें विकार होणें शक्यच नाहीं.—आत्म्याला विकार होत नाहीं, कारण तो निरवयव आहे आणि निर्विकारी आत्मा आहे म्हणून तो अमर आहे असा 'बटलर' नामक एका प्रसिद्ध नीतितत्त्ववेत्त्याचा सिद्धांत आहे.—देहाला विकार होतो, कारण हात, पाय, वगैरे अवयव देहास आहेत. आतां कोणी असें म्हणेल कीं देवदत्ताची धनावर सत्ता असते, तेव्हांचा असणारा देवदत्त धनहीन झाला असतां जसा निराळा होतो तसेंच आत्म्याची स्वतःवर सत्ता असल्यामुळें केव्हांतरी आत्मस्वरूपांत फरक पडत असेल, विकार उत्पन्न होत असेल; तर तसेंही नाहीं; कारण आत्म्यावर कोणाचीच सत्ता नाहीं. सारांश, आत्मा सर्वव्यापी आहे, निरवयव आहे व त्यावर कोणाची सत्ता नाहीं; असा तो असल्यामुळें त्याचा नाश करण्याला प्रत्यक्ष ईश्वरसुद्धां समर्थ नाहीं. आत्मा हेंच ब्रह्म होय. आतां आत्म्याचें कार्य आपल्या स्वतःवरच होईल—असें म्हणणेंही विरोधात्मक आहे. कारण आत्मा निष्क्रीय आहे. एवंच स्वतःकडून किंवा दुसऱ्याकडून आत्म्याला विकार होत नाहीं ह्मणून तो अव्ययच आहे; तो सर्वव्यापी आहे हें मागें सांगितलेंच आहे.

**मधुसू०**—'**इदं**' **दृश्यजातं** ( **स्वतःसत्तास्फूर्तिशून्यं** ) म्हणजे हा दिसणारा पदार्थमात्र—ज्याला स्वतः सत्तेची स्फूर्ती कधींही होत नाहीं, असें हें जग. असा 'इदं' चा अर्थ' करितात. तसेंच 'अस्य' ह्याचा 'प्रत्यक्ष, शून्यवादी वगैरे सर्वांस अनुभव असणाऱ्या चैतन्यस्वरूपाचा' असा अर्थ करितात; आणि म्हणतात कीं आत्म्याचें सर्वव्यापित्व सिद्ध होतें.—यावरून शून्यवादी चार्वाकाचें-- व अलीकडील शास्त्रीय नास्तिकांचें व क्षणभरसुद्धां कोणतीही वस्तु एका स्वरूपामध्यें असूं शकत नाहीं असें ह्मणणाऱ्या क्षणिक-वादी बुद्धाचें व ग्रीस देशांतील हिराक्लीटसनामक तत्त्ववेत्त्याचें खंडन होतें.---

आत्म्याचें अमरत्व **रामानुजांनीं** सिद्ध केलें आहे त्याच मुद्यावर बटलरनें १७ व्या शतकांत केलं आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

ज्ञानेश्वरीकार—'हा लोकत्रयाकार। तो जयाचा विस्तार। तेथ नाम, वर्ण, आकार। चिन्ह नाहीं ॥ १७ ॥

किं पुनस्तदसद्यत्स्वात्मसत्तां व्यभिचरीति। उच्यते—

असें तें असत् काय आहे बरें कीं जें आपलें स्वतःचें अस्तित्वच सोडून देतें? तें कायतें सांगतों ऐक.

# अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः।
# अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

—**नित्यस्य** ( अमर, सदोदित राहणारा जो त्याचीं ) **शरीरिणः** ( शरीर धारण करणारा जो आत्मा त्याचीं ) **इमे** ( ही ) **देहाः** ( शरीरें ) **अन्तवन्तः** (नाशवंत चिरकाळ न टिकणारीं अशीं) **उक्तः** ( सांगितलीं आहेत.)— आत्मा शरीरी ( देहवान् ) आहे खरें, पण त्यांचीं शरीरें नष्ट होणारीं, नाशवंत अशीं आहेत, आत्मा कसा आहे, तें फिरून सांगतातः— **अनाशिनः** ( कधींही नाश न पावणारा त्याचीं ) **अप्रमेयस्य** ( —आणि—ज्याचें स्वरूप अगर लक्षण सांगतां येत नाहीं त्याचीं )—हा— आभासरूपानें दिसणारीं, मिथ्या शरीरें नाशवंत आहेत. **तस्मात्** ( ह्मणून ) **भारत** ( अर्जुना!) **युद्धस्व** ( तूं युद्ध कर. )

अन्तवन्त इति। अन्तवन्तोऽन्तो विनाशो विद्यते येषां तेऽन्त-वन्तो यथा मृगतृष्णिकोदकादौ सद्बुद्धिरनुवृत्ता प्रमाणनिरूपणान्ते

विच्छिद्यते स तस्या अन्तस्तथेमे देहाः स्वप्नमायादेहादिवच्चान्तवन्तो नित्यस्य शरीरिणः शरीरवतोऽनाशिनोऽप्रमेयस्याऽऽत्मनोऽन्तवन्त इत्युक्ता विवेकिभिरित्यर्थः । नित्यस्यानाशिन इति न पुनरुक्तं नित्यत्वस्य द्विविधत्वाल्लोके नाशस्य च । यथा देहो भस्मीभूतोऽदर्शनं गतो नष्ट उच्यते, विद्यमानोऽप्यन्यथापरिणतो व्याध्यादियुक्तो जातो नष्ट उच्यते । तत्रानाशिनो नित्यस्येति द्विविधेनापि नाशेनासंबन्धोऽस्येत्यर्थः । अन्यथा पृथिव्यादिवदपि नित्यत्वं स्यादात्मनस्तन्माभूदिति नित्यस्यानाशिन इत्याह ।

ज्यांना अंत आहे, ज्यांचा शेवट होतो, ते अंतवंत अगर नाशवंत होत.—पहा. ज्याप्रमाणें मृगजळ हें आहे असा प्रथम ज्ञानाचा आभास होऊन नंतर प्रत्यक्ष, अनुमान इत्यादिकांच्या साहाय्यानें निश्चय करूं लागलें ह्मणजे मृगजळाच्या संबंधानें ‘ आहे, ’ अशी बुद्धि ( सद्बुद्धि ) नाश पावते, त्याचप्रमाणें देहादिकांचा सप्रमाण विचार करावयास लागलें म्हणजे हे नाशवंत आहेत अशी खातरी होते. स्वप्नामध्यें पाहिलेलीं शरीरें किंवा गारोड्यानें निर्माण केलेलीं शरीरें जशीं विचारप्रकाशामध्यें नाश पावतात, तद्वतच नित्य राहणारा, शरीर धारण करणारा, नाश न पावणारा आणि ज्याचें स्वरूप कसें आहे तें वाणीनें सांगतां येत नाहीं असा जो आत्मा त्याचीं हीं शरीरें नाशवंत आहेत, असें सुज्ञ, ज्ञानी, व उपनिषदें जाणणारे—लोक ह्मणतात असा अर्थ होय.—श्लोकामध्यें—नित्य व अविनाशी अशीं समानार्थकच ( एकच अर्थ दर्शविणारीं ) पदें घातलीं आहेत म्हणून येथें द्विरुक्ति झाली असें म्हणतां यावयाचें नाहीं. कारण व्यवहारामध्यें नित्यत्व आणि नाश या दोघांचेही दोन दोन अर्थ करीत असतात. पहाः—दहन होऊन रक्षा झाल्यामुळें अदृश्य झालेल्या देहास ‘ तो नाश पावला ’ असें ह्मणतात; व देह असला परंतु व्याधि वगैरे उत्पन्न झाल्यामुळें त्याचे स्वरूपांत विलक्षण फेरबदल घडला तर त्या देहालाही ‘ तो नाश पावला ’ असें ह्मणतात. तेव्हां थोडासा नाश आणि पूर्णनाश या दोन्ही नाशांचा व आत्म्याचा संबंध नाहीं असें दाखविण्यासाठीं वरील दोन विशेषणें घातलीं आहेत. असें न करितां एकच विशेषण योजिलें असतें तर पृथ्वी नित्य आहे तसाच आत्माही नित्य झाला असता, म्हणजे दिसणाऱ्या पृथ्वीच्या स्वरूपांत जसे फेरफार होतात तसे आत्म्याच्या

स्वरूपांत होतात, असा अर्थ झाला असता ह्मणून आत्मस्वरूपांत थोडा अगर सगळा,–कसलाच–नाश नाहीं, हें स्पष्ट करण्याकरितांच श्लोकांत वरील दोन पदें घातलीं आहेत.

अप्रमेयस्य न प्रमेयस्य प्रत्यक्षादिप्रमाणैरपरिच्छेद्यस्येत्यर्थः। नन्वागमेनाऽऽत्मा परिच्छिद्यते प्रत्यक्षादीना च पूर्वम्। न, आत्मनः स्वतःसिद्धत्वात्। सिद्धे ह्यात्मनि प्रमातरि प्रमित्सोः प्रमाणान्वेषणा भवति। न हि पूर्वमित्थमहमित्यात्मान*मप्रमाय पश्चात्प्रमेयपरिच्छेदाय प्रवर्तते। न ह्यात्मा नाम कस्यचिदप्रसिद्धो भवति।

ज्याचें स्वरूप अगर लक्षण प्रत्यक्षानुमानादिक प्रमाणांनीं ठरवितां येत नाहीं, असा अप्रमेय शब्दाचा अर्थ आहे. यावर कोणी शंका घेतात कीं, 'वेदवाक्यावरून व उपनिषदांवरून व त्याचप्रमाणें प्रत्यक्षादि प्रमाणांच्या योगानें आत्म्याचें स्वरूप प्रथमच ठरवितां येतें; तेव्हां आत्मा अप्रमेय आहे, असें कसें ह्मणतां?'

आचार्य ह्मणतातः—ही शंका व्यर्थ आहे. आत्मा हा स्वतःसिद्धच आहे. याचें आस्तित्व अगर स्वरूप ठरविण्याला दुसऱ्या प्रमाणाची गरजच नाहीं. कारण—सर्वांचें स्वरूप ठरविणारा जो आत्मा तो 'आहे' अशी खातरी झाल्यावरच शोधकाची बुद्धि प्रमाणें शोधावयास लागते. उदाहरणार्थः 'थंडी पडली आहे.' 'कशावरून' 'हातपाय गारठलेले आहेत ह्मणून.' 'हें कशावरून' 'मला अनुभव आहे ह्मणून.' ह्मणजे 'मी आहें' व 'मला असा अनुभव येतो ह्मणून' सारांश कोणताही पदार्थ घेतला तरी त्या पदार्थाला जाणणारा जो आत्मा तो आहे असें धरल्याखेरीज त्या पदार्थाचें ज्ञान होणें शक्य नाहीं,—आत्मा असा असा आहे. असें स्वानुभवानें प्रथम ठरविल्यावांचून कोणीही जिज्ञासु ज्ञेय वस्तूचें स्वरूप प्रमाणांनीं ठरविण्याचा आरंभ करीत नाहीं! आत्मा ठाऊक नाहीं, असा मनुष्यच सांपडणें शक्य नाहीं.–सारांश आत्म्याचें लक्षण व स्वरूप प्रमाणांनीं ठरवितां येत नाहीं. कारण कोणतेंही प्रमाण घेतलें तरी तें लागू करतांना 'आत्मा आहे' हें गृहीतच

* येथें 'आत्मानं प्रमाय' असाही कांहीं पुस्तकांत पाठ आढळतो. प्रमाय शब्दाचे निरनिराळे अर्थ केले असतां पुढें दिला आहे तसाच अर्थ निष्पन्न होतो.

ध्यावें लागतें. तेव्हां सर्व प्रमाणांच्या अगोदर जो आहे व ज्याशिवाय प्रमाण करणेंच संभवत नाहीं, त्या आत्म्याची अस्तित्वसिद्धि अगर स्वरूपसिद्धि प्रमाणांनीं कशी होणार? पर्जन्याचे योगानें पाणी मिळतें अशी सामान्य समजूत आहे. पण पाण्याची वाफ झाली तरच ढग उत्पन्न होऊन ते धारारूपानें विशेष ऋतूंमध्यें विरघळतात, असें ज्याला समजलें आहे, तो पर्जन्यापासूनच पाणी मिळतें असें म्हणणार नाहीं, त्याचप्रमाणें सर्व प्रमाणांस निश्चित स्वरूप देणारा जो आत्मा त्याचें स्वरूप व अस्तित्व हीं—आत्म्यापासून उत्पन्न झालेल्या प्रमाणांतींच कळतात असेंही म्हणणार नाहीं.—

शास्त्रं त्वन्त्यं प्रमाणमतद्धर्माध्यारोपणमात्रनिवर्तकत्वेन प्रमाणत्वमात्मनि प्रतिपद्यते, न त्वज्ञातार्थज्ञापकत्वेन। तथा च श्रुतिः—'यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरः' इति। यस्मादेवं नित्योऽविक्रियश्चाऽऽत्मा तस्माद्युध्यस्व युद्धादुपरमं मा कार्षीरित्यर्थः। न ह्यत्र युद्धकर्तव्यता विधीयते। युद्धे प्रवृत्त एव ह्यसौ शोकमोहप्रतिबद्धस्तूष्णीमास्ते तस्य कर्तव्यप्रतिबन्धापनयनमात्रं भगवता क्रियते तस्माद्युध्यस्वेत्यनुवादमात्रं न विधिः॥ १८॥

उपनिषदें वगैरे शास्त्रें हें शेवटचें प्रमाण आहे; पण आत्म्यावर—'मी गोरा आहें, हें माझें आहे.' अशा प्रकारचे आरोप अज्ञानानें झालेले असतात, ते अज्ञानजन्य आरोप नाहींसे करण्यापुरतें मात्र हें प्रमाण आहे. ठाऊक नसलेली वस्तु दाखविणें हें प्रमाणाचें लक्षण आहे; तसलें काम हें शास्त्र प्रमाण करीत नाहीं; तर केवळ अज्ञानाचा पडदा मात्र दूर करितें. श्रुतीही असेंच सांगतेः—'हें ब्रह्म स्वतःसिद्ध आणि सर्वांस प्रत्यक्ष असें आहे. हा आत्मा पदार्थमात्राच्या अंतर्यामीं आहे.' (बृहदा० ३।४।१.) याप्रमाणें आत्मा नित्य असून विकृति न होणारा असा आहे म्हणून हे अर्जुना! भीष्मादिकांविषयींचा शोक, मोह व वधाविषयींची पापबुद्धि टाकून देऊन युद्ध कर, युद्धापासून पराङ्मुख होऊं नको, असा अभिप्राय आहे. येथें भगवान 'युद्ध करणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे म्हणून तूं युद्ध कर' अशी अर्जुनास आज्ञा करीत नाहींत, तर युद्ध करण्यास सिद्ध झालेल्या अर्जुनाला शोकमोहांच्या योगानें स्तब्धता प्राप्त झाली, तो थबकून बसला, हें नाहींसें व्हावें येवढ्यासाठीं कर्तव्य करण्याच्या आड आलेले जे शोकमोह त्यांचें निवारण मात्र भगवान करीत आहेत.

सारांश 'युद्ध कर' हें वाक्य केवळ अनुवादक आहे; (तो करण्यास तयार झाला होता तेंच करावयास सांगत आहे;) ही आज्ञा नव्हे.—आत्म्याचा नाश कोणत्याही प्रकारें होत नाहीं, तो नित्य आहे. म्हणून 'भीष्मादिकांस मी मारीन' वगैरे मोहशोकांनीं स्तब्ध झालेल्या अर्जुनाला 'तूं युद्ध कर' तूं युद्ध केल्यानें त्यांच्या आत्म्यांस काडीमात्रही विकार होणार नाहीं म्हणून शोकमोह सोडून देऊन मनांत आणलेली युद्धाची गोष्ट करावयास लाग' असें भगवान सांगतात. 'ज्या कारणांसाठीं तूं युद्धपराङ्मुख झालास तीं कारणें खोटीं आहेत म्हणून तूं आपलें इष्ट कर्तव्य पूर्ण करून घे' असा भगवंतांचा व आचार्यांचा अभिप्राय आहे.

**मधु०**—देह शब्द अनेकवचनी योजिला आहे यावरून गूढार्थ काढितात कीं अनेक वचनानें स्थूळ शरीर, लिंगशरीर व कारणशरीर इत्यादिक देहांचा व विराट् स्वरूपाचा समावेश भगवंतांनीं केला आहे. तसेंच आत्म्याचें एकवचन सार्थ आहे हें दाखविण्यासाठीं '**एको देवः सर्वभूतेषु गूढः**' (भूतमात्राचे ठायीं, अंतर्यामीं वास करणारा, व प्रकाशित असणारा देव एकच आहे) हा आधार देतात.

**रामानुज**—देहाच्या अनेक वचनासंबंधें '**कर्मफलभोगार्थतया भूतसंघातरूपाः कर्मावसानविनाशिनः**' (कर्मफलाचा उपभोग; घेण्यासाठीं भूतद्रव्यापांसून झालेले व कर्म संपलें ह्मणजे नष्ट होणारे देहांचा) असा अर्थ करितात. '**अमृतत्वप्राप्तयेऽनभिसंहितफलं युद्धाख्यं कर्म आरभस्व**' (**मोक्ष**विळविण्यासाठीं निष्काम युद्ध कर) असा भगवंताचा कर्मपर उपदेश आहे, असें सुचवितात. कर्मानें चित्तशुद्धि होते, मोक्ष मिळत नाहीं, हें अद्वैतमत वरचेवर सांगण्यास नकोच आहे!

**सत्यानंदस्वामी 'नित्यस्य**=प्रतिबिंबरूपजीवस्य' (ईश्वर बिंब; त्याचें प्रतिबिंब जीव आहे त्या जीवाचा) असें सांगून '**जीवोपाधिर्द्विधा प्रोक्तः स्वरूपं बाह्य एव च। बाह्योपाधिर्लयं याति मुक्तावन्यस्य संस्थितिः। सर्वोपाधिविनाशे तु प्रतिबिम्बः कथं भवेत्....उपाधेश्चैव नित्यत्वान्नैव जीवो विनश्यति**' (जीवाला दोन प्रकारचे उपाधि आहेत. एक स्वरूपाचा—जीव असणें हा उपाधि आणि दुसरा बाह्य उपाधि. मुक्ति प्राप्त झाली ह्मणजे बाह्योपाधि नष्ट होतो; पण स्वरूपोपाधि रहातो. कारण सर्वच उपाधींचा नाश झाल्यावर प्रतिबिंबाच

ह्मणजे जीवाचा संभवच राहणार नाहीं. तात्पर्य, उपाधि नित्य आहे ह्मणूनच जीवही नित्य आहे; म्हणजे मुक्ति मिळाली तरी जीव स्वरूपानें राहतो, ब्रह्म-स्वरूपांत जाऊन मिळत नाहीं; असें सांगण्याचा स्वामींचा अभिप्राय आहे. यांच्या मतें ईश्वर, माया (विश्व) आणि जीव अथवा God, Nature and Man यांचें अस्तित्व नित्य आहे असें आहे. सर्व भक्तिपंथांत ही त्रयी दृश्य होते. परंतु हे सर्व दृश्य पदार्थ आहेत, यांच्या पलीकडे अदृश्य, केवल, नित्य, बुद्ध, शुद्ध आणि परब्रह्म स्वरूप आहे हें या भक्तिपंथीयांस मान्य नाहीं. कारण सर्व ज्ञानेंद्रियांस अंतर्मुख करून आत्मस्वरूपाचा शोध करणें व 'अहं ब्रह्मास्मि' हा साक्षात्परिचय करून घेणें याची गुरुकिल्ली यांस सांपडली नाहीं!

**शंकरानंद** म्हणतात कीं प्रस्तुतचा श्लोक, **अशोच्यानन्वशोचस्त्वं** ' या श्लोकाचे स्पष्टीकरणार्थ घातला आहे. देह विनाशी आहेत कारण '**यदल्पं तन्मर्त्यमिति** श्रुतेः (जें थोडें मर्यादित आहे तें मर्त्य नाशवंत आहे.) (छांदोग्य ७।२४।१) अशी श्रुति आहे. तसेंच आत्मा अविनाशी आहे, कारण '**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म**' (ब्रह्म हें स्वस्वरूपी, ज्ञानस्वरूपी आणि अनतंस्वरूपी आहे) (तैत्तिरीय २।१।१०) म्हणून कोणतीही शंका न धरितां व शोकमोह सोडून देऊन 'अर्जुना! तूं युद्ध कर' हें स्पष्ट सांगण्यासाठीं ह्या श्लोकाची योजना केली आहे, असें शंकरानंद म्हणतात. आत्मा अप्रमेय आहे कारण '**अशब्दमस्पर्शं**' (कंठ २।१९) (तो ऐकावयास यावयाचा नाहीं, त्याला स्पर्श करितां येत नाहीं, सारांश इंद्रियगोचर म्हणजे प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध होणारा नाहीं) '**नैव च तस्य लिङ्गं**, त्याला अशी कोणतीही खूण नाहीं कीं जिच्या योगानें त्याचें आपल्यास अनुमान करितां येईल, म्हणजे अनुमान प्रमाणाला तो अगोचर आहे. (श्वेताश्व० ६।९ —लिंग म्हणजे चिन्ह यालाच इंग्रजी न्यायशास्त्री Mark 'चिन्ह' असें म्हणतात!); '**दृष्टांतवर्जितं**' आत्म्यासारखी दुसरी वस्तुच नाहीं (ब्रह्मबिंदु ९) ह्मणून उपमान प्रमाण Analogy ही लागूं पडत नाहीं. '**यतो वाचो निवर्तन्ते**' (वाणी ही जेथून परत फिरते ह्मणजे जो शब्द प्रमाणांलाही [ Testimony ] अगोचर आहे.) ( तैति० २।४।१० ) सारांश सर्व प्रमाणांला अगोचर आत्मा आहे ह्मणून त्याला अप्रमेय म्हटलें. शिवाय

**' विज्ञातारमरे केन विजानीयात् '** ( सर्वच जो जाणणारा त्यालारे कोणत्या प्रमाणानें जाणावें ? ( बृहदा० ४।५।१५ ) म्हणूनही तो अप्रमेयच होय. सर्व दृश्य नाहींसें करून ज्ञानेंद्रियांस अंतर्मुख केलें असतां आत्मसाक्षात्कार होतो हें तज्ज्ञांस सांगावयांस नकोच.

ज्ञानाच्या सत्यत्वाविषयीं विचार करितां करितां **डेका** नामक तत्त्ववेत्त्यानें आपलें स्वतःचें अगर आत्म्याचें अस्तित्व स्थापित केलें तें I think therefore I am ( मी विचार करितों ह्मणूनच मी आहें ) ह्या महावाक्यावरून होय. हें महावाक्य आणि **' प्रमाणमप्रमाणं च प्रमाभासस्तथैव च । कुर्वन्त्येव प्रमां यत्र तदसंभावना कुतः** ( प्रमाण, अप्रमाण, प्रमाभास वगैरे जेथून ज्ञानाचा पुरवठा घेतात, त्याचे अस्तित्वाचा असंभव कसा उत्पन्न व्हावा ? ) हें मधुसूदनींतील महावाक्यही समानार्थक नाहीं असें कोण ह्मणेल ? तरी आमचा वेदान्त रानटी स्थितींतून उत्पन्न झाला असें म्हणणारे उपनिषद्विरोधी **गो** साहेब आहेतच !

**परमार्थप्रपाकार—' नित्यस्य '**= ' सर्वदैकस्वभावस्य ' ( सदा एकच स्वरूपामध्यें असणारा ह्मणून अविनाशी ) असा अर्थ करितात. घटामध्यें असणाऱ्या आकाशाचें ( Space ) जसे घट हीं शरीरें असतात तसेच आत्म्याचे हे सुखदुःखात्मक देह होत. घट फुटला तरी अवकाश नष्ट होत नाहीं, तसेंच देह नष्ट झाला तरी आत्म्याला विकार होत नाहीं. ॥ १८ ॥

शोकमोहादिसंसारकारणनिवृत्त्यर्थं गीताशास्त्रं न प्रवर्तकमित्येतस्यार्थस्य साक्षीभूते ऋचावानिनाय भगवान् । यत्तु मन्यसे युद्धे भीष्मादयो मया हन्यन्तेऽहमेव तेषां हन्तेत्येषा बुद्धिर्मृषैव ते, कथम्—

प्राण्याला शोक मोह उत्पन्न होतात व त्यांपासून संसारचक्रांत पडावें लागतें. या शोकमोहांचा नाश करणारें हें गीताशास्त्र आहे. ' असुक गोष्ट कर ' असें सांगून कर्माला प्रवृत्त करणारें हें शास्त्र नव्हे, हें समर्थन करण्यासाठीं भगवंतानीं कठोपनिषदांतील दोन ऋचा अवतीर्ण केल्या आहेत. भगवान ह्मणतातः—अरे भीष्मादिक माझ्या हातून मरणार, मी त्यास मारणारा, वगैरे जी बुद्धि तुला झाली आहे, ती खोटी आहे, हा तुझा निवळ भ्रम आहे. कसा म्हणशील तर सांगतों ऐकः—

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥**

**यः** ( जो कोणी ) **एनं** ( ह्या—आत्म्याला—) **हन्तारं** ( मारणारा आहे असें ) **वेत्ति** ( समजतो ) **च** ( आणि ) **यः** ( जो दुसरा कोणी ) **एनं** ( ह्या आत्म्याला ) **हतं** ( मेला आहे असें ) **मन्यते** ( समजतो ) **तौ** ( ते ) **उभौ** ( दोघेही ) **न विजानीतः** ( जाणत नाहींत. )--कारण--**अयं** ( हा आत्मा ) **न हन्ति** ( मारित नाहीं )--व--**न हन्यते** ( मारलाही जात नाहीं. )--सारांश आत्मा मारितो, किंवा आत्मा मरतो अगर जातो असें जे समजतात ते लोक अज्ञ आहेत. कारण आत्मा मारित नाहीं आणि मरतही नाहीं.—

य एनमिति । य एनं प्रकृतं देहिनं वेत्ति जानाति हन्तारं हननक्रियायाः कर्तारं, यश्चैनमन्ये[1] मन्यते हतं देहहननेन हतोऽहमिति हननक्रियायाः कर्मभूतं, तावुभौ न विजानीतो न ज्ञातवन्तावविवेकेनाऽऽत्मानमहंप्रत्ययविषयं,हन्ताऽहं हतोऽस्म्यहमिति देहहननेनाऽऽत्मानमहंप्रत्ययविषयं यौ विजानीतस्तावात्मस्वरूपानभिज्ञावित्यर्थः । यस्मान्नायमात्मा हन्ति न हननक्रियायाः कर्ता भवति, न हन्यते न च कर्म भवतीत्यर्थः, अविक्रियत्वात् ॥ १९ ॥

प्रस्तुतचा विचाराचा विषय-जो-देही ( आत्मा ) त्याला ‘ मारण्याच्या क्रियेचा तो आत्मा कर्ता आहे, ’ असें जो समजतो. ( गौतमादि तर्कशास्त्री व जैमिन्यादि कर्मयोगी आत्मा कर्ता आहे असें म्हणतात. ) तसेंच देह नष्ट झाला असतां ‘आत्माच मारण्याच्या क्रियेचें कर्म झाला,—आत्माच मेला.’ असें जो समजतो; ( चार्वाकादि शून्यवादी आणि प्राकृत लोक आत्माच मेला असें म्हणतात. ) या दोघांसही कांहीं कळत नाहीं. अविवेकानें, अजाणतेपणानें जे लोक आत्म्याला—मी हा प्रत्यय ज्या निर्विकार वस्तूला लागतो त्याला—‘ मी मारणारा ’ असें समजतात, किंवा देहनाश झाला असतां आत्म्याचेंच—मी प्रत्यय ज्याला आहे त्या नित्य वस्तूचाच—नाश झाला असें समजतात. ते उभयतांही अज्ञानी आहेत, आत्मस्वरूपाची व त्यांची ओळख झाली नाहीं असें ह्मणण्याचा भगवन्ताचा हेतु आहे. कारण हा आत्मा हनन क्रियेचा कर्ता होत नाहीं ( मारीत नाहीं ) किंवा त्या क्रियेचें कर्मही होत नाहीं

मारलाही जात नाहीं). आत्मा हा अविकारी आहे ह्मणून तो मारीत नाहीं व मरतही नाहीं—सारांश मारणें व मरणें ह्या दोन्ही क्रिया ( तात्पर्य कोणतीच क्रिया )—आत्म्याच्या हातून होत नाहीं तेव्हां ' मी मारीन;' ' ते मरतील ' याविषयीं शोकमोहाचें कारण ज्ञानी पुरुषाला उतरच नाहीं हें स्पष्ट झालें. आपल्या हातून पाम कर्म होत आहे अशी जी अर्जुनाला शंका आली होती ती अर्थातच निर्मूळ होती हेंही सिद्ध झालें. श्रीकृष्णांनीं नैय्यायिक, कर्मयोगी, शून्यवादी लोकांचेंही येथें खंडन केलें आहे. कै. प्रो. द्विवेदी यांनीं कठोपनिषद अ. १वल्ली २ श्लोक १९ चा उल्लेख केला आहे. ' **हन्ता चेन्मन्यते हन्तुं हतश्चेन्मन्यते हतम्। उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते** । वरील श्लोक व हा उपनिषदांतील श्लोक समानार्थकच आहेत.

**मधु०**—अतिशूर ( आपणच सर्व करितों असें मानणारे अभिमानी पुरुष ) आणि अतिकातर ( अत्यंत भित्रे पुरुष ) यासाठीं हा श्लोक योजिला आहे असेंही म्हणतां येईल असें सुचवितात.

**रामानुजाचार्य** वरीलप्रमाणें अर्थ करितात. मात्र ' **हन्तिधातुरप्यात्मकर्मशरीरवियोगकरणवाची** ' ( ' हन ' ह्या धातूचा अर्थ आत्मा आणि कर्मशरीर यांची ताटातूट करणारा आहे ) असें सांगून ' **न हिंस्याद्भूतानि** ' ( प्राण्यास ठार मारूं नये ) ' **ब्राह्मणो न हन्तव्यः** ( ब्राह्मणास मारूं नये ) इत्यादि शास्त्रे सुद्धां **अविहितशरीरावियोगकारणाविषयाणि** ' अयोग्य अशा शरीराचा वियोग करविण्याच्या हेतूनें सांगितलीं आहेत असें ह्मणतात.

**सत्यानंदस्वामी** ' हंन्तारं ' ( मारणारा ) यावर पुढील व्याख्यान करितात:—जो मनुष्य असें समजतो कीं जीव हा **स्वतंत्रपणानेंच** जीवाचा किंवा देहाचा नाश करणारा आहे, तो मूर्ख होय. कारण जीव हा परमेश्वराचें प्रतिबिंब आहे म्हणून प्रतिबिंबाच्या सर्व क्रिया बिंबाच्या ( परमेश्वराच्या ) स्वाधीन आहेत, ' केवळ परमेश्वर मात्र स्वतंत्र आहे, ' ह्या सिद्धांतांचें अज्ञान आणि जीवाला स्वातंत्र्य आहे ' हें मिथ्या ज्ञान हीं दोन्हीही जीवाला कर्मबंधरूपी संसारांत ढकलतात. सारांश स्वतः कांहीं करीत नसूनही ' आपणच सर्व करितों ' असें मानणारा जो जीव तोच संसारांत पडतो. ' कर्ता करविता परमेश्वर आहे ' या सत्य सिद्धांताचें अज्ञानच मनुष्यास संसारचक्रांत गुरफटून

टाकतें असें जीव आणि शीव निराळे मानणाऱ्या स्वामींचें ह्मणणें आहे. वेदांत्यांस जीव शीव भेद संमत नाहीं हें सांगावयास नकोच.

**शंकरानंद** अद्वैतमतानुयायी आहेत. ते '**न तदश्नाति किंचन, न तदश्नाति कश्चन**'—(बृहदा० ३।८।८) 'तो आत्मा कांहीं खात नाहीं, त्या आत्म्याला कोणी खात नाहीं' अशी श्रुति आचार्यांच्या समर्थनार्थ पुढें आणितात.

**वल्लभाचार्य** 'माझ्या इच्छेनेंच सर्व कांहीं होतें' असा या श्लोकाचा भावार्थ सांगतात. हे कट्टे भक्तिपंथानुयायी आहेत.

**ज्ञानेश्वरः**—तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी (दृष्टिसूनि ठेवूनि) 'शरीरातें । मी मारिता, हे मरते' । ह्मणत आहासि (आहेस) ॥ तरी अर्जुना ! तूं नेणसी ।....॥

**वामनपंडितः**—श्लोकाचा इतुकाच अर्थ । मतें दूषावी तीं किमर्थ । ऐसें बोलती त्यांतें समर्थ । श्रीहरीच उत्तर देतसे ॥ जे ह्मणती साधारण । आत्मा देह त्यास मरण । देहें देहास मारण । त्यांलाच वाटे ॥ मरणार ह्मणे जो स्वयें । मारणारही ह्मणे निश्चयें । दों गोष्टींस दोघे, अन्ययें (परमेश्वरें) । नेणते वर्णिलें कांहो ॥ आतां देहात्मवादी[1] । ज्यांस विश्वास नाहीं वेदीं । आत्मदेह त्या मंदी । 'मरे, मारी हीं,' ह्मणावा ॥ प्रमाण ज्या मतीं वेद । तथापि मानिती भेद । आत्मा अकर्ता ह्मणतां खेद । ते मानिती ॥....एवं आत्मा मारणार । सकळ भेदवादी[2] ह्मणणार । आणि आत्मा—देह मरणार । चार्वाक ह्मणती॥ भेदवादी पक्ष एक । आणि एक पक्ष चार्वाक । या दो गजभारावरी हांक । गीताश्लोकीं हरीची[3] ॥....हे तो जैमिनी गौतम । जरी ऋषी दोघे उत्तम । तिहीं असल्यास, अधम । भेद पक्ष धरिला ॥....भेदवादी यांचे बोल । एथें ऐसेच तितुके फोल । साधारणांसि हेच्चि खोल । वाटति, उथळ अत्यंत जे ॥ ....सारांश—यालागी हे वेडे चार । हा नव्हे शुद्ध आत्मविचार । अहंप्रत्यय असार । टाकितां, स्फुरे शुद्ध आत्मा ॥ पंडितांनीं या श्लोकांवर टीका कारि-

---

१ देह हाच आत्मा असें म्हणणारे.

२ आत्मा आणि परमात्मा निराळे आहेत, असें म्हणणारे.

३ सिंहरूपी श्रीकृष्णाची.

तांना, चार्वाक, बृहस्पति, जैमिनी, गौतम इत्यादि लोकांचे सयुक्तिक आणि सांगोपांग खंडन केलें आहे, तें अगत्य वाचण्याविषयीं मी वाचकांस शिफारस करितों. ॥ १९ ॥

कथमविक्रिय आत्मेति द्वितीयो मन्त्रः—

आत्मा विकारशून्य कसा आहे हें सांगण्यासाठीं हा दुसरा मंत्र भगवान म्हणतातः—

**न जायते म्रियते वा कदाचि-**
**न्नायं भूत्वाऽभविता न भूयः ॥**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥**

**अयं** (हा—आत्मा) **कदाचित्** (केव्हांही) **न जायते** (जन्म पावत नाहीं) **वा** (किंवा) **म्रियते** (मरतही नाहीं). **वा** (किंवा) **अयं** (हा—आत्मा—) **भूत्वा** (असणें या स्थितींत असून) **भूयः** (पुनः) **अभविता न** (नाहींसा होणार नाहीं.)—सारांश आत्म्यास कधींही जन्ममरण नाहीं, आणि नित्य असणारा जो आत्मा तो कधींही नाहींसा होत नाहीं, तो नित्यच आहे.—कारण **अयं** (हा आत्मा) **अजः** (न जन्मलेला), **नित्यः** (सनातन, असणारा) **शाश्वतः** (कोणत्याही प्रकारें कमी होण्याचा विकार न पावणारा) **पुराणः** (जुना, अनादि)—असा आहे. आत्मा हा अनादि, अनंत, अविकृत असा आहे. हा—**शरीरे हन्यमाने** (शरीराचा घात होत असतां) **न हन्यते** (मारला जात नाहीं) सारांश आत्म्याचें शरीर नाहींसें झालें ह्मणून हा नाहींसा होतो असें नाहीं.—सापानें आपली कांत टाकिली तरी त्याचा जसा नाश होत नाहीं, तद्वत्च आत्म्यानें आपलें शरीर टाकून दिलें तरी त्याचा नाश होत नाहीं.—

न जायते नोत्पद्यते, जनिलक्षणा वस्तुविक्रिया नाऽऽत्मनो-विद्यत इत्यर्थः । न म्रियते वा । वाशब्दश्चार्थे । न म्रियते चेत्यन्त्या विनाशलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते । कदाचिच्छब्दः सर्वविक्रिया-प्रतिषेधैः संबध्यते, न कदाचिज्जायते न कदाचिन्म्रियत इत्येवम् ।

यस्मादयमात्मा भूत्वा भवनक्रियामनुभूय पश्चादभविताऽभावं गन्ता न भूयः पुनस्तस्मान्न म्रियते । यो हि भूत्वा न भविता स म्रियत इत्युच्यते लोके वाशब्दान्नशब्दाच्चायमात्माऽभूत्वा भविता वा देहवन्न भूयः पुनस्तस्मान्न जायते । यो ह्यभूत्वा भविता स जायत इत्युच्यते, नैवमात्माऽतो न जायते । यस्मादेवं तस्मादजो यस्मान्न म्रियते तस्मान्नित्यश्च ।

जन्म पावत नाहीं, उत्पन्न होत नाहीं, ह्मणजे जन्म पावण्याचा जो दृश्य पदार्थाला विकार होत असतो तो आत्म्याला होत नाहीं असा अर्थ आहे. किंवा आत्मा मरतही नाहीं. येथें 'वा' (किंवा) याचा अर्थ 'आणि' असा करावा.—आत्म्याला जन्म नाहीं आणि मरणही नाहीं, असा अर्थ होय.— आणि मरत नाहीं ह्मणजे शेवटचा विनाश नामक विकार, तोही आत्म्याला नाहीं असें निश्चितपणानें--येथें सांगितलें आहे.--लोकांत--जो 'कदाचित्' (कधींही, केव्हांही) शब्द आहे त्याचा संबंध, सर्व विकारांचा प्रतिषेध, निषेध करण्याकडे घ्यावा, ह्मणजे कोणत्याही प्रकारचे विकार आत्म्याला केव्हांही होत नाहींत, असें समजावें. सारांश तो केव्हांही जन्म पावत नाहीं व केव्हांही मरत नाहीं असा अर्थ होय. पहा कीं, ज्याअर्थीं आत्म्याला नित्यच असणेंपणाची सत्ता असते ह्मणून नसणेंपणाची सत्ता त्यास कधींही प्राप्त होत नाहीं, ह्मणजे सद्वस्तु जो आत्मा तो केव्हांही ज्याअर्थीं नाहींसा होत नाहीं, त्याअर्थीं त्याला मरण नाहीं, असेंच आपल्यास ह्मटलें पाहिजे.--कारण तो एकदां उत्पन्न होऊन पुढें नाहींसा होतो. अदृश्य होतो, तो मरतो असें व्यवहारांत आपण बोलतों. ह्याचप्रमाणें श्लोकांत जे 'वा' (किंवा) व 'न' (नाहीं) अशा शब्दाची योजना केली आहे, यावरूनही असा उद्देश दिसतो कीं, देहाप्रमाणें, हा आत्मा प्रथम नसून पुढें जन्म पावतो असेंही नाहीं--असें भगवंतास सांगवयाचें आहे. ह्या सांगण्यावरून अर्थातच आत्म्याला जन्म प्राप्त होत नाहीं, तो कधीं जन्मतो असें नाहीं, हें स्पष्टच झालें. जो प्रथम नसून पुढें उत्पन्न होतो तो जन्मला असें लोक बोलतात.. अशा प्रकारचा आत्मा नाहीं म्हणून त्याला जन्मच नाहीं हें सिद्ध झालें. ज्याअर्थीं आत्म्याला जन्म नाहीं, त्याअर्थींच त्याला 'अज' असें वरील श्लोकांत ह्मटलें आहे. आणि तसेंच तो मरत नाहीं ह्मणून त्याला 'नित्य' असें ह्मटलें आहे.—सारांश

आत्म्याला जन्म नाहीं व मरण नाहीं म्हणून तो अनादि आणि अनंत आहे हें सिद्ध झालें.

यद्यप्याद्यन्तयोर्विक्रिययोः प्रतिषेधे सर्वा विक्रियाः प्रतिषिद्धा भवन्ति तथाऽपि मध्यभाविनीनां विक्रियाणां स्वशब्दैरेव तदर्थैः प्रतिषेधः कर्तव्य इत्यनुक्तानामपि यौवनादिसमस्तविक्रियाणां प्रतिषेधो यथा स्यादित्याह शाश्वत इत्यादिना। शाश्वत इत्यपक्षयलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते, शश्वद्भवः शाश्वतः। नापक्षीयते स्वरूपेण निरवयवत्वान्निर्गुणत्वाच्च नापि गुणक्षयेणपक्षयः। अपक्षयविपरीतावाऽपि वृद्धिलक्षणा विक्रिया प्रतिषिध्यते पुराण इति। यो ह्यवयवागमेनोपचीयते स वर्धतेऽभिनव इति चोच्यते। अयं त्वात्मा निरवयवत्वात्पुराऽपि नव एवेति पुराणो न वर्धत इत्यर्थः। तथा न हन्यते न विपरिणम्यते हन्यमाने विपरिणम्यमानेऽपि शरीरे। हन्तिरत्र विपरिणामार्थो द्रष्टव्योऽपुनरुक्ततायै, न विपरिणम्यत इत्यर्थः अस्मिन्मन्त्रे षड्भावाविकारा लौकिकवस्तुवीक्रिया आत्मनि प्रतिषिध्यन्ते। सर्वप्रकाराविक्रियारहित आत्मेति वाक्यार्थः। यस्मादेवं तस्मादुभौ तौ न विजानीत इति पूर्वेण मन्त्रेणास्य संबन्धः ॥ २० ॥

जरी पहिला (जन्माचा) व शेवटचा (मरणाचा) हे दोन्ही विकार आत्म्यास नाहीं असें सांगून कोणत्याही प्रकारचा विकार आत्म्यास होत नाहीं म्हणून सांगितलें, तथापि मध्यें होणाऱ्या म्हणजे जन्मापासून मरणापर्यंत सर्व विकारांचा निषेध प्रत्यक्ष शब्दांनीं व त्यांच्या अर्थांनीं केला नाहीं म्हणून ते विकार आत्म्यास होत असतील असें कोणी ह्मणेल त्याची शंका निवारण करावी एतदर्थ 'जन्ममरणादि' शब्दांमध्यें अंतर्भूत होणारे परंतु प्रत्यक्ष शब्दांनीं न सांगितलेले तारुण्यादि विकारांचा निषेध करण्यासाठीं भगवंतांनीं शाश्वत इत्यादि शब्द योजून आत्म्याच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे. 'शाश्वत' (कमी न होणारा) या शब्दानें क्षय नामक विकाराचा निषेध केला. जो नेहमींच रहाणार त्याला शाश्वत ह्मणावें. आत्मा स्वतःच निरावयव आहे, अनेक भाग एकत्र करून झालेला नाहीं. ह्मणून त्याच्या स्वरूपामध्यें फेरफार होत नाहीं, व तो स्वतः निर्गुण आहे, गुणशून्य आहे, म्हणून त्याचे गुणही कमी होत नाहींत. सारांश ज्याच्या स्वरूपांत फेरफार होत नाहीं व गुणांत

कमीजास्त होत नाहीं त्याला क्षयाचा विकार कसा होईल?—'पुराण' या शब्दानें क्षयाच्या उलट जो वृद्धि नामक विकार त्याचाही निषेध केला. कारण ज्याला नवे नवे अवयव (भाग) उत्पन्न होतात, तो नित्य नवा वाढतो असें आपण म्हणतों. पण ह्या आत्म्याला मुळींच अवयव नसल्यामुळें तो पूर्वींपासून नेहमीं नवाच आहे ह्मणजे पूर्वीं जसा होता तसाच आहे, तात्पर्य तो वाढत नाहीं. याप्रमाणें शरीराचा नाश होत असला तरी याचा नाश होत नाहीं व यामध्यें कोणताही नाश करणारा विकार उत्पन्न होत नाहीं. येथें 'हन्ति' (मरतो किंवा मारतो) याचा अर्थ विकार होतो असा घेतला म्हणजे पुनरुक्तीचा दोष येत नाहीं.—पुनः पुनः तेंच सांगणें याला पुनरुक्ति म्हणतात.—या मंत्रा[1]मध्यें दृश्यवस्तूचे ठायीं जे सहा[2] विकार उत्पन्न होतात ते आत्म्याला होत नाहींत असें सांगून आत्मा पूर्णत्वानें अविक्रिय आहे असें शब्दार्थानें ठरविलें. सारांश आत्मा अविकारी आहे म्हणून 'मी मारीन, मी मरेन' असें ह्मणणारे दोन्ही प्रकारचे जैमिनीप्रभृति, व गौतमप्रभृति कर्मयोगी व तार्किक (न्यायावर ग्रंथ लिहिणारे) हे उभयतांही अज्ञानी आहेत, असा पूर्वींच्या मंत्राशीं (१९ व्या श्लोकाशीं) संबंध लावावा. सारांश या मंत्ररूपी श्लोकद्वयांत आत्म्याला कोणताही विकार होत नाहीं म्हणून तो नित्य आणि शुद्ध आहे असें सांगून देहाभिमानी व कर्तृत्वाभिमानी लोकांचें खंडन केलें आहे.—

**रामानुजाचार्य**—'पुराण' शब्दाची व्युत्पत्ति देतातः—"पुरातन आहे तरी सदा नव्यासारखा आहे असा अनुभवानें दिसणारा तो 'पुराण' होय."

**सत्यानंदस्वामी**—बिंबप्रतिबिंब न्यायानें श्लोकाचा अर्थ करितात. त्यांच्या मतें 'पुराण' शब्दाची व्युत्पत्ति अशी आहेः 'पुराणि (देहान्) अणति प्राप्नोतीति पुराणः' ह्मणजे ज्याला अनेक देह मिळतात तो पुराण होय! तसेंच 'शाश्वत' शब्दावर त्यांची व्याख्या अशी आहेः 'शश्वदेक प्रकारः,

---

१ हा मंत्र काठकांतून घेतला आहे.

२ 'जायते' (उत्पन्न होतो) 'अस्ति' (असतो) 'वर्धते' (वाढतो) 'विपरिणमते' (विकार पावतो) 'अपक्षीयते' (कमी होतो) 'विनश्यति' नाश पावतो. हे सहा विकार आहेत.

न कदाऽपि जहात्यस्वातंत्र्यादिस्वस्वरूप ( एक प्रकारचा व आपलें अस्वातंत्र्य वगैरेचें स्वरूप कधींही न सोडणारा तो शाश्वत होय ) जीवेश्वरांचा भेद ते सांगतात:—

'**अल्पशक्तिरसार्वज्ञ्यं पारतन्त्र्यमपूर्णता । उपजीवकजीवत्वमीशत्वं तद्विपर्ययः**' ( जीव हा अल्प शक्तीचा, किंचिज्ज्ञ, परतंत्र, अपूर्ण आणि आपल्या धन्याच्या जीवावर अवलंबून राहणारा असा आहे. ईश्वराचे गुण या गुणांच्या उलट आहेत. ) डेकानामक एक फ्रेंच तत्त्ववेत्ता होऊन गेला, त्यानेंही जीवास वरीलच गुण आहेत, असें गृहीत धरिलें आहे. परमेश्वराचे गुण सांगतांना सर्वशक्तिमत्व, सर्वज्ञत्व, स्वतंत्रतत्व आणि पूर्णत्व हेच गुण डेकानें सांगितलें आहेत. वेदांत्यांच्या मतें जीवेश्वर भेद नाहीं. म्हणून वरील शश्वत् शब्दाचा अर्थ त्यास मान्य होणार नाहीं.

**शंकरानंद**—हे आचार्यांच्या अर्थाला पुष्टि आणण्यासाठीं '**अविनाशी वा अरेऽयमात्माऽनुच्छित्तिधर्मा**' ( बृहदारण्य० ४।५ १९ ) 'अरे हा आत्मा विनाशी नाहीं व विकारीही नाहीं.' अशा अर्थाची श्रुति देतात.

**वल्लभाचार्य** सांगतात कीं परमेश्वरानें स्वतःच्या क्रीडेसाठीं ही सृष्टि निर्माण केली आणि जो जो प्राणी ज्या ज्या भावनेसाठीं निर्माण केला तो तो प्राणी त्या त्याच भावनेनें वागला पाहिजे असें केलें. असें आचरण केलें तरच जन्माचें सार्थक्य होईल! असा अर्थ काढण्याला वल्लभाचार्यांस फारच प्रयास पडलें आहेत. 'पुराण' शब्दाचा अर्थ ते 'सदासर्वदा माझ्या सेवेसाठीं दासत्वानें राहणारा' असा करितात. यावरूनच या आचार्यांस शब्दांशीं कशा झोंब्या खेळाव्या लागत असतील त्यांची कल्पना होण्यासारखी आहे. 'न हन्यते' वगैरेवर व्याख्यान देतांना भगवंताच्या इच्छेनुरूप वागल्यावर अतिभ्रमाच्या योगानें केलेलीं कृत्यें सुद्धां दूषित होत नाहींत, 'कौरवांस मारिलें असतां पाप लागेल वगैरे कल्पना अज्ञानमूलक आहेत' अशीं विधानें या आचार्यांनीं केलीं आहेत. भगवंताच्या इच्छेप्रमाणें वागलें असतां पुण्य लागतें, त्याच्या इच्छेविरूद्ध वर्तन केल्यास पाप लागतें हे विचार ठीक आहेत. प्रश्न इतकाच आहे कीं भगवंताची इच्छा तरी पापपुण्याच्या तारतम्यानेंच नियमित होते कीं नाहीं? नीतिशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे सिज्विक साहेबांनीं एक प्रश्न विचा-

रला आहे, तो असाः—अमुक गोष्ट चांगली व दुसरी वाईट असें जें तारतम्य ईश्वर करितो तें केवळ त्याच्या इच्छेवरच अवलंबून आहे, किंवा चांगल्या वर्तनालाच ईश्वर 'चांगलें' असें ह्मणतो! म्हणजे 'खरें बोलणें चांगलें आहे.' 'कां ह्मणून!' 'कारण ईश्वराची तशी आज्ञा आहे ह्मणून.' ईश्वर तरी खऱ्या बोलण्यास चांगलें कां म्हणतो? तें स्वत चांगलें आहे ह्मणून, किंवा तें वाईट असूनही ईश्वराची इच्छा त्या वाईटालाच चांगलें म्हणावें अशी आहे ह्मणून?' 'अर्थातच खरें बोलणें चांगलें आहे म्हणून ईश्वराची तशी आज्ञा आहे.' सारांश ईश्वराच्या इच्छेनुसार चांगलें वाईट ठरत नाहीं, चांगलें वाईटाच्या स्वरूपावरून ईश्वर आज्ञा करितो. तेव्हां चांगलें म्हणजे काय हा प्रश्न राहिलाच. वल्लभाचार्य या प्रश्नावरून काय उत्तर देते परमेश्वर जाणे! अद्वैतमताच्या वेदांताशिवाय असल्या गूढ प्रश्नाला समाधानकारक उत्तर इतर मतांतून मिळणें प्रायः दुर्घटच होय!

**प्रपाकार**—ह्या श्लोकाच्या दृढीकरणार्थ कठोपनिषदांतील श्रुति सांगतात ती समाधानार्थकच आहे ह्मणून मी येथें घेतों. "**न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित्। अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे**" ही श्रुति समान अर्थाचीच केवळ आहे असें नाहीं; तर येथें बहुतेक सर्वत्र शब्दही समानच आहेत. मागील एकोणिसाव्या श्लोकाचे व कठोपनिषदांतील मंत्राचें शब्दार्थसाम्य पुष्कळच आहे. याचेंच दृढीकरण पहाः '**अशरीरं शरीरेषु अनवस्थेष्ववस्थितम्। महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥**' 'शरीरांमध्यें राहून शरीररहित, नाशवंतामध्यें राहून अविनाशी, मोठा आणि सर्वगामी असा आपला आत्मा आहे असें समजून बुद्धिमान लोक शोक करीत नाहींत.' कारण आपणच विश्व झाल्यावर शोकाचें कारण कोठें राहिलें?

**ज्ञानदेव**—शोकमोहाचें निराकरण करण्यासाठीं मारणें व मरणें यासंबंधानें ह्मणतातः—' अर्जुना! तैसी हे जाण माया। तूं भ्रमत अहासि (आहेस) वाया। शस्त्रें हाणीतलीया छाया। जैसी आंगीं न रूपे ॥ छायेवर घातलेले शस्त्राचे घाव आंगाला रुपत नाहींत हा दृष्टांत किती मनोहर आहे बरें?

**वामनपंडितांचा**ही एक दृष्टांतरूपी मासला पहाः—देह उत्पन्न होतसे। त्या देहीं आत्मा वसे। त्यासवे उपजला दिसे। परि न उपजे उपजोनि ॥ राजा

ह्मणती चालिला । तो तों सुखासनी बैसला । चालोनि नाहीं घडला । चालण्याचा प्रसंग ! ॥ मूळ श्लोकाचा अर्थ मनामध्यें पूर्णत्वानें उतरण्याला पंडितांचा दृष्टांत किती खासा आहे ! पंडितांनीं आपल्या टीकेंत आत्म्याचें अणुत्व प्रतिपादन करणारे मतवाल्यांचा उत्कृष्ट समाचार घेतला आहे, पण विस्तारभयास्तव त्याचें अवतरण करवत नाहीं. वाचकांनीं मात्र अवश्य ' यथार्थ दीपिका ' पहावी. ॥ २० ॥

' य एनं वेत्ति हन्तारम् ' इत्यनेन मन्त्रेण हननक्रियायाः कर्ता कर्म च भवतीति प्रतिज्ञाय ' न जायते ' इत्यनेनाविक्रियत्वे हेतमुक्त्वा प्रतिज्ञातार्थमुपसंहरतिः—

' जो या आत्म्याला मारणारा असें समजतो ( अ० २ श्लोक १९ )' या मंत्रानें आत्मा हा क्रियेचा कर्ता होत नाहीं व कर्म होत नाहीं.—सारांश आत्मा कशावरही विकार उत्पन्न करीत नाहीं व आत्म्यावरही कोणाचा विकार होत नाहीं, —अशी—या मंत्रामध्यें—प्रतिज्ञा करून न ' जायते ' (—हा —उत्पन्न होत नाहीं. ) या मंत्रानें आत्मा विकारशून्य कां व कसा आहे याचें कारण सांगितलें. आतां भगवान केलेल्या प्रतिज्ञेचा उपसंहार करितातः—

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ॥**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥२१॥**

**यः** ( जो—कोणी ) **एनं** ( ह्या—आत्म्याला ( **अविनाशिनं** ) नाश न पावणारा ) **नित्यं** ( सदैव असाणारा) **अजं** ( जन्म न पावणारा) **अव्ययं** (कोणत्याही प्रकारचे विकार न होणारा )—आहे असे—**वेद** ( जाणतो) —सारांश आत्मा हा नित्य अविनाशी, जन्ममरणातीत व अविकारी आहे, असें जो जाणतो—**स** ( तो —पुरुष ) **पार्थ** ( पृथाकुमारा ! अर्जुना ! ) **कथं** (कसा बरें ? ) **कं घातयति** (कोणाला मारवील ?) **कं हन्ति** ( कोणाला मारील ?) सारांश आत्म्यविषयीं वरील ज्ञान ज्यास झालें तो पुरुष कोणाला मारील किंवा कोणाला मारण्याच्या कामीं प्रवृत्त करील ?

वेदाविनाशिनमिति । वेद विजानात्यविनाशिनमत्यन्तभावविकार-रहितं नित्यं विपरिणामरहितं यो वेदेति संबन्धः । एनं पूर्वेण

मन्त्रेणोक्तलक्षणमजं जन्मरहितमव्ययमपक्षयरहितं कथं केन प्रकारेण स विद्वान्पुरुषोऽधिकृतो हन्ति हननक्रियां करोति । कथं वा घातयति हन्तारं प्रयोजयति । न कथंचित्कंचिद्धन्ति, न कथंचित्कंचिद्घातयतीत्युभयत्राऽऽक्षेप एवार्थः प्रश्नार्थासंभवात् । हेत्वर्थस्य तुल्यत्वाद्विदुषः सर्वकर्मप्रतिषेध एव प्रकरणार्थोऽभिप्रेतो भगवतः । हन्तेस्त्वाक्षेप उदाहरणार्थत्वेन । विदुषः कं कर्मासंभवे हेतुविशेषं पश्यन्कर्माण्याक्षिपति भगवान्कथं स पुरुष इति ।

आत्मा अविनाशी आहे म्हणजे शेवटील मरणाचा विकार त्याला होत नाहीं व तो नित्य आहे म्हणजे वाढणें वगैरे विकार त्याला होत नाहींत. त्या आत्म्याचें स्वरूप ज्याला समजलें तो कसा मारील व मारवील? असा संबंध आहे. सारांश पूर्वीच्या विसाव्या श्लोकांत सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असा आत्मा अज आहे (जन्मादिविकारशून्य आहे--जो नेहमींच अस्तित्वांत असतो म्हणून त्याला जन्मादिविकार होणें शक्यच नाहीं) व अव्यय आहे (म्हणजे ज्याच्या स्वरूपामध्यें बालाग्रही फरक पडून तो कमी होणारा नाहीं)--सारांश आत्मा हा जन्ममरणरहित आहे, असें ज्याला कळलें, तो जाणता किंवा मोक्षाला अधिकारी असणारा पुरुष मारण्याची क्रिया कशी बरें करील, किंवा मारण्याविषयीं दुसऱ्याला कसा प्रवृत्त करील? याचें उत्तर स्पष्टच आहे तो केव्हांही कोणालाही मारण्याविषयीं स्वतः प्रवृत्त होणार नाहीं, किंवा त्या कामीं दुसऱ्यालाही प्रवृत्त करणार नाहीं. येथील वाक्य प्रश्नासारखें दिसत आहे खरें, परंतु येथें 'नाहीं' असेंच उत्तर अपेक्षित आहे.--असा वाक्यरचनेचा प्रकार जेथें असतो, तेथें आक्षेपनामक रचनाप्रकार झाला आहे असें समजावें--नुसता प्रश्नच घेतला तर येथें पूर्वापर संबंध जुळत नाहीं. आतां ज्या अज, अविकृत वगैरे कारणासाठीं 'मारणें' व 'मारविणें' या कर्मांचा निषेध प्रत्यक्ष शब्दांनीं केला त्याच कारणासाठीं शाहण्या माणसानें सर्व कर्मांचा परित्याग करावा असा हा श्लोक सांगतांना भगवंताचा अभिप्राय असला पाहिजे. मारण्याची क्रिया फक्त उदाहरणासाठीं, विषयाचें दिग्दर्शन करण्यासाठीं, घेतलेली आहे.--या क्रियेच्या निषेधानें भगवंतांनीं सर्व क्रियांचा निषेध केला आहे, असें आचार्यांचें म्हणणें आहे.-- मुमुक्षूच्या हातून कर्म होणें कांहीं कोणत्यातरी विशेष कार-

णामुळें अत्यंत असंभवनीय असतें असें पाहून भगवंतांनीं अपेक्षित उत्तराचा प्रश्न विचारला आहे कीं 'तो पुरुष कसा मारील?' वगैरे.

ननूक्त एवाऽऽत्मनोऽविक्रियत्वं सर्वकर्मासंभवकारणविशेषः, सत्यमुक्तो न तु सकारणविशेषोऽन्यत्वाद्विदुषोऽविक्रियादात्मन इति । न ह्यविक्रियं स्थाणुं विदितवतः कर्म न संभवतीति चेत्, न । विदुष आत्मत्वात् । न देहादिसंघातस्य विद्वत्ता । अतः परिशेष्याद्संहत आत्मा विद्वानविक्रिय इति तस्य विदुषःकर्मासंभवादाक्षेपो युक्तः कथं स पुरुष इति । यथा बुद्ध्याद्याहृतस्य शब्दाद्यर्थस्याविक्रिय एव सन्बुद्धिवृत्त्याविवेकविज्ञानेनाविद्ययोपालब्धाऽऽत्मा कल्प्यते, एवमेवाऽऽत्मानात्मविवेकज्ञानेन बुद्धिवृत्त्या विद्ययाऽसत्यरूपयैव परमार्थतोऽविक्रिय एवाऽऽत्मा विद्वानुच्यते । विदुषः कर्मासंभववचनाद्यानि कर्माणि शास्त्रेण विधीयन्ते तान्यविदुषो विहितानाति भगवतो निश्चयोऽवगम्यते ।

**पूर्वपक्षी**—'अहो ! आत्मा अविक्रिय आहे, आत्म्याला कोणताही विकार होत नाहीं हें विशेष कारण आतांच सांगितलेंत ना ?'

**सिद्धान्ती**—होय सांगितलें खरें. पण तें विशेष कारण नव्हे. उघडच आहे, कीं विद्वान पुरुष आणि अविक्रिय आत्मा हे जोंपर्यंत निरनिराळे आहेत असें मानिलें जातें, तोंपर्यंत हें विशेष कारण आहे असें कसें म्हणतां येईल ?

**पूर्व०**—कां नाहीं म्हणतां येणार ? आत्मा अविकारी आहे व अचल आहे असें ज्यांस एकदां समजलें त्याच्या हातून क्रिया होण्याचा संभवच नाहीं. म्हणून शाहण्याच्या हातून कर्म न होण्याचें हें विशेष कारणच होय.

**सिद्धान्ती**—तसें नव्हे. आत्मा अविकारी आहे एवढेंच समजलें म्हणजे कर्माचा असंभव होतो, असें नाहीं; तर आपलें मूळ ज्ञानस्वरूपच आहे असें त्यास समजलें, म्हणजे कर्मसंभव असत नाहीं, त्याच्या हातून कर्म होत नाहीं.—'एकच आहे' असें ज्ञानस्वरूप झालें म्हणजे कर्ता कसला, कर्म कसलें आणि क्रिया कसली ? हें ज्ञानस्वरूप कोणाचें ? असें विचाराल तर सांगतों. जड देहाला ज्ञान नसतें, आत्म्याशीं देहाचा संबंध झाला असें दिसलें तरी देह जड ह्मणून बाकी राहिलेला जो आत्मा तोच ज्ञानस्वरूप आहे

हें उघड झालें. आत्मा कर्ता करविता नाहीं ह्मणून ज्ञानस्वरूपालाही कर्तृत्व, कर्मत्व, व क्रियात्व येत नाहीं. यावरून शहाण्या अगर ज्ञानी मनुष्याला कर्म कसें करितां येणार नाहीं हें ठरलें नाहीं काय ? ठरलें. तेव्हां कर्म करितां येणार नाहीं, असा भगवंतांनीं साक्षेप प्रश्न विचारणें रास्तच होतें.

**पूर्व०**—बरें पण ज्ञानी पुरुषांस 'ज्ञान असणें' अगर 'ज्ञान उत्पन्न होणें' हा तरी विकारच आहे कीं नाहीं ?

**सिद्धां०**—अहो; हा निव्वळ भ्रम अगर अविद्या आहे. स्वभावतः आत्मा अविक्रियच आहे. परंतु अविद्येनें त्यास आपण 'ज्ञान झालें' असें म्हणतों. पहा; त्याला शब्द, स्पर्श इत्यादि विषयांचें जें त्याच्या बुद्धीनें त्याला ज्ञान झालेंसें दिसतें, तें ज्ञान नव्हे, तर, शब्दादि जे जे विषय असतात, तसलेंच स्वरूप बुद्धीला प्राप्त होतें म्हणजे स्वतः बुद्धीच शब्दस्वरूपी होते. पण आपण मात्र आत्मा ज्ञानवंत झाला असें म्हणतो. बुद्धि शब्दादि विषयरूप झाली असतां ती ज्ञानवंत झाली—नव्हे आत्माच ज्ञानवंत झाला असें आपण जसें अज्ञानानें म्हणतों, त्याचप्रमाणें बुद्धीमध्येंच राहणारें जें आत्मानात्मविवेकज्ञान ( आत्मा कोणता व आत्मा कोणता नव्हे यांचे तारतम्य ज्ञान ) तें प्राप्त झालें ह्मणजे अविक्रिय आत्माच विद्वान झाला असें आपण ह्मणतों. हें ज्ञान सुद्धां असत् वस्तूचेंच असतें, तथापि आत्मानात्मविवेक झाला ह्मणजे आपण आत्माच विद्वान झाला असें ह्मणतों. आत्मा स्वतःच ज्ञानस्वरूपी आहे. शिवाय वेदांत्याच्या मतें दुसरी वस्तूच नाहीं. तेव्हां आत्म्यास इतर वस्तूचें ज्ञान झालें असें ह्मणणेंच संभवत नाहीं. तथापि बुद्धीला आत्मा ह्मणजे काय हें समजलें ह्मणजे त्याच्या बुद्धीला हें ज्ञान झालें त्याला अथवा ज्याचें अज्ञान नष्ट झालें त्यालाच विद्वान ह्मणण्याचा प्रघात पडला आहे.—याप्रमाणें स्वतःच ज्ञानरूपी जो आत्मा त्याला कर्म करणें संभवत नाहीं ह्मणून भगवंतांनीं असा सिद्धांत काढिला कीं शास्त्रानें जीं जीं कर्में करावयास सांगितलीं आहेत, तीं विद्वान पुरुषांस सांगितलीं नाहींत; तर जे अविद्वान् आहेत, ज्याच्या बुद्धीला आत्मानात्मविवेक प्राप्त झाला नाहीं त्याच्यासाठीं तीं कर्में सांगितलीं आहेत.

—थोडक्यांत तात्पर्य असें आहे, आत्मा अविक्रिय आहे, म्हणून त्याकडून कर्म संभवत नाहीं ज्ञानस्वरूप हेंही आत्माच आहे; तेव्हां ज्ञान्यालाही

कर्म करणें शक्य नाहीं. तर कर्म कोणीं करावें, असा प्रश्न येतो. याला उत्तर येवढेंच कीं ज्याच्या बुद्धीला आत्मानात्मविवेक होऊन प्रत्यक्ष ब्रह्मसाक्षात्कार घडला नाहीं, त्यानें कर्म करावें. सारांश आत्मा करीत नाहीं आणि करवित नाहीं, आपणच आत्मा आहोंत असें ज्ञान ज्याच्या बुद्धीला झालें त्याचें बहुतेक कर्म सुटलें. पण ' ब्रह्मच आहे ' असा ज्याला साक्षात्कार झाला त्याचें सर्वच कर्म सुटलें व तो मुक्तही झाला.

ननु विद्याऽप्यविदुष एव विधीयते विदितविद्यस्य पिष्टपेषणवद्विद्या विधानानर्थक्यात् । तत्राविदुषः कर्माणि विधीयन्ते न विदुष इति विशेषो नोपपद्यते । न, अनुष्ठेयस्य भावाभावविशेषोपपत्तेः । अग्निहोत्रादिविध्यर्थज्ञानोत्तरकालमग्निहोत्रादिकर्मानेकसाधनोपसंहारपूर्वकमनुष्ठेयं कर्ताऽहं मम कर्तव्यमित्येवंप्रकारविज्ञानवतोऽविदुषोयथाऽनुष्ठेयं भवति न तु तथा न जायत इत्याद्यात्मस्वरूपविध्यर्थज्ञानोत्तरकालभावि किंचिदनुष्ठेयं भवति । किंतु नाहं कर्ता न भोक्तेत्याद्यात्मैकत्वाकर्तृत्वादिविषयज्ञानादन्यन्नोत्पद्यत इत्येष विशेष उपपद्यते । यः पुनः कर्ताऽहमिती वेत्त्यात्मानं तस्य ममेदं कर्तव्यमित्यवश्यंभाविनी बुद्धिः स्यात्तदपेक्षया सोऽधिक्रियत इति तं प्राति कर्माणि । स चाविद्वान—'उभौ तौ न विजानीतः' इति वचनात् । विशेषितस्य च विदुषः कर्माक्षेपवचनात्कथं स पुरुष इति । तस्माद्विशेषितस्याविक्रीयात्मदर्शिनोविदुषो मुमुक्षोश्च सर्वकर्मसंन्यास एवाधिकारः अतएव भगवान्नारायणः सांख्यान्विदुषोऽविदुषश्च कार्मिणः प्रविभज्य द्वे निष्ठे ग्राहयति—' ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् ' इति । तथा पुत्रायाऽऽह भगवान्व्यासः-' द्वाविमावथ पन्थानौ ' इत्यादि ।

**पूर्व**——कायहो ! विद्वानासाठीं विद्या आणि अविद्वानासाठीं कर्म असा तुम्हीं प्रपंच केला तो युक्तीला जुळत नाहीं. कारण जो अविद्वान् आहे त्यालाच विद्या शिकविली पाहिजे. विद्वानांस नको; आणि याप्रमाणेंच शास्त्राचीही आज्ञा असली पाहिजे. तुम्ही तर विद्वानाला विद्या सांगतां, म्हणजे दळलेलेंच पीठ पुनः दळण्याची क्रिया करण्यास सांगण्यासारखें अप्रबुद्ध भाषण करितां. सारांश अविद्वान लोकांसाठींच कर्में सांगितलीं आहेत, असा जो भेद तुम्ही येथें काढिला आहे तो सयुक्तिक नाहीं.

**सिद्धां०**—तुह्मांस माझा अभिप्राय समजला नाहीं. भेद कसा आहे तो तुह्मांस सांगतों. जें काय कर्म करावयाचें आहे तें कर्तव्य अगर अनुष्ठेय होय. हें कर्तव्य कांहीं लोकांस आहे आणि कांहींस नाहीं असा येथें भेद आहे. ह्या कर्मकांडामध्यें जे विधि सांगितले आहेत त्यांतच अग्निहोत्रादि नित्यकर्में सांगितलीं आहेत. त्यांचें ज्ञान आपल्यास झालें ह्मणजे त्या त्या नित्य अगर नैमित्तिक कर्मास लागणारीं सर्व याज्ञिक सामग्री जुळवून अग्निहोत्रादि कर्म करणें अवश्य असतें तें. ' मी कर्ता आहें, ' ' मला हें केलेंच पाहिजे ' अशा प्रकारचा अनुभव असणारा, अशा प्रकारचें ज्ञान असणारा जो अविद्वान् पुरुष त्याला जशीं हीं कर्में करावींच लागतात त्याप्रमाणें विद्वानाला हीं कर्में करण्याची आवश्यकताच रहात नाहीं. कारण ' आत्म्याला जन्म नाहीं, मरण नाहीं ' अशा तात्पर्याचें आत्मस्वरूपज्ञान झालें, अथवा आत्मस्वरूपाची ओळख पटली, ह्मणजे त्या विद्वान पुरुषाला कांहीं कर्तव्य उरत नाहीं. वेदांतील महावाक्यांनीं जें ज्ञान होतें तें हें कीं, ' मी कर्ता नाहीं. ' ' मी भोक्ता नाहीं. ' वगैरे आत्मा व ब्रह्म यांचें ऐक्यपर, आत्म्याला कर्तव्य नाहीं अशा प्रकारचें, आणि ' मी आत्म्याहून-परब्रह्माहून भिन्न नाहीं ' असें ज्ञान उत्पन्न होतें. सारांश ' मला कर्तव्य आहे कारण मी कर्ता आहे, ' आणि ' मला कर्तव्य नाहीं, कारण मी कर्ता नाहीं, ' असा अविद्वान आणि विद्वान् यांच्यामध्यें भेद आहे. म्हणजे **मीं कर्ता** आहे, असें आपलें स्वरूप आहे अशी जो भावना धरितो, त्याला ' **हें माझें कर्तव्य आहे** ' अशी बुद्धि आवश्यक रीतीनें उत्पन्न होते ह्मणून त्याला कर्म करण्याचा अधिकारही पोहोंचतो आणि कर्मही त्यासाठीं सांगितलें आहे. ( ' त्यालाच कर्म संभवतें ' असें पाठांतर आहे. ) या पुरुषालाच अविद्वान असें भगवंतांनीं ' त्या उभयतांसही कांहीं समजत नाहीं ' ( अध्याय २ श्लोक २० ) या मंत्रवाक्यानें ह्मटलें आहे. ह्मणून ' आत्मा अविक्रिय आहे ' असें समजणाऱ्या ज्ञानविशिष्ट विद्वानांस व मुमुक्षुलोकांस मात्र कर्मसंन्यास करण्याचा अधिकार आहे. कर्मत्याग असल्या ज्ञानी पुरुषांनींच केला पाहिजे. म्हणूनच सर्वज्ञ भगवान नारायणांनींच विद्वान सांख्य (ज्ञान मार्गी ) आणि अविद्वान कर्ममार्गी यांचा भेद करून दोन प्रकारच्या बुद्धि सांगितल्या आहेत. ' ज्ञानमार्गानें सांख्याचें व कर्ममार्गानें योग्याचें ' इत्यादि

अध्याय १ श्लोक ३ पहा. भगवान व्यासही आपल्या शुक नामक पुत्राला सांगतांना ह्मणतात 'यानंतर हे दोन मार्ग आहेत' वगैरे.

सारांश कर्तृत्वबुद्धि ज्याला आहे तो कर्मयोगाला अधिकारी होतो व अकर्तृत्वबुद्धि ज्याला आहे तो कर्मत्यागाला अधिकारी होतो.

तथा च क्रियापथश्चैव पुरस्तात्पश्चात्संन्यासश्चेति । एतमेव विभागं पुनर्दर्शयिष्यति भगवान् । अतत्त्वविदहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते, तत्त्ववित्तु, नाहं करोमिति । तथा च सर्वकर्माणि मनसा संन्यस्याऽऽस्त इत्यादि ।

याप्रमाणें प्रथम कर्ममार्ग आणि नंतर कर्म संन्यास मार्ग ( ज्ञान मार्ग ) असे दोन विभाग झाले भगवंतांनीं येथें केलेले हे दोन विभाग पुनः तेच एकदां प्रगट करतील. 'ज्याला तत्त्वज्ञान झालें नाहीं व ज्याला अहंकाराच्या योगानें मोह प्राप्त झाला आहे, तो 'आत्मा कर्ता' असें ह्मणतो पण तत्त्वज्ञानी ह्मणतो कीं 'मी कांहीं करीत नाहीं.' ( अ० ३ श्लोक २७।२८ ) याचप्रमाणें आपल्या मनानें तत्त्वज्ञानी सर्व कर्मांचा संन्यास करून स्वस्थ असतो. ( अ० ५ श्लोक १३. ) वगैरे ठिकाणीं हेंच तत्त्व प्रकट झालें आहे.

तत्र केचित्पण्डितंमन्या वदन्ति जन्मादिषड्भावविक्रियारहितोऽविक्रियोऽकर्तैकोऽहमात्मेति न कस्य चिज्ज्ञानमुत्पद्यते यस्मिन्सति सर्वकर्मसंन्यास उपदिश्यते । न, 'न जायते' इत्यादि शास्त्रोपदेशानर्थक्यात् । यथा च शास्त्रोपदेशसामर्थ्याद्धर्मास्तित्वविज्ञानं कर्तुश्च देहान्तरसंबन्धिज्ञानं चोत्पद्यते, तथा शास्त्रात्तस्यैवाऽऽत्मनोऽविक्रियत्वाकर्तृकत्वैकत्वादिविज्ञानं कस्मान्नोत्पद्यत इति प्रष्टव्यास्ते करणागोचरत्वादिति चेन्न, मनसैवानुद्रष्टव्यमिति श्रुतः । शास्त्राचार्योपदेशशमदमादिसंस्कृतं मन आत्मदर्शने करणम् । तथा च तदधिगमायानुमान आगमे च सति ज्ञानं नोत्पद्यत इति साहसमेतत् । ज्ञानं चोत्पद्यमानं तद्विपरीतमज्ञानमवश्यं बाधत इत्यभ्युपगन्तव्यम् । तच्चाज्ञानं दर्शितं हन्ताऽहं हतोऽस्मीत्युभौ तौ न विजानीत इति । अत्र चाऽऽत्मनो हननक्रियायाः कर्तृत्वं कर्मत्वं हेतुकर्तृत्वं चाज्ञानकृतं दर्शितम् ।

आतां कांहीं पंडित म्हणवून घेणारे अभिमानी गृहस्थ प्रतिपादन करितातः— "जन्मादि सहा विकार ज्याला नाहींत, जो अविक्रिय आहे जो अकर्ता असतो, व जो एक आहे अशा स्वरूपाचा आत्मा मीच आहें, असें ज्ञान उत्पन्न झालें ह्मणजे विद्वान पुरुषानें कर्मत्याग करणें योग्य आहे; पण असें ज्ञान उत्पन्न होणेंच अत्यंत असंभवनीय आहे; कारण आत्मा अविक्रिय आहे असें ज्ञान उत्पन्न होणें ह्मणजे आत्मा विकारी आहे असें ठरविण्यासारखें आहे.—आत्मा अविकारी आहे असें ज्ञान तरी आत्म्यासच होणार ह्मणजे तो तेवढ्याज्ञानानें व ज्ञानसाधनाच्या उपाधीनें विकृत होणार, ह्मणून आत्मा अविकारी आहे असें ज्ञान होणेंही शक्य नाहीं आणि ह्मणून कर्मसंन्यासाचा उपदेश करणें हेंही असमंजसच होय असें पूर्वपक्षियाचें ह्मणणें आहे.—

**सिद्धां०**—हें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तें बरोबर धरिलें तर 'आत्मा उत्पन्न होत नाहीं.' ( अ० २ श्लोक २० ) वगैरे शास्त्रशुद्ध उपदेशाला बाध येईल, व त्या उपदेशांत अर्थ नाहीं, तो व्यर्थ आहे, असें म्हणण्याचा प्रसंग प्राप्त होईल. तसेंच शास्त्राच्या उपदेशानें जर धर्म कोणता, अधर्म कोणता याचें व धर्माच्या अस्तित्वाचें स्वानुभवपूर्वक ज्ञान आत्म्याला ( जीवाला ) होतें, त्याचप्रमाणें कर्म करणाऱ्या पुरुषाला अन्यलोकीं सुखदुःख कसें मिळेल व पुढें कसला देह प्राप्त होईल याचेंही जर ज्ञान आत्म्याला ( जीवाला ) होतें तर त्याच आत्म्याला शास्त्राच्या योगानें आपल्या स्वतःचें अकर्तृत्व, अविकारित्व वगैरे सानुभव ज्ञान कां होऊं नये याचें कारण सांगा बरें ?

**पूर्व०**—कारण इतकेंच, आत्म्याजवळ ज्ञानेंद्रियाचें साधन नाहीं. आत्मा हा इंद्रियांना गोचर नाहीं असें सिद्ध झालें आहे.

**सिद्धां०**—तसें नाहीं. 'मनानें मात्र त्याला ( आत्म्याला सद्वस्तूला )पहावा' अशी श्रुतीच आहे. तें मन मात्र शास्त्राच्या आभ्यासानें आचार्याच्या उपदेशानें आणि शमदम वगैरे उपसाधनांच्या द्वारानें संस्कृत ( संस्कारशुद्ध ) झालें असलें पाहिजे. असें मन असेल तर तें आत्मस्वरूपाची ओळख करून घेण्याला उपयोगीं पडतें. त्याचप्रमाणें आत्मज्ञान होण्याला अनुमानप्रमाण व श्रुतिप्रमाण हींही साधनें आहेतच. इतकी सामग्री असूनही आत्मज्ञान होत नाहीं

असें म्हणणें साहसाचें ( अविचाराचें ) आहे—नव्हे बरें ? जसजसें ज्ञान उत्पन्न होत जातें, तसतसें त्याहून विपरीत जें अज्ञान तें नाहींसें होतें हें तुम्हांसही कबूल आहेच. हें अज्ञान कोणतें तें तुम्हांस दाखविलेंच. 'मी मारणारा, मी मरणारा' वगैरे हें अज्ञान होय. अशा उभय प्रकारानें बोलणाऱ्या लोकांसच भगवंतांनीं अज्ञानी असें म्हटलें आहे. सारांश आत्मा कर्ता आहे, कर्म आहे किंवा क्रिया आहे म्हणजे आत्मा कारितो अगर करवितो असें म्हणणें अविद्येच्या योगानें होत असतें. सारांश आत्म्याला विकार होऊन ज्ञान उत्पन्न होत नाहीं, तर त्याच्याजवळ जो अज्ञानाचा पडदा असतो तो नाहींसा होऊन आत्म्याला स्वस्वरूपाची ओळख अज्ञानशून्य ह्मणजे आत्मस्वरूपीं तन्मय असणाऱ्या बुद्धीच्या योगानें होतें.—

तच्च सर्वक्रियास्वपि समानं कर्तृत्वादेरविद्याकृतत्वमविक्रियत्वादात्मनः। विक्रियावान्हि कर्ताऽऽत्मनः कर्मभूतमन्यं प्रयोजयति कुर्विति। तदेतदविशेषेण विदुषः सर्वक्रियासु कर्तृत्वं हेतुकर्तृत्वं च प्रतिषेधति भगवान्विदुषः कर्माधिकाराभावप्रदर्शनार्थं 'वेदाविनाशिनं-कथं स पुरुषः' इत्यादिना। क्व पुनर्विदुषोऽधिकार इत्येतदुक्तं पूर्वमेव 'ज्ञानयोगेन सांख्यानाम्' इति। तथा च सर्वकर्मसन्यासं वक्ष्यति 'सर्वकर्माणि मनसा' इत्यादिना।

ज्याप्रमाणें 'मारणें' 'मरणें' 'मारविणें' या क्रियांचा निषेध केला त्याचाप्रमाणें कर्तृत्वादि सर्व क्रिया ( कर्में ) अविद्याकृत ( अज्ञानानें, मायेनें उत्पन्न झालेलीं ) आहेत असें सांगावयाचें आहे. कारण आत्मा हा अविक्रिय आहे.—आत्म्यास ज्ञान होतें असें जें आपण ह्मणतों तें तसें न ह्मणतां जीवाचें अज्ञान नाहींसें होतें असें ह्मटलें ह्मणजे आत्म्याचें अविकारित्व स्पष्ट होईल.—जो कार्य करणारा व विकार पावणारा कर्ता असतो, तो कर्म करण्याची योग्यता असणाऱ्या दुसऱ्याला 'हें कर' असें ह्मणून कर्म करावयास लावतो. ह्मणून स्वस्वरूपाचें ज्ञान झालें आहे अशा पुरुषानें कोणतीही क्रिया करूं नये, अगर करवूं नये असा उपदेश ( क्रिया करण्याचा निषेध ) भगवान दुसऱ्या अध्यायाच्या एकविसाव्या श्लोकांत करितात. कोणतेंही कर्म करण्यास विद्वान पुरुष योग्य नाहीं असा एकूणएक सर्व कर्मांचा निषेध भगवंतांनीं केला आहे.

पूर्व०—मग ज्ञानी पुरुषानें करावयाचें तरी काय ?

**सिद्धां०**—त्यांनीं काय करावें हें पूर्वींच सांगितलें आहे. 'ज्ञानयोगानें सांख्यांनीं आत्मसाधन करावें (अ० ३ श्लो० ३)' या श्लोकांतच भगवंतांनीं ज्ञानी पुरुषाची व्यवस्था सांगितली आहे. तसेंच 'मनानें सर्व कर्मांचा त्याग करावा' असें (अ० ५ श्लो० १३) यामध्येंही स्पष्ट सांगतील.

ननु मनसेति वचनान्न वाचिकानां कायिकानां च संन्यास इति चेन्न । सर्वकर्माणीति विशेषित्वात । मानसानामेव सर्वकर्मणामिति चेन्न, मनोव्यापारपूर्वकत्वाद्वाक्कायव्यापाराणां मनोव्यापाराभावे तदनुपपत्तेः शास्त्रीयाणां वाक्कायकर्मणां कारणानि मानसानि वर्जयित्वाऽऽन्यानि सर्वकर्माणि मनसा संन्यसेदिति चेन्न । नैव कुर्वन्न कारयन्निति विशेषणा । सर्वकर्मसंन्यासोऽयं भगवतोक्तो मरिष्यतो न जीवित इति चेन्न, नव द्वारे पुरे देह्यास्त इति विशेषणानुपपत्तेः । न हि सर्वकर्मसंन्यासेन मृतस्य तद्देह आसनं संभवात ।

**पूर्व०**—अहो! मानसिक कर्मांचा मनानें त्याग करावा, कायिक (देह चीं) व वाचिक (वाणींचीं) कर्मे टाकण्याचें कारण नाहीं, असाच तुमच्या ह्मणण्याचा व भगवंताचा अभिप्राय नव्हे काय!

**सिद्धां०**—नव्हे. सर्व कर्मांचा त्याग म्हटलें आहे यावरून कायिक, वाचिक व मानसिक सर्व कर्मांचा त्याग करावा असाच अर्थ होतो.

**पूर्व०**—सव कर्मांचा हें बरोबर. पण हीं सर्व मानसिक कर्मे बरें!

**सिद्धांती**—अहो हें काय? वाणीचे व शरीराचे व्यापार प्रथमतः काय करावयाचे याचें चिंतन झाल्याखेरीज म्हणजे मनोव्यापार झाल्याखेरीज होतच नाहींत. मनोव्यापार चालणार नाहीं तर कोणताही व्यापार चालणे अगर कर्म होणें अशक्यच आहेना?

**पूर्व०**—बरें असो; शास्त्रानें सांगितलेलीं, शास्त्रास विहित, अशीं जीं कायिक व वाचिक कर्मे मानसिक कारणांपासून उत्पन्न होतात, तीं शिवाय करून बाकींची सर्व कर्मे टाकून द्यावीं असाच भगवंताचा अभिप्राय असला पाहिजे. शास्त्रविहित म्हणून कर्मांशिवाय बाकीच्याचा त्याग करावा असेंच कीं नाहीं?

**सिद्धां०**—नाहीं तसेंही नाहीं. 'कारण कांहीं एक न करितां' 'कांहीं-एक न करवितां' असे तेथें विशेष शब्द स्पष्ट आहेत. (अ. ५ श्लो. १३)

**पूर्व०**—ह्मणजे तात्पर्य असेंच ना कीं भगवंतानीं हा जो सर्व कर्मसंन्यास

सांगितला आहे तो मृत्यूच्या तोंडाशीं उभे राहिलेल्या मनुष्यास सांगितला आहे ? इतरांच्या ( जिवंत मनुष्याच्या ) हातून हा संन्यास होणें शक्यच नाहीं.

**सिद्धां०**—अरे असा शब्दछल कां ? असा तुझ्या ह्मणण्यप्रमाणें अर्थ केला तर ' हा देही ( जीवात्मा ) नऊ आहेत दरवाजे ज्याला अशा देहनगरीमध्यें सुखानें राहतो ' या शब्दांची वाट कशी लावावयाची ? ही सर्व विशेषणें मग निरर्थक होतीलना ?---निरर्थक शब्द वाक्यांत घालीत नाहीं.---शिवाय सर्व कर्मांचा संन्यास करून देहामध्यें सुखानें राहणें---मरणाऱ्या किंवा मृत मनुष्याला संभवत नाहीं. मेल्यावर कर्मसंन्यास करणें अगर देहामध्यें राहणें या दोन्ही गोष्टी असंभवनीय आहेत. मेल्यावर प्राणी देहामध्यें राहतो असा अनुभव तरी आहे काय ?

> अकुर्वतोऽकारयतश्च देहे सन्यस्योति संबन्धो न देह आस्त इति चेन्न, सर्वत्राऽऽत्मनोऽविक्रियत्वावधारणात् आसनक्रियायाश्चाधिकरणापेक्षत्वात्तदनपेक्षत्वाच्च संन्यासस्य । संपूर्वस्तु न्यासशब्दस्त्यागार्थो न निक्षेपार्थः । तस्माद्गीताशास्त्र आत्मज्ञानवतः संन्यास एवाधिकारो न कर्मणीति तत्र तत्रोपरिष्टादात्मज्ञानप्रकरणे दर्शयिष्यामः ॥ २१ ॥

**पूर्व०**—अहो ! आमचें ह्मणणें असें आहे कीं ' न करणारा व न करविणारा ' असा जो विद्वान् तो देहाच्या स्वाधीन सर्व कर्मे करून आपण सुखानें राहतो, असा अन्वयार्थ करावा, देहामध्यें सुखानें राहतो, असा अन्वय करूं नये व अर्थहि करूं नये म्हणजे झालें. मग तर आत्म्याला सर्व कर्मांचा त्याग करावा लागत नाहीं ?

**सिद्धां०**—असें कसें होईल ? स्वाधीन करणें हें सुद्धां कर्मच आहे. आणि सर्वत्र ( श्रुतिस्मृतिमध्यें ) आत्मा अविकारी आहे, असा सिद्धांत आहे. तुम्ही ह्मणतां त्या वाक्यांतही असेंच ह्मटलें आहेना ? शिवाय न्या (ठेव) ठेवावयाची त्याला ठेवावयास अधिकरणाची अपेक्षा असते. ह्मणजे ठेव ठेवावयाची असेल तर ती ठेवण्याला जागा पाहिजे. पण आह्मी ह्मणतो तो कर्मसंन्यास करण्याला जाग्याचीही अपेक्षा लागत नाहीं. आणखी तुमचा अर्थही पण चुकला आहे. न्यास शब्दाला ' सं ' हा उपसर्ग लाविला ह्मणजे टाकणें असा अर्थ होतो, ठेवणें असा अर्थच होत नाहीं, सारांश या गीताशास्त्रामध्यें असाच सिद्धांत

सांगितला आहे कीं आत्मस्वरूपाचें ज्ञान झालेल्या विद्वानास कर्मसंन्यासच योग्य आहे, कर्म करणें योग्य नाहीं. असाच अर्थ आहे हें आम्ही पुनः जेव्हां जेव्हां आत्मज्ञानप्रकरण पुढें येईल तेव्हांही सिद्ध करून दाखवूं.—याप्रमाणें आचार्यांनीं असें सिद्ध केलें आहे कीं जो विद्वान पुरुष आहे त्याला कोणत्याही प्रकारचें कार्य करावें लागत नाहीं किंवा तो करतो अगर करवितो असें कांहींच नाहीं. प्रथमतः आत्म्यालाच स्वस्वरूपाचें ज्ञान होतें व अविद्यारूप जगाचा भासही नाहींसा होतो असें सांगून नंतर हें स्वस्वरूपाचें ज्ञान कसें प्राप्त होतें, 'आत्मा एकच आहे, निष्कामी आहे, अविनाशी आहे, ज्ञानस्वरूप आहे अशी श्रुती, स्मृति, युक्ति आणि अनुभव या सर्वांची एकवाक्यता कशी होते याचेंही थोडक्यांत दिग्दर्शन करून कर्मसंन्यास म्हणजे काय याचें उत्कृष्ट स्पष्टीकरण केलें आहे. आत्मा आहे अशी खातरी होऊन स्वस्वरूपाची ओळख झाली म्हणजे कोण-तेंही कर्तव्य उरत नाहीं असा वेदांतमताचा सिद्धांत आहे. 'मीच ब्रह्म आहें आणि ब्रह्म हें सत् चित् आनंद स्वरूपानें ओतप्रोत भरलेलें असून तेंच सर्वत्र आहे, तें अनादि आहे, अनंत आहे, पूर्ण आहे, दुसरें कांहीं नाहीं,' असा ज्याचा एकदां कायमचा निश्चय झाला, त्याला कांहींच कर्तव्य उरत नाहीं हें सांगावयास नकोच. तेव्हां या सदैव विकार पावणाऱ्या दृश्य विश्वांत एकच वस्तु निर्विकार आणि निरामय अशी आहे, अशी संसाराची वीट येऊन विरक्त झालेल्या मनुष्याला विचार करितां करितां ओळख पटली ह्मणजे तो वेदांतमार्गाचें म्हणजे अद्वैतासिद्धांताचें अनुसरण करितो. श्रवण, मनन, निदि-ध्यास इत्यादिकांच्या साहाय्यानें व श्रुति, युक्ति आणि अनुभव यांच्या संगतीनें स्वस्वरूप कळलें, ओळख पटली, निश्चय झाला म्हणजे तो मुक्तच होतो. मुक्त झालेल्या जीवाला कोणतेंही कर्तव्य रहात नाहीं हें स्पष्टच आहे. बुद्धीच्या व अहंकाराच्या पलीकडे आत्मा आहे व त्याची ओळख झाली असतां 'सर्वच' एकमय होऊन जातें असा ज्यांचा निश्चय झाला नाहीं त्यांस ही वेदांतपद्धति शब्दद्वारा अगर युक्तिद्वारा चांगलीशी समजून देतां घेतां येत नाहीं; असें असल्यामुळें वेदांती मनुष्य नास्तिक, दुर्वृत्त व अनाचारी असतो व असेल आणि असणारच असा आपला समज करून घेऊन व मला कांहीं कर्तव्य नाहीं, मला नीति, अनीति, कांहीं नाहीं, असें वेदांत्यानें म्हटल्याबरोबर हा आळशी आहे, दुष्ट आहे, धर्मद्रोही आहे व ही वेदांताची पद्धति रानटी व

वितंडवादाची आहे असें ठरवून टाकून तो मोकळा होतो व या पद्धतीचा नादच सोडून देतो. ख्राइस्टची भक्ति करून ईश्वरावर पूर्ण भरंवसा ठेवणारे व तत्त्वज्ञानाचा शोध हिंदुपद्धतीनें करणारे कोल्ब्रुक, जेकब, गो वगैरे लोकांस वेदांतासिद्धांतांचा पत्ता लागला नाहीं असें जेकब गो वगैरेंच्या लेखांवरून स्पष्ट दिसतें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. परंतु पूर्ववयामध्यें षड्दर्शनांचें उत्कृष्ट अध्ययन करून ज्यांनीं खिस्तिधर्माचें खंडन करण्यासाठीं ख्राइस्टप्रणीत धर्माचें अध्ययन सुरू केलें व शेवटीं भक्तिविकारवश होऊन जे ख्राइस्टचे दास बनले अशा महाविद्वान गोरेशास्त्रयांची बुद्धि सुद्धां वेदांतविषयासंबधानें चकली व भ्रमण करूं लागली हें मोठेंच आश्चर्य आहे, असें मला मोठ्या कष्टानें म्हणावें लागत आहे. ह्या शास्त्रीबोवांचें व युरोपियन शास्त्रवेत्त्यांचें पूर्ण ह्मणणें ऐकून घेऊन त्यांचें पूर्ण खंडन करण्याचें हें स्थळ नव्हे; तथापि या महान आक्षेपकांनीं व सामान्य समजुतीच्या लोकांनीं विचार करावा एतदर्थ एकच प्रश्न त्यांच्यापुढें ठेवितों, तो हाः आपल्यास इंद्रियद्वारां व बुद्धिद्वारां जें ज्ञान होतें तें पूर्ण असतें कीं काय ! प्राचीन अगर अर्वाचीन असें कोणतेंही शास्त्र अगर कपिल महामुनीपासून तों आधुनिक स्पेन्सर साहेब महा तत्त्ववेत्ते यांच्यापर्यंत कोणताही शास्त्रकार घेतला असतां सरशेवटीं तो ' हें मला समजत नाहीं ' असेंच म्हणतांना आढळतो कीं नाहीं ! ( ईश्वर ब्रह्म ) दृश्य विश्वें आणि मनुष्य, यांचा परस्पर संबंध काय आहे, निरुपाधिक परमेश्वरानें हें सोपाधिक जग कसें व कां निर्माण केलें, मनुष्याचें शेवटचें कर्तव्य काय, वगैरे प्रश्नांवर सोपपत्तिक आणि समाधानकारक अशीं उत्तरें आजपर्यंत मिळालीं आहेत काय ? व पुढें मनुष्याचें बुद्धिसामर्थ्यच जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत तरी निश्चयाचीं उत्तरें मिळण्याचा संभव आहे काय ? येथें जर ' नाहीं ' असेंच उत्तर येतें व स्पेन्सर साहेबांच्या मताप्रमाणें ' जसजसें बुद्धिद्वारां ज्ञान वाढत जातें, तसतसें त्या ज्ञानाच्या अनेकपट अज्ञानाचा प्रांत बुद्धीसच दिसूं लागतो : ' ह्याच अनुभव बुद्धीला केव्हांही जर येणार तर असल्या सर्व दृश्य विश्वसंबंधीं प्रश्नाला वेदांत्यांनीं मायेचें स्वरूप दिलें तर त्यांत कांहीं त्यांची चूक आहे काय ? कायम नसतांना कायम आहे असें भासविणारी व अघटितघटनेनें मनुष्यास मोहाधिकारामध्यें पाडणारी ती माया होय. अशा माया

स्वरूपानें दृश्य विश्व समजूनही घेतलें व या दृश्यविश्वाच्या ज्ञानानें मानवी सुखाची व मानवी ज्ञानाची कितीही मोठी वृद्धि झाली तथापि 'मला हें सर्व कळावें' अशी जी मनुष्याची वृकोदरी जिज्ञासावृत्ति असते, तिचें समाधान होण्याला फक्त एकच मार्ग आहे आणि तो हा कीं, ज्याच्या सत्तेनें नेत्रादि ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें आपआपलीं कर्मे करितात, परंतु जो नेत्रादिकांस गोचर होत नाहीं, ज्याच्या सत्तेनें मन, बुद्धि, आदि अंतरिंद्रियें दृश्यसृष्टि कांहींशीं समजून घेतात परंतु जो बुद्धीलाही गोचर नाहीं, असा आपल्या सन्निकट सदैव असणारा जो नित्य आत्मा त्याची ओळख सांगितलेल्या मार्गानें करून घ्यावयाची आणि पूर्ण निश्चय करून घेऊन सर्वत्र ब्रह्मच आहे असा कायमचा सिद्धांत करावयाचा. हा एकच मार्ग आहे. ज्ञानाच्या शोधामध्यें आपलीं आयुष्यें खर्च केलीं असे प्लेटो, प्लेटोनियस, कांट, हार्टमन, शोपेनहार वगैरे युरपियन तत्त्ववेत्ते याच मार्गास आले, आले आहेत, येत आहेत आणि येतील. जागृत अवस्थेमध्यें इंद्रियें, मन, बुद्धि अहंकार इत्यादिकांचे दृश्य जगाविषयींचे सर्व व्यापार बंद करून शून्यावस्था करण्याचा प्रयत्न केला असतां व गुरुमुखानें महावाक्याचा खरा अर्थ समजून घेतला असतां मुमुक्षूस साक्षात्कार होतो असा तज्ज्ञांचा अनुभव आहे. असो; हें स्वस्वरूपाचें ज्ञान झालें ह्मणजे विश्वाचें नित्य स्वरूप समजतें. आतां हें स्वरूप समजल्याबरोबर दृश्य विश्वाचा (मायेचा) उलगडा होतो हें एक पक्षानें खरें आहे. ह्मणजे दृश्य विश्व हें अनित्य आहे, येथें होणारीं सुखदुःखें व येथें होणारें ज्ञान हीं सर्व विकारास कालास व स्थलास वश आहेत, ह्मणून आत्मस्वरूपाचें नित्य ज्ञान झालेल्या वेदांत्यास दृश्यजग, सुखदुःखें व विषयज्ञान हीं बहुमोल वाटत नाहींत इतकाच कायतो खरा भाग मायेच्या स्वरूपांत आहे. पण दुसऱ्या पक्षीं या ज्ञानानें व्यवहारांत कर्तव्यपूर्णता होत नाहीं. दिसतें आहे ही सर्व माया आहे, असें वेदांत्यांनीं अथवा त्यांच्या अनुयायांनीं कितीही कंठशोष करून सांगितलें तरी बुद्धीच्या नैसर्गिकप्रभावानें या मायेचा शोध लागणार नाहीं असें समजलें तरी मनुष्यप्राणी तिचा शोध करीत रहणारच; व कर्तव्याची सीमा वाढवून जगांतील सुख जास्त होईल व दुःख कमी होईल असा प्रयत्न करीत बसणार यांत तिळमात्र संदेह नाहीं, मात्र हें सुख कायमचें नाहीं, हें ज्ञान पूर्ण नाहीं व दृश्य विश्वाचें ज्ञान व उपभोग येवढाच पुरुषार्थ नाहीं असें त्यानें एकदां वेदांतमार्गानें सम-

जून घेतलें पाहिजे. अशी वृत्ति झाली ह्मणजे तो मनुष्य प्रपंचांत निर्लोभमनानें राहून परमार्थ साधतो अथवा जीवन्मुक्त होतो. सारांश दृश्यजगांत व्यवहार आणि व्यावहारिक कर्तव्यें ज्ञानपूर्वक करावयाचीं आणि ब्रह्मदृष्टीनें आत्मस्वरूपाचें चिंतन करीत बसावयाचें हे दोन भिन्न भासणारे पंथ एक होतील तर द्वैत, अद्वैत, ख्रिस्ती, हिंदु यांच्यामधील धार्मिककलहास शून्यत्व येऊन 'धर्म, अर्थ, काम, मोक्ष' हे चारही पुरुषार्थ ज्ञानी, व विचारी कर्तव्योन्मुख मनुष्यास साध्य होतील यांत शंका नाहीं. यावरून वेदांतमार्ग भक्तीच्या अगर कर्तव्यकर्माच्या आड येत नाहीं इतकेंच नव्हे, पण उलट तो त्या पंथास पोषकच होतो, व सर्वकालीन व सर्वदेशीय धर्मांचा अंतर्भाव करण्यासारख्या अति विस्तृत पायावर याची इमारत रचलेला असा आहे असें स्पष्ट होतें, येवढें सांगून ह्या मनोरम विषयांतरास रजा देतों ॥ २१ ॥

**मधुसूदनीकार**–'अव्यय' शब्दाची फोड करून सांगतातः 'ज्याच्या अवयवामध्यें अगर गुणामध्यें कधींही कमीपणा येत नाहीं त्यास अव्यय म्हणावें' विद्वान् शब्दाचा अर्थ पहाः 'मी विकारशून्य आहें, सर्वांवर प्रकाश पाडणारा आहें, माझ्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं, अत्यंत आनंदाचा अनुभव मला जाग्रदवस्थेमध्यें आहे' असें जो जाणतो तो विद्वान होय. ह्या श्लोकाच्या समर्थनार्थ ते एक आधारश्लोक देतातः '**आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः । किमिच्छन्कस्यकामाय शरीरमनुसंज्वरेत् ।** (मी तोच पुरुष आहे असें जर कोणाला आत्मज्ञान झालें तर कोणती इच्छा धारण करून तो शरीर आपल्यास असावें अशाबद्दल स्वतःला संताप करून घेईल?) (बृहदारण्यक ४।४।१२.) हा श्लोक तेराव्या अध्यायाचें बीज आहे असें मधुसूदनीकार ह्मणतात.

**रामानुज**–' आत्मस्वरूपाचें खरें स्वरूप न समजल्यामुळें मी यांस मारितों असा शोक होतो.

**सत्यानंद**–' अविनाशी ह्मणजे ज्याला नैमित्तिक नाश नाहीं (दुसऱ्यामुळें नाश होत नाहीं) तो. हे स्वामी हा श्लोक विष्णुपर लावतात. **वल्लभ** म्हणतात कीं विशेष विकार होत नाहींत ते अविनाशी !

**शंकरानंद**–' नित्य ' याचा अर्थ एकरस असा करितात. एकच जेथें सर्वत्र भरलें आहे तें एकरस होय. अंतर्बाह्य ज्याचें स्वरूप एकच आहे असा

जो मिठाचा खडा तो एकरसत्वाची थोडीशी साक्ष देतो. 'पुरुष' ह्मणजे 'सर्व मीच आहे, सर्वत्र आत्मा आहे' असें जाणणारा विद्वान होय. प्रपाकार नित्य ह्मणजे वृद्धिशून्य, असा अर्थ करून **"शुद्धो निरंजनोऽनन्तो बोधोऽहं प्रकृतेः परः। चेष्टमानामिदं देहं पश्याम्यन्यशरीरवत्"** (मी शुद्ध आहें, दोषरहित आहें, अनंत आहें; ज्ञानस्वरूपी आहें, प्रकृतीहून निराळा व श्रेष्ठ आहे; आणि हा हालचाल करणारा, माझाच देह पाहून मला वाटतें कीं, माझा व या देहाचा कांहीं संबंध नसून तो दुसऱ्याचाच देह असावा!"

**ज्ञानेश्वरांनीं** एक दोन दृष्टांत फार सुरेख दिले आहेत, ते येथें घेतों:—
'का पूर्ण कुंभ उलंडला (कलंडला, पालथा झाला)। तेथें बिंबाकार (प्रतिबिंबित सूर्य) दिसे भ्रंशला (नष्ट झाला)। परि भानु नाहीं नासला तयासवें॥ ना तरी मठीं (घरीं) आकाश जैसें। मठाकृती (घराच्या आकाराचें) अवतरलें असे। तो (मठ) भंगलिया आपैसें (आपल्या आपण) स्वरूपाचि (घर मोडलें तरी आकाशास भंग होत नाहीं)॥ तैसें शरीराच्या लोपीं। सर्वथा नाहीं नाश स्वरूपीं (आत्म्याला)। म्हणवूनि तूं हे नारोपी। भ्रांति बापा॥

**वामन पंडितांची** एकच ओंवी घेतों. 'ऐशा आत्मयातें जाणे। त्यास अकर्तृत्वही बाणे। तुज ऐसे **लौकिकी शहाणे**। ते हें कैसे जाणती?॥२१॥

---

वरील श्लोकाचा अर्थ समर्थन करणारीं वाक्यें पहा:—

'म्हणून सामान्य किंवा जातिमूलक जे पदार्थ आहेत, ते नुसते द्रव्यरूपींच आहेत असेंच नव्हे, तर शारिरीक व्यक्तीपेक्षां या द्रव्यांमध्यें पदार्थत्व जास्त प्रमाणानें असतें. ते जास्त प्राचीन असतात आणि व्यक्तीस उत्पन्न करून त्यांचें नियमन करणारेही पदार्थ हेच असतात. उदाहरणार्थ गोत्व (गाईपणा) अगर मनुष्यत्व [माणुसपणा] ह्या जाती अनुक्रमें गाई मनुष्यें यापेक्षां प्राचीनतर असून त्यांच्याच योगानें ह्यांची उत्पत्ति व नियमन हीं होतात...ह्याप्रमाणें विचार करीत गेलें असतां ईश्वर [—परब्रह्म—] हा केवळ सद्वस्तु सर्वगामी असून उपाधि विरहित असते. ईश्वरासंबंधें आपल्यास फक्त 'नेति, नेति' [तो असा नाहीं, असा नाहीं.] इतकें कायतें म्हणतां येतें.—सारांश ती वस्तु अनिर्वचनीय आहे.—ही सद्वस्तु अज असून—सर्व दृश्य विश्व—हिच्यापासूनच निर्माण होतें असें ठरतें. सारांश सर्व दृश्यजात हें परमेश्वराच्या विभूतींनीं निर्माण झालें आहे म्हणून तें ईश्वरमयच आहे....ईश्वरच हें सर्व नटून राहिला आहे. ईश्वर आणि जगत् हीं एकच आहेत........'

(पहा वुइंडेलब्यांड कृत युरपियन तत्वज्ञानाचा इतिहास पृष्ठ २९०.)

ब्रह्माविषयीं स्पेन्सर साहेब, आधुनिक तत्ववेत्यांचे मुकुटमणी यांनीं दृश्य विश्वाचा उल केल्यानंतर ते म्हणतात:—

प्रकृतं तु वक्ष्यामः, तत्राऽऽत्मनोऽविनाशित्वं प्रतिज्ञातं तत्किमिव त्युचते—

—पाठीमागील श्लोकाचें स्पष्टीकरण करितांना केलेल्या वादाची समाप्ति करून आचार्य म्हणतात.—असो; भगवान सांगतातः—आतां प्रस्तुतच्या विषयाकडे आपण जाऊं या. मागें आत्मा अविनाशी आहे, असें सांगितलें आहे, अशी प्रतिज्ञा केली आहे, तें अविनाशीत्व कशाप्रमाणें आहे असें अर्जुना ! तूं विचारशील म्हणून सांगतों.

**वासांसि जीर्णानि यथा विहाय**
**नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा-**
**न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥**

**यथा** ( ज्याप्रमाणें ) **जीर्णानि** ( जीर्ण झालेलीं, जुनीं ) **वासांसि** (वस्त्रें) **विहाय** ( टाकून देऊन ) **नरः** ( मनुष्य ) **अपराणि** ( दुसरीं ) **नवानि** ( नवीं ) **गृह्णाति** ( घेतो, ) **तथा** ( त्याचप्रमाणें ) **जीर्णानि** ( जुनीं झालेलीं वृद्ध झालेलीं ) **शरीराणि** ( शरीरें ) **विहाय** ( टाकून देऊन ) **अन्यानि** ( दुसरीं ) **नवानि** ( नवीं ) **संयाति** ( प्राप्त करून घेतो. ) तात्पर्य असें आहे

---

...अंतःस्थ आणि बाह्य दृश्य जातीच्या पलीकडे एक अचिंत्य शक्ति आहे असें स्पष्ट होतें. ह्या अविज्ञेय शक्तीच्या स्वरूपाचें आकलन होणें जरी मानवी सामर्थ्याच्या बाहेर आहे, त्या शक्तीच्या स्वरूपाच्या शतांशाची सुद्धां कल्पना करितां येणें जरी अशक्य आहे, तथापि त्या अचित्य आणि अविज्ञेय शक्तीचें अस्तित्व कायमचें आणि निर्विवाद आहे असें वरील विवेचनावरून सिद्ध झालें आहे; सारांश केवल सद्वस्तूशिवाय दृश्य वस्तू प्रकट होणें अशक्यच आहे. प्रत्येक मनोवृत्ति आणि विचार हे अनित्य आहेत, त्या विकारांनीं व विचारांनीं आपलें जें आयुष्य घटतें तेंही अनित्य आहे आणि शेवटीं ज्या दृश्यविषयामध्यें म्हणजे जगामध्यें आपल्यास आपलें आयुष्य कंठावयाचें असतें तें जग अथवा ब्रह्मांडही अनित्यच असून सावकाशपणानें आपल्या व्यष्टिपणांतून ( भेदरूपानें निराळें असण्याच्या स्थितींतून ) समष्टीकडे ( सर्वच एक होण्याकडे ) जात आहे; या सर्व गोष्टींवरून आपल्यास स्पष्ट समजून येतें कीं अव्यक्त, अचिंत्य, अविकार्य अशी एक सद्वस्तु आहे ती नित्य आहे आणि विकार पावणाऱ्या सर्व दृश्यजातीच्या स्वरूपामध्येंच ती गूढरूपानेंच स्थित झालेली आहे.)

( स्पेन्सरकृत मानसशास्त्र तत्त्वें भाग २ पृ. ५०२ पहा. )

कीं, जीर्ण झालेलीं वस्त्रें ज्याप्रमाणें टाकून देऊन आपण नवीं वस्त्रें धारण करितों, त्याप्रमाणेंच निरुपयोगी झालेले देहांचा त्याग करून प्राणी नवीन शरीरांचा स्वीकार करितो. शब्दांच्याच अर्थाप्रमाणें पाहिल्यास नव्या देहांत जातो असें भाषांतर करणें इष्ट आहे.

वासांसीति । वासांसि वस्त्राणि जीर्णानि दुर्बलतां गतानि यथा लोके विहाय परित्यज्य नवान्यभिनवानि गृह्णात्युपादत्ते नरः पुरुषोऽपराण्यन्यानि, तथा तद्वदेव शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति संगच्छति नवानि देह्यात्मा पुरुषवददविक्रिय एवेत्यर्थः ॥ २२ ॥

व्यवहारामध्यें मनुष्यें ज्याप्रमाणें दुर्बळ झालेलीं; फाटावयास लागलेलीं वस्त्रें फेंकून देऊन नवीं कोरीं अशीं दुसरीं वस्त्रें धारण करितात, त्याचप्रमाणें जीर्ण झालेल्या शरीरांचा त्याग करून आत्मा जो आहे तो नवीन देहाप्रत पावतो; नवीन देहाची संगति त्याला मिळते. तात्पर्य जुनीं टाकून नवीं वस्त्रें घेतांना पुरुष पूर्वीप्रमाणेंच कायम राहतो, त्यामध्यें कोणताही विकार होत नाहीं, त्याचप्रमाणें देहांतर झालें म्हणून आत्म्यासही कसलाच विकार होत नाहीं.— तो मागें सांगितलेल्या पुरुषाप्रमाणें शुद्ध व निर्विकारच राहतो. भगवंताचा अभिप्राय असें सांगण्याचा आहे. देहाचा नाश झाला तरी शोक करण्याचें कारण नाहीं. कारण देहनाश झाला ह्मणून आत्म्याचा नाश होत नाहीं. आतां पुण्यकर्म करण्याचें स्थान जे भीष्मादिकांचे देह त्याचा नाश करणें योग्य नाहीं अशी अर्जुन शंका घेईल, म्हणून भगवान दृष्टांताच्या साहाय्यानें अर्जुनाचें समाधान करितात कीं जीर्ण देह नष्ट होऊन देहांतर झालें म्हणूनही आत्म्यास विकृति होत नाहीं. **ज्ञानेश्वरांचें** मत असेंच आहे.

**मधु०**—' आत्मा अविनाशी असेल, पण शरीर तर विनाशी आहे, आणि भीष्मादिकांचे देह पवित्र आहेत. युद्ध केलें असतां या पवित्र देहांचा नाश केलासें होईल व ह्मणून पाप व शोक हीं होतीलच. असा अर्जुनाकडून पूर्वपक्ष करवून उत्तर देतातः—' अर्जुना ! पाप न करितां तूं पुण्यच्च करशील. कारण भीष्मादिकांचीं शरीरें आतांच वृद्धत्वानें विगलित झालीं आहेत. युद्धामध्यें तूं यांस मारलेंस म्हणजे यांस अन्य देह प्राप्त होतील. आणि हे सत्कर्मी आहेत ह्मणून यांस आतांच्या देहापेक्षां अधिक चांगले देह प्राप्त होतील. सारांश तूं

भीष्मादिकांवर व दुर्योधनादिकांवर सुद्धां उपकारच करशील.' 'अन्यानि नवानि या शब्दांचा अर्थ--असाच आहे हें सिद्ध करण्यासाठीं--'**नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते, पित्र्यं, गांधर्वं, दैवं, प्राजापत्यं वा ब्राह्मं**' बृहदा० ४।४।४ श्रुति देतात. अर्थ स्पष्टच आहे कीं नवें कल्याणकारक व कल्याणमूलक रूप प्राप्त होतें तें पितरांचें, गंधर्वांचें, देवांचें, प्रजापतींचें अथवा ब्रह्माचें स्वरूप प्राप्त होतें. मग यांत वाईट तें काय ? हा गूढार्थ काढून ह्मणतात 'कीं असा बोध केल्यावांचून केवळ आत्मा अविनाशी आहे' इतकेंच आचार्यांप्रमाणें सांगणें म्हणजे नुसता वरवरचा अर्थ करणें आहे. भगवंताच्या मनांत वर सांगितलेला गूढार्थच असला पाहिजे.

**रामानुजाचार्यांचा** अभिप्राय वरीलप्रमाणेंच पडला आहे. 'धर्मयुद्धामध्यें व धारातीर्थी मृत्यु आला असतां उत्तम शरीर प्राप्त होतें' अशा अर्थाचे शास्त्राधार देऊन या आचार्यांनीं वरील गोष्ट सांगितली आहे .शंकराचार्यांस हे अर्थ अप्रस्तुतच वाटतील. कारण शरीर चागलें मिळेल कीं वाईट मिळेल हा प्रश्न नाहीं; आत्मा अविक्रिय राहतो कीं नाहीं हा वादविषय आहे. पूर्वापार संबंधही आत्म्याच्या अविनाशित्वाबद्दलच आहे. तेव्हां कर्माकर्माप्रमाणें आत्म्यास कोणत्याही शरीरांत प्रवेश करावा लागला तरी तो अविक्रियच राहतो हा मुख्यार्थ भगवंतास सिद्ध करावयाचा आहे व तो जीर्ण वस्त्राचा त्याग करणाऱ्या पुरुषाच्या दृष्टांतानें उत्तम रीतीनें सिद्ध झाला आहे असें मला वाटतें. **शंकरानंदाचाही** हाच अभिप्राय आहे.

**श्रीधरस्वामी** व **प्रपाकार** म्हणतात कीं 'कर्मामध्येंच गुंतून राहिलेल्या जीवांस पुनः जन्म असतो ह्मणून जीर्ण देहाचा कर्म करण्यास अशक्त झालेल्या देहाचा नाश झाला असतां शोक करणें योग्य नाहीं; किंवा पाप लागेल असें समजणेंही योग्य नाहीं.

**वल्लभाचार्य** 'जीर्ण' या शब्दाची 'माझ्या क्रीडेस अयोग्य, निरुपयोगी झालेलीं—शरीरें' अशी व्याख्या देतात.

**वामन**—देहास अवांतर व्यय। क्षीण रोड होतां निश्चय। अविनाशी होउनि अव्यय। हा आत्मा ॥....थोडिया वयाचा देह। तोही जीर्ण निःसंदेह लोक मूढ धरिती स्नेह। तत्व न कळे ॥ कणसाची नव्हाळी। परि मूषक

लागली मुळीं । दाणा न येतां ते काळीं । वाळूनि जाय ॥ ज्यास आला काळ । तो देह होय फटकाळ ( निरुपयोगी ) । ज्यास डवसला महाव्याळ । तोंची जीर्ण ॥ हा उपदेश आमचे संसारी गृहस्थ काळजीपूर्वक वाचतील काय ?

पूर्वजन्माची वाटाघाट—

कर्म करून फलाची अकांक्षा धरणाऱ्या प्राण्यास पुनः जन्म येतो असें हिंदुधर्माचे प्रमाणभूत असणारे ग्रंथांत ह्मणजे श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणें वगैरे ग्रंथांत अनंत वेळां प्रतिपादन केलेलें आढळतें. फलेच्छाविरहित कर्म केलें असतां व स्वस्वरूपाची ओळख झाली असतां मुक्ति मिळते, आणि सकाम कर्म केलें तर जन्ममरणाच्या फेऱ्यांत प्राणी सांपडतो व कर्मनाश होईपर्यंत तो तसाच संसारसागरांत हेलकावे खात राहतो, असें हिंदुधर्माचें सांगणें आहे. ग्रीसमध्यें पायथॅगोरस व प्लेटोनामक महातत्त्ववेत्ते होऊन गेले त्यांचेंही मत असेंच होतें. समजत नाहींत अशा कारणांनीं प्रथमतः मनुष्य जन्मास येतो आणि येथील कर्माकर्माप्रमाणें त्याला पुढें सुखदुःख मिळतें असें ख्रिस्ती लोकांचा पैगंबर ख्राइस्ट व मुसलमान लोकांचा पैगंबर महमद यांचें ह्मणणें आहे. खाल्डिया, इजिप्ट, आसिरिया वगैरे अत्यंत जीर्ण व सद्यःकालीं नामशेष झालेल्या धार्मिक लोकांचें ह्मणणें हिंदुलोकांसारखेंच ह्मणजे कर्मनाश व स्वरूपज्ञान होईपर्यंत जन्ममरण सुटत नाहीं असेंच होतें. बुद्धाचेंही मत असेंच. सारांश या जगांत आजपर्यंत जे मोठमोठे धर्म होऊन गेले व त्यांपैकीं जे अद्यापि प्रखर अगर मंद तेजानें त्या त्या लोकांत उन्नतीचा मार्ग पात्रापात्रानुसार दाखवीत आहेत त्या सर्वांचें हें ह्मणणें आहे कीं, 'या लोकीं सत्कर्माचें अगर दुष्कर्माचें पूर्ण फळ मिळणें शक्य नाहीं, म्हणून येथील देह टाकल्यावर प्राणी अन्यत्र जातो, तेथें एकंदर कर्माकर्मांचा आढावा निघून नंतर त्यास सद्गति अगर यातनामय स्थिति प्राप्त होते.' ख्रिस्ती धर्माप्रमाणें पुढील सुखदुःख देहास न मिळतां आत्म्यास मिळतें ह्मणून पुनर्जन्म मानणाऱ्या 'खुळ्या हिंदूंस ख्रिस्ती व मुसलमान लोक हंसतात. पण व्यावहारिक न्यायाच्या दृष्टीनें पाहिलें असतां हिंदुलोकांचीच समजूत विशेष समंजस आहे असें दिसून येईल. ॲडम नामक ईश्वराचा मानसपुत्र व प्रथम प्रजापति आपलें सर्व आयुष्य ईश्वराच्या भजनांत घालवितो काय आणि कोठें त्याच्या बायकोची जिज्ञासावृत्ति उच्छृंखळ होऊन ईश्वराची आज्ञा एकदां मोडल्याबरोबर

सर्व मानवी प्राण्यांस—नव्हे सर्व प्राणीमात्रांस अथवा स्थावरजंगमवस्तु मात्रास मृत्यूची शिक्षा होते काय ? एका अपराधाबद्दल येवढी जबरदस्त शिक्षा सर्वत्र आणि सर्वदयाघन प्रभूच्या दरबारीं व्हावी, तसेंच अमुक प्राणी पापमग्न आहेत असें न्यायाच्या दिवशीं ईश्वरास समजल्याबरोबर अनंतकालपर्यंत यमयातना त्या त्या प्राण्यास सरसकट भोगाव्या लागाव्या हेंही समंजस आणि तारतम्यशील मनुष्यास एकदम समजण्यासारखें नाहीं. या अभेद्य न्यायमालेपेक्षां आमची पुनर्जन्माची समजूत बरी असें माझ्यासारख्या स्थूलबुद्धि पुरुषास वाटतें. पूर्वजन्मींच्या कर्माप्रमाणें हा जन्म मिळतो व या जन्मांतील पापपुंण्याच्या आढाव्यावर पुढील जन्म येतो, व पुढें केव्हां कधीं काळीं साधुसंतांची भेट झाल्यामुळें संसाराचा वीट आला, निष्कामवृत्ति झाली, गुरूच्या अनुग्रहानें ब्रह्मस्वरूपाची ओळख होऊन आपणच ब्रह्म असा साक्षात्कार झाला ह्मणजे मोक्ष मिळतो, अशी आमची खाशी व्यवस्था आहे. सुधारण्याचे मनांत आणण्यास भाविक हिंदुलोकांच्या मतें सर्व प्राणीमात्रांस याप्रमाणें ईश्वरानें पुष्कळ सवलत दिलेली आहे. त्याचप्रमाणें एकास चांगली स्थिति, दुसऱ्यास वाईट स्थिति असा पक्षपाती व्यवहार दिसतो त्यासही उत्तर द्यावयास सांपडतें कीं, ज्याच्या त्याच्या कर्मानुसार प्रत्येकास सुख किंवा दुःख मिळतें. तेव्हां ख्रिस्ती किंवा इतर धर्मीयांनीं केवळ हंसण्यासारखा आमचा वेडसर धर्मपंथ नाहीं, निदान पुनर्जन्माचा विषय तरी नाहीं, असें वाटतें. सर्वमान्य भगवद्गीतेमध्येंही पुनर्जन्माच्या सत्यतेविषयीं अनेक वेळ उल्लेख आला आहे आमच्या लोकांचीही समजूत याच प्रकारची आहे. ज्याचें कर्म तो भोगतो व असें नसतें तर जगांत फार अनर्थ झाले असते असें आमच्यांतील श्रेष्ठ पुरुषांचें ह्मणणें आहे.

हा एकदृष्टीनें ह्मणजे भाविक धर्मदृष्टीनें विचार झाला. आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें विचार करावयाचा म्हटला म्हणजे विशिष्ट व्यक्तीस पुनर्जन्म येतो किंवा कसें हें पाहिलें पाहिजे. पूर्वजन्माचें स्मरण जाग्रदवस्थेमध्यें राहतें तर पुनर्जन्माचा उलगडा करण्यास धर्माची अगर शास्त्राची अपेक्षाच राहिली नसती. आपल्या सर्वांच्याच दुर्दैवानें अगर सुदैवानें तशी स्थिति नाहीं ह्मणून धर्मवचनांवर व अनुमानप्रमाणावर आपल्यास अवलंबावें लागत आहे. असो; अनुभवजन्य सिद्धांत सांगणाऱ्या शास्त्राचें असें एक प्रमेय आहे कीं जें जें ह्मणून कार्य आहे, तें घडवून आणण्यास या विश्वसृष्टींतील प्रत्येक गोष्ट कारणीभूत

होत असते. दुसरें एक प्रमेय असें आहे कीं प्रत्येक प्राणी जन्म पावतो, तो आपल्या पितरांच्या, कुलाच्या, जातीच्या, देशाच्या व मानवी प्राण्यांच्या शारीरिक व मानसिक गुणधर्मानुसार अवतीर्ण होत असतो. मुलांच्या रंगरूपावरून व आवाजावरून जर सामान्यतः त्यांचे आईबाप व जाती ओळखितां येते, मनुष्याच्या पापपुण्यान्वयें एकवीस मागील व एकवीस पुढील पिढयांस दुःखसुख भोगावें लागतें अशी जर समजूत आहे, व्यवहारांत व लग्नविधीचे वेळीं जर आपण हिंदुलोक आईबापांच्या कुलशीलावरूनच वधुवरांचे गुणधर्म सामान्यतः ठरवितों व ‘ जाती तशी पोती ’ असें म्हणतों, आधुनिक प्रसिद्ध महाडकर ज्योतिशी हे जर मुलाच्या चेहऱ्यावरून बापाची व बापाच्या चेहऱ्यावरून मुलाची, जन्मपत्रिका बहुतकरून बिनचूक तयार करितात, व्यक्तीवरून देशांतील लोकांच्या गुणधर्माचें व देशांवरून व्यक्तींच्या गुणधर्मांचें संकीर्तन जर आपण पुष्कळ वेळां करितों, विद्येनें, विचारानें, संगतीनें, उपदेशानें व प्रपंचांतील अनेकविध प्रसंगांनीं मनुष्याची दानत सुसंस्कृत अगर अपकृत होते असें जर प्रत्यहीं आपण पाहतों तर आपल्यास असें ह्मणावयास नको काय कीं मनुष्य जें जें कर्म करितो अगर जें जें फल इहलोकीं त्यास प्राप्त होतें, तें तें सर्व येथील उपाधींच्या नियमानुसार प्राप्त होतें व प्राप्त झालेंच पाहिजे. त्याचप्रमाणें आईबाप शरीर देतात हें प्रत्यक्ष अनुभवावरून जर आपल्यास स्पष्ट दिसतें, तर आईबापच मानसिक वृत्ति देत नाहींत हें सिद्ध करण्यास हल्लीं आहेत त्यापेक्षां अनेक पट सबळ पुरावा प्रस्तुतच्या चौकसकाळांत असला पाहिजे. आतां मातापितरें सशक्त असलीं व मुलांची जोपासना त्यांनीं यथाशास्त्र केली ह्मणजे मुलें सशक्त होतात हा जसा अनुभव आहे, तसा आईबाप बुद्धिमंत व नीतिवंत असले तर मुलें तशींच निपजतात असा अनुभव नेहमींचा नाहीं, असें कोणी ह्मणेल त्या अक्षेपास आज मी इतकेंच म्हणतों कीं अमृततुल्य अन्न आपल्या सामर्थ्यापेक्षां जास्त खाल्लें तर तें जसें विषमय होतें, तद्वत्च शरीराची काळजी न करितां आईबापांनीं विचाराचे श्रम अत्यंत केले तर मुलेंही शरीरानें व मनानें अशक्त होण्याचा संभव आहे; अथवा शारीरिक व मानसिक श्रमांचें व उपभोगांचें असें अद्यापि एक प्रमाण ठरलें नाहीं कीं ज्यांच्या योगानें शारीरिक श्रमाचा व उपभोगांचा मनावर व मानसिक श्रमांचा व उपभोगांचा शरीरावर उत्तम परिणाम होऊन

पूर्वपिढीपेक्षां पुढची पिढी जास्त शक्तिवंत आणि जास्त विचारवंत निघेल; इतकेंच काय तें स्पेन्सरसाहेबांचें म्हणण्याप्रमाणें मला आज ह्मणतां येतें. तथापि उलट पक्ष खरा धरूनही हेंच सिद्ध होतें कीं आईबापांच्या कर्माप्रमाणें मुलें निपजतात. असा जर आजचा अनुभव आहे तर प्राण्यास पूर्वजन्म होतो व त्यामध्यें केलेल्या कर्मानुसार त्याचें कर्म आहे व त्याला सुख दुःख मिळतें, असा पुरावा नसतां आग्रह कां धरावा ? पूर्वजन्माच्या कर्माप्रमाणें ह्या जन्मांतील उपाधि असतात असें धार्मिक लोकांचें ह्मणणें आहे व येथील परिस्थितीच्या धोरणानें मनुष्य कर्म करितो व त्यास सुखदुःख मिळतें असें आधुनिक उत्क्रांतिशास्त्राचें ह्मणणें आहे. पूर्वमताप्रमाणें व्यक्तीचें सुखदुःख व्यक्तीच्या पूर्वकर्माप्रमाणें उत्पन्न होतें असें आहे व हल्लींचें मत व्यक्तीचें सुखदुःख व्यक्तीच्या येथील कर्मावर, जातीच्या कर्मावर आणि आधिभौतिक स्थितीवर अवलंबून असतें. असें आहे. पूर्वींच्या व हल्लींच्या मतांत आत्मा सारखाच कायम आहे पण तो विकारशून्य आहे ह्मणून त्याचा विचार उभयपक्षींही करणें अवश्य नाहीं. तेव्हां पूर्वपक्षाप्रमाणें राहतांपैकीं वासनामय देह हा कायम असतो व तो वासनानुसार व कर्मानुसार जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो असें सिद्ध होतें. त्यांतही हल्लींचे थिआसोफिस्ट, महात्म्यांच्या आज्ञेवरून असें ह्मणतात कीं वासनामय देह हा अगर लिंगदेह हा देहपात झाल्यावर थोड्या दिवसांच्या आंतच नष्ट होतो व कारणदेह अगर जीवांचे संचित मात्र कायम राहून कर्मोपभोग घेण्यासाठीं प्राण्यास पुनः देहप्राप्ति होते! आधुनिक पक्षाचें असें ह्मणणें आहे कीं, कांहींएक विशिष्ट प्रकारची रासायनिक क्रिया झाली, (हिलाच ते चैतन्यविशिष्ट रासायनिक क्रिया ह्मणतात.) ह्मणजे पूर्वपिढीच्या इहलोकांतील शारीरिक व मानासिक कर्मानुसार जीव उत्पन्न होतो सारांश ह्या लोकांच्या ह्मणण्याप्रमाणें बाप आणि पूर्वपिढी हा मुलाचा पूर्वजन्म आणि त्या मुलांचीं मुलें व पुढील पिढी हा त्याचा पुढील जन्म होय. अशी ही परंपरा आहे. यांतील खरा पक्ष कोणता व खोटा कोणता ह्याचें तारतम्य पाहण्याचें हें स्थळ नव्हे, निदान सद्यःकालीं तसें करण्यास माझी तरी तयारी नाहीं. मात्र इतकें सांगून ठेवणें येथें अवश्य दिसतें कीं आधुनिक पक्षाच्या समर्थनार्थ उपनिषदांतील अनेक वचनें अवतीर्ण करितां येतील. त्यांपैकीं कांहींचा मात्र येथें उल्लेख करितों.

ऐतरेयोपनिषदामध्यें तीन जन्म सांगितले आहेत ते येणेंप्रमाणें:—

" पुरुषे ह वा अयमादितो गर्भो भवति । यदेतद्रेतस्तदेतत्सर्वेभ्योऽङ्गेभ्यस्तेजः संभूतमात्मन्येवाऽऽत्मानं बिभर्ति तद्यदास्त्रियां सिञ्चत्यथैनज्जनयति तदस्य प्रथमं जन्म ॥ तत्स्त्रिया आत्मभूयं गच्छति यथा स्वमङ्गं तथा, तस्मादेनां न हिनास्ति साऽस्यैतमात्मानमत्र गतं भावयति ॥ सा भावयित्री भावयितव्या भवति तं स्त्री गर्भं बिभर्ति सोऽग्र एव कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयति स यत्कुमारं जन्मनोऽग्रेऽधिभावयत्यात्मानमेव तद्भावयत्येषां लोकानां संतत्या एवं संतता हीमे लोकस्तदस्य द्वीतियं जन्म ॥ सोऽस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्य प्रतिधीयते अथास्यायमितर आत्मा कृतकृत्यो वयोगतः प्रैति स इतः प्रयन्नेव पुनर्जायते तदस्य तृतीयं जन्म " (ऐ० आ०२ अ०५ख०१)

हा उतारा प्रस्तुत प्रकरणास फार उपयोगी आहे. व या उताऱ्यांतही पुनर्जन्माचा निर्देश आहे; तथापि आपला मुलगा ह्मणजे आपलेंच दुसरें जन्म असा जो तिसऱ्या मंत्रांत अर्थ आणिला आहे तोच विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. आचार्यही भाष्य लिहितांना म्हणतातः ' कोणत्या कारणासाठीं आपणच आपल्याला पुत्ररूपानें उत्पन्न करून घेऊन त्याचें संगोपन करितो ? ह्याचें उत्तर असें कीं, ह्या पुत्रपौत्रादि लोकांचा उच्छेद होऊं नये ह्मणून ? ' यावरून उपनिषत्काराचें ह्मणणें कोणत्या धोरणाचें आहे हें स्पष्ट दिसतें. **आत्मावै पुत्रनामासि** ' हें वाक्य तर सुप्रसिद्धच आहे.

यापेक्षांहीं स्पष्ट अभिप्राय कौषीतकी उपनिषदांत आहे.—बाप मुलाला ह्मणतो

**अङ्गादङ्गात्संभवासि हृदयादधि जायसे।आत्मा त्वं पुत्रमाऽऽविथ....**

माझ्या प्रत्येक अंगापासून तुझा संभव होत आहे, तुझी उत्पत्ति होत आहे माझ्या हृदयापासूनच किंवा माझ्या सूक्ष्मदेहापासूनच तुझी उत्पत्ति पूर्ण होत आहे. पुत्रा ? यापुढें तूं माझें संरक्षण करणारा हो. नंतर पित्याचें शरीर पुत्राच्या वाचेमध्यें डोळे, कान, मन यामध्यें शिरतें झालें असें सांगून पितापुत्राच्या संवादाचें अवतरण करितात.

**वाचं मे त्वयि दधानीति पिता । वाचं ते मयि दध इति पुत्रः ? ।**

पिता—हे मुला, माझी वाणी मी तुझ्यामध्यें ठेवितों.

पुत्र—तुझी वाणी मी ग्रहण करितों.

अशाच प्रकारचें प्राण, चक्षु, श्रोत्र, अन्नरस, **कर्म सुखदुःखें आनंद,** रति उत्पादन शक्ति, चलनवलनशक्ति, धीशक्ति ( बुद्धि, अंतःकरणवृत्ति ) प्रज्ञा, मन, ज्ञानविषय आणि इच्छाविषय ह्या सर्वांचा न्यास व न्यासग्रहणविधि सांगितला आहे. तो इतका स्पष्ट आहे व आधुनिकशास्त्रांसही प्रमाणभूत होणारा आहे कीं हा भाग प्रत्येक समंजस आणि पूर्वजाभिमानी पुरुषानें निष्पापबुद्धीनें वाचावा असें सांगितल्यावांचून मला राहवत नाहीं. या प्रकरणाला संप्रत्तिप्रकरण ( संप्रदानप्रकरण ) असें म्हटलें आहे!

आतां बृहदारण्यक उपनिषद पहाः—

पुत्राला विद्यासंपन्न करून व त्यास संसारधुरेचा धुरंधर करून स्वतः मरणास तयार झालेला मनुष्य.

**"अस्माल्लोकात्प्रैत्यथैभिरेव प्राणैः सह पुत्रमाविशति"**

'मनुष्य ह्या लोकास सोडून जातो, मरतो, तेव्हां ह्याच आपल्या प्राणासह ( आचार्य म्हणतात; आपली वाणी, मन व प्राण यांच्यासह ) तो पुत्र शरीरांत प्रवेश करितो, त्यास व्यापून टाकितो! आचार्य या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ एक प्रमाणवाक्य घेऊन म्हणतातः—ज्या पित्याला असा सुविद्यासुसंस्कृत पुत्र आहे तो पिता ह्या लोकामध्यें, पृथ्वीवर, पुत्ररूपानें राहतो, मरत नाहीं असेंच मानावें.' वर ऐतरेय उपनिषदांतील अवतरण घेतलें आहे त्यांतही 'तो त्याचा दुसरा आत्मा पुण्यकर्मासाठीं ह्या लोकामध्यें प्रतिनिधिरूपानें,पुत्ररूपानें येथें राहतो. पुत्राचें लक्षणच आचार्य सांगतात कीं 'वडिलांचें जें उणें असेल तें भरून काढून जो त्याचें संरक्षण करितो तोच खरा पुत्र होय. पुत्रत्वाची खरी कर्तव्यसीमा हीच होय.' आणखी पहाः—

**"स पुत्रेणैवाऽस्मिंल्लोके प्रतितिष्ठति"** (तो पुत्राच्या योगानेंच ह्या मनुष्यलोकांस जिंकितो, ) वश करितो असा आचार्यांनीं अर्थ केला आहे 'तो ह्या कर्मभूमींत पुत्ररूपानें राहतो.' असा अर्थ होईल काय? )

आणखीही पुष्कळ उतारे देतां येतील, पण विस्तारभयास्तव इतकेंच देतों.

ह्या वरील श्रुतिवाक्यांवरून असें दिसत नाहीं काय कीं अत्यंत प्राचीनकाळीं आमच्या पूर्वजांस आधुनिक उत्क्रांतितत्त्वांचा सुगावा लागला होता! सृष्टींतील लाखों वस्तूंचें एका दिशेनें परीक्षण केल्यानंतर उत्क्रांतितत्त्वाची

कल्पना निघून तिनें विचारी पुरुषांचीं अंतःकरणें आकर्षित केलीं व सहज उलगडा न करितां येण्यासारख्या ज्या अनंत गोष्टी आहेत, त्यांपैकीं पुष्कळांच्या स्वरूपाचें उद्‌घाटन उत्तम प्रकारचें केलें ही आनंदजनक सुवार्ता होय व ह्याबद्दल डार्विन, हक्सले, स्पेन्सर वगैरे आधुनिक महर्षींचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे; पण जगाचा अनुभव ज्या वेळीं बाल्यावस्थेंत होता, आज स्पष्ट झालेल्या गोष्टी ज्या वेळीं अत्यंत मुग्धावस्थेंत होत्या, आजचीं उपकरणें ज्यावेळीं अस्तित्त्वांत नव्हतीं, सामान्य पोरासोरांस जे आज समजतें, त्याची कल्पना सुद्धां ज्यावेळीं करितां येण्यासरखी नव्हती, अशा मानवी जातीच्या बाल्यावस्थेंतही ज्यांनीं आपल्या अद्वितीय आणि . ह्मणूनच प्रासादिक बुद्धिप्रभावानें आजही कौतुक उत्पन्न करणारें उत्क्रांतितत्त्व शोधून पुढील पिढीच्या हितासाठीं प्रकटही केलें, त्या उपनिषत्कारांस जर कोणी प्रेमभरानें अवतारी पुरुष म्हटलें तर त्याला कां हंसावें? अवतारी पुरुषांचीच त्यांची खरी योग्यता होय !

असो; तेव्हां आधुनिक मतास उपनिषदांचा आधार आहे. व्यवहारांत या आधुनिकतत्त्वानें अनर्थ उत्पन्न होतील, पुढें जन्म नाहीं, आपण मेल्याबरोबर संसारयात्रा संपते, असें तत्त्व प्रकट झाल्यास लोक दुराचारी होतील अशी कांहीं पापभीरु सद्‌गृहस्थास शंका येते, नव्हे—भीतीही वाटते. पण या सत्त्वस्थ संतांनीं मानवी वृत्तीचें परीक्षण यथार्थ केलें नाहीं असें मला कष्टानें म्हणावें लागत आहे. माझ्या सत्कर्मानें बायकामुलांचें कल्याण होईल व माझ्या दुष्कर्मानें त्यांचा संसार बिघडेल, वंशाची उन्नति करणें अगर अवनति करणें ह्या दृश्यजगांत माझ्या कर्मावर पुष्कळच अवलंबून आहे, अशी मानवी मनाची समजूत व खातरजमा झाली तर मनुष्याची स्वार्थपरायणताच सदैव उच्छृंखल होत राहील असें निदान मला तरी वाटत नाहीं. पापकर्म केलें असतां आपल्यास यमयातना भोगाव्या लागतील असें धार्मिक बुद्धीनें समजत असतें तरी बायकामुलांसाठीं खोटें बोलणारे व चोऱ्या करणारे अनेक लोक सांपडणार नाहींत काय? माझ्या प्रत्येक कृत्याचा परिणाम मुलावर व इतरांवर होत आहे व त्याचें फळ इहलोकीं मला त्यांस भोगावें लागेल असें स्पष्टपणें समजलें असतां अनेक लोक पापापासून परावृत्त होतील असें मला वाटतें. आपल्या कृत्याबद्दलचा विचार आपल्यास प्रतिक्षणीं सुखदुःख देतोच, पण अंतकालचा समय येऊन ठेपला

असतां व आपण आतां निःशेष नाहींसे होणार असें समजलें असतां म्हणजे अशा दारुण प्रसंगीं मनुष्य जेव्हां आपल्या कृत्यांचा झाडा आपल्या मनास देत असेल, जेव्हां प्रत्येक क्षण युगाप्रमाणें भासून आपल्या आयुष्याचें चित्र जसेंच्या तसें आपल्या समोर प्रत्यक्ष येऊन उभें रहात असेल. तेव्हांचें होणारें समाधान किंवा होणारी तळमळ अगर झालेला पश्चात्ताप हीं सर्व पापपुण्याच्या अढाव्याप्रमाणें अनंतकाळांत होणाऱ्या यमयातना किंवा अनंतकाळ होणारें स्वर्गसुख एका क्षणांत कशावरून एकवट होत नसेल ? आणि या परंतु मरणासन्न प्राण्यास युगाप्रमाणें भासणाऱ्या क्षणिक कालांत होणारें सुखदुःखच स्वर्गनरकादिवासाप्रमाणें आहे असें आमच्या पूर्वजांचें मत कशावरून नसेल ?

असो; हे दोन्हीं पक्ष सूज्ञ व समंजस वांचकांपुढें निष्पापबुद्धीनें मांडिलें आहेत. उपनिषदांचे मंत्रद्रष्टे पुनर्जन्मावर विश्वास ठेवित होते यांतही शंका नाहीं. तथापि सभोंवार असणाऱ्या विश्वासचक्राचा भेद करून अनुभूत गोष्टींचा उलगडा स्वाभाविक रीतीनें करण्यासाठीं अनुमानाच्या निरामय आकाशांत जेव्हां ते सयुक्तिक कल्पनाशक्तीनें भराऱ्या मारूं लागले, तेव्हां त्या वरदी व असामान्य ऋषींच्या अलौकिक आणि प्रासादिक कल्पनासामर्थ्याला हे विचार सुचलेले आहेत व त्या विचारांस सार्थ करण्याचे श्रेय एकोणिसाव्या शतकांत साता समुद्राच्या पलीकडे राहणाऱ्या तत्त्ववेत्त्यांनीं घेतलें आहे. विधात्याची अघाटितघटना ती हीच होय. याप्रमाणें प्रस्ताव करून प्रस्तुत विषयाचा भाग आटपतो. मूळश्लोकाचें विवरण मागेंच झालें आहे ॥ २२ ॥

कस्मादविक्रिय एवेति, आह—

'आत्मा अविक्रिय कां आहे ? भगवान सांगतातः—

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ॥**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥२३॥**

**एनं** ( ह्या आत्म्याला ) **शस्त्राणि** ( शस्त्रें ) **न छिन्दन्ति** ( तोडीत नाहींत, याचे विभाग करूं शकत नाहींत. ); **एनं** ( ह्याला ) **पावकः** ( अग्नि ) **न दहति** ( जाळीत नाहीं ) **च** ( आणि ) **एनं** ( ह्याला ) **आपः** ( पाणी ) **न क्लेदयन्ति** ( ओलें करीत नाहींत, भिजवीत किंवा कुजवीत नाहींत. ) **मारुतः** ( वायु ) **न शोषयति** ( सुकवीत नाहीं )—सारांश पंच-

महाभूतांपैकीं, पृथ्वी, आप, तेज आणि वायु ह्या कोणालाही आत्मरूपी सद्वस्तूला विकार करण्याचें सामर्थ्य नाहीं. तोडणें, कुजणें, जाळणें, सुकणें हीं नाशाचीं साधनें आहेत. परंतु यांपैकीं कोणताच विकार आत्म्याला होत नाहीं.

नैनं छिन्दन्तीति । एनं प्रकृतं देहिनं न छिन्दन्ति शस्त्राणि निरवयवत्वान्नावय वविभागं कुर्वन्ति शस्त्राण्यस्यादीनि । तथा नैनं दहति पावकोऽग्निरपि न भस्मीकरोति तथा नैनं क्लेदयन्त्यापः । अपां हि सावयवस्य वस्तुन आर्द्रिभावकरणेनावयववि श्लेषापादने सामर्थ्यं तन्न निरवयव आत्मनि संभवति । तथा स्नेहवद्द्रव्यं स्नेहशोषणेन नाशयति वायुरेनं स्वात्मानं न शोषयति मारुतोऽपि ॥ २३ ॥

प्रस्तुतच्या ह्या आत्म्याला शस्त्रें तोडूं शकत नाहींत. कारण आत्मा अवयव-शून्य आहे. खड्गासारखीं ( तरवारीसारखीं ) शस्त्रें असतात तीं ज्याला अवयव आहेत, भाग आहेत त्याला तोडतील. पण आत्म्याला भागच नाहींत.—युरपियन लोक व कणादप्रभृति नैयायिक परमाणु निरवयव आहेत असें म्हणतात. तसाच आत्माही असल्यामुळें शस्त्रांच्या हातून याचे विभाग कसे होणार ? त्याचप्रमाणें व त्याच कारणास्तव अग्नीच्या हातूनही याला जाळवत किंवा भस्म करवत नाहीं. पाण्यानें हा भिजत नाहीं. ज्याला अवयव आहेत, भाग आहेत, अशा पदार्थाला पाणी भिजवितें आणि नंतर त्या पदार्थाचे अवयव निरनिराळे करून टाकितें. हे सामर्थ्य पाण्याला आहे. पण ह्या सामर्थ्याचा आत्म्यावर परिणाम घडत नाहीं. कारण तो निरवयवच आहे ! तसेंच पदार्थामध्यें जी स्निग्धता असते, जो रस असतो, त्याचें शोषण वायु करितो. पण वायूचेंही येथें कांहीं चालत नाहीं. कारण आत्मा—आनंदैकरसघन,—एकच एक, अवयवशून्य आहे. सारांश ज्याप्रमाणें आकाश विभागरहित आहे, अवयवशून्य आहे, त्याचप्रमाणें आत्मा असल्यामुळें कोणत्याही भूताचा अगर महाभूताचा परिणाम आत्म्यावर घडत नाहीं. बटलरचें असेंच ह्मणणें आहे व आत्म्याचें अमरत्व त्यानें असेंच सिद्ध केलें आहे, असें मागें एकदां सांगितलेंच आहे.

**प्रपाकार** 'मऊ करण्याचा हेतूनें पदार्थ शिथिल करणें' असा '**क्लेदन**' शब्दाचा अर्थ करितात.

वर सांगितलेल्या व इतर सर्व आधिव्याधींचा परिमाण शरीरावरच होत असल्यामुळें आत्मा अविकृत व अबाधित राहतो असें **शंकरानंद** ह्मणतात. **पंडितांनीं**ही हाच अनुवाद केला आहे **'सनातनोऽनादिः ।' 'न तस्य कश्चिज्जनिता न चाधिपः'** श्वेताश्वतर ६।९. 'हा आत्मा सनातन आहे व अनादि आहे. यांचा कोणी उत्पन्नकर्ता नाहीं किंवा स्वामीही नाहीं.'॥२३॥

यत एवं तस्मात्—

असें आहे ह्मणूनः—

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

**अयं** ( हा--आत्मा-- ) **अच्छेद्यः** ( तोडला जाणारा नव्हे ) **अयं** ( हा ) **अदाह्यः** ( जळणारा नव्हे) **अक्लेद्यः** ( कुजणारा नव्हे ) **च** ( आणि ) **अशोष्य एव** ( सुकणाराही नव्हे. ) **अयं** ( हा—आत्मा ) **नित्यः** ( नाश न पावणारा, अविनाशी ) **सर्वगतः** ( सर्वव्यापी ) **स्थाणुः** ( स्थिर ) **अचलः** ( गतिशून्य ) आणि **सनातनः** ( त्रिकाल राहणारा आहे— ) ह्याला कोणताच विकार होत नसून तो अविनाशी, सर्वस्थ स्थिर, अचल आणि सर्वकाल राहणारा आहे. म्हणून तो अविक्रिय आहे.

अच्छेद्योऽयमिति । यस्मादन्योन्यनाशहेतूनि भूतान्येनमात्मानं नाशयितुं नोत्सहन्ते तस्मान्नित्यो नित्यत्वात्सर्वगतः सर्वगतत्वात्स्थाणुः स्थाणुरिव स्थिर इत्येतत् । स्थिरत्वादचलोऽयमात्माऽतः सनातनश्चिरंतनो न कारणात्कुतश्चिन्निष्पन्नोऽभिनव इत्यर्थः । नैतेषां श्लोकानां पौनरुक्त्यं चोदनीयम् । एत एकेनैव श्लोकेनाऽऽत्मनो नित्यत्वमविक्रियत्वं चोक्तं 'न जायते म्रियते वा' इत्यादिना । तत्र यदेवाऽऽत्मविषयं किंचिदुच्यते । तदेतस्माच्छ्लोकार्थान्नातिरिच्यते किंचिच्छब्दतः पुनरुक्तं किंचदर्थत इति । दुर्बोधत्वादात्मवस्तुनः पुनः पुनः प्रसङ्गमापाद्य शब्दान्तरेण तदेव वस्तु निरूपयति भगवान्वासुदेवः कथं नु नाम संसारिणामव्यक्तं तत्त्वं बुद्धिगोचरतामापन्नं सत्संसारनिवृत्तये स्यादिति ॥ २४ ॥

आतां ज्या अर्थीं परस्परांचा नाश करणारीं हीं चार पृथ्वी, जल, अग्नि, वायुनामक महाभूतें आत्म्याचा नाश करण्यास समर्थ होत नाहींत, सारांश ज्या अर्थीं आत्म्याचा नाशच होत नाहीं, त्या अर्थीं तो नित्य (अविनाशी) आहे, नित्य आहे म्हणून तो सर्वव्यापी आहे, सर्वच दृश्य त्यानें भरलेलें आहे म्हणून तो स्तंभासारखा स्थिर आहे; आत्मा स्थिर आहे तेव्हां त्यांत कोठेंही हालचाल होत नाहीं हें ठीकच आहे, कोणाचाच विकार आत्म्याला होत नाहीं अत एव तो सनातन, त्रिकाल राहणारा, नेहमीं असणारा आहे म्हणजे तो कोणत्याही कारणापासून उत्पन्न झाला म्हणून तो नवा आहे, असें कधींही म्हणतां यावयाचें नाहीं.--'वाऱ्यासारखा उत्पन्न झालेला तो नाहीं.' असा एक पाठ आहे.--सारांश आत्मा नित्य, सर्वव्यापी, स्थिर, अचल, आणि चिरंतन राहणारा आहे.--प्रपाकार ह्या देहावर आत्म्याच्या आभासांचे स्पष्टीकरणार्थ एक श्लोक देतात.--

"अयःपिण्डगते वन्हौ लोहकारस्य ताडनम्।
आरोप्यते तथा लोहे दाहकत्वादि वन्हिजम्॥"

'अग्नीमध्यें तापवून लाल झालेल्या गोळ्याला मारलें असतां जसें आपण अग्नीला मारलें असें म्हणतों, त्याचप्रमाणें भाजणाऱ्या लोखंडावरच भाजणें आदिकरून अग्नीचे गुणांचाही आरोप करितो! देह आणि आत्म्यावर असेंच परस्परांचे धर्मांचा आरोप असतो.

**पूर्वपक्षी**--काय हो! भगवंतांनीं तेंच तें पिष्टपेषण काय चालविलें आहे? मागें २० व्या श्लोकांत आत्मा नित्य आहे, अविक्रिय आहे असें सांगून पुढेंही तोच सिद्धांत सांगत आहेत. तेथें आत्म्याच्या स्वरूपाविषयीं जें कांहीं सांगितलें आहे, त्याहून ह्या वरील श्लोकांत कांहीं निराळें सांगावयाचें नसून नुसती शब्दांची व कधीं अर्थाची पुनरुक्ति चालविली आहे याचा अर्थ काय?

**सिद्धान्ती**--अरे बाबा! येथें पुनरुक्ति झाली आहे खरी; पण तूं मानतोस त्या रीतीनें ही पुनरुक्ति दोषास मुळींच पात्र होत नाहीं. कारण आत्मवस्तूचें ज्ञान करून देणें व ज्ञान करून घेणें फार कठिण आहे, तें ज्ञान लवकर होत नाहीं ह्मणून कृपाघन वासुदेव हे पुनः पुनः निरनिराळे प्रसंग आणून--त्याच शब्दांनीं, अगर,--शब्द फिरवून आत्मस्वरूपाचेंच वर्णन करीत आहेत! बाबारे! त्यांचा हेतु हा आहे कीं, संसारामध्यें--या दृश्य विश्वाच्या चक्रामध्यें--जे बापडे

सांपडले आहेत, त्यांच्या बुद्धीला हें आत्म्याचें अव्यक्त स्वरूप (ज्याचें लक्षण) पूर्णपणें देतां येत नाहीं, कारण जे मुळींच विलक्षण आहे, अनुद्भुत आहे.) कोणत्या तरी रीतीनें समजावून द्यावे त्यांची खातरी पुनः पुनः त्याच त्याच किंवा अन्य शब्दांनीं सांगून करावी आणि त्यास संसारापासून—संसाराच्या दुर्धर तापत्रयापासून—निवृत्त करावें, व संसारामधून त्यांची वृत्ति फिरवून आत्मविचाराकडे लावावी आणि त्यांस मोक्ष मिळवून द्यावा. समजलास ?—आचार्यांनीं येथें येणारा पुनरुक्तीचा दोष कशा सुंदर रीतीनें निराकृत केला आहे, व त्या पुनरुक्तीचें समर्थन करून दयावत्सल भगवंताची काळजी कशी अभिव्यक्त केली आहे हें चाणाक्ष वाचकांस समजून सांगावयास नकोच. ज्यांना अद्यापि ही शंका असेल त्यांनीं मिल्ल अगर स्पेन्सर यांचे मानसिक विषयांवरील अभियुक्त ग्रंथ वाचावे ह्मणजे एकच सूक्ष्म सिद्धांताचें स्पष्टीकरण करण्यास ह्या लोकमान्य ग्रंथकारांनीं किती वेळ पुनरुक्ती केली आहे त्याचा परिचय होईल.—

पंडितांनीं या श्लोकांवर जें व्याख्यान केलें आहे, तें वाचकांनीं अवश्य वाचावें. विस्तारभयास्तव तें येथें घेतलें नाहीं.

**मधुसूदनीकार 'एव'** ( ही ) या शब्दाचा अन्वय सर्वत्र घेतला आहे. **'नित्य'** याचा अर्थ 'ज्याला पूर्वीची निराळी स्थिति, पुढील निराळी स्थिति, आणि आतांची निराळी स्थिति असें नसतें. असा करितात. **'स्थाणुः'** ( अविकारी ); **'अचल'** ( संस्कारशून्य ) **'सनातन'** ( कोणत्याही क्रियेचें कर्म नाहीं असा ) असे या शब्दाचे निराळे अर्थ हे टीकाकार देतात. श्लोकाच्या समर्थनार्थ **'यःपृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या आन्तरो योऽप्सु तिष्ठन्नद्‍भ्योन्तरो यस्तेजसि तिष्ठंस्तेजसोन्तरो यो वायौ तिष्ठन्वायोरन्तरः'** असा (बृहदा० ३।७।३ वगैरे) श्रुति देतात. 'पृथ्वींत राहून जो पृथ्वीच्या अंतर्यामीं असतो, पाण्यांत राहून पाण्याच्या अंतर्यामीं असतो वगैरे' असा यांचा अर्थ आहे. यावरून मधुसूदनीकार असा सिद्धांत काढितात कीं सर्वांच्या अर्थातच शस्त्रादिकांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या आत्म्याला शस्त्रें कशीं तोडतील ? ज्याच्या योगानें शस्त्रास तोडण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें त्यासच तें शस्त्र तोडूं शकेल कसें ? म्हणून आत्मा अविकारी, नित्य वगैरे आहे. **रामानुजां**चा अशासारखाच अभिप्राय आहे.

**वल्लभा०**—'हाच शास्त्राचा प्रेरक आहे.' असें ह्मणून **'येन सूर्यस्तपाति'** ( ज्याच्या सामर्थ्यानें सूर्य प्रकाशित होतो ) अशी श्रुति देतात.

**शंकरानंदांनीं** दुसऱ्या चरणांतील विशेषणांचा निष्कर्ष काढून म्हटलें आहे. **'आनंदैकरसत्वं चाऽऽत्मनः सूचितं भवति'** यावरून आत्म्याचें आनंदैकरसत्व ह्मणजे निरतिशयसुखस्वरूपत्व ( अत्यंत सुखाचें स्वरूप असणें हें ) व्यक्त होतें.

**मध्व** हे आचार्य **'नित्य'** हें 'सर्वगताचें' विशेषण करितात. 'नेहमींच सर्वत्र पसरलेला' असा यांचा अर्थ आहे. **'स्थाणुः'** ह्मणजे 'नैमित्तिक बाधा ज्याला नाहीं असा' हा अर्थ यांनीं केला आहे. हा श्लोक हे आचार्य ईश्वरपर लावितात. प्रतिबिंबाचे ठायीं बिंबाचे धर्म असणें योग्य आहे. **'रूपं रूपं प्रतिरूपो बभूव'** **'आभास एव च'** (कठ ५।९।१० ) ईश्वर प्रत्येक ठिकाणीं निरनिराळें रूप ग्रहण करिता झाला. जीव हा परमेश्वराचा आभास आहे. वासुदेवाची भक्ति केल्याव्यतिरिक्त मोक्ष नाहीं असें सांगून सर्व देवतांपेक्षां वासुदेव श्रेष्ठ आहे, असेंही यांनीं प्रसंगवशात् श्रुति, स्मृति पुराणांचे एकदेशी आधार देऊन सिद्ध केलें आहे. तसेंच 'याची शक्ति अनंत आहे अनंत प्रकारची दिसते. आणि ज्ञान, बल आणि क्रिया या सामान्य रूपांनीं ही शक्ति प्रकट होते' अशीं वाक्यें आहेत ह्मणून हें जग मायामय आहे, असें म्हणतात तें असत्य आहे, असा यांनीं द्वैतसिद्धांत ठोकला आहे. या द्वैतमतधारी लोकांचे प्रतिक्षणीं खंडन करणें कंटाळवाणें आहे. तथापि द्वैत हें नेहमीं हट्टानें पुढें येत असतें म्हणून पुनः पुनः तिकडे वळणें आवश्यक आहे. **'एकमेवाद्वितीयम्'** **'तत्त्वमसि'** हीं महावाक्यें प्रत्येक उपनिषदांत सांपडतात. आणि प्रत्येक उपनिषदाचा उपक्रम आणि उपसंहार 'तें एकच आहे, अद्वितीय आहे' 'तेंच तूं आहेस' असा होत असतो. तेव्हां उपनिषदें मानणाराला वरील वाक्यें नाहींशीं केल्याशिवाय, किंवा त्यांचे अर्थ बदलल्याशिवाय द्वैतपक्षाचे किंवा शून्यवादाचें समर्थन करितां यावयाचें नाहीं. दुसरें कोणतेंही महावाक्य नसून जर 'तेंच तूं आहेस' येवढें एकच वाक्य उपनिषदांतून सांपडतें तरीसुद्धां अद्वैताची पूर्ण सिद्धि झाली असती. युरपियन तत्त्ववेत्त्यांची विचारादिशा अद्वैताकडेच आहे. भक्तिपंथ अगर कर्मपंथ पृथ्वी-

वर पुष्कळ आहेत खरें; पण त्या पंथांची उत्पत्ति विषयवैराग्य झालें नाहीं किंवा ममता सुटली नाहीं अशा लोकांकरितां मात्र आहे. कर्म करून स्वर्ग-सुख भोगावयाचें आणि तें संपल्याबरोबर पुनः कर्मभूमींत जन्म घ्यावयाचा हा कर्मपंथाचा पुरुषार्थ आहे. याला जो कंटाळला तो विरक्त होतो. भक्ति अगर उपासनेमध्यें ईश्वरपरच सर्व कर्म करावें असा पुरुषार्थ वर्णिला आहे. निष्काम कर्म करून तें परमेश्वरचरणीं ज्ञानपूर्वक समर्पण केलें असतां म्हणजे ममताशून्य होऊन सर्व विश्व परमेश्वरस्वरूपामध्येंच पाहूं लागलें असतां, मुक्ति मिळेल व मिळते. कारण अशा पुरुषाला सद्वस्तूचें ज्ञान होतें आणि स्वरूप-साक्षात्कार झाल्याबरोबर मुक्तिही मिळते. आतां ईश्वरास सर्वज्ञ समजून आणि प्राण्यास सर्वच स्थितीमध्यें किंचिज्ज्ञ समजून अथवा 'ईश्वर आणि मी निराळे आणि नेहमींच निराळे राहणार' अशी भावना करून जे भक्ति कारितात ते चांगले आहेत, पूज्य आहेत, वंदनीय आहेत हें खरें; पण लिहिण्यास दुःख वाटतें कीं सर्वज्ञ परमेश्वरास 'सर्वव्यापी' ठरवूनही ते जीवास निराळा ठेवितात! परमेश्वरानें सर्व विश्व व्यापून टाकल्यावर व विश्वरूपीच तो आहे हें समजल्यावर जीवास अस्तित्व कसें संभवतें हें त्यांचे तेच समजूं जाणत. 'दृश्यविश्वांत ईश्वर, जीव' असा भेदाभेद मनुष्यें कारितात हें ठीक आहे; हा भिन्नभाव केल्याखेरीज चित्तामध्यें पूर्ण सात्विकता कधींही बाणावयाची नाहीं हें खरें. पण चित्तशुद्धि झाली, अभिमान सुटला, वैराग्य प्राप्त झालें, नित्य सद्वस्तु शोधून काढण्याचा ध्यास लागला, गुरुमुखानें, वेदांतपठनानें सत्स्वरू-पाची दिशा समजली, आणि नित्य चिंतनानें 'मीच ब्रह्म आहें' असा साक्षा-त्कार झाला म्हणजे 'एकच आहे' असा सत्स्वरूपाचा बोध होऊन सर्व अज्ञान निरस्त होतें; तेव्हांही ईश्वर व जीव असा भेद ठेवणें अगर भेद असतो अशी कल्पना करणें ह्मणजे सूर्यज्योति अंधकारमय आहे असेंच प्रतिपादन करण्यासारखें होय! असो; द्वैतवाद्यांनीं याचा विचार करावा.

**किंच—**

आणखी पहा:—

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

**अयं** (हा–आत्मा–) **अव्यक्तः** (अस्पष्ट, अदृश्य आहे.) **अयं** (हा) **अचिन्त्यः** ( कल्पनातीत, मनानें आकलन न करण्यासारखा आहे. ) **अयं** (हा) **अविकार्यः** ( विकाराला वश न होण्यासारखा आहे. ) **उच्यते** (असें म्हटलें आहे, असें ह्मणतात. ) **तस्मात्** (ह्मणून) **एनं** (ह्या आत्म्याला–) **एवं** (याप्रमाणें, आतांच सांगितल्याप्रमाणें ) **विदित्वा** ( जाणून) **अनुशोचितुम्** ( नंतर शोक करण्यास ) **न अर्हसि** ( तूं योग्य नाहींस, ) सारांश, आत्मा हा अदृश्य, अविकारी आहे ह्मणून यांचें पूर्ण स्वरूप समजल्यानंतरही अर्जुना शोक करणें तुला उचित नाहीं.

अव्यक्तोऽयमिति । अव्यक्तः सर्वकरणाविषयत्वान्न व्यजत इत्यव्यक्तोऽयमात्मा । अत एवाचिन्त्योऽयम् । यद्धीन्द्रियगोचरं वस्तु तच्चिन्ताविषयत्वमापद्यतेऽयं त्वात्माऽनिन्द्रियगोचरत्वादचिन्त्यः । अविकार्योऽयम् । यथा क्षीरं दध्यातञ्चनादिना विकारि न तथाऽयमात्मा । निरवयवत्वाच्चाविक्रियः । न हि निरवयवं किञ्चिद्विक्रियात्मकं दृष्टम् । अविक्रियत्वादविकार्योऽयमात्मोच्यते । तस्मादेवं यथोक्तप्रकारेणैनमात्मानं विदित्वा त्वं नानुशोचितुमर्हसि हन्ताऽहमेषां मयेमे हन्यन्त इति ॥ २९ ॥

–आत्म्यास रंगरूप नाहीं ह्मणून–मनुष्यास अगर इतर कोणाही प्राण्यास प्राप्त झालेल्या सर्व इंद्रियांना जो आत्मा अगोचर असल्यामुळें कळत नाहीं तो अव्यक्त होय.—नेत्रादि ज्ञानेंद्रियें, अंतःकरण व बुद्धि यांचा आत्म्याचें स्वरूप ओळखणें हा विषय नसल्यामुळें हा सर्व ज्ञानेंद्रियांस अगोचर आहे व म्हणूनच त्यांस अज्ञेय आहे.–तो इंद्रियांस अज्ञेय आहे म्हणून तो चिंतन करण्यासारखा नाहीं; कल्पनातीत आहे. जी वस्तु इंद्रियांस कळते, त्या वस्तूंचें चिंतन करितां येतें हा अनुभव आहे. "**प्रकृतिभ्यः परं यत्तु तदचिन्त्यस्य लक्षणम्**" (प्रकृतीच्यापेक्षां पलीकडचें असणें, हें कल्पनाऽगोचरत्वाचें लक्षण होय.) असा हा आत्मा कोणत्याच ज्ञानेंद्रियाला गोचर नाहीं म्हणून अचिंत्य आहे. तसेंच हा विकार होण्यासारखा नाहीं. ज्याप्रमाणें दुधामध्यें दही अगर दुसरा कांहीं आंबट पदार्थ घातला असतां दुधास विकार होतो, तसा आत्म्यास होत नाहीं. कारण आत्मा हा निरवयव आहे.—निरनिराळे कण असल्यामुळें दुधास विकार होतो; आत्म्याचे विभागच नसल्यामुळें त्यास विकार होत नाहीं

असा अनुभवच आहे.-यास्तव आत्म्याला अविकार्य असें म्हटलें. म्हणून अर्जुना! अशा प्रकारच्या व आतांच सांगितलेल्या स्वरूपाच्या आत्म्याचें पूर्ण लक्षण आणल्यानंतर 'मी यांस मारणारा,' माझ्या हातून हे मरणारे' असा शोक करणें तुला अत्यंत अनुचित होय.

**मधु०**—'आत्म्यास शस्त्रानें मारितां येतें असे सिद्ध करणारे प्रमाणच नाहीं' असे या श्लोकांत सांगितले आहे म्हणून पुनरुक्ति नाहीं. अर्थातच मग शोकमोहाचें कारणही उरत नाहीं. **रामानुजाचार्य व श्रीधरस्वामीचा** असाच अभिप्राय आहे.

**प्रो. द्विवेदी**—अविकारीशब्दानें येथें सांख्यांच्या **प्रधानाचा** निरास केला, प्रधान अदृश्य व अचिंत्य आहे, पण अविकारी नाहीं.

**शंकरानंद**—'आत्मशोधनाच्या मीमांसेस २२ व्या श्लोकांत आरंभ करून ती येथें संपविली आहे अव्यक्त हे प्रधानाचे व सृष्टीचे साक्षी आहे ह्मणून ह्या उभयतांहून ते निराळे आहे. या श्लोकाच्या समर्थनार्थ श्रुति पहा. '**परस्तात्सिद्धं हि ब्रह्म, अस्ति विज्ञाता, शुद्धोऽबाध्यस्वरूपः। बुद्धः सुखस्वरूपः। असंकार्यः। अद्वय एवाय मात्मा सन्मात्रो मुक्तो नित्यः शुद्धो बुद्धः सत्यो निरंजनो विभुरद्वय आनन्दः पर एकरसः** ब्रह्म हें पूर्वीपासूनच, अनादि कालापासूनच सिद्ध झालेलें आहे. तें ज्ञानवंत, शुद्ध आणि अविकारी स्वरूपाचें आहे. तें चैतन्यस्वरूपी आणि आनंदस्वरूपी आहे. तो नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य, निर्लेप, व सर्वव्यापी आहे तो एकच आहे. तो आनंद आहे. तो श्रेष्ठ आहे आणि तो एकरसात्मक आहे.' **मध्व व सत्यानंद** हे हा श्लोकही ईश्वरपरच लावितात.

**ज्ञानेश्वर**—'हा तर्काचिये दिठी (दृष्टीनें)। गोचर नव्हे कीरिटी!। ध्यान याचिये भेटी। उत्कंठा[१] वाहे। हा गुणत्रयरहित। अनादि अविकृत। व्यक्तीस (मनुष्यास) अतीत। सर्वरूप॥ अर्जुना ऐसा हा जाणावा। सकळात्मक देखावा। मग सहजे शोक अघवा (सगळा) हरेल तुझा॥

वामनपंडितांच्या दोनच ओंव्या घेतों? 'ज्या सत्तेनें सचेतन। होऊनि, मन करी चिंतन। त्यास ते मन अचेतन। चिंतील काय॥' म्हणून 'आका-

---

१ आत्म्याची आपली भेट व्हावी म्हणून ध्यान हें स्वतःच अत्यंत उत्सुक झालें असतें! पण भेट कोठून होणार.

रार्चे चिंतन । राहतां, आत्माकार मन तें उन्मनीं ( आत्माकार मन झालें असतां ) तें उन्मन । जाणवेण परी चिंतवेना ! ॥ शोकापर होण्यासाठीं नारदांनी सनत्कुमाराची प्रार्थना केली आहे व त्यांनीं आत्मशोधनाचा मार्ग सांगितला आहे,हा बहारीचा प्रसंग पंडितांनीं मोठ्या खुबीनें आणिला आहे. ॥२५॥

आत्मनोऽनित्यत्वमभ्युपगम्येदमुच्यते–

—आत्मा नित्य आहे हें सिद्ध झालें:–आतां आत्मा अनित्य आहे असें वादासाठीं गृहीत धरून भगवान म्हणतात:—

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ॥**
**तथाऽपि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि २६ ॥**

**अथ च** ( आतां आणखी–जर )—**एनं** ( ह्या-आत्म्याला ) **नित्यजातं** ( नेहमीं उत्पन्न होत आहे असा ) **वा** ( अथवा ) **नित्यं** ( नेहमीं ) **मृतं** ( मरत आहे असा ) **मन्यसे** ( मानशील, मानलेस ) **तथाऽपि** ( तरी ) **महाबाहो** ( हे अजानुबाहु ) अर्जुना ! **एवं** ( या प्रकारें ) **त्वं** ( तूं ) **शोचितुं** ( शोक करण्यास ) **न अर्हसि** ( योग्य नाहींस ).—सारांश प्रतिदेहाबरोबर आत्मा जन्मास येतो व तसाच देहाबरोबर मरतो असें जरी तुझ्या मताप्रमाणें कबूल केलें तरी हे पराक्रमी अर्जुना ! तुला करण्याचें कारण नाहीं.

अथ चैनमिति । अथ चेत्यभ्युपगमार्थः । एनं प्रकृतमात्मानं नित्य जातं लोकप्रसिद्ध्या प्रत्येनकशरीरोत्पत्तिं जातो जात इति मन्यसे । तथा प्रतितद्विनाशं नित्यं वा मन्यसे मृतं मृतो मृत इति । तथाऽपि तथाभाविन्यप्यात्मनि त्वं महाबाहो नेवं शोचितुमर्हसि जन्मवतो जन्मनाशवतो नाशश्चेत्येतावश्यं भाविनाविति ॥ २६ ॥

आतां वादसिद्धि करण्यासाठीं जर तूं आत्म्याला, व्यवहारांत ह्मणतात त्याप्रमाणें प्रत्येक शरीराच्या उत्पत्तीच्या वेळीं 'आत्मा जन्म पावतो' असें मानशील, व तसेंच प्रत्येक शरीराचा नाश होतो तेव्हां 'आत्म्याचा नाश होतो' असें प्राकृत मनुष्याप्रमाणें मानशील तरी सुद्धां म्हणजे आत्म्याला जन्म मरण आहे असें घटकाभर गृहीत धरिलें तरी सुद्धां हे शूरा, अजानुबाहो अर्जुना ! तुला शोक करण्याचें कारण नाहीं. कारण जो जन्म पावणारा आहे

त्याला जन्म येणें व मरण पावणारा आहे तो मरणें, ह्या गोष्टी अवश्य रीतीनें झाल्याच पाहिजेत.– सारांश आचार्य ह्मणतात कीं, नाशवंत वस्तूचा नाश झाला किंवा होणार याबद्दल शोक करण्याचें कारण नाहीं.

**मधुसूदनीकारः**—ह्या श्लोकामध्यें **सौगत, लौकायतिक, तार्किक, मीमांसक** इत्यादि लोकांच्या सिद्धांतांनुसार विचार भगवंतानीं केला आहे. '**आत्मा ज्ञानस्वरूपः प्रतिक्षणविनाशी**' ( आत्मा हा ज्ञानस्वरूपी आहे, पण प्रतिक्षणीं त्याचा नाश होतो. ) असें **सौगत** म्हणतात यांच्या मतें आत्मा क्षणैकजीवी आहे. '**देह एवाऽऽत्मा, स्थिरोऽप्यनुक्षणपरिणामी, जायते नश्यति प्रत्यक्षश्च** ( देह हाच आत्मा आहे. तो स्थिर आहे ह्मणजे प्रतिक्षणीं, त्याचा नाश होत नाहीं, तरी प्रत्येकक्षणीं, क्षणोक्षणीं त्याच्यावर बाहेरचे संस्कार होत असतात व म्हणून त्याचें स्वरूप प्रतिक्षणीं बदलत असतें, व पुनः तो प्रत्यक्ष असतो. असें **लौकायातिक** ह्मणतात. '**देहातिरिक्तोऽपि देहेन सहैव जायते नश्यति च** ( देहाहून आत्मा भिन्न आहे, तथापि तो देहाबरोबरच जन्मास येतो व देहाबरोबरच मरतो ) असे इतर वादी ह्मणतात. **सर्गकाले जायत आकाशवन्नश्यति प्रलयकाले च नित्य एवाऽऽत्मा जायते म्रियते च**' ( जगाच्या उत्पत्तिकालीं आकाशाप्रमाणेंच आत्मा जन्म पावतो व प्रलयकालीं त्याचा लय होतो, आत्मा नित्य आहे पण तो जन्म पावतो व मरतो. ) असे तार्किक व इतर लोक ह्मणतात. ह्या मताचा अभिप्राय आणून भगवंतांनीं हा श्लोक म्हटला आणि ' तुला जर स्थुल स्वभावामुळें ही सूक्ष्म वस्तु ( अव्यक्त, अचिंत्य, अविकारी आत्मा ) कळत नसेल तर निदान वर जीं मतें सांगितलीं किंवा पुढें केव्हां प्रगट होतील त्यांचा अभिप्राय ध्यानांत ठेवून रहा. ह्या मतांचें अनुकरण केलेंस तरी तुला शोक करण्याचें कारण नाहीं. जी वस्तु स्वभावतः नाहींशी होणार त्याचा शोक करणें उचित नाहीं. **श्रीधरस्वामी** व **प्रपाकार** ह्मणतातः—पुण्यपापाच्या संस्कारांनीं आत्म्यास जन्म मृत्यु देहाबरोबरच येतात असें मानलेंस तरीही शोकाचें कारण नाहीं. **रामानुजाचार्य**ही ' विकार होणें हा ज्याचा धर्म अशा देहाला उत्पत्ति आणि विनाश हे होणारच. मग रडण्याचें कारण काय ? ' असें विचारतात.

**शंकरानंद** ह्मणतात कीं 'येथपर्यंत आत्मयाथात्म्यज्ञान सांगितलें, परंतु अर्जुनाच्या मनांत आत्मप्रसादाचा उदय झाला नाहीं असें पाहून भगवंतांनीं त्याचें समाधान करण्यास्तव ही दिशा घेतली. व 'नार्हावयं हन्तुम्' असें अर्जुनानें ह्मटलें आहे तें कां असें या श्लोकांत त्याला विचारलें आहे.

**वल्लभाचार्यः**—'ज्ञानशून्य लोकांचा सिद्धांत घेतला तरी शोक करण्याचें कारण नाहीं.'

**प्रो० द्विवेदीः**–महाबाहो! अजानुबाहु अर्जुना! असें ह्मणून भगवंतांनीं अर्जुनाचा उपहास किंवा उपरोध केला आहे असें ह्मणतात. व जोंपर्यंत कर्म संपलें नाहीं तोंपर्यंत जन्ममरणाचा विचार अद्वैतमतासही करावा लागतो असें प्रतिपादन करितात. '**यन्मन्यसे ध्रुवं लोकमध्रुवं वा न चोभयम् । सर्वथा न हि शोचास्ते स्नेहादन्यत्र मोहजात्**' भागवत. ( हा श्लोक कायमचा आहे, अगर क्षणिक आहे अथवा क्षणिक नसून कायमचा नाहीं, असें कांहीं मानलेंस तरी गेलेल्याचा शोक करणें योग्य नाहीं. शोक होतो तो केवळ मायेनें उत्पन्न झालेल्या मोहापासून होतो. )

**ज्ञानेश्वराचें** व्याख्यान फार चांगलें आहे. गुरुमुखानें समजून मात्र घेतलें पाहिजे. विस्तारभयास्तव मात्र या व्याख्यानावर मी भाष्य करीत नाहीं! जे आदि, स्थिति, अंत। हा निरंतर असें नित्य। जैसा प्रवाह अनुस्यूत (अखंड)। गंगाजळीचा ॥ तें आदि ( उत्पत्ति ) नाहीं खंडलें। समुद्रीं तरि असे मिनलें (मिळालें)। आणि जातांचि ( जात असतांना, वाहत्या प्रवाहांत ) मध्यें उरलें। दिसे जैसें ॥ इये ( ही ) तिन्ही तयापरी। सरसींच (सारखीच) सदा अवधारी। भूतांसि कवणी अवसरी ( समयीं ) ठाकतीना (मिळतीना) ॥ ह्मणोनि हें अघवें। एथ तुज नलगे शोचावें। जे स्थितीच ( हा सृष्टिक्रम ) हें स्वभावें अनादि ऐशी ॥ २१ ॥

**तथा च सति**—

असें असेल तर किंवा तूं म्हणतोस तसें गृहीत धरिलें आहे ह्मणून—

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥२७॥**

**हि** (कारण) **जातस्य** ( जन्मास येणाऱ्या ) **मृत्युः** ( मरण ) **ध्रुवः**

( निश्चयानें–येतोच. ) **मृतस्य च** ( आणि मेलेलेल्याला ) **जन्म** ( जन्म ) **ध्रुवं** ( अवश्यच प्राप्त होतें. ) **तस्मात्** ( ह्मणून ) **अपरिहार्ये** ( न टाळतां येणाऱ्या, स्वभावतःच होणाऱ्या ) **अर्थे** ( गोष्टीसाठीं– स्वाभाविकच होणाऱ्या परिमाणाला ) **त्वं** ( तूं ) **शोचितुम्** ( शोक करण्यास ) **न अर्हसि** ( योग्य नाहींस. ) तात्पर्य जन्मापाठीमागें मृत्यु आणि मृत्युपाठीमागें जन्म हें चक्र सतत सुरू आहे. यापासून कोणीही–कर्ममार्गी–सुटला नाहीं.–आत्मा जन्मतो असें मानलेंस कीं तो मरतो असें तुला मानलेंच पाहिजे; ह्मणून अवश्यक रीतीनें होणाऱ्या ह्या गोष्टीबद्दल शोक करण्याचें कारण दिसत नाहीं.— अज्ञानी मनुष्याचें समाधान करण्यासाठीं हा श्लोक आहे.—

> जातस्येति । जातस्य हि लब्धजन्मनो ध्रुवोऽव्यभिचारी मृत्यु-
> र्मरणं ध्रुवं जन्म मृतस्य च, तस्मादपरिहार्योऽयं जन्मरणलक्षणोऽर्थ-
> स्तस्मिन्नपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

ज्याचा म्हणून जन्म झाला त्याला मृत्यु येणार हा सिद्धांत कधींही बाधित होत नाहीं. त्याचप्रमाणें मेला तो पुनः जन्माला यावयाचा ह्याही सिद्धांताला कधीं खंड पडत नाहीं. ह्मणून जन्ममरण प्राप्त करून घेणारी गोष्ट पुनः जन्ममरणाप्रत पावणार हें अपरिहार्य आहे,—हें ब्रह्मदेवासही चुकावयाचें नाहीं —मग तुला शोक करण्याचें प्रयोजन काय ?

**मधुसूदन, श्रीधर, द्विवेदी**:—' प्रारब्ध कर्माचा क्षय झाला ह्मणजे मृत्यु येतो आणि त्या देहामध्यें असतांना केलेल्या कर्मामुळें पुनः जन्म प्राप्त होतो ' असा शास्त्रनियम सांगतात. **मधुसूदनीकार**:—अध्याय ११ श्लोक ३२ मध्यें ' तुझ्याशिवाय कोणीच जिवंत राहणार नाहीं ' या श्लोकान्वयें स्वतःच्या कर्मानें ते आधींच मेले आहेत, तुला शोक करण्याचें कारण नाहीं, असें प्रतिपादन कारितात. व धर्म्ययुद्धामध्यें हिंसा झाली तरी पाप लागत नाहीं यास शास्त्राधार देतात.

**शंकरानंद**:—जन्ममृत्यूला दिवस आणि रात्रीची उपमा देतात. उपमा सरस आहे. ज्ञानेश्वर रहाटगाडग्याची उपमा देतात.

**रामानुजः**—' द्रव्याला उत्पत्तिविनाश असतात हें सिद्ध करून शून्य-वाद्यांचें खंडन कारितात. ॥ २७ ॥

कार्यकरणसंघातात्मकान्यपि भूतान्युद्दिश्य शोको न युक्तः कर्तुं, यतः—

कार्य आणि कारण यांच्या व्यापाराला वश असणारीं जीं शरीरादिक भूतें त्यांचा विचार केला असतांही शोक करण्याचें कारण दिसत नाहीं; कारणः—

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ॥**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

**भारत** (हे अर्जुना!) **भूतानि** (आत्मा नाहींत अशीं सर्व दृश्य द्रव्यें) **अव्यक्तादीनि** (अव्यक्त, अदृश्य, वस्तू आहे ज्यांच्या प्रारंभीं अशीं—आहेत.) **व्यक्तमध्यानि** व्यक्त—दृश्य—आहे मध्य स्थितींत ज्याच्या अशीं--आहेत. )--आणि--**अव्यक्तनिधानानि एव** (अदृश्यच आहे ज्यांच्या शेवटीं अशीं--आहेत. ) **तत्र** (तेथें) **परिदेवना** (शोक) **का** (कसला?) तात्पर्य हें आहे कीं, दृश्यस्वरूपानें—नामरूपमात्र--असणारीं हीं सर्व देहादिक द्रव्यें अदृष्ट अशा मायाविशिष्टब्रह्मापासून उत्पन्न झालीं आहेत, पुनः तीं सर्व त्याच ब्रह्मामध्यें लय पावणार, कांहीं काळपर्यंत मात्र तीं दृश्य आणि म्हणून स्पष्टरूपानें भासतात; अशी जर वस्तुस्थिति आहे तर शोक करण्याचें कारण काय? तूं कां रडतोस? जेथून आलें तेथेंच गेलें, तर रडण्याचें कारण नाहीं हें तुला समजावें.—

अव्यक्तादीन्यव्यक्तमदर्शनमनुपलब्धिरादिर्येषां भूतानां पुत्रमित्रादिकार्यकरणसंघातात्मकानां तान्यव्यक्तादीनि भूतानि प्रागुत्पत्तेः । उत्पन्नानि च प्राङ्मरणाव्द्यक्तमध्यानि । अव्यक्तनिधनान्येव पुनरव्यक्तमदर्शनं निधनं मरणं येषां तान्यव्यक्तनिधनानि । मरणादूर्ध्वमप्यव्यक्ततामेव प्रतिपद्यन्त इत्यर्थः । तथा चोक्तम्—

'अदर्शनादापतितः पुनश्चादर्शनं गतः ।
नासौ तव न तस्य त्वं वृथा का परिदेवना । " इति । तत्र का परिदेवना को वा प्रलापोऽदृष्टदृष्टप्रनष्टभ्रान्तिभूतेषु भूतेष्वित्यर्थः ॥ २८ ॥

ज्यांच्या प्रारंभी—ज्यांच्या जन्म होण्याच्या अगोदर -अव्यक्त, अदर्शन किंवा अप्रत्यक्षता आहे,—म्हणजे, जन्माच्या अगोदर जीं अस्पष्ट स्थितींत असल्यामुळें स्वरूपवंत नसतात व ह्मणून प्रत्यक्ष होत नाहींत--अशीं कार्य कारणांच्या संघातानें स्वरूपास पावणारीं पुत्रमित्र कलत्रादि शरीरें जन्माच्या पूर्वी अस्पष्ट अस-

तात. हीं शरीरें उत्पन्न झाल्यापासून तों मरणकालपर्यंत मात्र स्पष्टरीतीनें दिसतात. आणि पुनः अव्यक्त किंवा अस्पष्टता हाच शेवट ह्मणजे मरण ज्यांचें अशीं हीं शरीरें होत. सारांश मरणानंतर तीं पुनः अव्यक्त स्थितींतच जातात. ह्मटलें आहे "ज्याचें स्वरूप दिसत नाहीं त्या अदृश्यापासून आला आणि पुन. अदृश्य स्थितींला गेला. म्हणून तो तुझा कोणी नव्हे आणि तूंही त्याचा नव्हेस. मग तो गेला. म्हणून रडतोस कां ?' सारांश दिसत नाहीं, समजत नाहीं अशा स्थितींतून येणारीं, कांहीं दिवस दिसणारीं आणि पुनः अदृश्य होणारीं जीं हीं शरीरें आहेत यांच्यासाठीं तूं कां रडत बसला आहेस ?—आचार्यांचें म्हणणें थोडक्यांत असें आहे! हीं शरीरें कोठून येतात हें ठाऊक नाहीं, शेवटीं जातात कोठें हेंही माहित नाहीं, मध्यें मात्र थोडा वेळ असतात, तेव्हां असल्या क्षणभंगुर शरीरांसाठीं शोक करण्याचें कारण नाहीं.

**मधु०**—सर्वव्यापी असणारें जें आकाश त्याचाही अंत होतो, मग इतर कार्यांची काय कथा ? 'ज्याचें होतें त्यानें नेलें । इथें कोणाचें काय गेलें ॥ ?' याप्रमाणें अव्यक्तानें दिलेलें अव्यक्तानें परत नेलें यांत शोक करण्याचें काय कारण आहे ?

'Deth is the debt we owe to nature'(मरणें ह्मणजे सृष्टीचें जें आपण देणें लागत होतो तें परत करणें होय ') हें इंग्रजी वाक्य तरी हाच अर्थ प्रकट करितें. 'स्वप्नांत मिळालेल्या द्रव्यनाशाचा शोक करीत नाहीं, त्याचप्रमाणें या थोरल्या स्वप्नांत (जिवंत असतांना) मिळालेली वस्तू नाहींशी झाली ह्मणूनही शोक करूं नये असें-- **श्रीधरस्वामी** व **शंकरानंद** म्हणतात. "**यथा स्वप्नप्रपञ्चोऽयं मयि मायाविजृंभितः। तथा जाग्रत्प्रपञ्चोऽयं मयि मायाविजृंभितः।**' याचाही तोच अर्थ आहे. म्हणून शंकरानंद म्हणतात कीं खोट्या गोष्टीसाठीं संताप करून घेणें योग्य नाहीं. अव्यक्त म्हणजे नामरूप ज्याला नाहीं तें.

**शंकरानंद** स्वामींनीं या श्लोकाचा दुसरा अर्थ केला आहे. अव्यक्त म्हणजे ब्रम्ह; कारण कोणत्याही प्रमाणानें तें व्यक्त होत नाहीं. तें ब्रम्ह न

समजल्यामुळें ज्यांचा जन्म होतो तीं भूतें (शरिरें) होत. व्यक्त म्हणजे अंतःकरण आहे मध्य स्थितींत ज्यांच्या अशीं तीं शरीरें आहेत. अंतःकरणाला जोंपर्यंत ब्रह्मज्ञान झालें नाहीं तोंपर्यंतच जातीभेद लिंगभेद, माझें, तुझें हे भेद असतात. '**मनोवृत्तिमयं द्वैतमद्वैतं परमार्थतः**' मूळचें अद्वैतच. मनानें मात्र द्वैत उत्पन्न केलें आहे.) तें मन स्वस्वरूपीं लागलें ह्मणजे ब्रह्ममय होतें. मग सर्वकाल ब्रह्मच. या वेळीं कसला शोक?

**प्रो० द्विवेदी** यांनीं–'**आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा**' जें आदिकालीं नव्हतें व अंतकालींही असणार नाहीं, ते वर्तमानकालींसुद्धां नसल्याप्रमाणेंच आहे. सारांश ज्याला जन्ममृत्यू आहे तें असत्य आहे.' **गौडपादाचार्यांचें** वाक्य उद्धृत केलें आहे. याच अर्थाचा पंचदशींतीलही एक श्लोक ते देतात.

**ज्ञानेश्वरींतील** दृष्टांत मात्र घेतोंः—धेर (दुसरें) मध्यें जें प्रतिभासे। तें निद्रिता स्वप्न जैसें। तैसा आकार हा मायावशें। सत्स्वरूपीं। नातरी पवनें स्पर्शिलें नीर। पढियासे (भासे) तरंगाकार (लाटरूप)। कां परापेक्ष (दुसऱ्याचे जिवावर होणारे) अलंकार। व्यक्ती कनकीं॥ तैसें सकळ हें मूर्त। जाण पा माया करीत। जैसें आकाशीं बिंबत। अभ्रपटळ॥ तैसें आदीचि जें नाहीं। तयासाठीं तू रुदसी कायी?। तूं अवीट (न विटणारें ब्रह्म) तें पाही। चैतन्य एक॥

पंडितांनीं या श्लोकावर बहार केली आहे! एक दोन ओंव्याच घेतों. मूळ पहावेंः—

आपुला अर्थ जातां मना। शोक वाटो, ये अर्जुना! परावा ने आपुल्या धना। धनंजया! का शोक त्याचा?॥....अरे हीं सकल भूतें। पंचभूतांश निश्चितें। तीं अहंकाराचीं, त्यातें। उत्पन्न करी महत्तत्व॥ त्या महत्तत्वाची उत्पत्ति। ज्यापासूनि ते मूळप्रकृती। तें अव्यक्त, कीं नसे व्यक्ति। मूळ, प्रकृतीला॥....एवं अव्यक्तीं सकल लय। मरण नव्हे तो तों प्रलय। मरणार तों पंचभूतीं भूतलय। होतां, काय काज आपुलें?॥....देखोनि धन आरसींचें (आरशांतील)। झुरे, आणि निजधन साचें। जें प्रकाशक मानसाचें। तें न पाहे!॥....! जें धन सोडितां सुटेना। तें निज धन तोडितां तुटेना। जें निज धन फोडितां फुटेना। अरे! अनुभवाचें तें धन॥२८॥

दुर्विज्ञेयोऽयं प्रकृत आत्मा किं त्वामेवैकमुपालभे साधारणे भ्रान्तिनिमित्ते । कथं दुर्विज्ञेयोऽयमात्मेति। आह–

अरे ! हा वादविषयक आत्मा समजायला अत्यंत कठिण आहे. सर्वांसच हा विषय भ्रांति उत्पन्न करणारा आहे, त्यांत तुला एकटयालाच काय दोष देऊं ?

**अर्जुन**—कशावरून ? हा कसा समजावयाला कठिण आहे ?

**कृष्ण**—सांगतों ऐक.

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन-**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ॥**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति**
**श्रुत्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥**

**कश्चित्** ( कोणीएक ) **एनं** ( ह्या आत्म्याला ) **आश्चर्यवत्** ( आश्चर्य आहे ज्यामध्यें असें ) **पश्यति** ( पाहतो ) **तथैव** ( त्याचप्रमाणें ) **अन्यः** ( दुसरा कोणी ) **आश्चर्यवद्वदति** ( मोठी आश्चर्यकारक ही वस्तु आहे असें बोलतो ) **अन्यः** ( तिसरा ) **एनं** ( ह्या आत्म्याला ) **आश्चर्यवत्** ( मोठी आश्चर्याची गोष्ट आहे असें ) **शृणोति** ( ऐकतो) **च** ( आणखी ) **श्रुत्वाऽपि** ( ऐकून सुद्धां ) **कश्चित् एव** ( कोणीही ) **एनं** ( ह्या आत्म्याला ) **न वेद** ( जाणिलें नाहीं ) तात्पर्य असें आहे कीं, आत्म्या ही आश्चर्यकारक गोष्ट ह्मणून पाहतात, बोलतात, ऐकतात, पण इतकें सर्व करूनही तो कोणासच समजला नाहीं.

आश्चर्यवदिति । आश्चर्यवदाश्चर्यमदृष्टमद्भुतमकस्माद्दृश्यमानं तेन तुल्यमाश्चर्यवदाश्चर्यमिवैवमात्मानं पश्यति कश्चित् । आश्चर्यवदेनं वदति तथैव चान्यः । आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वा दृष्ट्वोक्त्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् । अथ वा योऽयमात्मानं पश्यति स आश्चर्यतुल्यो यो वदति यश्च शृणोतिसोऽनेकसहस्रेषु कश्चिदेव भवति । अतो दुर्बोध आत्मेत्यभिप्रायः ॥ २९ ॥

आश्चर्य ह्मणजे तें होय कीं जें आपण कधींही पाहिलेलें नसतें किंवा

अपूर्व असतें किंवा अकस्मात् आपल्या दृष्टीस पडतें.—सारांश सामान्य व्यवहारांत ज्याचा प्रत्यय येत नाहीं, तें आश्चर्यकारी होय. त्या आश्चर्यकारक गोष्टीसारखें असतें तें आश्चर्यवत् होय. ह्याप्रमाणें आत्मा ही आश्चर्यकारक गोष्ट आहे असें कोणास दिसतें. तसेंच दुसरा कोणी 'आत्मा ही आश्चर्यकारक गोष्ट आहे असें सांगत असतो. तिसरा 'काय हें आश्चर्य?' असें ह्मणून आत्म्याचें वर्णन ऐकत असतो. पण ऐकून, पाहून, बोलून देखील तो आत्मा कोणास समजत नाहीं!--हें केवढें आश्चर्य?--सारांश आत्मा ही न दिसणारी वस्तु आहे असें समजून प्रेक्षक तिच्याकडे आश्चर्यानें पाहत असतो, वाचेला अगोचर आहे असें ह्मणून आत्म्याचें आश्चर्यकारी वर्णन दुसरा देत असतो! ज्याच्या सत्तेनें ऐकण्यास येतें पण जो ऐकायला येत नाहीं असें आत्म्याचें स्वरूप समजून त्याचें आश्चर्यकारक स्वरूप तिसराच एक ऐकत असतो! पण जो अरूप, जेथून वाणी परत फिरते, जो ऐकावयाला येत नाहीं, तो इंद्रियांनीं पाहणाऱ्या, ऐकणाऱ्या व बोलणाऱ्या लोकांस--तो गोचर होत नाहीं यांत काय आश्चर्य आहे? अथवा शहाणे लोक आत्म्याला डोळ्यांनीं पहावयाला जातात हें केवढें आश्चर्य आहे?--आचार्य म्हणतातः--अथवा ज्या पुरुषाला वर सांगितलेला आत्मा स्वानुभवानें पहावयास ऐकावयास व बोलावयास सांपडला तो मूर्तिमंत आश्चर्य होय. कारण शेंकडों हजारांमध्यें असला स्वानुभवी पुरुष एखादा सांपडला तर भाग्यच होय! सारांश आत्मज्ञान होणें व आत्मानुभव येणें फार दुर्लभ आहे असा अभिप्राय आहे.—भगवान ७ व्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकांत हाच अभिप्राय पुनः दृढ करितील.

**मधु०**—आश्चर्यवत् याचा कर्त्याकडे, कर्माकडे आणि क्रियेकडे संबंध लाविला असतां तीन अर्थ होतात. पहिला अर्थ आचार्यांच्या दुसऱ्या अर्थाप्रमाणेंच आहे. मात्र आत्मज्ञ पुरुष व्यवहारामध्यें अज्ञ माणसासारखेंच कर्म करितो हेंही आश्चर्यच आहे असा अर्थ जास्त निघतो. (२) दुसरा अर्थ आचार्यांच्या पहिल्या अर्थासारखा आहे. आश्चर्य यासाठीं कीं आत्मा दिसत नसतांनाही 'असतो' असें ज्ञानी लोक ह्मणतात. (३) अव्यक्त असून व्यक्तास (पदार्थांस) प्रकाशित करणें, मायेपासून जन्म घेऊन मायेचा नाश करणें व निवळीप्रमाणें आपला नाश करणें ही आत्मज्ञानाची आश्चर्यकारक करणी आहे.

**रामा०**—मोठी तपश्चर्या केल्यामुळें ज्यांचीं पापें नष्ट झालीं व पुण्यसंचय झाला त्यांस आत्मावलोकनाचें सामर्थ्य येतें. कर्मक्षय केल्याशिवाय आत्मानुभव येणार नाहीं असें ह्मणणाऱ्या सिद्धांतवाद्यांस रामानुजाचार्यांचें वरील ह्मणणें अयुक्त वाटेल.

**मध्व०**—हा श्लोक ईश्वरपर लावितात. **सत्यानंदस्वामी** तर ईश्वर व जीव अगर बिंबप्रतिबिंबाकडे लावितात. ईश्वर बिंब आणि जीव हें प्रतिबिंब होय.

**शंकरा०--एनं=आत्मान=कूटस्थासंगचिद्रुपं, अद्वयं, अखंडानंदैकरसं'** 'आत्मा हा पदार्थाच्या अंतर्यामीं राहणारा, असंग, अद्वितीय, सर्वदा शुद्धानंदी असा आहे म्हणून आश्चर्य !

**प्रो० चांदोरकर व प्रो० द्विवेदीः**—कठोपानिषदांतील एक मंत्र ह्या श्लोकाचे समर्थनार्थ घेतात. " **श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः । शृण्वन्तोपि बहवो यं न विद्युः आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा । आश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः** " जो अनेक लोकास ऐकावयासही येत नाहीं, ऐकणारे अनेक लोकांपैकीं पुष्कळांस जो समजला नाहीं, त्या आत्म्याचें वर्णन करणारा अपूर्वच, अद्भुत गोष्टींप्रमाणें दुर्मिळच होय. तो आत्मा ज्याला सांपडला असा निपुण पुरुष क्वचितच आढळतो. कुशल आचार्यापासून वेदांताचें अध्ययन केलेला असा अनुभवी पुरुष एखादाच आढळतो. ह्मणून आश्चर्य !' वादविषयक श्लोक आणि वरील मंत्र हे समानार्थकच नाहींत असें कोण ह्मणेल ? सारांश आत्मज्ञान हें सर्वत्र आश्चर्यकारकच आहे आणि ज्यांचें कर्म आटपलें आहे, तेच लोक ब्रह्मज्ञानास अधिकारी आहेत.

**ज्ञानेश्वरांनी** प्रतिपादन केलें आहे कीं ज्यानें आत्मा पाहिला, किंवा ऐकला, किंवा जे आत्मभजनीं लागले ते पुन संसाराकडे परत येत नाहींत. कारण आत्मस्वरूप इतकें मनोहरच आहे. शेवटीं ह्मणतातः—जैसे सरिता ओघ समस्त। समुद्रामाजीं मिळत। परी मावौत ( माघारे ) न समात ( न मावतां ) । परतले नाहीं ॥ तैसिया योगीश्वरांच्या मतीं । मिळणीसवें ( मिळाल्याबरोबर ) एकवटती। परी जे विचारूनी पुनरावृत्ती। भजतीच ना ( पावतच नाहींत.)—

**वामनपंडितांनीं** विवेचनाची दिशा निराळीच घेतली आहे. त्यांची एक ओंवी मासल्यासाठीं घेतों. पंडितांचें विवेचन मनन करण्यास योग्य आहे.—

अनादि ज्याचा स्नेह । त्यास ह्मणत होता देह । तो सर्वदा असे विदेह ! । आश्चर्य हें ! ॥ एक देहच आपण । मानी धरूनि मीपण ! । त्यास सर्वत्र देखे ! निपुण । आश्चर्य हें– ॥ २९ ॥

अथेदानीं प्रकरणार्थमुपसंहरन्ब्रूते—

असो; यानंतर प्रस्तुतच्या प्रकरणाचा उपसंहार करून ह्मणतात.

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ॥**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि॥३०॥**

**भारत** ( भरतकुलोत्पन्ना अर्जुना ! ) **सर्वस्य** ( सर्वांच्या ) **देहे** ( शरीरामध्यें ) **देही** ( देह धारण करणारा, देहांतर्यामी असणारा ) **नित्यं** ( नेहमीं ) **अयं** ( हा आत्मा ) **अवध्यः** ( न मारण्यासारखा, न मरणारा )—आहे. **तस्मात्** ( म्हणून ) **सर्वाणि** ( सर्व ) **भूतानि** ( चराचर मात्रासंबंधें ) **त्वं** ( तूं ) **शोचितुं** ( शोक करण्यास ) **न अर्हसि** ( योग्य नाहींस. )—सारांश सर्व चराचर पदार्थांमध्यें राहून कधींहि न मरणारा असा हा आत्मा आहे. ह्मणून प्रत्येक पदार्थ नष्ट होण्याचे वेळीं शोक करणें तुला उचित नाहीं. सर्व विश्वंभर स्वस्वरूपाच्या स्थितीमध्यें राहून अनादि व अनंत असा आत्मा आहे; तेव्हां आत्म्याविषयीं कोणत्याही प्रकारचा शोक—कितीही प्राणी आले गेले तरी करणें शक्य नाहीं व म्हणून योग्यही नाहीं.

*सर्वस्य प्राणिजातस्य देहे वध्यमानेऽप्ययं देही न वध्यो यस्मात्तस्माद्भीष्मादीनि सर्वाणि भुतान्युद्दिश्य न त्वं शोचितुमर्हसि ॥३०॥

सर्व प्राणीमात्रांचे देह नष्ट झाले तरी आपण स्वतः नष्ट होत नाहीं म्हणून

---

* हा मजकूर आनंदाश्रमांतील 'श्रीमद्भगवद्गीतेचें' पुस्तकांत वर घेतला नाहीं. परंतु इतर प्रतींत आढळतो, सबब तो खालीं घेतला आहे.

**" देही शरीरी नित्यं सर्वदा सर्वास्ववस्थास्ववध्यो निरवयवत्वान्नित्यत्वाच्च ॥ तत्रावध्योऽयं देहे शरीरे सर्वस्यसर्वगतत्वात्स्थावरादिषु स्थितोऽपि "**

देह धारण करणारा हा आत्मा स्वतः नित्य आणि निरवयव असल्यामुळें कोणत्याही अवस्थेमध्यें याचा नाश होत नाहीं. असा हा सर्वव्यापी आणि म्हणून सर्व चराचर पदार्थांच्या अंतर्यामीं राहणारा सुद्धां आत्मा.–

भीष्मादि सर्व प्राण्यांच्या संबंधानें शोक करणें तुला योग्य नाहीं. कारण सर्व प्राणी मेले तरी आत्मा कायमच राहणार आहे.—

**मधु०**—देही म्हणजे लिंगदेहाचा उपाधि ज्याला आहे असा आत्मा! स्थूल देह मरणारच, तेव्हां जी गोष्ट अवश्य होणार तिचा शोक करणें उचित नाहीं; आणि लिंगदेह तर आत्म्याप्रमाणेंच अवध्य आहे. म्हणून लिंगदेहाविषयींही शोक करणें योग्य नाहीं. सारांश स्थूलदेह, लिंगदेह अगर आत्मा या कोणाविषयींच शोक करणें योग्य नाहीं! मधुसुदनीकारांनीं हें लिंगदेहाचें प्रकरण कां उपस्थित केलें आहे हें समजत नाहीं!

**रामानु**—देवांपासून तों स्थावरापर्यंत जीं कांहीं चराचर द्रव्यें आहेत तीं आकारवैषम्यानें भिन्न वाटतात, तथापि मागें द्रव्यांचे जे स्वभाव सांगितले आहेत त्यांवरून तीं सर्व समान असून नित्य आहेत. वैषम्य अनित्य आहे. मग वैषम्याविषयीं शोक कां?

**सत्या०**—'ईश्वरच सर्वत्र भरला आहे, तेव्हां शोक कां करितोस?'

**शंकरानं०**—'आपलें जसें प्रारब्ध असेल, ज्या कर्माच्या योगानें आपल्यास शरीर मिळालें असेल, त्या कर्मावर जगणें अगर मरणें हें अवलंबून असल्यामुळें या शरीराविषयीं आपण हर्षशोक वगैरे कां करावे?' 'पुनः जर आपल्यास जन्म नको असेल तर शरीरपोषणासाठीं सुद्धां आपल्यास कर्म करितां उपयोगी नाहीं.'! कर्मापैकीं कांहीं भाग प्रारब्धाच्या वांट्यांस जातो त्या योगानें जन्म प्राप्त होतो असें आमच्या लोकांचें म्हणणें आहे या म्हणण्याचा विचार कर्मयोगांतच करूं.

**प्रपाकार**—'**सर्वे प्राणाः सर्वे लोकाः सर्वे देवाः सर्वाणि भूतानि सर्व एतदात्मनो व्युच्चरन्ति**' ( बृहदारण्यकोपनिषत् ). सर्व प्राण, सर्व लोक, सर्व देव, सर्व भूतें, सारांश यच्चयावत् सर्व भूतें ह्या एका आत्म्यापासून उत्पन्न होतात.—व आत्म्यांतच लय पावतात.—तेव्हां शोकाचें कारण नाहीं.— **ज्ञानेश्वरांचें** असेंच म्हणणें आहे. **वामनपंडित** उपसंहार करितात. एवं मिथ्या भूतगणें। मिथ्या मारणें, मिथ्या मरणें। म्हणोनि शोका न करणें। पाहणें आत्मा पूर्वोक्त ॥ पंडित पुढील श्लोकाचें अवतरण कसें करितात पहा:— संदेह ( अर्जुनाचा संशय ) गेला सकळ। परी कृपा उरली पुष्कळ। या कारणें मेघनीळ। उपदेशितो हा श्लोक ॥ ३० ॥

इह परमार्थतत्त्वापेक्षायां शोको मोहो वा संभवतीत्युक्तं, न केवलं परमार्थतत्त्वापेक्षायामेव किंतु—

—याप्रमाणें—आतांपर्यंत परमार्थतत्त्वानुसंधानानें विचार केला असतां शोक किंवा मोह संभवत नाहीं, उत्पन्न होऊं शकत नाहीं असें सांगितलें. शोकमोह हे, परमार्थ तत्त्वें समजलीं ह्मणजेच संभवत नाहींत असें नव्हे तर—

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ॥**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥**

**च** (आणखी) **स्वधर्मं** (आपला क्षत्रियाचा धर्म) **अपि** (ही) **अवेक्ष्य** (लक्षांत घेऊन—सुद्धां—) **विकम्पितुं** (कंपित होण्यास) **न अर्हसि** (योग्य नाहींस) **हि** (कारण) **धर्म्यात्** (धर्मांमध्यें सांगितलेल्या) **युद्धात्** (युद्धावांचून, युद्धाशिवाय, धर्मयुद्धाशिवाय) **क्षत्रियस्य** (शस्त्रधारण करणाऱ्या क्षत्रियाला) **अन्यत्** (दुसरें) **श्रेयः** (कल्याण) **न विद्यते** (नाहीं.) तूं आपला क्षत्रियाचा धर्म पाहिलास तरी, स्वधर्मानुसार विचार केलास तरी, तुला येथें कृपेनें किंवा भीतीनें कांपण्याची जरूरी नाहीं. कारण क्षत्रियाला धर्मयुद्धाशिवाय पुण्यसंपादक असें दुसरें साधनच नाहीं.

स्वधर्ममिति । स्वधर्ममपि स्वो धर्मः क्षत्रियस्य युद्धं तमप्यवेक्ष्य त्वं न विकम्पितुं प्रचलितुं नार्हसि, स्वाभाविकाद्धर्मादात्मस्वाभाव्यादित्यभिप्रायः । तच्च युद्धं पृथ्वीजयद्वारेण धर्मार्थं प्रजारक्षणार्थं चेति धर्मादनपेतं परं धर्म्यं तस्माद्धर्म्याद्युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते हि यस्मात् ॥ ३१ ॥

क्षत्रियाचा धर्म युद्ध करण्याचा आहे. तो पाहून तर, तो शास्त्रपूर्वक लक्षांत आणून तर, तुला येथून हालतांच येत नाहीं, अगर घाबरतां येत नाहीं—किंवा युद्ध हिंसाजनक आहे असें ह्मणतां येत नाहीं.—हें तुझें स्वाभाविकच कर्तव्यकर्म आहे; कारण तुझा जन्मच क्षत्रियकुलांत झाला आहे. शिवाय हें युद्धही सत्कर्ममूलक आहे. कारण या युद्धानें धर्माचें व प्रजेचें

संरक्षण होणार आहे--दुर्योधनादि दुष्टांचा संहार झाला ह्मणजे पृथ्वीवर धर्मराज्य होईल व तेणेंकरून प्रजेचें रक्षणही होईल ह्मणून हें युद्ध धर्म्य आहे, धर्मविहित आहे. शिवाय तुला हें माहीतच आहे कीं, धर्मविहित युद्धां-वांचून क्षत्रियाला खरा पुरुषार्थ साध्य होणार नाहीं, नुसता स्वर्ग सुद्धां मिळ-णार नाहीं--सारांश हल्लींचें युद्ध शास्त्रोक्त असून तेणेंकरून धर्मसंरक्षण व संतानवृद्धि होणार आहे. क्षत्रियाचें हेंच कर्म आहे. म्हणून शोकमोहांस वश होऊन आपलें कर्तव्यकर्म टाकून देणें हें तुला योग्य नव्हे:— ( शांतिपर्व आणि मनुस्मृति अध्याय १२ पहा. )

**मधु०**—'संसार मिथ्या असूनही उपाधींच्या योगानें खरा भासतो; हा अर्जुनाचा भ्रम नाहींसा करून भगवान आतां त्याचा विशेषभ्रम ह्मणजे युद्धांत हिंसा होईल, कुलक्षय होईल, पाप लागेल वगैरे— विशेषभ्रम ( अध्याय १ श्लोक ४४ वगैरे पहा. ) ह्या श्लोकांत शून्यवत् करितात. **पराशर** म्हणतात:—

**'क्षत्रियो हि प्रजां रक्षञ्शस्त्रपाणिः प्रदण्डवान् । निर्जित्य परसै-न्यानि क्षितिं धर्मेण पालयेत्' मनु--' संग्रामे त्वनिवर्त्यत्वं प्रजानां चैव पालनम् । शुश्रूषा ब्राह्मणानां च राज्ञः श्रेयस्करांपराम्'** अर्थ सामा-न्यतः एकच आहे कीं राजानें पळून न येतां शत्रुसैन्याचा पाडाव करावा आणि धर्मपूर्वक गोब्राह्मणांचा प्रतिपाल करावा. अध्याय १ श्लोक ३१ मध्यें अर्जुनानें पुरुषार्थ नाहीं असें म्हटलें त्याचेंही खंडन या श्लोकांत केलें आहे.

**प्रो० द्विवेदी**—येथपर्यंत सांगितलेला प्रज्ञावाद अर्जुनास कळला नसेल ह्मणून चित्तशुद्धीसाठीं कर्म सांगतात. समजला असेल तर देहाचें प्रारब्ध आहे, तोंपर्यंत धर्मकर्म केलें पाहिजे असें ह्मणून पुढील कर्म सांगतात.

**शंकरानंद**—ब्राह्मण चित्तशुद्धीसाठीं यज्ञयाग करितात, तसेंच क्षत्रियांनीं युद्ध करावें.

**सरकार**नामक एका वंगदेशस्थ विद्वच्छिरोमणीनें 'हिंदुलोकांची नीति' नामक एक अतिसुंदर पुस्तक लिहिलें आहे, त्यांत म्हटलें आहे 'नीतिदृष्ट्या चांगलें युद्ध कोणतें व वाईट कोणतें याचें तारतम्य भगवंतांनीं 'धर्म्य' या एका शब्दानेंच केलें आहे.'

**रामानुज व प्रपाकार.**--क्षत्रियानें युद्ध करावें याच्या समर्थनार्थ दोन श्रुति देतात. वरील स्मृतींशी समनार्थक आहेत ह्मणून येथें घेतल्या नाहींत.

**ज्ञानेश्वर.**—अर्जुना! तुझें चित्त। जरी झालें द्रवीभूत। तऱ्ही हें अनुचित। संग्रामसमयीं॥ अगा! गोक्षीर (गाईचें दूध) जऱ्ही जाहलें। तरी पथ्यासि नाहीं घेतलें। ऐसेनिही विष होय सुदलें (घातलें)। नवज्वरीं देतां!॥ तैसें आनीं आन कारितां (एकानें दुसरेंच केलें तर)। नाश होईल हिता। म्हणवूनि तूं आतां। सावध होई. ॥....जैसें मार्गेंचि चालतां। अपायो (अपाय) न पवे सर्वथा। कां दीपाधारें वर्ततां। नाडळीजे (अडखळत नाहीं ॥ तयापरी पार्था। स्वधर्में राहटतां। सकळकाम पूर्णता। सहज होय॥ दृष्टांत खासे आहेत कीं नाहींत?

कुतश्च तद्युद्धं कर्तव्यमिति। उच्यते--

अ०--हें युद्ध करावें, हें कर्तव्य आहे असें कशावरून?

श्रीकृष्ण--सांगतो ऐक.

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम्॥**
**सुखिनः क्षत्रियाःपार्थ लभन्ते युद्धमीदृशम्॥३२॥**

**पार्थ** (अर्जुना!) **ईदृशं** (अशा प्रकारचें) **इदृच्छया उपपन्नं** (आपोआप, आपण कांहींएक न करितां प्राप्त झालेलें, आपण उकरून काढलेलें नव्हे असें,--Detensive--) **च** (आणि) **स्वर्गद्वारं** (स्वर्गलोकांचे दरवाजे) **अपावृतं** (उघडले आहेत असें करणारें--हें--) **युद्धम्** (युद्ध) **सुखिनः** (भाग्यशाली) **क्षत्रियाः** (क्षत्रिय लोकच) **लभन्ते** (मिळवितात). सारांश, आपण कांहींएक कुरापत न काढितां उत्पन्न झालेलें आणि स्वर्गलोकचे दरवाजे उघडणारें हें असलें युद्ध करायला सांपडणें हें क्षत्रियाचें उत्तम भाग्य होय. भगवंतासच असलें युद्ध खेळायला सांपडेंत!—

यदृच्छयेति। यदृच्छया चाप्रार्थितयोपपन्नमागतं स्वर्गद्वारमपावृतमुद्घाटितं ये तदीदृशं युद्धं लभन्ते क्षत्रिया हे पार्थ, किं न सुखिनस्ते।

आपण प्रार्थना केल्याशिवाय, आपण बोलल्याशिवाय, प्राप्त झालेलें आगंतुक युद्ध हें स्वर्गाचीं द्वारें खुलीं करितें. ज्यांना असलें युद्ध सांपडतें ते क्षत्रिय सुखी, भाग्यवंत नव्हेत काय? अर्जुना! जय मिळाला तर पृथ्वी, मृत्यु आला तर स्वर्ग! असलें हें युद्ध आहे.

**मधु०**—कीर्ति, राज्यलाभ, राज्यसुख, स्वर्गसुख इत्यादिकांचें साधन हें युद्ध होय. अ० १ श्लो० ३७ मधील अर्जुनाची शंका येथें निवारण केली; ती अशी कीं, स्वजन हे आततायी, घोरकर्मं करणारे आहेत ह्मणून त्यांना मारणें अयोग्य होणार नाहीं आणि युद्ध करणें हा तर क्षत्रियधर्मच होय.

**रामानु०**—'अत्यंत सुखाचें साधन असें हें युद्ध आहे.'

**ज्ञाने०**—क्षत्रियें बहुत पुण्य कीजे। तैं झुंज ऐसें लाहिजे। जैसें मार्गें जातां आडळीजे ( आढळावें ) चिंतामणीसी ॥ नातरी जांभया पसरे मुख। तेथ अवचटे ( एकदम ) पडे पीयुख ( अमृत ) तैसा हा संग्राम देख। पातला असे ॥

**वामन**—उभय लोक पुरुषार्थां। हें युद्ध देणार गा पार्था!। हें न करितां अनर्था। पावसी म्हणुनि चौ श्लोकी (पुढें येणारे चार श्लोक) ॥ ३२ ॥

एवं कर्तव्यताप्राप्तमपि—

याप्रमाणें कर्तव्याच्या पदवीस हें युद्ध आलें असूनही—

## अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ॥
## ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥३३॥

**अथ चेत्** (यानंतर जर, असें असतांही जर) **त्वं** (तूं) **इमं धर्म्यं संग्रामं** (हें धर्मोक्त युद्ध) **न करिष्यसि** (करणार नाहींस) **ततः** (तर, त्यापासून) **स्वधर्मं कीर्तिं च हित्वा** (आपला क्षत्रियधर्म आणि शौर्याबद्दलची कीर्ति हरवून) **पापं** (पाप मात्र) **अवाप्स्यसि** (संपादन करून घेशील). ही लढाई केली नाहींस तर तुझा धर्म नाहींसा होईल, कीर्ति बुडेल, आणि पाप पात्र येऊन पदरांत पडेल!--

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं धर्मादनपेतं सङ्ग्रामं युद्धं न करिष्यसि चेत्ततस्तदकरणात्स्वधर्मं कीर्तिं च महादेवादिसमागमनिमित्तां हित्वा केवलं पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

आतां जर धर्मविहित आणि प्राप्त झालेलें युद्ध--तूं मोहानें किंवा अज्ञानानें करणार नाहींस तर तुझ्या औदासीन्यामुळें तूं क्षात्रधर्मापासून पदच्युत होशील व शंकराबरोबर सामना ठोकून तूं त्यांच्यापासून पाशुपतास्त्र मिळविलेंस ती

तुझी कीर्ति तुला सोडून जाईल आणि पापाला मात्र अधिकारी होशील.--कर्तव्य केलें नाहीं तर काय परिणाम होतो तो सांगण्यासाठीं पुढील चार श्लोकांची योजना आहे.—

**मधु० व प्रपा०**—अ. १ श्लोक ३१ मध्यें 'मला जय नको' आम्हांला पाप मात्र लागेल, वगैरे अर्जुनाच्या शंकांचा येथें प्रतिकार केला. '**धर्म्यं**'—हिंसा वगैरेंचा दोष लागत नाहीं असें. '**पापम्**' रणांतून पलायन केलें असतां लागणारें पाप. परलोकीं जाण्याच्या आड येतें तें पाप होय. '**राजा सुकृतमादत्ते हतानां विपलायिनाम्**'—रणांत मेल्यामुळें मुक्त झालेल्या लोकांचें शिल्लक राहिलेलें पुण्य व पळालेल्या लोकांचें पुण्य राजास मिळतें.!

**रामानुज—पापं**=नित्याकरणं; नित्यकर्म न करणें म्हणजे पाप.

**शंकरानंद**—तूं युद्ध केलें नाहींस तर तुला कर्मसंन्यासाचें पुण्य तर मिळणार नाहींच, पण कर्तव्यकर्म न केल्याचें पाप मात्र लागेल!

**सरकार—'अनुष्ठानं निषिद्धस्य त्यागो विहितकर्मणः'** 'शास्त्रानें निशिद्ध केलेल्या गोष्टी करणें आणि शास्त्राविहित गोष्टी न करणें ह्मणजे पाप होय.' महानिर्वाणतंत्र अ० १४ श्लोक १४।१९.

**ज्ञाने०**—जैसी भर्तारें हीन वनिता। उपहाती (अपमान) पावे सर्वथा। मग तैसी दशा जीविता। स्वधर्मे वीण॥ ना तरी रणीं शव सांडिजे। चौमेरी तें (चोहोंकडून) गिधीं (गिधाडांनीं) विदारिजे। तैसें स्वधर्महीना अभिभाविजे (त्रास दिला जातो,)। महादोषीं॥३३॥

न केवलं स्वधर्मकीर्तिपरित्यागः—

या योगानें स्वतःचा धर्म आणि स्वकीर्ति यांचाच केवळ त्याग होतो असें नाहीं तर—

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम्।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥३४॥**

**च** (आणि) **भूतानि** (प्राणीमात्र) **ते** (तुझी) **अव्ययाम्** (कधींही कमी न होणारी अशी--निरंतर असाही अर्थ होईल.--) **अकीर्तिम्** (अपकीर्ति)

**अपि** ( हीं ) **कथयिष्यन्ति** ( सांगत बसतील ). **च** ( शिवाय—आणखी असें ध्यानांत ठेव कीं—) **संभावितस्य** ( संभाविताला, शिष्ट पुरुषाला ) **अकीर्तिः** ( अपकीर्ति, अपमान ) ही-- **मरणात्** ( मरणापेक्षां )**अतिरिच्यते** ( जास्त असते--जास्त दुःख देते )--सारांश तूं स्वधर्मानें चालणार नाहींस तर तुझा लौकिक नष्ट होईल इतकेंच नाहीं,--तर सर्व प्राणीमात्र तुझी अपकीर्ति गात बसतील. आणि हा सामान्य अनुभव आहे कीं अपमान सोसणें हें श्रेष्ठ पुरुषाला मरणापेक्षांही जास्त संतापदायक होतें.

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति ते तवाव्ययां दीर्घकालाम् । धर्मात्मा शूर इत्येवमादिभिर्गुणैः । संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते । संभावितस्य चाकीर्तेर्वरं मरणमित्यर्थः ॥ ३४ ॥

सर्व लोक दीर्घकालपर्यंत तुझी 'आपला धर्म सोडून परधर्म स्वीकारलास अशी' अपकीर्ति सांगत बसतील. 'मोठा धर्मशील आहे, शूर आहे' अशा गुणांनीं नांवालौकिकास आलेल्या पुरुषाला अपकीर्तिपेक्षां मरण येणें हें जास्त इष्ट असतें.--लढला नाहींस तर तुझी अपकीर्ति होईल आणि ती तुला सहन होणार नाहीं हा भावार्थ होय. **'न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः'** ही चारुदत्तोक्ति समानार्थकच होय. 'Death deforc dishonor' (अब्रू जाण्यापूर्वीं मरण यावें' हें वाक्यही हाच अर्थ प्रकट करितें. अर्जुनाप्रमाणेंच आम्हांला हीं वाक्यें सात्त्विक बोध करूं शकतील काय ?

**वल्लभ**—'भूत' शब्दाच्या नपुंसकलिंगी प्रयोगावरून यःकश्चित माणसें-सुद्धां तुझी बेअब्रू करतील असें सुचविलें आहे. **मधुसूदनीकारांचें** व **रामानुजांचें**ही असेंच मत आहे.

**सरकार**—येथें केलेला उपदेश स्वार्थमूलक आहे हें खरें, पण तमोगुणाला वश होऊन अज्ञानानें स्तब्ध बसण्यापेक्षां कर्मफलाशेनें तरी कर्तव्य करणें इष्ट आहे, हें सांगण्याचा आशय आहे, असें सुचवितात.

**किंच—**

आणखी—

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ॥**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥**

**महारथाः** ( हजारों वीरांशीं एक एकट्यानें लढणारे महावीर ) **त्वां** (तुला) **भयात्** ( भय उत्पन्न झाल्यामुळें ) **रणात्** ( रणभूमींतून ) **उपरतं** ( तूं परत फिरलास असें ) **मंस्यन्ते** ( मानतील. ) **च** ( आणि ) **येषां** ( ज्या वीरांच्या ) **बहुमतो भूत्वा** ( आजपर्यंत सन्मानाला पात्र असणारा ) **त्वं** ( तूं ) **लाघवं** ( तुच्छतेला ) **यास्यसि** ( जाशील. ) सारांश मोठमोठे वीर म्हणतील कीं, अर्जुन भ्याला ह्मणून रणभूमींवरून पळून गेला! आजपर्यंत ज्यांनीं तुला बहुमान दिला, जे तुला चांगला असें ह्मणत आले, त्यांच्याच मतानें तूं यःकचित् आहेस असें ठरेल.—

भयादिति । भयात्कर्णादिभ्यो रणाद्युद्धादुपरतं निवृत्तं मंस्यन्ते चिन्तयिष्यन्ति न कृपयेति त्वां महारथो दुर्योधनप्रभृतयः । येषां च त्वं दुर्योधनादीनां बहुमतो बहुभिर्गुणैर्युक्त इत्येवं बहुमतो भूत्वा पुनर्यास्यसि लाघवं लघुभावम् ॥ ३५ ॥

तुझे दुर्योधनशकुनिप्रभृति पराक्रमी शत्रु असें समजतील कीं, तूं रणांतून परत फिरलास तें तुला आप्तइष्टांचा कळवळा आला म्हणून नव्हे, तर तूं कर्णादिकांस भ्यालास ह्मणून पळालास! 'तूं शूर, धीर, पराक्रमी आहेस' असें दुर्योधनादिक व भीष्मद्रोणादिक तुझ्या संबंधानें म्हणत आहेत, तेच लोक 'तूं तुच्छ' ह्मणून तुझी निंदा करूं लागतील; तूं त्यांच्या तिरस्काराला—आतांपासूनच—पात्र होशील.

**रामानुज**—'**लाघम्**' याचा अर्थ 'लवकर धरण्यास योग्य, नेभळा, असा करितात.

**प्रो० द्विवेदी**—द्रोणादिक तुला 'बायको' समजतील. कर्णदुर्योधनादिक तुझ्या बायलेपणाबद्दलची द्वाही फिरवितील ?

किंच—

आणखी पुनः

**अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यान्ति तवाहिताः**
**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम्॥३६॥**

**च** ( आणखी ) तव ( तुझें ) **सामर्थ्यम** ( सामर्थ्य, युद्धकौशल्य, परा-

क्रम यांचीं) **निन्दन्तः** ( निंदा करणारे, मत्सरदृष्टीनें बघणारे ) **तव** ( तुझे ) **अहिताः** ( शत्रु ) **बहून्** ( पुष्कळ ) **आवाच्यवादान्** ( बोलूं नये असें शब्द ) **वदिष्यन्ति** ( तुझ्या संबंधानें बोलतील. ) **ततः** ( त्यापेक्षां ) **दुःखतरं** ( जास्त दुःख देणारे **किम नु** ( काय आहे बरें ? ) तुझ्या पराक्रमाविषयीं ज्यांना मत्सर उत्पन्न झाला आहे असे तुझे शत्रु, नाहीं नाहीं त्या बातम्या पिकवितील. यापेक्षां जास्त तापदायक काय आहे ! कांहीं नाहीं. हेंच अत्यंत दुःखदायक आहे.

अवाच्यवादानिति । अवाच्यवादानवक्तव्यवादांश्च बहूननेकप्रकारान्वदिष्यन्ति तवाहिताः शत्रवो निन्दन्तः कुत्सयन्तस्तव त्वदीयं सामर्थ्यं निवातकवचादियुद्धनिमित्तम् । तस्मात्ततो निन्दाप्राप्तेर्दुःखादुखतरं नु किम् । ततः कष्टतरं दुःखं नास्तीत्यर्थः

निवातकवचादि राक्षसांचा तूं संहार केलास,---शंकरास युद्धामध्यें प्रसन्न केलेंस, इत्यादि तुझे पराक्रम पाहून खिन्न झालेल मत्सरयुक्त तुझे दुर्योधनकर्णप्रभृति शत्रु तुझ्या संबंधानें हजारों प्रकारचे कुतर्क काढून वाटेल तें बहकत सुटतील. तुझा कांहीं पराक्रम नसतां तुला उगीच्या उगीच कीर्ति मिळाली, बृहन्नटेचें काम करणें हेंच तुझें मूळचें स्वरूप असें बडबडत सुटतील.--असली निंदा झाल्यामुळें उत्पन्न होणारें दुःख--भीष्मादिकांच्या योग्य वधानें होणाऱ्या दुःखापेक्षां--अधिक तापदायक नाहीं काय ? या अपकीर्तीनें होणाऱ्या दुःखापेक्षां अधिक तापदायक असें दुसरें कोणतें दुःख आहे ? अर्थात् नाहीं हा भावार्थ आहे.--सारांश अर्जुन हा भीष्मादिकांच्या वधानें होणारी निंदा चुकवावयास पहात होता तों त्याच्या गळ्यांत शत्रूंची उग्र आणि अवास्तव निंदा पडेल असें भगवंतांनीं त्यास दाखविलें ! दोहींकडे त्यास पाशरज्जु आढळले, अथवा एकीकडे आड व दुसरीकडे विहीर असें झालें. **मधुसूदनीकाराचें** हें म्हणणें यथार्थ आहे. जोंपर्यंत अज्ञान आहे तोंपर्यंत शोक सुटत नाहीं. भगवंतास अर्जुनाला होणाऱ्या दुःखांचीं व शोकांचीं करणेंच नष्ट करावयाचीं होतीं. असो, येथें भगवंताचें वक्तृत्व कौशल्य दिसून येतें. त्यांनीं प्रथम अकीर्ति होईल म्हणून सांगितलें, नंतर अनादर होईल म्हणून सांगितलें आणि शेवटीं तुझ्या तोंडावर तुझी निंदा होईल ह्मणून सांगितलें. एकापेक्षां एक **वरचढ** असे

हेतु येथें आणले आहेत. याप्रमाणें, युद्ध न केलें असतां उत्पन्न होणारी दुःख-परंपरा व श्लोकचतुष्टयी आटपली.--॥ ३६ ॥

युद्धे पुनः क्रियमाणे कर्णादिभिः--

पुनः कर्णादिकांशीं युद्ध करीत असतां त्यांच्याकडून--

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

हतः वा (जर मेलास तर) **स्वर्गम्** (स्वर्गाप्रत) **प्राप्स्यसि** (प्राप्त करून घेशील, स्वर्गाला जाशील) **जित्वा वा** (तुला जय मिळाला तर) **महीम्** (पृथ्वी) **भोक्ष्यसे** (भोगशील, राज्यसुख भोगशील.) **तस्मात्** (म्हणून) **कौन्तेय** (हे कुन्तीपुत्रा अर्जुना!) **युद्धाय** (युद्धासाठीं) **कृतनिश्चयः** (केला आहे निश्चय ज्यानें असा) **उत्तिष्ठ** (ऊठ. तयार हो.) सारांश युद्धांत मेलास तर स्वर्गलोक मिळविशील, आणि जय मिळविलास तर पृथ्वीचें राज्यसुख भोगशील,--दोन्हीपक्षीं सुखच आहे. म्हणून युद्ध करावयाचें असा मनाचा निश्चय करून एकदम ऊठ.

हतो वेति। हतो वा प्राप्स्यासि स्वर्गं हतः सन्स्वर्गं प्राप्राप्स्यसि जित्वा वा कर्णादिन्शूरान्भोक्ष्यसे महीम्। उभयथाऽपि तव लाभ एवेत्यभिप्रायः। यत एवं तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयो जेष्यामि शत्रून्मरिष्यामि वेति निश्चयं कृत्वेत्यर्थः।

कर्णादिकांच्या कडून युद्धांत मेलास तर स्वर्गाप्रत जाशील अगर त्या शूर पुरुषांचा पराभव केलास तर पृथ्वीचें राज्य तुला मिळेल. दोन्ही बाजूंनीं तुला लाभच प्राप्त होणार आहे असा अर्थ आहे. असें आहे ह्मणून हे कुंती पुत्रा! शत्रूंस मारीन, किंवा मरेन'—असा मनाचा निश्चय करून युद्ध करण्यास तयार हो—प्रस्तुत अध्यायांतील सहाव्या श्लोकांत केलेल्या प्रश्नाला हें उत्तर आहे.—

**शंकरनंद०**—युद्ध केलें तर शिष्ट लोक निंदा करतील, नाहीं केलें तर शत्रु करतील! तेव्हां काय करावें असा अर्जुनास गळेपाश Dilemma पडला. श्रीकृष्ण ह्मणतातः—धर्म्ययुद्धाला शिष्ट लोक नांवें ठेवणार नाहींत, शत्रूंना

निंदा करण्याला सवड नाहींशीं होईल आणि पापही लागणार नाहीं. सुटला गळेपाश !

**द्विवेदी**—'तूं धर्माप्रमाणें चालून निष्कामकर्म ( युद्ध ) केल्यास चित्तशुद्धि होऊन मोक्ष मिळेल.

**प्रपा०**—युद्धांत मेलास तर स्वाराज्य ( स्वर्गाचें राज्य ) आणि जगलास तर साम्राज्य मिळेल.

**ज्ञानेश्वर**—देखे स्वधर्म हा आचरतां । दोष नासे असता ( असलेला ) तुज भ्रांती हे कवण चित्ता । पातकाची ॥ सांगे पूर्वेचि काय बुडिजे । कां मार्गीं जातां आढळीजे ( आपटावें ) परी विपायें ( कदाचित् ) चालों नेणिजे। तरी तेंही घडे ॥अमृतें तरीच मरिजे । जरी विषेंसी सेविजे । तैसा स्वधर्मी दोष पाविजे । हेतुकपणें ( इच्छा ठेवून केला असतां ) ॥ ह्मणोनि पार्था ! । हेतु सांडूनि सर्वथा । तुज क्षात्रवृत्ति झुंजतां । पाप नाही ॥३७ ॥

याप्रमाणें ' आत्मा अकर्ता आहे व आत्मा नित्य असून तोच सर्वव्यापी आहे ' हें ज्ञान अथवा स्वस्वरूपाचा स्वानुभव आणि ' आत्मा कर्ता आहे, भोक्ता आहे, आत्मे अनेक आहेत, कर्माप्रमाणें आत्म्यास सुखदुःख प्राप्त होतें ' हें अज्ञान ( ह्मणजे ज्ञानबुद्धि आणि कर्मबुद्धि ) निराळीं आहेत व त्यांच्यामध्यें अत्यंत विरोध आहे, उजेड आणि अंधकार यांमध्यें नित्य विरोध आहे, तसाच ज्ञान आणि कर्म यांमध्यें आहे. ह्मणून मुमुक्षूला उपदेश करितांना ' ज्ञान व कर्म एकत्र ठेवून मोक्ष मिळीव ' असें भगवान कधींही सांगणार नाहींत असा आचार्यांनीं सिद्धांत अगर असें गीतारहस्य प्रकट केलें आहे. इतर सर्व मार्ग वर्ज्य करून केवळ निष्कर्मस्वरूपी ज्ञानमार्गाचाच उपदेश भगवंतांनीं केला आहे असें आचार्यांचें ह्मणणें आहे.

या आचार्यांच्या प्रतिपादनाविरुद्ध अनेक आक्षेप घेण्यांत येतात. (१) अर्जुनास युद्ध करण्याचें कर्म करावयास ज्या गीतेनें प्रोत्साहन मिळालें, त्या गीतेचें रहस्य कर्मशून्य व ज्ञानपर कसें असेल ? (२) ज्या गीतेंत सात्विक भक्तिमार्गाचें विवरण सहा अध्यायामध्यें केलें आहे, त्या गीतेनें प्रबुद्ध झालेला अर्जुन हिंसापर युद्धकर्म करण्यास कसा प्रवृत्त झाला ? (३) गीता हा नीतिपर ग्रंथ आहे, व सर्वकालीं टिकणारी नीति आणि त्या नीति-वर प्रस्थापित होणारे सर्व धर्म गीतेंत अंतर्भूत होतात, असें शेवटच्या

षडाध्यायीवरून दिसतें, तेव्हां अर्जुनास शुद्ध नीतिपर व सार्वत्रिक धर्मपर उपदेश करणाऱ्या भगवंतांनीं आपला प्रिय शिष्य जो अर्जुन व सर्व मानव जाति या सर्वांस बंधुबांधवांची हत्या करणाऱ्या युद्धाकडे प्रवृत्ति कां केली, अशा अर्थाचे हे आक्षेप आहेत. या सर्वांवर यथास्थित उत्तर देणें हें सध्यांच्या प्रसंगीं अशक्यच होय. शिवाय गीतेमध्यें काय सांगितलें आहे त्याचें प्राथमिक आविष्करण मीं यथामति पहिल्या प्रस्तावनेंत केलेंच आहे. तथापि वर निर्दिष्ट केलेल्या शंकांचे समाधानार्थ आपल्या मताचें दिग्दर्शन या अध्यायाचे शेवटीं करीन इतकेंच येथें सांगून ठेवितों.

तत्र युद्धं स्वधर्म इत्येवं युद्ध्यमानस्योपदेशमिमं शृणु—

युद्ध करणें हा आपला स्वधर्म आहे असें म्हणून युद्धास तयार होणाऱ्या वीरास योग्य असा उपदेश ऐक.

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

**सुखदुःखे** ( सुखदुःख हीं दोन्हीं )—तसेंच--**लाभालाभौ** (लाभ व हानि ) आणि--**जयाजयौ** ( जय व अपजय )--हीं सर्व--**समे कृत्वा** ( एकच आहेत असें समजून ) **ततः** ( तदनंतर ) **युद्धाय युज्यस्व** ( युद्ध करण्याची सिद्धता कर, युद्ध करूं लाग. ) **एवं** ( याप्रमाणें ) **पापं न अवाप्स्यसि** (--तुला--पाप लागणार नाहीं. ) सारांश, सुख किंवा दुःख कांहीं झालें तरी मनास विकार होऊं द्यावयाचा नाहीं असा मनाचा निश्चय कर आणि नंतर युद्धास सुरवात कर.--आपलें कर्तव्य आहे ह्मणून युद्ध कर.--ह्मणजे तुला पापाचा संपर्कसुद्धां लागणार नाहीं.

सुखदुःखे इति । सुखदुःखे समे तुल्ये कृत्वा रागद्वेषावकृत्वेत्येतत् । तथा लाभालाभौ जयाजयौ च समौ कृत्वा ततो युद्धाय युज्यस्व घटस्व । नैवं युद्धं कुर्वन्पापमवाप्स्यसीत्येष उपदेशः प्रासङ्गिकः

अर्जुन—युद्ध केलें असतां गुरुवध होऊन पाप लागेल असें मीं प्रथम ( अ. १ श्लोक ३६ मध्यें ) म्हटलें होतें त्याची वाट काय ?

श्रीकृष्ण—अरे ! अर्जुन पापशंका तुझ्या मनांत राहिली आहे ? मित्र जगून शत्रु मेले किंवा मित्र मरून शत्रु जगले किंवा शत्रूचें धनसर्वस्व आपल्या हातीं

लागलें किंवा आपलें सर्वस्व शत्रूनें नेलें तरी दोन्ही गोष्टी समान मानून अथवा हर्षद्वेष न करितां शांत रहावें; त्याचप्रमाणें आपण शत्रूचा पराजय केला किंवा त्यानें आपला केला, तथापि हर्षविषाद मानूं नये, अशी मनाची तयारी करून ठेवून युद्धास सिद्ध हो. सारांश विकारशून्य मनानें व निष्कामबुद्धीनें कर्तव्य कर, याप्रमाणें स्वकर्तव्य जें युद्ध तें केलें असतां तुला बिलकुल म्हणून पाप लागावयाचें नाहीं--स्वतःचा लोभ सोडून कर्तव्य केलें असतां पाप लागणें संभवनीयच नाहीं--असो हा उपदेश केवळ पुढें येऊन उभें राहिलेलें कर्तव्य करण्यापुरताच आहे. ज्ञान आणि कर्म यांचा येथें समुच्चय झाला आहे व ज्ञानी पुरुषास कर्म करणें अवश्य आहे, असा या श्लोकांतून अर्थ काढणें शक्य नाहीं.

**श्रीधर**—जय मिळाला असतां लाभ व लाभानंतर सुख अशी कारणपरंपरा या श्लोकांत दाखवितात.

**रामानुज—' पापम् '** म्हणजे दुःखरूपी संसार असा अर्थ करितात. अर्थात हा अर्थ घेतल्यास स्वकर्तव्य केल्यावर ज्ञानी अर्जुनास मोक्ष मिळणार असें सुचवितात. हाच ज्ञान कर्मांचा समुच्चय !

**सत्या०—' समे '** लक्ष्मीसहित हरीचे ठायीं आहे कीं नाहीं पांडित्य !

**शंकरानंद**ही याचा अर्थ ' माझ्या ' भक्तीनें विधिविधेय होऊन असा करितात.

हा वेळपर्यंत ह्मणजे ११ व्या श्लोकापासून ते १८ व्या श्लोकापर्यंत भगवंतांनीं अर्जुनास सांख्यविचार अगर आचार्यांचे मताप्रमाणें आत्मानात्मविचाराचा प्रथम भाग सांगितला. आत्मा अमर आहे व सर्वकालीन आहे, स्थूल देहापासून भिन्न आहे म्हणून देहाचे वृद्धतारुण्यादि कोणतेही विकार त्या आत्म्याला होत नाहींत असें बाराव्या व तेराव्या श्लोकांत सांगून देहात्मवादी चार्वाक व क्षणिक विज्ञानवादी बौद्धांचें खंडन केलें. नंतर बुद्धि, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म, संस्कार ( भावना ) सुखदुःख हे नऊ विकार केवळ लिंगशरीरास होतात, आत्म्याशीं त्या विकारांचा कोणताही संबंध नाहीं, आत्मा केवळ साक्षीरूप आहे, असें १४ व्या श्लोकांत निवेदन केलें. नंतर १५ व्या श्लोकामध्यें सर्वसाक्षी व सर्वचेतनामय आत्मा एकच असून निर्विकार असतो व त्याचा प्रत्यय प्रत्येक मनुष्यास झोंप आट-

पल्यावर ' मी सुखानें निजलों होतों ' असा प्रत्यहीं होत असतो असा ध्वनि प्रकट केला. सत् कोणतें आणि असत् कोणतें हा नित्यानित्य विवेक करून आत्मा नित्य आहे; आणि इतर सगळें अनात्मक, अनित्य अगर मायिक आहे; या अविनाशी अगर नित्य आणि सर्वव्यापी आत्म्याचा नाश होणें शक्यच नाहीं, व आत्म्याशिवाय इतर सर्व नाशवंत आहे असें १६, १७, १८ ठ्या श्लोकांत सांगितलें व ह्मणून भीष्मादिकांच्या देहांतील आत्मा नित्य आहे, त्याविषयीं शोक करणें उचित नाहीं, सर्वांच्याच शरीरांचा नाश प्रकृतीच्या स्वभावानुसार होतो, तेव्हां भीष्मादिकांच्या शरीराविषयींचाही शोक वृथा आहे असा उपदेश केला .—

पुढें ' आत्मा मरतो किंवा मारितो ' असें ह्मणणारे अनुक्रमें चार्वाक मीमांसक व नैयायिक हे अज्ञानी आहेत, आत्म्याला सहा विकारांपैकीं कोणताही विकार होत नाहीं, तो अविनाशी, नित्य, अज आहे, तो कोणतीच क्रिया करीत नाहीं, जीर्ण झालेलीं शरीरें जाऊन नवीं शरीरें मात्र त्यांस प्राप्त होतात, त्याला पंचमहाभूतांकडून अगर इतर कोणाकडून कसलाच उपद्रव लागणें शक्य नाहीं, कारण त्याच्याच सत्तेनें सर्व जडद्रव्यें आपापलीं नियतकर्मैं करितात, असें मायेच्या योगानें आपल्यास दिसतें, पण वस्तुतः जड द्रव्यें नाहींत आणि कर्मेंही नाहीं; तो नित्य, सर्वगत; स्थाणु, अचल व सनातन असून अव्यक्त, अचिंत्य व अविकारी आहे हें प्रतिपादन १९ ते २५ श्लोकापर्यंत झालें.

सारांश आत्मा नित्य व अविकारी आहे, तो सत् आहे, चित् आहे, बाकी सर्व मायिक, अनित्य, विकारी, असत् व जड आहे, इतका उपदेश येथपर्यंत झाला. पुनः हा कठिण विषय अर्जुनास समजणार नाहीं असें गृहीत धरून किंवा उलट कल्पना केली असतांही शोकमोहाचें कारण नाहीं हाच सिद्धांत कसा निष्पन्न होतो हें सांगण्याच्या बुद्धीनें आत्मा क्षणजीवी आहे अशी कल्पना केली; नंतर क्षणजीवी वस्तु क्षणध्वंसी असतात, त्या कोठून येतात, कोठें जातात हें माहित नसतें, ह्मणून असल्या अनियमित वस्तूंचा शोक करणें समंजस पुरुषास योग्य नाहीं असें ठरवून पुनः आत्म्याचें वृत्त आश्चर्यकारी आहे, तो एकच असून सर्व ब्रह्मांडामध्यें भरलेला आहे ह्मणून अवध्य आहे, तेव्हां त्याच्याविषयीं शोक करणें सर्वथा असमंजस आहे. असें २६ ते ३१ पर्यंत सांगितलें.

याप्रमाणें अर्जुनास झालेला जो शोकमोह तो नाहींसा करण्यासाठीं आत्मस्वरूपाची मीमांसा करून सामान्यतः असें ठरविलें कीं, कर्तव्याच्या आड येऊं पाहणारे शोकमोह हे अज्ञानजन्य आहेत, खरे नव्हत; नंतर क्षत्रियानें स्वकर्तव्य केलें असतां लाभ कोणता, न केलें तर धर्मनाश, कीर्तिच्छेद, पापाधिगम, लोकनिंदा इत्यादि दोष कोणते हें स्पष्ट सांगून जयापजय--कांहीं--झालें तरी युद्ध कां करावें ह्याचें संकीर्तन केलें आणि शेवटीं जय येवो वा पराजय होवो, लाभ असो वा नसो, सुख मिळो वा दुःख जडो, कांहीं झालें तरी चित्ताची समता ठेवून निष्काम बुद्धीनें कर्तव्य केलें असतां कोणत्याही प्रकारचें पातक लागत नाहीं हा सर्व धर्मांस आणि प्राचीन व आधुनिक तत्त्ववेत्त्यांस मान्य असा उत्कृष्ट सिद्धांत सांगितला. हा झालेल्या विषयाचा सारांश आहे व यांतच सांख्यमताचें खंडन आहे.

सांख्यमताचें मुख्य आचार्य कापिलमहामुनी होत, असें म्हणतात. हे कपिल कोणते, ह्यांचा काळ कोणता, यांनीं प्रथमतः प्रणीत केलेलीं मतें कोणतीं, या सर्वांचा उलगडा यथासांग करणें हा मोठा मौजेचा व उपयोगाचा विषय आहे सांख्यकारिका, सांख्यसूत्रें हे ग्रंथ मला वाचण्यास मिळाले, त्यांवरून पाहतां कपिलमुनी हे अतिप्राचीन कालांत झालें असूनही सर्वकालीन तत्त्ववेत्त्यांच्या पहिल्या वर्गांत या श्रेष्ठपुरुषास खुशाल बसवितां येईल असें मला वाटलें. प्रचलित धर्मास व शास्त्रास अमळ एकीकडे ठेवून ज्या महात्म्यानें सर्व सृष्टीच्या उत्पत्तिस्थितिलयांची उत्कृष्ट मीमांसा एका बुद्धीच्या जोरावर करण्याचा प्रयत्न केला व अलीकडील स्पायनोझा, क्यांट, हेगेल, शोपेनहार, हार्टमन, स्पेन्सर, डार्विन, हक्सले इत्यादि महामुनींच्या एकंदर प्रयत्नांस जें यश आलें आहे, तें यश आपच्या आर्यावर्तांतील महातत्त्वज्ञानें सुमारें चार हजार वर्षांपूर्वीं ज्या एकट्यानेंच संपादन करण्याचें पुण्य घेतलें; हल्लीं जगांतील सन्माननीय धर्मांमध्यें मोडणारा बुद्धधर्म हा ज्याचा खटपटीचा एक अंश, तो महापुरुष किती बुद्धिमान् असला पाहिजे याची वाचकांनीच कल्पना करावी. आमच्या पूर्वजांनींही ह्या अलौकिक पुरुषाचें कौतुक केलें नाहीं असें नाहीं. कापिल हा ईश्वरी अवतार असें भागवतांत वर्णन आहे कपिलाच्या दुर्धर शापानें सगराचे साठ हजार पुत्र एका क्षणमात्रांत भस्म झाले असें रामायण ह्मणतें. जीवन्मुक्त नारदानें दक्षाच्या मुलांस

'सांख्याचें अध्ययन करा' असा उपदेश केला त्याचें वर्णन महाभारतांत आहे. असो; तेव्हां सर्व जगास आपल्या बुद्धीप्रभावानें थक्क करून टाकून जगाचीं व मानवी बुद्धीसामर्थ्याची महती वाढविणाऱ्या या थोर—अतिथोर* पुरुषाचा लागेल तितका शोध लावून त्याचीं तत्त्वें मराठी वाचकांस अर्पण

---

सांख्यतत्वाचे प्रतिपादक कपिलमहामुनि याच्या संबंधानें इतकें स्तुतिपर लिहावयाचें कारण इतकेंच कीं हिंदुस्थानामध्यें पुढें जे तत्वविचार प्रसृत झाले त्यांचा मूळ पाया सांख्य-तत्वामध्यें आहे. प्रथमतः सद्वस्तु दोन, पुरुष आणि प्रकृति; पुरुष, म्हणजे आत्मा हा निर्वि-कार आणि निष्क्रिय असून साक्षी असतो. मूळ प्रकृतीमध्यें सत्व, रज व तम हे तिन्ही गुण सारखेच असतात म्हणून ती साम्यावस्थेंत असते. पण पुरुष आणि प्रकृतीची गांठ पडली म्हणजे आत्म्याचें शुद्ध आणि निर्विकार स्वरूप मूळ स्वरूपापासून भिन्न होतें तें प्रकृतीच्या संयोगानें होतें आत्म्यास त्रिविधतापांपासून दुःख भोगावें लागतें तें प्रकृतीच्या संगतीमुळें होय आणि प्रकृतीची संगति तोडून टाकण्याची खटपट झाली, अगर कर्मांचा सर्वथैव त्याग केला, तर आत्मा पुनः पूर्वस्वरूपास जाऊन मिळेल, सर्वच भिन्नरूपानें दिस-णारे पदार्थ एकाच प्रकृतीपासून झाले आहेत ही सांख्यांची मूळ तत्वमालिका आहे. कपिल महामुनींनीं सर्व प्रकारचे कर्तृत्व आत्मसांनिध्यानें विकृत झालेल्या प्रकृतीकडेच आहे व विश्वाची उत्पत्ति, त्याची स्थिति व त्याचा लय हें सर्व प्रकृतीकरवींच होतें असें मत प्रकट केलें. आपली बुद्धि, अहंकार व सर्व इंद्रियें ही प्रकृतीपासूनच उत्क्रांत झालीं असें कपिल म्हणतात व अलीकडील क्लिफर्ड आदि तत्ववेत्तेही हेंच म्हणतात स्पायनोझाचें सांख्यतत्वाशीं साम्य दिसतें तें सेश्वर सांख्य अगर योगतत्वांशीं होय. असो; सांगावयाचें तात्पर्य म्हणून इतकेंच कीं सर्व विश्व प्रकृतीपासून, अव्यक्तापासून उत्पन्न झालें असें जें म्हटलें आहे, त्याच्या जवळ जवळच स्पेन्सरादि उत्क्रांतितत्वाचें पुरस्कर्ते यांचें म्हणणें येत आहे! ग्रीस देशांत आरिस्टाटल नामक तत्ववेत्त्यानें सुमारें दोन हजार दोनशें वर्षांपूर्वी सामान्य गोष्टी शास्त्राच्या चक्रामध्यें गुंतवून ठेविल्या, तीनशें वर्षांपूर्वी बेकन नामक आंग्लभौमतत्ववेत्त्यानें पूर्वीच्या ज्ञानाचा आढावा घेऊन भौतिक शास्त्रांची सीमा कशी वाढवावी हें तत्व प्रकट केलें, आलीकडे या एकोणिसाव्या शतकांत स्पेन्सर नामक महापंडित आणि महातत्ववेत्त्यानें सर्व भौतिक व मानसिक गोष्टींचा कांहींचा उलगडा आपल्या उत्क्रांतितत्वानें केला, त्याच-प्रमाणें आमच्या देशांत सुमारें चार हजार वर्षांवूर्वी सांख्यमुनीनें इहलोकामध्यें दिसणाऱ्या सर्व पदार्थांचें प्रत्यक्ष आणि अनुमानानें अवलोकन करून सर्व पदार्थ एका मूळप्रकृती-पासून निघाले आहेत असें ठरविलें! ही गोष्ट लहान सामान्य आहे काय? सांख्यांच्या नंतर जीं तत्वशास्त्रें अद्भुत झालीं तीं योग, वेदांत व इतर दर्शनें, व त्यांचे पुरस्कर्ते, यांनीं पुष्कळ अंशांनीं सांख्यमताचेंच अनुसरण केलें आहे. सांख्य मतानें मूळपासूनच 'अनंत आत्मे निरनिराळे होते' ते एकाच महान् आत्म्यापासूनच निघालें आहेत असें

करण्याचा प्रयत्न करणारा पंडित आम्हा सर्वत्रांवर अनेक उपकार करील असें मला वाटतें.

आतां ह्या श्रेष्ठ पुरुषाच्या सिद्धांतापैकीं गीतेंत ओघानें आलेल्या तत्वांचें निदर्शन व खंडन यांचें दिग्दर्शन करून हा विषय आटपतो.

१ आत्मे व प्रकृति किंवा प्रकृति आणि पुरूष अशा दोन सद्वस्तु आहेत असा सांख्यसिद्धांत आहे.

,, येथपर्यंत झालेल्या प्रकरणांत—व पुढेंही-गीतेंत सांगितलें आहे कीं सद्वस्तु एकच आहे. प्रकृति ( Neture ) मायिक ह्मणजे मिथ्या आहे, सद्वस्तु मिथ्या नाहीं, असा गीतेचा उपनिषदानुसार सिद्धांत आहे. ( पहा अ० २ श्लोक १७।१८।२०।२९ ).

२ सांख्याचे मतें आत्मे अनेक आहेत.

,, गीतेचा, उपनिषदांचा व वेदांताचा मथितार्थ 'आत्मा एकच आहे' असा आहे. (पहा अ० २ श्लोक १७ ते २९ ). १२ वा श्लोक संशयित आहे त्याचा विचार त्याच श्लोकामध्यें केला आहे.

---

योगानें ठरविलें; म्हणजे निरीश्वर सांख्य मताला सेश्वर केलें. वेदांत्यांनीं प्रकृति व पुरुष हीं दोन तत्वें शुद्ध विचाराच्या कसोटीस उतरत नाहींत व दोन वस्तूमध्यें सामान्य असें कांहीं तरी पाहिजे असें ठरविणें हा बुद्धीचा धर्मच आहे, असा विचार करून पुरुष आणि प्रकृति या दोहोंच्याही पलीकडे ब्रह्म म्हणून खरी सद्वस्तु आहे व तिच्याच मात्र सत्तेनें सर्व दृश्य जग उत्पत्ति-स्थिति-लयाच्या चक्रांतुन हिंडत आहेसें भासतें असा सिद्धांत करून अद्वैत मताची स्थापना केली. सारांश जे जे कोणी तत्ववेत्ते पुढें निर्माण झाले त्यांपैकीं कांहींनीं सांख्याचें अनुसरण तरी केलें आहे व इतरांनीं सांख्यमताची सुधारणा केली आहे. हा संसार हें जन्ममरण. हा ऐहिक वास हें सर्व दुःखमय आहे असें सांख्यमुनींनीं सांगितलें आहे. तेंच योग्यास, अद्वैत्यांस बुद्धास, व आगस्टाईनसारख्या ख्रिस्त भक्तांस, व हार्टमन शोपेनहार नामक तत्ववेत्यांस मान्य आहे. असो; तेव्हां सांख्यमहामुनींची स्तुति करणें अवश्य आहे असें मीं म्हटलें तें यथार्थ आहे असें यावरून दिसेल वेदांतमताला जें अति उत्कृष्ट स्थैर्य प्राप्त झालें व दुःखी व अनाथ आणि तळमळणाऱ्या जीवांचें समाधान करण्याचें सामर्थ्य जें त्यास प्राप्त झालें त्याचा मूळ पाया सांख्यांत आहे असें म्हटलें असतां अद्वैत मताची निंदा होत नसून उलट येवढ्या जबरदस्त सांख्यमताचाही पराभव करण्याचें सामर्थ्य त्याच्या अनुषंगानेंच उत्पन्न झालेल्या वेदांतांत आहे हें त्यांस भूषणच आहे. शिवाय सम्मत जें स्थापित होतें तें प्रथमतः होत नाहीं, दुर्मतांचा विध्वंस करून मग तें प्रस्थापित होत असतें हेंही आमच्या भाविक मुमुक्षूंनीं विसरतां कामा नये.

३ सांख्यमतानें 'अव्यक्त' प्रकृतीचा, श्रेष्ठ व चिंतनीय आहे.

,, गीतामतानें आत्मा अव्यक्त खरा पण तो अविकारि आहे. म्हणून अव्यक्त या शब्दानें प्रकृति घेतां येत नाहीं. आत्माच ध्यावा लागतो. (पहा अ० २ श्लोक २५).

४ कर्म न करणें हा सांख्यमतानें पुरुषार्थ ठरतो.

,, कर्तव्य केलेंच पाहिजे, निष्काम आणि निरहंकार बुद्धीनें मात्र कर्म केलें पाहिजे असें गीताशास्त्र सांगतें. ज्ञानोत्पत्तीपूर्वी कर्म केलें नाहीं तर प्रपंचही होत नाहीं व परमार्थही साधत नाहीं. (पहा अ० २ श्लोक १८ व ३१ ते ३८.)

५ आत्मा सुखदुःखाचा अधिकारी आहे.

,, आत्मा अधिकारी नाहीं. (पहा अ० २ श्लोक १४।१५).

वरील विषयांत सांख्यमतखंडनपर जे जे श्लोक मला आढळले त्यांचें येथें निदर्शन केलें आहे. सुखदुःखाच्या विमोचनासाठीं तत्त्वज्ञानाचा व्यासंग केला पाहिजे, ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं, आत्म्याशिवाय 'माझें' असें दृश्य जगांत कांहीं नाहीं, विषय, इंद्रियें, मन, लिंगदेह, अहंकार बुद्धि, कारणदेह हीं सर्व प्रकृतीचीं कार्यें आहेत, आत्मा निराळाच आहे, वगैरे पुष्कळ सिद्धांत कपिल-सांख्य आणि गीतासांख्य ह्या दोन्ही शास्त्रांसही मान्य आहेत. मुख्य गोष्ट लक्ष्यांत ठेवावयाची ती ही कीं, तत्त्वविवेकानें आत्मानात्मविषयाचे सिद्धांत ठरवून ठेवून व त्याप्रमाणें आचरण करावयाचें असा निश्चय करून मनुष्यानें आपआपलें कर्तव्य करावें, दैहिक, मानसिक अगर नैतिक अडचणी येतील त्या एकीकडे सारून शास्त्रप्रणीत कर्तव्य निर्लोभमनानें केलेंच पाहिजे असें सांगण्याचा श्रीभगवंताचा हेतु आहे व तो हेतु वरील तात्विक, सयुक्तिक आणि समंजस प्रतिपादनाच्या योगानें सिद्धीसही गेला आहे. सारांश गीता सांख्यशास्त्र निष्काम कर्तव्याच्या आड येत नाहीं हें येथें सिद्ध झालें.

आतां या मासिक पुस्तकाचें काळजीपूर्वक पठन करणाऱ्या मुमुक्षूपैकीं कांहीं सद्‌गृहस्थांस अशी शंका आली आहे कीं, हा तत्वोपदेश युद्धसमयींच कां केला ? व तो अर्जुनासच कां केला ? या प्रश्नास आचार्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत उत्तरें दिलींच आहेत; पण त्यांचें थोडेसें जास्त स्पष्टीकरण येथेंच

करून घेतों. भारती युद्ध हें ऐतिहासिक युद्ध आहे अशी फार दिवसांची समजूत आहे. पण प्रत्येकक्षणीं आपल्या मनांत भारती युद्ध चाललें असतें हें कदाचित् बऱ्याच लोकांस माहीत नसेल. आपण प्रपंचांत गुंतलों असतांना जेव्हां जेव्हां कर्तव्याचा प्रश्न पुढें येतो त्यावेळीं कामक्रोधादि षड्रिपु आणि सद्विचारादि मित्र यामध्यें तुमुल रण जुंपून कधीं कौरवांचा जय व ईश्वर सारथी असेल व आपली निष्ठा चांगली असेल तेव्हां कौरवांचा अगर दुष्ट शत्रूंचा, दुर्विकाराचा, पराजय होत असतो; हा अनुभव व्यक्तिमात्रास यावा व येतो. अशा या प्रत्येक युद्धाच्या वेळीं युद्धांमध्यें तटस्थ राहणारा परंतु वेळोवेळीं उपदेश करणारा विवेकरूपी श्रीकृष्ण सारथी आपल्या हृदयांत वास करीत असूनही आपण त्याचा उपदेश ऐकत नाहीं! तर असें करूं नये, ईश्वरप्रेरित अगर पूर्वसंस्कारांनीं घटित जी विवेकबुद्धि ती काय ह्मणते तें सावकाशपणें ऐकावें, विकारवश होऊं नये, अज्ञानाला, मोहाला किंवा शोकाला आपल्या कर्तव्याच्या आड येऊं देऊं नये. कर्तव्य करावयाचे वेळीं आपल्यास अत्यंत प्रिय अशा अनेक गोष्टी वर्ज कराव्या लागतील, इष्टमित्रांस, गणगोतास दुखवावें लागेल, कदाचित् आपल्यास व समाजास अत्यंत अप्रिय अशा एखाद्या वाईट गोष्टीचें सुद्धां सात्विकतेनें अवलंबन करावें लागेल, तेव्हां अशा कठिण प्रसंगीं धैर्य धरून आपलें शास्त्रप्रणीत कर्तव्य आपण करावें असा उपदेश अर्जुनासचसा काय पण आपणा सर्वांनाही हा उपदेश भगवंतांनीं अर्जुनास निमित्तमात्र पुढें करून केला आहे. भारती युद्ध खरें असो वा नसो, आपल्या मनोभूमिकेवर जें तुमुळ युद्ध अहर्निश चालेलें आहे व ज्या ह्या युद्धविषयक गोष्टीला मार्टिनो आदि नीतितत्त्ववेत्त्यांची पूर्ण संमति आहे त्या मानसिक युद्धाचा प्रत्येकानें अनुभव घ्यावा, विचार करावा ह्मणजे ईश्वरी गीतेमध्यें पूर्णत्वानें प्रतिपादन केलेल्या अमोलिक उपदेशाचें चीज होईल. आपण प्रत्येकजण अर्जुन आहों, व विवेकसिंह हा श्रीकृष्ण होय. तेव्हां भारती युद्धांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास 'उपदेशिली स्वयें गीता' या गोष्टीचा वरील प्रमाणें अर्थ करून आपण गीतामृत वाचावयास लागलों म्हणजे अर्जुनाचा जसा मोह नष्ट झाला, तसा आपलाही होईल आणि सद्बुद्धीच्या मात्र उपदेशाप्रमाणें आपण वागावयास लागू. हें या वरील शंकाचें निवारण झालें. यापुढें आपलें कर्तव्य काय हा

प्रश्न आहे, त्याचा विचार आणखी एखाद्या प्रसंगीं करीन असें अभिवचन देऊन हा विषयभाग आटपता घेतों.

शोकमोहापनयनाय लौकिको न्यायः स्वधर्ममपि चोवेक्ष्येत्याद्यैः श्लोकैरुक्तो न तु तात्पर्येण । परमार्थदर्शनं त्विह प्रकृतं तच्चोक्तमुपसंह्रियत एषा तेऽभिहितेति शास्त्रविषयविभागप्रदर्शनाय । इह हि दर्शिते पुनः शास्त्रविषयविभाग उपरिष्टाज्ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनामिति निष्ठाद्वयविषयं शास्त्रं सुखं प्रवर्तिष्यते श्रोतारश्च विषयविभागेन सुखं ग्रहीष्यन्तीत्यत आह--

'आपला धर्म काय आहे तो लक्ष्यांत ठेवून ही' वगैरे एकतिसाव्या श्लोकापासून तों येथपर्यंत जी उपदेशपद्धति भगवंतांनीं अर्जुनाचा शोक व मोह दूर करण्यासाठीं अंगीकृत केली ती व्यवहारिक व वर्णाश्रम धरून चालणारी पद्धति होय. वेदांताची सरणी धरून सद्वस्तूचें प्रतिपादन करणारी ही पद्धति नव्हे. केवळ सामान्य मनुष्यास व्यवहारांत होणाऱ्या शोकमोहांचा निरास करण्यासाठीं श्रोत्याचा अधिकार पाहून ह्या लौकिकपद्धतीचा भगवंतांनीं स्वीकार केला आहे. भगवंतास गीताशास्त्रांत मुख्यतः प्रतिपादन करावयाचें आहे तें सद्वस्तूचें, ब्रह्माचें, ज्ञान होय. तें अकराव्या श्लोकापासून एकतिसाव्या श्लोकापर्यंत केलेंच आहे. आतां त्या सर्व उपदेशाचा उपसंहार प्रकृत श्लोकांत 'ही तुला सांख्यबुद्धि सांगितली' असें ह्मणून केला आहे. हा सारांश सांगितला तो गीताशास्त्रामध्यें 'ज्ञान आणि कर्म' असे जे दोन विभाग केले आहेत, त्यांचें स्पष्ट आकलन व्हावें, ते विभाग सहज लक्षांत यावे एतदर्थ सांगितला आहे. येथें जे विषयाचे विभाग करून दाखविले आहेत, तेच पुनः 'ज्ञानयोगानें सांख्यांची निष्ठा आणि कर्मयोगानें योग्यांची निष्ठा'— (पहा अ० ३ श्लोक ३) या श्लोकांतही तेच दोन निष्ठाविभाग स्पष्ट करून दाखवितील. उद्देश हा कीं असा विभाग केला म्हणजे विषयाची मीमांसा स्पष्टतर व्हावी आणि श्रोत्यांसही हा विषय सुखानें, सौकर्यानें, समजावा. भगवान ह्मणतातः—

**एषाऽतेभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ॥**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥३९॥**

**एषा** ( ही आतांपर्यंत सांगितलेली ) **सांख्ये** ( सांख्य--परमार्थशास्त्रांतील ) **बुद्धिः** ( ज्ञान ) **ते** ( तुला ) **अभिहिता** ( सांगितलें आहे. ) **तु** ( आतां यापुढें—पण आतां–) **योगे** ( योगशास्त्रांतील ) **इमां** ( ही—मी यापुढें सांगणार आहे ती बुद्धि तें—ज्ञान) **शृणु** ( ऐक ) **पार्थ** ( अर्जुना ! ) **यया बुद्ध्या युक्तः** ( जी बुद्धि--जें ज्ञान, तुला प्राप्त झालें असतां— ) **कर्मबन्ध** ( कर्म हाच एक बंध, ताप. ) **प्रहास्यसि** ( सोडून टाकशील ). सारांश, आतां यापुढें तुला मी जें योगशास्त्राचें ज्ञान सांगणार आहे, त्याचें तुला पूर्ण ज्ञान झालें तर कर्मरूपी बंधापासून होणाऱ्या तापत्रयाची बाधा तुला बिलकूल होणार नाहीं. तू कर्माचें कपाट फोडून बाहेर येशील.—

एषो त इति । एषा तेतुभ्यमभिहितोक्ता सांख्ये परमार्थवस्तुविवेकविषये बुद्धिर्ज्ञानं साक्षाच्छोकमोहादिसंसारहेतुदोषनिवृत्तिकारणम् । योगे तु तत्प्राप्त्युपाये निसङ्गतया द्वंद्वप्रहाणपूर्वकमीश्वराराधनार्थे कर्मयोगे कर्मानुष्ठाने समाधियोगे चेमामनन्तरमेवोच्यमानां बुद्धिं शृणु । तां बुद्धिं स्तौति प्ररोचनार्थम्—बुद्ध्या यया योगविषयया युक्तो हे पार्थ कर्मबन्धं कर्मैव धर्माधर्माख्यो बन्धः कर्मबन्धस्तं प्रहास्यसीश्वरप्रसादनिमित्तज्ञानप्राप्तेरित्याभिप्रायः ॥ ३९ ॥

आतांपर्यंत जें तुला ज्ञान सांगितलें त्याचा हेतु तुला परमार्थ वस्तूची, सद्वस्तूची, ओळख व्हावी हा होता. हें ज्ञान सांख्यशास्त्रांतील, अध्यात्मशास्त्रांतील आहे. अर्जुना, सांख्यशास्त्राचें ज्ञान प्राप्त झालें असतां काय होतें असें ह्मणशील तर सांगतों. 'आत्मा कर्ता आहे, आत्मा भोक्ता आहे' वगैरे—अज्ञानामुळें प्राण्यास शोकमोहादिक विकार होतात तें अज्ञान अगर ती मायाच या सांख्यज्ञानानें समूळ नाहींशी होते. अज्ञान नाहींसें झालें ह्मणजे मुक्ति मिळते, हें तुला विदितच आहे.—पण हा अवघड विषय तुला समजला नसेल, तुला ग्रहण करितां आला नसेल, अशी मला बळकट शंका आली आहे.—ह्मणून तुला समजण्यास अत्यंत सोपें असें कर्मयोगाचें ज्ञान आतां सांगतों. कर्मयोग ह्मणजे निष्काम बुद्धीनें, फलाची आशा न ठेवितां व लाभ हानि झाली तरी सुखदुःख न मानितां, कर्तव्यकर्म करून तें सर्व परमेश्वराच्या चरणाकडे लावावयाची निष्ठा होय. कर्मयोगाचें असें अनुष्ठान केलें ह्मणजे चित्तशुद्धी होऊन तत्प्राप्ति ह्मणजे वर सांगितलेल्या ज्ञानाची प्राप्ति होते.-

सारांश कर्मयोग हा ज्ञानप्राप्तीचा एक उपाय आहे.—असो. तेव्हां आतां तुला कर्मयोगाचें ज्ञान सांगतों हें ज्ञान प्राप्त झालें असतां इष्ट फल मिळतें, हें ऐकून तरी उदासीन झालेल्या तुला कर्म करण्याची स्फूर्ति होईल. असें जाणून कर्मयोगाची फलश्रुति सांगतों. 'हे पार्था! ह्या कर्मयोगाचें जर तुला चांगलें ज्ञान झालें व तें तुझ्या आचरणांत दिसूं लागलें तर कर्म रूपी जो धर्म व अधर्म या नांवाचा बन्ध ( पिंजरा ) त्यापासून तूं मुक्त होशील.

**अर्जुन**—कर्म केल्यानें मुक्ति कशी मिळेल?

**भगवान्**—अरे! फलाची अशा सोडून देऊन सुखदुःखविरहित अशा मनाच्या स्थितीनें कर्तव्यकर्म केलें व तें परमेश्वरास समर्पण केलें ह्मणजे त्याच्या कृपेनें 'मी कर्ता आहे' वगैरे अज्ञान नाहींसें होतें, व आत्मस्वरूप कळतें. आत्मस्वरूप कळलें व आपणच ब्रह्म आहों अशी वृत्ति होऊन ब्रह्मामध्यें सर्वांचा लय झाला ह्मणजे मुक्तीच मिळाली? नव्हे काय?

या श्लोकावर **प्रपाकार, मधुसूदनीकार, भाषाविवृतीकार कै० रघुनाथशास्त्री पर्वते, कै० प्रो० द्विवेदी** या सर्वांचा आणि **शंकरानंदाचा** अभिप्राय एकच पडला आहे. हे सर्व टीकाकार **शंकराचार्योपजीवी** आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. या विशेषणानें सदरहू टीकाकारांचा अपमान होत नसून उलट त्यांस व आचार्यांस हा सर्व प्रकार भूषणस्पदच आहे असें म्हटलें पाहिजे. निष्काम व परमेश्वरास अर्पण केलेला कर्मयोग हा चित्तशुद्धि करितो ह्मणजे क्रमाक्रमानें मनुष्याचा स्वाभिमान व अज्ञान घालवितो म्हणून ईश्वराचा असल्या कर्मयोग्यावरही अनुग्रह होतो. कर्मयोगानें ह्या गोष्टी साध्य होतात म्हणून त्याला ज्ञानमार्गाचा उपाय ज्ञानमार्गाचें साधन, असें ह्मटलें आहे. 'हा मी व हें माझें' असें ज्या पुरुषास अज्ञान असतें त्याच्यासाठीं निष्काम कर्मयोग सांगितला आहे. **मधुसूदनी**कारांनीं सांख्य शब्दाची व्युत्पत्ति देऊन असा अर्थ केला आहे कीं, 'ज्या उपनिषदामध्यें परब्रह्म हें निर्विकार आहे, निरुपाधिक आहे, असें प्रतिपादन केलेलें असतें तें **संख्योपनिषद;** त्याचा तात्पर्यार्थ ( उपनिषदांतील परमपुरुष ) ज्यांत सांगितला असतो तें होय.' **पर्वते** व **द्विवेदी** यास हाच अर्थ मान्य आहे. **सांख्य** ह्मणजे निर्विशेष परब्रह्म असें **शंकरानंद** म्हणतात. गीताशास्त्रांत ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय नाहीं असें **मधुसूदनीकार, शंकरानंद, पर्वते** आणि **द्विवेदी** यांचा आचार्यां-

प्रमाणेंच अभिप्राय आहे. 'ज्ञानाचा प्रतिबंध करणाऱ्या कर्मांनें ज्ञान कसें प्राप्त होईल ?" अशा शंकेचें निवारण असें कीं निष्कामत्वानें, निरभिमानपणानें, ईश्वरार्पणबुद्धीनें आणि समवृत्तीनें कर्म केलें तर तेंच शुद्धीस कारण होऊन ज्ञानाचा मार्ग खुला करितें. '**धर्मेण पापमपनुदतीति श्रुतेः**' धर्मानें पापाचा, अज्ञानाचा, नाश होतो अशी श्रुती आहे.

**वल्ल०**—योग=भगवंताशीं एकरूपता करणारें कर्म. कर्मबंध=केलेल्या कर्मांचें पातक.

**मध्वा०**—' सांख्य '=शुद्धात्मतत्वविज्ञानं योग=उपाय. **सत्यानंद** सांख्य आणि योग हे विष्णुकृत सांख्यशास्त्र व योगशास्त्र असें समजतात. **कपिलकृत** सांख्य निरीश्वर आहे व वेदबाह्य आहे ह्मणून ते यांत संमत नाहीं. **विद्याधिराजभट्ट** सत्यानंदाचे अनुयायी आहेत. यांनीं असें कारण दिलें कीं, **कापिल** व **पतंजलीकृत** सांख्य व योगशास्त्रें घेतलीं तर त्यांच्या आधारावर 'युद्ध कर' असे भगवंतास सांगतांच येणार नाहीं! शृणु=ऐक व त्याप्रमाणें कर.

**रामा०**—सांख्यबुद्धीनेंच आकलन करायाजोगें ज्ञान. 'कर्मणाबन्धः' कर्म बंध (कर्मानें उत्पन्न होणारा बंध तो कर्मबंध) असा समास सोडवितात. आचार्यांनीं कर्म हाच बंध असा विग्रह केला आहे. अद्वैतपंथास कर्म मुळींच नको आहे. कारण तें बंध करणारें आहे. इतर पंथीयांस सत्कर्म पाहिजे आहे व दुष्कर्मानें मात्र बंध होतो अशी त्यांची समजूत आहे. तसेंच या विशिष्टाद्वैताचार्यांनीं चालू श्लोकांतील योगास बुद्धियोग असें म्हटले आहे व आपले ह्मणणें बरोबर आहे हें दाखविण्यासाठीं अ० २ श्लोक ४९ मधील 'बुद्धियोग' शब्दाचा आधार दिला आहे. यांच्या मतानें बुद्धियोग ह्मणजे मोक्ष देणाऱ्या कर्मांचें 'आत्मज्ञानपूर्वक अनुष्ठान' असा अर्थ आहे. आत्मज्ञान झाल्यावर कर्माची अवश्यकता नाहीं हें मागें अनेक वेळां सांगितलेंच आहे.

**ज्ञानेश्वरांचा** कर्मफलदर्शक दृष्टांत पहाः—जैसें वज्रकवच लेईजे। मग शास्त्रांचा वरिखाव ( वर्षाव ) साहिजे। पारि जैतेसी ( जयासह जय पाहून ) उरिजे। अचुंबित ( बाधारहित )॥ कर्मबंध सुटण्याला निष्कामकर्मरूपी कवच कसें उपयोगी पडतें हें ज्ञानेश्वरांनीं किती सुंदर रीतीनें दाखविलें आहे बरें ?

**वामन** पंतितांचा व **मधुसूदनीकारांचा** एकच अभिप्राय आहे. सांख्य म्हणजे गणना । सकल तत्त्वांची अर्जुना । ज्या शास्त्रांत हे रचना । सांख्य म्हणावें तें शास्त्र ॥ असत्पदें जडे क्षेत्र । त्यांत गाणिजे जडत्वमात्र । क्षेत्रज्ञ जाणे जो हें विचित्र । तो सत्पदें वर्णिला ॥ तें क्षेत्र नाशवंत । क्षेत्रज्ञ साक्षी शाश्वत । जाणोनी तो सर्वगत (सर्वव्यापी) । शोक टाकी, असें बोलिलें ॥ हे सांख्य रीतीची बुद्धि ।....[ पहा श्लोक २१ अध्याय २. ]

किंचान्यत्—

आणखीही पहाः—

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ॥**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

**इह** (या आतांच सांगितलेल्या निष्काम कर्मयोगामध्यें) **अभिक्रमनाशः** (आरंभ झालेल्या कर्माचा नाश) **न अस्ति** (असत, होत नाहीं;) **प्रत्यवायः** (अडचण, विघ्न) **न विद्यते** (प्राप्त होत नाहीं.) **अस्य धर्मस्य** (ह्या निष्काम अशा षिहित कर्मरूपी धर्माचा) **स्वल्पमपि** (थोडासासुद्धां अंश) **महतः भयात्** (मोठ्याभयापासून **त्रायते** (तारण करितो, तारितो, तारण्यास समर्थ होतो.) सारांश, निष्काम कर्माला आरंभ केला व मध्येंच तें थांबलें तरी त्याचा नाश होत नाहीं, तसेंच कर्म करितांना कसली अडचणही येत नाहीं. शिवाय एवढेंसें कर्म केलेलें असलें तर तें मोठमोठ्या संकटांपासून कर्मकर्त्याचें तारण करितें ह्मणजे मोठमोठ्या संकटांचा नाश करितें.

नेहाभिति । नेह मोक्षमार्गे कर्मयोगेऽभिक्रमनाशोऽभिक्रमणमभिक्रमः प्रारम्भस्तस्य नाशो नास्ति । यथा कृष्यादेः । योगविषये प्रारम्भस्य नानैकान्तिकफलत्वामित्यर्थः । किंच नापि चिकित्सावत्प्रत्यवायो विद्यते। किं तु भवतिस्वल्पमप्यस्य योगधर्मस्यानुष्ठितं त्रायते रक्षति महतः संसारभयाज्जन्ममरणादिलक्षणात् ॥ ४० ॥

**पूर्व०**—गुरुजी! कर्म केलें असतां फल आवश्यक रीतीनें मिळतेंच असें नाहीं, हें मागें आपणच सांगितलें असून आतां त्या तसल्या कर्माची स्तुति करून कर्म करावयास सांगतां व कर्मबंधांतून सुटशील ह्मणतां हें काय?

**सिद्धां०**—कर्म सांग झाल्याशिवाय सकाम कर्माचें निश्चित फल निराबाधत्वानें मिळत नाहीं हें बरोबर आहे. व सकामकर्मामध्यें विघ्न येऊन तें बंद पडलें तर केलेल्या कर्माचाही फलविषयक नाश होतो हें बरोबर समजलास. उदाहरणार्थ पहा; एखादी ज़मीन नांगरावयास आरंभ केला, किंवा खरेदीविकरीचा व्यापार आरंभिला, अगर ज्योतिष्टोमादिकास आरंभ केला आणि मध्येंच कांहीं कारणानें कर्म बंद पडलें तर शेती व्यर्थ जाते, व्यापार बुडतो आणि ज्योतिष्टोमादिक कर्म व्यर्थ होतें ! ह्मणजे प्रालब्ध कर्माचे फलाचा नाश होतो. पण निःष्काम कर्माचें तसें नाहीं. ब्रह्मज्ञानाची अगर मोक्षाची वाट दाखविणारा जो हा निष्काम आणि ईश्वरार्पित कर्मयोग, त्याचा आरंभ केला असतां जितकें कर्म घडतें, तितक्याचें फल प्राप्त होतेंच्च होतें; ह्मणजे त्या त्या विहित कर्मोच्या मानानें चित्तशुद्धि प्राप्त होते. तेव्हां येथें कर्म करावयास सांगितलें आहे, तें सकाम कर्म नव्हे, निष्काम कर्म आहे व तें मोक्षाच्या उपयोगी पडणारें आहे. समजलें ?

**पूर्व०**—हें समजलें. पण हें निष्काम कर्म करतांनाच विघ्न आलें तर !

**सिद्धां०**—अरे ! विघ्न तें कसलें येणार ! ईश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धीनें निष्काम कर्माला आरंभ केला असतां विघ्न येण्याची काय प्राज्ञा आहे ? आलेंच एखादे विघ्न तरीही झालेल्या कर्माचें फल मिळतें हें मागें सांगितलेंच. आतां शास्त्रशुद्धरीतीनें कर्म झालें नाहीं, कोठें कांहीं चुकी झाली, तर सकाम कर्म फुकट जातें, पण निष्काम कर्म व्यर्थ जाण्याचें कारणच्च नाहीं. दुसरें, रोगाची परीक्षा करीत असतां कदाचित् परीक्षा चुकेल अथवा पापकर्मानें उद्भवलेला रोग दुःसाध्य किंवा असाध्य होईल, रोगी मरेल, वगैरे जशा अडचणी येऊन इष्ट हेतु साध्य होत नाहीं तसाही येथें संभव नाहीं. कारण हें निष्काम कर्तव्यकर्म आहे. असो; तेव्हां कोणत्याही प्रकारचें संकट येण्याचा संभव नाहीं व आलें तरी त्यापासून हानि होत नाहीं.

**पूर्व०**—मग असलें कर्म करून शेवटीं साधावयाचें तरी काय ?

**सिद्धां०**—साधावयाचें काय ? अरे सर्व काळ त्रिविधतापामध्यें बुडवून टाकणाऱ्या व मनुष्यास अत्यंत दुःख देणाऱ्या संसाराचा व जन्ममरणाचा नाश करावयाचा आहेना ? शिष्या फार काय सांगावें ! या वर सांगितलेल्या सुलभ

आणि सुगम अशा वेदोक्त अगर व्यवहारिक निष्काम कर्माचा थोडासा अंश जरी आपल्या हातून धार्मिक व ईश्वरार्पण बुद्धीनें सिद्धीस गेला, थोडेसें कर्म जरी आपल्या हातून झालें, तरी त्यापासून चित्तशुद्धी होते आणि जन्ममरणाच्या भयापासून हें कर्म आपल्यास सोडवितें. म्हणून हा उपदेश भगवंतांनीं अर्जुनास केला आहे, व त्यास स्मृतिधर्मविहित जें युद्ध तें करण्यास लाविलें आहे.

**मधुसुदनीकार, प्रपाकार, शंकरानंद, द्विवेदी** यांनीं वरीलप्रमाणेंच अर्थ केला आहे. प्रपाकार भागवतांतील एक श्लोक उदाहरणार्थ घेतातः—

"त्वां सेवतां सुरकृता बहवोऽन्तरायाः स्वौको विलङ्घ्य व्रजतां परमं पदं ते। नान्यस्य बर्हिषि बलिं ददतः स्वधर्म धत्ते पदं त्वम विता यदि विघ्नमूर्ध्नि॥"

आपलीं घरें दारें सोडून तुझ्या पदाला जाण्याची इच्छा करणाऱ्या भक्तांस देवादिक पुष्कळ विघ्नें करितात. कर्मठांस मात्र यांच्याकडून त्रास पोहोंचत नाहीं, कारण या लोकांकडून देवांस अवदानें मिळतात! पण तूंच विघ्नसंरक्षण करणारा आहेस ह्मणून देवांसारख्या बलिष्ठ विघ्नकर्त्यांसही न जुमानतां तुझे भक्त तुझ्या पदाप्रत बिनधोक जातात.

**प्रपाकारः-प्रत्यवाय**=पाप असें म्हणतात. निष्कामकर्म करितांना पाप नाहीं. **'अग्नीषोमीयं पशुमालभेत'** 'अग्नी व सोम यांच्यासाठीं तयार केलेल्या पशूंस मारावें' या हिंसेंत पाप नाहीं. हे **टीकाकार** व **द्विवेदी** सकाम कर्मानें संसार उत्पन्न होतो अशा अर्थाची टीका करितात. **'यथेह कर्मचितो लोकः क्षीयत एवामु पुण्यचितो लोकः क्षीयते'** [ छांदोग्य ] ज्याप्रमाणें कर्मानें मिळालेला येथील लोक अगर सुख नष्ट होतें, तसेंच पुण्यानें प्राप्त झालेलें स्वर्गसुखही नष्ट होतें.--सारांश पुनः जन्ममरण प्राप्त होतें.'**—मधुसूदनीकार 'तद्यथेहेति या निन्दा सा फले न तु कर्मणि। फलेच्छां तु परित्यज्य कृतं कर्म विशुद्धिकृत्'** [ येथें निंदा केली आहे ती फलाची आहे कर्माची नव्हे. फलेच्छाविरहित कर्म केलें असतां चित्तशुद्धि होते. ] असा निष्काम कर्माचा उपयोग दर्शवितात.

**सत्यानंद**—या कर्मयोगाला विष्णूद्दिष्ट ( विष्णूप्रीत्यर्थ केलेला कर्मयोग )

असें ह्मणतात. **रामानुज** ‘ नाश होत नाहीं ’ हा अर्थ भग० गी० अ० ६ श्लोक ४ यानें समर्थन करितात.

**ज्ञानेश्वर**—कर्माधारें राहटिजे ( वागावें ) । परी कर्मफळा न निरीक्षिजे । जैसा मंत्रज्ञ ( देवर्षि, देवरुषी ) न बधिजे ( बाधा पावत नाहीं, बाधत नाहीं )। भूत बाधा ॥

**वामनपंडित**—फुका सेवा करूं लागे । आणि फळ कांहीं न मागे । विहित आज्ञेमध्यें वागे । फुकाची ॥ पूर्ण होतां ही फळ । जो न इच्छीच केवळ । पूर्ण न होतां काय विकळ । होणार त्याचें ! ॥ ४० ॥

येयं सांख्ये बुद्धिरुक्ता योगे च वक्ष्यमाणलक्षणा सा—

आत्मज्ञान सांगणाऱ्या सांख्यामध्यें जी बुद्धि सांगितलेली ती व बुद्धि-योगामध्यें सांगितलेली बुद्धि या दोन्ही एकस्वरूपात्मकच आहेत. आतां त्या योगबुद्धीचें लक्षण आतांच पुढें सांगावयाचें आहे. ती—

**व्यवसायात्मिकाबुद्धिरेकेह कुरुनन्दन ॥**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥४१॥**

**कुरुनन्दन** ( हे कौरवकुलोत्पन्ना अर्जुना, ! ) **इह** ( या मोक्षमार्गामध्यें, किंवा मोक्षाची वाट दाखविणाऱ्या कर्मयोगामध्यें ) **व्यवसायात्मिका बुद्धिः** ( निश्चयच आहे स्वरूप जिचें अशी बुद्धि ) **एका** ( एकच ह्मणजे खरी आहे. ) **च** ( आणि ) **अव्यवसायिनां** ( सद्वस्तूचें ज्ञान नसल्यामुळें ज्यांस विवेक झाला नाहीं किंवा ज्यांचा निश्चय ठरला नाहीं अशांच्या ) **बुद्धयः** ( बुद्धि ) **बहुशाखा** ( पुष्कळ फांद्या आहेत, भेद आहेत अशा ) **च** ( आणि ) **अनन्तः** ( अगाणित ) असतात.— सारांश ज्यांनीं आत्मानात्मविचार करून आपली बुद्धि कायमची ठरविली असते त्यांची निश्चयात्मक बुद्धि खरी असते. **पण** ज्यांनीं हा विवेक केला नाहीं त्यांच्या बुद्धीस अनेक फांटे फुटून त्या अगणित वाटांनीं धांवत असलेल्या दिसतात.—

व्यवसायेति । व्यवसायात्मिका । निश्चयस्वभावैकैव बुद्धिरितर-विपरीतबुद्धिशाखाभेदस्य बाधिका सम्यक्प्रमाणजनितत्वादिह श्रेयोमार्गे हे कुरुनन्दन । याः पुनरितरा बुद्धयो यासां शाखाभेदप्रचारवशाद-नन्तोऽपारोऽनुपरतः संसारो नित्यप्रततो विस्तीर्णो भवति, **प्रमाणज-**

नितविवेकबुद्धिनिमित्तवशाच्चोपरतास्वनन्तभेदबुद्धिषु संसारोऽप्यु-
परमते । ता बुद्धयो बहुशाखा बह्व्यः शाखा यासां ता बहुशाखा
बहुभेदा इत्येतत्। प्रतिशाखाभेदेन ह्यनताश्च बुद्धयः, केषामव्यवसायि-
नां प्रमाणजानितविवेकबुद्धिराहितानामित्यर्थः ॥ ४१ ॥

त्या योगबुद्धीचें लक्षण ह्मणजे निश्चयात्मकता हें होय. आत्मतत्त्वाचा निश्चय केला आहे अशी किंवा परमेश्वराला सर्व निष्काम कर्म अर्पण करून त्याच्या प्रसादानेंच मला आत्मज्ञान होऊन मोक्ष मिळेल असें मानणारी बुद्धि तिला निश्चयात्मक बुद्धि म्हणावें. अर्जुना ! मोक्ष मिळविण्याचें मार्गक्रमण चाललें असतां शुद्ध अशीं प्रमाणभूत वेदांत वाक्यें ऐकून ऐकून उत्पन्न झालेली ही निश्चयात्मक बुद्धि एकच आणि म्हणून खरी असते. ही बुद्धि कायम झाली, ज्ञानबुद्धि व योगबुद्धि कायम झाल्या म्हणजे इतर अप्रमाण, स्वकपोलकल्पित अशा बुद्धि व त्याचे पोटभेद या सर्वांचा अस्त होतो— ह्मणून ही बुद्धि संपादन करण्याचा सांख्यशास्त्रानें, निदान आत्मज्ञान करून देण्यास उपयोगीं पडणाऱ्या निष्काम कर्मयोगानें, प्रयत्न कर व मिळवून घे.—

**पूर्व०**—बरें मग कणादप्रभृति लोकांनीं सांगितलेल्या इतर बुद्धींचें काय ?

**सिध्दां०**—अरे ! वेदांतशास्त्र अगर त्यालाच अंगभूत असणारा कर्मयोग यांचें ज्ञान नसल्यामुळें समुद्राच्या लाटांप्रमाणें क्षणोक्षणीं भिन्नस्वरूपानें उत्पन्न होणाऱ्या चंचल बुद्धीचें काय विचारतोस ? ह्या क्षणभंगुर अनंत बुध्दि, त्यांचे भेद, पोटभेद याची सारखी वृद्धीच होत राहते. ‘ मी कर्ता ’ ‘हा मी’ ‘ हें माझें ’ ‘ हें मला हवें, तें मिळावें ’ वगैरे मायेनें उत्पन्न झालेले दोष, ह्या चंचलबुध्दि कायम असल्या ह्मणजे, जसेच्या तसेच राहतात ! त्यांच्या योगानें जन्ममरणरूपी संसाराचा कधींच अंत होत नाहीं; तो अमर्यादपणानें नित्यशः वाढत जातो; त्याची निवृत्ति होण्याचें, संसार आटपण्याचें चिन्ह दिसत नाहीं, आणि अशा रीतीनें प्राणी ‘ पुनरपि जन्म । येऊनि मरती । मरुनि पुनरपि जन्मा येती । ” या घोंटाळ्यांत पडतो !

**पूर्व०**—मग ही संसाराची बेडी सोडविण्यास कांहींच मार्ग नाहीं कीं काय ?

**सिद्धां०**—असें कसें होईल ? संसारतापानें होरपळून जाऊन त्याचा वीट आल्यानंतर श्रुति, युक्ति आणि अनुभूति यांच्या नित्य आणि भक्तिपूर्वक साहचर्यानें निश्चय ठरतो, मग विवेकबुद्धि उत्पन्न होऊन नित्य कोणतें व

अनित्य कोणतें हें कळूं लागतें; शेवटीं बुद्धीला निश्चयात्मकतेचें स्वरूप आलें ह्मणजे ज्या कांहीं नाना प्रकारच्या अनंत वेडगळ कल्पना असतात त्या नष्ट होतात. त्या त्या बुद्धी नाहींशा झाल्या, चित्तशुद्धि झाली, ब्रह्मस्वरूपावर कायमपणानें बुद्धि ठसली कीं तिच्या समोर उभा कशाला राहतो आहे संसार? अभेदबुद्धि झाली कीं जन्ममरण सुटलें अथवा मोक्ष मिळाला असेंच समजावें.

**पूर्व०**—पण या निश्चयात्मकबुद्धीशिवाय ज्या दुसऱ्या बुद्धि त्यांनीं अनेकत्व कसें येतें?

**सिद्धां०**—त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं.—जाग्यावरून एखादा 'तारा' सुटला ह्मणजे त्याचे शतधा तुकडे होऊन आधार नसल्यामुळें ते जसे सैरावैरा सर्व आकाशभर धांवत सुटतात,—त्याप्रमाणें मुख्य आधारस्तंभापासून एकदां बुद्धि चळली कीं जें सांपडेल तोच आश्रय असें मानून 'आतां हें केलें ह्मणजे अमुक होईल' 'क्षणाभरानें दुसरें केलें ह्मणजे तमुक होईल' असे अनेकविध हेतु उत्पन्न होतात. या हेतूंस पुनः पारंब्या फुटतात, त्यांना आणखी प्रतिपारंब्या फुटतात, असे एक ना दोन, अनंत हेतु निर्माण होतात व हेतूंप्रमाणें बुद्धींचीही संख्या अगणितच होते.—सर्व संसार सोडून देऊन अरण्यवास पत्करलेल्या एका अर्धवट साधूला लंगोटी हवी अशी इच्छा झाल्याबरोबर हळूं हळूं त्यांच्या भोवतीं पुनश्च सगळा संसार जमला ही गोष्ट तुला ठाऊकच आहेना?—सारांश श्रुतींतील महावाक्यांवरून, किंवा शुध्द अनुमानानें अगर खऱ्या अनुभवानें ज्यांच्या मनाला विवेक झाला नाहीं, त्यांच्या बुध्दीस अनंतत्व येऊन त्यांचा संसार अखंड कायम राहतो; तसाच मला अमुक फळ मिळावें अशी इच्छा धारण करून कर्म अगर उपासना करणाऱ्या उपासकांचाही होतो.

**प्रपाकार** हेंच सिद्ध करण्यासाठीं '**जाया मे स्यात्, अथ प्रजायेयेति**' 'मला बायको मिळाल्यानंतर मी प्रजा उत्पन्न करीन' ही (बृह० १।४।१७) श्रुति देतात. 'बहुशाखाः' कामात्कामान्तरजनकाः (एका इच्छेपासून अनेक इच्छा उत्पन्न करणाऱ्या त्या बहुशाखा होत.) **मधुसू०** सांख्य व योगविषयक बुद्धीचें अंतिम फल एकच मोक्ष आहे ह्मणून बुद्धिही एकस्वरूपी असावी असें ह्मणतात. **प्रपाकार मधुसूदनीकार, शंकरानंद व द्विवेदी** कर्मयोगांत ईश्वरार्पण बुद्धि कायम असेल तरच तीस व्यवसायात्मिका ह्मणतात. ही बुद्धि

तत्त्वपरायण असते हेंही सर्वांस संमत आहे. **शंकरानंद** ' एकैव ' आंत बाहेर सद्रूपानेंच असणारी. **द्विवेदी** यांनीं दिलेला एक प्रमाणभूत श्लोक—

" ततोऽन्यथा किंचन यद्विवक्षतः पृथग्दृशस्तत्कृतनामरूपभिः ॥
न कुत्रचित्क्वापिचदुःस्थितां मतिर्लभेतवाताहतनौरिवाऽऽस्पदम् "

[ आत्मतत्त्वाशिवाय अगर निष्काम भगवद्भजनाशिवाय इतर गोष्टींचा विचार करणारे व नामरूपाच्या योगानें झालेलें जगच पाहत बसणारे लोकांची बुद्धि वादळाच्या सोसाटयांत सांपडलेल्या होडग्याप्रमाणें झोके खात राहते ? )

**मध्वाचार्य, रामानुजाचार्य, सत्यानंद** व **विद्याधिराजभट्ट** यांसही वरील श्लोकांचा अर्थ अमान्य नाहीं. **रामानुजांनीं** असें सांगितलें कीं ' आत्मा व देह हे भिन्न आहेत असें माहित असूनही आत्मस्वरूपाचा शोध न करणारे बौद्धादि व आत्मा काय आहे हें कळलें असूनही स्वर्ग प्राप्तीची इच्छा करणारे कर्मठादि हे सर्व अव्यवसायी होत.

**ज्ञानेश्वराचे दृष्टांत पहाः**—जैसी दीपकळिका धाकुटी । परी बहु तेजातें प्रकटी । तैसी सद्‌बुध्दि । हे थेकुटी ( लहान अल्प ) ह्मणो नये ॥....आणिका सारिखा बहुवस । जैसा न जोडे परिस । कां अमृताचा लेश । दैवगुणें ॥ तैसी दुर्लभ सद्‌बुध्दि । जिथे परमात्माच अवधि ( शेवटचा आधार ) । जैसा गंगेसि उदधि । निरंतर ॥ ४१ ॥ तैसे ईश्वरावांचुनि कांहीं । जिये ( ज्या बुध्दीला ) आणिक लाहाणें ( प्राप्त करून घेणें ) नाहीं । ते एकचि बुध्दि पाही । अर्जुना जगीं ॥

**वामनपंडित** अव्यवसायी लोकांसंबंधानें म्हणताातः—एका एका मनोरथासाठीं । यत्न करिती कोटी कोटी । मागुती निश्चय पोटीं । कार्य सिद्धीचा असेना ! ॥ होईल कीं नव्हे फळ । या चिंतनेनें तळमळ । **कधीं होईल ?** हे **हळहळ** । सुख कैचें तयांतें ? ॥ ४१ ॥

निश्चित बुद्धि कां होत नाहीं याविषयीं पुढील तीन श्लोकांनीं सांगतात.

येषां व्यवसायात्मिका बुद्धिर्नास्ति ते—

ज्या अविद्वान लोकांना ही निश्चयात्मक बुद्धि अगर ज्ञान नसतें ते—

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ॥**
**वेदवादरतः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥४२॥**

**पार्थ** ( अर्जुना! **वेदवादरताः** ( वेदाच्या नुसत्या बाह्य शब्दार्थाला जे मोहित झाले आहेत ) **न अन्यत् अस्ति इति वादिनः** ( --शब्दार्थाच्या पलीकडे--कर्माशिवाय--दुसरें कांहीं नाहीं असें जे म्हणणारे आहेत )--असे-- **अविपश्चितः** ( अविवेकी किंवा कामी व भोगरत अविद्वान लोक ) **यां इमां** ( जी ही ) **पुष्पितां** ( बाहेरून रमणीय दिसणारी ) **वाचं** ( वाणी ) **प्रवदन्ति** ( बोलतात; ) सारांश, वेदाच्या नुसत्या अर्थवादामध्यें मग्न होऊन कर्माशिवाय व स्वर्गसुखाशिवाय दुसरें कांहीं मिळविण्यासारखें नाहीं, दुसरा पुरुषार्थच नाहीं असें ह्मणणारे फलाकांक्षी कर्मठ लोक जी बाह्यरमणीय वेद-वचनें म्हणत असतात;--संबंध पुढील श्लोकाशीं आहे.--

यामिति । यामिमां वक्ष्यमाणां पुष्पितां पुष्पितवृक्ष इव शोभमानां श्रूयमाणरमणीयां वाचं वाक्यलक्षणां प्रवदन्ति । केऽविपश्चितोऽल्पमेधसोऽविवेकिन इत्यर्थः । वेदवादरता बह्वर्थवादफलसाधनप्रकाशकेषु वेदवाक्येषु रता हे पार्थ नान्यत्स्वर्गप्राप्त्यादिफलसाधनेभ्यः कर्मभ्योऽस्तीत्येवंवादिनो वदनशीलाः ॥ ४२ ॥

**पूर्व०**--भगवन्! मग ही सांख्यानें अगर योगानें सिद्ध होणारी बुद्धि सर्वांसच कां उत्पन्न होत नाहीं?

**सिद्धां०**--पार्था! मंदबुद्धिच ते! अनेक अर्थवादांचे फल काय मिळेल तें फल मिळण्यास साधनें काय वगैरे गोष्टी प्रकट करणारे, जे वेदमंत्र आहेत त्यांच्या बाह्य अर्थामध्येंच अविद्वान लोक रममाण होतात; वेदांचे खरे व सद्वस्तू प्रकट करणारे अर्थ गुरुमुखानें समजून न घेतां केवळ स्वर्गसुख हें फल व कर्म हेंच साधन ह्याच अर्थामध्यें रममाण होतात. आणि स्वर्गसुख आणि तें मिळवून देणारें कर्म याशिवाय दुसरा पुरुषार्थ ( ईश्वर अगर ब्रह्म असें ) कांहींच नाहीं असें हें अविद्वान लोक ह्मणतात. असें हें अविद्वान लोक काय करतात तर ऐकण्याला मात्र सुंदर अशीं नादमनोहर आणि ह्मणून किंशुक पुष्पांप्रमाणें दिसण्याला सुंदर परंतु वस्तुतः निष्फल अशीं--पुढील श्लोकांत स्पष्ट केलेलीं आणि रहाटगाडग्याप्रमाणें जन्ममरण देणारी जीं वाक्यें अथवा वाक्यें तरी कसलीं? नुसती कर्णमनोहर जी जल्पना आहे, त्या जल्पनेला वश होतात! ह्यामुळें अविद्वान लोकांची बुद्धि निश्चयात्मक होत नाहीं.--

या श्लोकावर सर्व अद्वैत, शुद्धाद्वैत, विशिष्टाद्वैत व द्वैतवादी टीकाकारांचा सामान्यतः एकच प्रकारची टीका आहे ही समाधानाची गोष्ट होय. कर्ममार्ग स्वर्गसुख देण्यासाठीं नाहीं. चित्तशुद्धीसाठीं आहे, कर्मानें मोक्ष नाहीं असा सर्व टीकाकारांचा सामान्यतः आशय आहे. **'परोक्षविषया वै वेदा'** 'वेदाचा अर्थ बाहेरून दिसतो तसाच तो नसतो, आंत निराळाच खोल अर्थ असतो' असें **मध्वाचार्यांनीं** ह्मटलें आहे तेंच सर्वांस मान्य आहे. केवळ उत्तान अर्थामध्येंच निमग्न होणाऱ्यांस **शंकरानंदांनीं** 'बहिर्मुख' असें म्हटलें आहे. **मधुसूदनीकार** यांनीं अविवेकी लोकांस 'विचारानें उत्पन्न होणाऱ्या तात्पर्यार्थाविषयीं ज्ञानशून्य' असें म्हटलें आहे पुष्पितां ह्मणजे देवताज्ञान अगर उपासनाविषयक बोलणें; नुसती उपासनाविषयक; ज्ञान देणारी, ब्रह्म समजावून देणारी, वाणी नव्हे.' असा **प्रपाकार** अर्थ करितात. 'वेदवाद' अर्थरहित पाठ, असा **सत्यानंद** अर्थ करितात. 'मनुष्यानें वेदाचें निरर्थक पठन करूं नये,' पाखंडमतानें करूं नये अगर सकाम करूं नये, असें **विद्याधिराज** म्हणतात. सारांश स्वर्गसुखाच्या आशेनें केलेलें कर्म अगर उपासना आणि निरर्थक वेदपठन यांची सर्व समंजस टीकाकारांनीं खरपूस निंदा केली आहे.

**ज्ञानेश्वर**—ह्मणती संसारी जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे । मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ एथ हें वांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखाचि नाहीं । ऐसें अर्जुना बोलती पाही । दुर्बद्धी ते ॥

**वामनपंडित**—अर्जुना कर्म म्हणजे वेल । स्वर्गादि पुष्प मोक्ष फल । आधीं वेलास येतें फुल । फल शेवटीं ॥ फल आलियावरी । वेल वाळे ज्यापरी ज्ञान झालिया उपरी । जळे कर्म ॥ जें ज्ञान तेची मुक्ति । तेची जागृती तेची स्वप्ननिवृत्ति । परि ते ब्रह्मात्मताप्राप्ती । चित्तशुद्धीनें ॥ दित्तशुद्धी कर्ममुळ । एवं परंपरेनें मोक्षफळ । तोचि मोक्ष केवळ । आत्मबोध ॥ फळ पक्क होतां वेल । वाळे त्यांत नुरे ओल । परी फलाहूनि पूर्वी येतें फूल । तें घेऊं नये ॥ ज्याणें तोडिलें फूल । त्यास कैचें होय फळ । परी बाळास सद्यः ( लागलीच ) कोमळ । पुष्प तोडणें आवडे ॥ पंडितांनीं हा श्लोक व हें रूपक समर्पक रीतीनें जुळविलें आहे त्याचा रस सूज्ञ वाचक चाखतीलच ॥ ४२ ॥

ते च—

आणखी ते लोक कसे आहेत व त्यांचीं वचनें कशीं आहेत हें पहाः—

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ॥**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

**कामात्मनः** ( इच्छा हाच आत्मा आहे ज्यांचा, इच्छापूर्ण ) **स्वर्गपराः** ( स्वर्ग हाच आहे मुख्य पुरुषार्थ ज्यांचा )--असे ते ज्ञानशून्य लोक आहेत. ते जी फसविणारी वाणी बोलतात ती--**जन्मकर्मफलप्रदां** ( जन्म, संसार, हें व कर्मफल देणारीं अशीं ),-तसेंच—**भोगैश्वर्यगतिंप्राति** ( भोग आणि ऐश्वर्य मिळवून देण्यासाठीं ) **क्रियाविशेषबहुलां** ( अनेक प्रकारचीं कर्में जिच्या योगानें पुष्कळशीं सांगितलीं जातात अशीं )—अशीं जीं भाषणें करितात,—सारांश वरच्या श्लोकांत सांगितलेले अपंडित लोक वासनेचे दास व स्वर्गसुखासाठीं हपापलेले असतात.; आणि म्हणून सकाम कर्म केल्यानें संसारांत पाडणारीं व पुष्कळ भोग आणि मोठी सत्ता मिळविण्याची इच्छा करणारांना अनेक प्रकारच्या क्रिया करण्यास सांगणारीं जीं भाषणें करितात; पुढील श्लोकांत अन्वय पूर्ण होईल.—

कामात्मान इति । कामात्मानः कामस्वभावाः कामपराइत्यर्थः । स्वर्गपराः स्वर्गः परः पुरुषार्थो येषां ते स्वर्गपराः स्वर्गप्रधानाः । जन्मकर्मफलप्रदां कर्मणः फलं कर्मफलं जन्मैव कर्मफलं जन्मकर्मफलं तत्प्रददातीति जन्मकर्मफलप्रदा तां वाचं प्रवदन्तीत्यनुषज्यते । क्रियाविशेषबहुलां क्रियाणां विशेषाः क्रियाविशेषास्ते बहुला यस्यां वाचि तां स्वर्गपशुपुत्राद्यर्थां यया वाचा बाहुल्येन प्रकाश्यन्ते । भोगैश्वर्यगतिं प्रति भोगश्चैश्वर्यं च भोगैश्वर्ये तयोर्गतिः प्राप्तिर्भोगैश्वर्यगतिस्तां प्रति साधनभूता ये क्रियाविशेषास्तद्बहुलां तां वाचं प्रवदन्तो मूढाः संसारे परिवर्तन्त इत्यभिप्रायः ॥ ४३ ॥

इच्छा अगर वासना हा ज्यांचा स्वभाव बनून गेला आहे, जे वासनांच्या सर्वथैव स्वाधीन झाले आहेत व ज्यांस स्वर्ग हाच प्रधान अगर मुख्य पुरुषार्थ वाटतो; अथवा ज्यांचें ' जन्म, कर्म आणि फल हाच पुरुषार्थ आहे ह्मणजे जन्मास यावें, कर्म करावें, फलभोगासाठीं पुनः जन्मास यावें, असा पुरुषार्थ आहे आणि ह्मणून जे मोक्षाची कथा ऐकत नाहींत किंवा तिचें नांव सुद्धां घेत नाहींत; तेच विषयभोगलंपट मीमांसक आणि अज्ञानी जन्ममर-

णाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें भाषणें बोलतात तीं कशीं असतात तें पहाः—ज्यांच्या सकाम कर्माचें फल जन्म मरण आणि संसार हेंच आहे तें फल देणारीं वेदवाक्यें जे लोक बोलत असतात आणि येथें व स्वर्गामध्यें उत्तम प्रकारचें भोग्य पदार्थ व उत्तम प्रकारची सत्ता व ऐश्वर्य मिळण्यासाठीं, हाच पुरुषार्थ साध्य करण्यासाठीं, उपयोगीं जीं नानाप्रकारचीं कर्में व स्वर्ग, पशु, पुत्र वगैरे भोग्य सुखाचीं साधनें मिळवून देणारीं अनेक कर्में ज्यांत सांगितलीं आहेत अशा प्रकारचे वेदमंत्र व वेदवाक्यें पठन करणारे मूढ लोक जन्ममरण आणि मरणजन्म या फिरकीच्या चक्रांत सांपडून दुःख भोगतात हा अभिप्राय आहे. तात्पर्य उपभोग मिळविण्याच्या हेतूनें केलेल्या सांग अगर व्यंग कर्माचा विपाक जन्ममरणामध्यें होतो आणि त्यामध्यें वरील अविचारी कर्मठ सांपडतात!

इतर टीकाकारही कांहीं विशेष सांगत नाहींत.

**वामनपंडित :**—कीं वासनानदीची धारा । जन्ममरण प्रवाही नरा । सहज वाहवी, विशेष वारा । सुटला काम्यवेदोक्तकर्माचा ॥ लागावया तीरा । यत्नही करूं नेदी नरा ।........॥ ४३ ॥

तेषां च—

आणि असल्या—लोकांची—

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयाऽपहृतचेतसाम् ॥**
**व्यसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥४४॥**

**भोगैश्वर्यप्रसक्तानां** ( उपभोग आणि ऐश्वर्य यांमध्यें मग्न झालेल्या ) **तया** ( त्या कर्म सांगणाऱ्या वेदवाणीनें ) **अपहृतचेतसां** ( आकर्षून आंखडून, आंवळून टाकिलीं आहेत मनें ज्यांचीं—असे अविवेकी व मूढ लोकांच्या—) **समाधौ** ( अंतःकरणामध्यें ) **व्यवसायात्मिका बुद्धिः** ( सद्वस्तूचा निश्चय केला आहे जिनें, निश्चयपूर्ण झाली आहे अशी जी बुद्धि अगर ज्ञान ) **न विधीयते** ( --तें असत नाहीं, मिळत नाहीं, प्राप्त होत नाहीं. ) सारांश वरील दोन श्लोकांत सांगितलेले व भोग आणि ऐश्वर्य यांतच गढून गेलेले आणि त्या वेदवाक्यांच्या वरवरच्या अर्थानेंच मतिभ्रष्ट झालेले कर्मठांच्या अंतःकरणांत सद्वस्तूचा निश्चय करणारी अगर कराविणारी सांख्य अगर योगबुद्धि

कधीं प्रवेशच करीत नाहीं. अर्थातच वैषयिक सुखांत दंग झालेल्या पुरुषाला आत्मस्वरूपाची ओळख करून देणारी बुद्धि कशी मिळणार?

भोगेति । भोगैश्वर्यप्रसक्तानां भोगः कर्तव्यमैश्वर्यं चेति भोगैश्वर्ययोरेव प्रणयवतां तदात्मभूतानां तया क्रियाविशेषबहुलया वाचाऽपहृतचेतसामाच्छादितविवेकप्रज्ञानां व्यवसायात्मिका सांख्ये योगे वा बुद्धिः समाधौ समाधीयतेऽस्मिन्पुरुषोपभोगाय सर्वमिति समाधिरन्तःकरणं बुद्धिस्तस्मिन्समाधौ न विधीयते न भवतीत्यर्थः ॥ ४४ ॥

**पूर्व०**—भगवन्! कर्मानें चित्तशुद्धि होते तेव्हां या कर्मठांस शेवटीं तरी ज्ञान होऊन मोक्षप्राप्ति होत असेल?

**सिद्धां**—अर्जुना! अरे नांव कशाला घेतोस? सर्व जन्मभर कर्म करून भोग व ऐश्वर्य मिळविण्यामध्यें जे दंग झाले, भोग व ऐश्वर्याचे जे दास झाले--नव्हे तत्स्वरूपीच बनले, तात्पर्य सर्वथैव आसक्त झाले, त्या बहिर्मुख व विषयांकडेच चित्त असणाऱ्यांची चित्तशुद्धि कसली आणि त्यांना मोक्ष तरी कसला मिळणार?

**पूर्व०**—असें झालें तरी केव्हां ना केव्हां त्यास विवेकबुद्धि होऊन ते मोक्ष मार्गास लागतील, नाहीं बरें भगवन्?

**सिद्धां**—विवेकापेक्षां तुझ्या अंतःकरणांत त्या अपंडित लोकांबद्दल दया जास्त दिसते. अरे असें पहा कीं यांचें सर्वच्या सर्व अंतःकरण त्या अनेक कर्में करावयास नित्यशः सांगणाऱ्या बाह्यरमणीय वेदवाक्यांनीं आपलेंसें करून टाकिलेलें असतें, व यांची तारतम्यबुद्धि दडपून टाकिलेली असते. तेव्हां जोंपर्यंत वेदांचा कर्मपर अर्थ करून कर्मामध्येंच हे विषयलंपट कर्मठ गुंग झाले आहेत, तोंपर्यंत त्यांची चित्तशुद्धि होणेंच नाहीं. ईश्वरप्रसाद किंवा गुरूचा अनुग्रह होऊन विषयपराङ्मुख चित्त झालें, तर यांस वेदवाक्यांचा गूढ अर्थ कळून चित्तशुद्धि व्हावयाची!—असो; सर्व पदार्थ पुरुषाच्या, ब्रह्माच्या उपभोगासाठीं मात्र आहेत असा कर्मठांच्या अंतःकरणामध्यें परमार्थाचा निश्चय करणारी सांख्यबुद्धि अगर योगबुद्धि कधींही प्रवेश करीत नाहीं. सारांश सकाम कर्म करणाऱ्या कर्मठांस अगर उपासकांस मोक्ष मिळणें अथवा चित्तशुद्धि होणें अत्यंत अशक्य आहे,

असें सांगण्याचा भगवंताचा हेतु आहे. जितकें विषयासक्त अंतःकरण जास्त तितका मोक्ष लांब जास्त आणि जन्म मरण अधिक जवळ असा मथितार्थ*आहे.

**शंकरानंद व रामानुज** यांशिवाय बाकीचे मला उपलब्ध असलेले टीकाकार 'समाधौ' शब्दाचा अर्थ आचार्यांहून भिन्न रीतीनें करितात. **प्रपाकार** 'परमेश्वराच्या आराधनेमधील ऐकाग्र्यांत' असा **मधुसूदनीकार** 'मीच ब्रह्म आहे अशा प्रकारची स्थिति होते ती समाधि आणि त्यांत' असा **मध्वाचार्य** 'ईश्वरचिंतनांत' असा, **सत्यानंद व श्रीधर** 'चित्तैकाग्र्यतेमध्यें' असा याप्रमाणें निरनिराळे अर्थ देतात **सरकार** नामक नीतिशास्त्रज्ञ समाधि ह्मणजे मोक्ष असा अर्थ करितात! **मधुसूदनीकार**ही 'हे अर्थही रूढ आहेत' इतकें मात्र म्हणतात. प्रस्तुत प्रकरणाला आचार्यांनीं दिलेला अर्थच उत्तम आहे असें विचारांतीं दिसेल. 'समाधि' शब्द प्राचीन उपनिषदांमध्यें फारसा दिसत नाहीं. भगवद्गीतेच्या वेळेस तो प्रचारांत येऊं लागला असावा असें दिसतें; ह्मणून योगशास्त्राचा जन्म होण्याच्या सुमारास व प्राचीन उपनिषदानंतर गीतावतार झाला असें दिसतें.

म्हटलें आहे:—

"सोऽहं चिन्मात्रमेवेति चिन्तनं ध्यानमुच्यते ।
ध्यानस्याविस्मृतिः सम्यक्समाधिरभिधीयते ॥"

( तो जो चैतन्यरूपी परमात्मा तोच मी असें जें चिंतन त्यास ध्यान ह्मणावें. आणि समाधि म्हणजे ध्यानाची उत्तम अविस्मृति होय.! )

या चुकलेल्या मूढांसंबंधानें **ज्ञानेश्वर** म्हणतातः—'जैसा कर्पूराचा राशी कीजे । मग अग्नि लावूनि दीजे । कां मिष्टान्नीं संचरविजे । (मिसळावें) । काळकूट ( विष ) ॥ दैवें अमृतकुंभ जोडिला । तों पायें हाणोनि उलंडिला । तैसा नासिती धर्म निपजला । हेतुकपणें ॥....जैसी रांधवणी (स्वयंपाकीण) रससोय (स्वयंपाक) निकी ( चांगली ) । करूनिया मोलें विकीं । भोगासाठीं अविवेकी । धाडिती ( घालवून टाकतात ) धर्म ! ॥

* 'तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु' असें ह्मणणाऱ्या परंतु आरोग्यासाठीं उदकशांति, ग्रहानूकूलतेसाठीं ग्रहमख, पुत्रासाठीं वगैरे कर्मे करणाऱ्या विषयलंपटांनीं वरील तीन श्लोकांचें नीट मनन करावें.

**वामन**—एकनिष्ठ जे बुद्धि । तेचि ह्मणावी समाधि ।....॥ ४४ ॥

य एवं विवेकबुद्धिरहितास्तेषां कामात्मनाम्—

याप्रमाणें जे लोक सद्बुद्धिशून्य आहेत त्या वासनात्मक कर्मठांस--वेद त्रिगुणात्मक दिसतात असें सांगण्याच्या उद्देशानें ह्मणतात—

## त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ॥
## निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्॥४५॥

**वेदाः** (वेद) **त्रैगुण्यविषयाः** ( सत्त्व, रज आणि तम यांच्या योगानें उत्पन्न होणारा जो संसार, त्या संसारास प्रकट करणारे आहेत. ) ज्यांना वेदांचा परमार्थ कळत नाहीं त्या कर्मठ लोकांस वेदांच्या बाह्य अर्थामुळें वासनात्मक सत्त्वादि गुणांचा उद्भव होऊन संसारांत पडावें लागतें.--ह्मणून-- **अर्जुन** (अर्जुना !) तूं **निस्त्रैगुण्यः** ( रजतमांनीं व्यापलेल्या सत्त्वगुणविरहित, निर्वासनात्मक, निष्काम )--तसाच--**निर्द्वंद्वः** ( सुखदुःखादि विपरीत भाव टाकून दिलेला ), **नित्यसत्त्वस्थः** ( निरंतर सात्विक गुणाचा मात्र आश्रय केलेला ) **निर्योगक्षेमः** ( नसलेला पदार्थ मिळाविणें तो योग आणि मिळालेल्याचें संरक्षण करणें तो क्षेम, या योगक्षेमाविरहित-होत्साता=) आणि—**आत्मवान्** (स्वरूपाचें चिंतन करणारा )—असा हो.—सारांश, वेदाचा बाहेरील विषयात्मक अर्थच समजून घेऊन वासनेच्या योगानें कर्म करणारे अविद्वान् लोकांच्या संबंधानें पाहिलें असतां वेदासारखा अद्वितीय ग्रंथही संसारपरच होतो! ह्मणून तूं आपलें मन वासनाशून्य कर. सुखदुःखाविषयीं हर्षविषाद मानूं नको; अहंकार सोडून देऊन सात्त्विकगुणाचा मात्र आश्रय कर; आपल्यास मिळेल काय व मिळाल्याचें संरक्षण कसें होईल वगैरे चिंता सोडून दे आणि नेहमीं मनोजय करून आपलें जें मूळचें स्वरूप त्याचें चिंतन करीत रहा.--

त्रैगुण्येति । त्रैगुण्यविषयास्त्रैगुण्यं संसारो विषयः प्रकाशितव्यो येषां ते वेदास्त्रैगुण्यविषयास्त्वं तु निस्त्रैगुण्यो भवार्जुन निष्कामो भवेत्यर्थः । निर्द्वंद्वः सुखदुःखहेतू सप्रतिपक्षौ पदार्थौ द्वंद्वशब्दवाच्यौ ततो निर्गतो निर्द्वंद्वो भव । त्वं नित्यसत्त्वस्थः सदा सत्त्वगुणाश्रितो भव । तथा निर्योगक्षेमोऽनुपात्तस्योपादानं योगः उपात्तस्य रक्षणं क्षेमः, योग-

क्षेमप्रधानस्य श्रेयसि प्रवृत्तिर्दुष्करेत्यतो निर्योगक्षेमो भव । आत्मवानप्रमत्तश्च भव । एष तवोपदेशः स्वधर्ममनुष्ठितः ॥ ४५ ॥

**पूर्व**०—श्रीकृष्णा! वेदांच्याच योगानें परब्रह्म जाणलें जातें, वेदोक्तकर्माप्रमाणें आचरण करावें असें सांगतात आणि आपण तर वेदांची निंदा करीत आहांत हें कसें?

**सिद्धां**०—अर्जुना! निष्कामत्वानें ममत्वशून्य होऊन, परमेश्वराप्रीत्यर्थ जे लोक कर्म करितात, त्यांच्या चित्ताची शुद्धि होऊन नंतर ज्ञानप्राप्ति होते व ज्ञानी लोक मोक्षास जातात हा सांगितलेला प्रकार व 'मला अमुक पाहिजे' म्हणूनच वेदोक्त कर्म ममत्वाभिमानानें करणारे लोक संसारांत पडतात हा विशेष विसरलास वाटते? या अज्ञानी लोकांनीं केलेल्या वेदार्थाची निंदा मीं केली व आणखीही करणार आहे. अशा लोकांस वेदापासून जें ज्ञान होतें तें संसार वाढविण्यास व कायम ठेवण्यास कारण होतें. सत्व रज आणि तम मिळून उत्पन्न होणारें कर्म आणि तदंगभूत जें जन्ममरण ह्यांचें मात्र ज्ञान या कर्मठांस वेदांपासून होतें ह्मणून वेदांस पर्यायानें संसारप्रकाशक असें ह्मटलें—दीपाचा उपयोग ज्ञानी लोकांस होतो व ते दीपाच्या साह्यानें अंधकाराचा नाश करितात. पण हाच तमोनाशक दीप अज्ञान्यांच्या हातांत पडला तर ते लोक आपल्या घरास आगही लावतील! हाच प्रकार वेदांचा आहे व म्हणूनच त्यास संसाराचे सहाय्यकारी असें ह्मटलें. असो—आतां, तूं मायेचे तीन गुण जे सत्व, * रज आणि तम यांस टाकून देऊन निष्काम हो; फलाची अशा ठेवूं नको; सुखदुःख जयापजय लाभालाभ वगैरे कांहीं झालें तरी त्यांस, त्या द्वंद्वांपैकीं ( जोडींपैकीं ) कोणासही, विचारांत घेऊं नको; सुखदुःखास न जुमानतां समाधानानें रहा; नेहमीं लोभ आणि अज्ञान यांचा नाश करण्याचा यत्न करून सात्विकवृत्तीनें शुद्ध सत्वगुणाचा (—अचंचलधैर्याचा—) आश्रय करून रहा; शरीरयात्रेसाठीं द्रव्योपार्जन करणें, व मिळविलेल्याचें रक्षण करणें, हे व्यवहारिक लोकांचे जे योगक्षेमाचे मार्ग हे प्रबल झाले तर मोक्ष मिळणें दुर्घट होईल; एतदर्थ 'आपलें कसें होईल!' ही चित्ताचा विक्षेप करणारी

---

* येथील सत्वगुण रज आणि तम यांनीं मिश्रित आहे. पुढें सांगितलेला सत्वगुण शुद्ध आहे.

संसारचिंता सोडून दे, आणि अप्रमत्त रीतीनें ( मनाला विषयांचें स्वाधीन न ठेवितां ) सदासर्वदा—सांख्ययोगांत सांगितलेल्या आत्मस्वरूपाचें चिंतन करीत ऐस. अर्थातच हा उपदेश केला आहे, तो तूं आपलें क्षत्रियधर्मा-प्रमाणें कर्तव्य करीत असतांनाही ध्यानांत बाळगिला पाहिजे.

ह्या श्लोकावर स्पष्टीकरणाच्या टिप्पण्या लिहितांना बऱ्याच टीकाकारांची पुष्कळशी धांदल उडाली आहे. येथें वेदाचीं उघड निंदा आहे असें वाटून कित्येकांनीं व विशेषत: द्वैतमतप्रतिपादकांनीं ‘ त्रैगुण्यविषय ’ ह्या शब्दाच्या चमत्कारिक व्युत्पत्ति दिल्या आहेत त्रैगुण्य विषयापर्यंति ते त्रैगुण्य-विषय: ( सत्त्वरजस्तमादि जे विष त्याचा तिरस्कार करणारे, त्यास घालवून टाकणारे ते त्रैगुण्यविषय ) अशी व्युत्पत्ति अद्वैतवादी **प्रपाकार** व **सत्यानंद**, आणि **विद्याधिराज** देतात ! ‘ सत्व, रज आणि तम ज्यांत पुष्कळ आहेत अशा पुरुषांचा उद्धार होणें शक्य नाहीं असें पाहून दयार्द्र-दृष्टीनें त्या पुरुषांस हितोपदेश करणारे ते वेद ’ अशी किंवा अशा अर्थाची व्युत्पत्ति **रामानुज** व **श्रीधर** देतात. **“ सर्वे वेदास्तत्पदमामनन्ति ’** ( सर्व वेदांचें महातात्पर्य परमात्मस्वरूप—विष्णुस्वरूप—प्रकट करितें ) ह्मणून वेदांचा कामुक लोकांस दिसणारा अर्थ मात्र येथें निंदित केला आहे, असें **सत्यानंद, विद्याधिराजभट्ट** आणि **मध्वाचार्य** म्हणतात. ‘ आत्मवान याचा अर्थ **विद्याधिराजांनीं** ‘ अहं परमात्मा न किंतु स मम स्वामीति ज्ञानवान् ( मी परमात्मा नव्हे, तो माझा स्वामी आहे असें ज्ञान ) हा केला आहे’ **मधुसूदनीकार, श्रीधर, पर्वते द्विवेदी, चांदोरकर** वगैरे अद्वैतवादी टीकाकार **आचार्यां**प्रमाणें ‘ कामुक लोकांच्या संबंधानें मात्र वेद त्रिगुणात्मक आहेत ’ असें निरनिराळ्या दिशेनें सांगतात. **शंकरानंद** मात्र ‘ त्रिगुणं अव्याकृतं तस्मदुत्पन्नं जगत्—त्रैगुण्यं तदेवप्रतिपादकत्वेन विषयो येषां ’ ( त्रिगुणात्मक जी मूळ प्रकृति, तिच्यापासून झालेलें जगत् तें त्रैगुण्य. तेंच सांगण्याचा हेतु आहे ज्यांचा ते वेद होत. ) अशी व्युत्पत्ति देऊन **‘वेदानिमं लोकममुं च परित्यज्याऽऽत्मानमन्विच्छेदिति** ( वेद, हा व तो लोक-पृथ्वी व स्वर्ग—सोडून, त्यांचा त्याग करून, आत्मचिंतन करावें अशा अर्थाची श्रुति देतात. ‘ द्वंद्व ह्मणजे नामरूप होय असें यांचें ह्मणणें आहे, यावरून निर्द्वंद्व ह्मणजे ब्रह्म स्वरूप असा अर्थ झाला ! **वल्लभ**—‘ गुणत्रय उत्पन्न

केल्यावर जे जीव उत्पन्न केले त्यांस कर्माचें फल सांगणारे वेद आहेत" असें ह्मणतात.

असो; तात्पर्य इतकेंच आहे कीं वासना उत्पन्न करणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा त्याग करावा.

**ज्ञानेश्वरः**—तिहीं गुणीं आवृत्त । हे वेद जाण निभ्रांत ! । ह्मणोनि उपनिषदादि समस्त । सात्विक ते ॥ येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक । जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा !

**पंडितांचा** अभिप्राय **प्रपाकारां**प्रमाणेंच आहे. तथापि यांचें स्पष्टीकरण अनेक कारणांनीं वाचण्यासारखें आहे, तें मुमुक्षुंनीं अवश्य वाचावें ॥ ४५ ॥

सर्वेषुवेदोक्तेषुकर्मसु यान्यनन्तानि फलानि तानि नापेक्ष्यन्ते चेत्किमर्थं तानीश्वरायेत्यनुष्ठीयन्त इति, उच्यते शृणु—

सर्व वेदोक्त कर्मांपासून जीं अनंत फलें उत्पन्न होतात, ह्मणून सांगितलें आहे; तीं जर नकोशीं आहेत, तर मग असलीं कर्में व कर्मफलें ईश्वरार्पण केलीं तरी व्यर्थच होणार अशी शंका घेशील तर, ऐक. सांगतों.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ॥**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

**उदपाने** ( उदकाच्या निरनिराळ्या, लहान संचयांमध्यें, कूप, तडाग, वगैरे मध्यें ) **यावान्** ( जितका ) **अर्थः** ( कार्यभाग—प्रत्येकीं होतो— ) **तावान्** ( तितकाच, सर्व, कार्यभाग ) **सर्वतः संप्लुतोदके** ( सर्वत्र जळमय असलेल्या महासागरामध्येंही—होतो.— )—त्याचप्रमाणें—**सर्वेषु वेदेषु** ( सर्व वेदामध्यें सांगितलेल्या—सर्व कर्मांपासून जी निरनिराळी सुखप्राप्ती होते ती- ) **विजानतः** ( परब्रह्मज्ञान झालेल्या ) **ब्राह्मणस्य** ( ब्रह्मज्ञानी पुरुषांस—समग्रत्वानें, एकदम होते.— ) तात्पर्य असें दिसतें कीं विहिरी, तळीं वगैरे निरनिराळ्या उदकसंचयामध्यें कोठें स्नान, कोठें पान, इत्यादि क्रिया करून आपण आपले कार्यभाग आटपून घेतों, ते सर्व कार्यभाग एखाद्या अगाध व गोड समुद्रामध्यें सहज करून घेतां येतात. तसेंच निरनिराळ्या वेदमंत्रांनीं जीं कर्में व जीं फलप्राप्ति सांगितली आहे सुखप्राप्तीही सांगितली आहे, तें

सर्व सुख एकदम आणि एके ठिकाणींच ब्रह्मज्ञान झालेल्या विद्वानांस मिळतें. वेदकर्मांपासून—अगर व्यवहारिक कर्मांपासून होणारे सुख क्षणजीवि असतें पण ब्रह्मानंद हा अक्षय सुखाचा सांठा असतो—

यावानिति । तथा लोके कूपतडागाद्यनेकस्मिन्नुदपाने परिच्छिन्नोदके यावान्यावत्परिमाणः स्नानपानादिरर्थः फलं प्रयोजनं स सर्वोऽर्थः सर्वतः संप्लुतोदके तावानेव संपद्यते तत्रान्तर्भवतीत्यर्थः । एवं तावांस्तावत्परिमाण एव संपद्यते सर्वेषु वेदेषु वेदोक्तेषु कर्मसुयोऽर्थो यत्कर्मफलम्, सोऽर्थो ब्राह्मणस्य संन्यासिनः परमार्थतत्त्वं विजानतो योऽर्थो विज्ञानफलं सर्वतः संप्लुतोदकस्थानीयं तस्मिंस्तावानेव संपद्यते तत्रैवान्तर्भवतीत्यर्थः । * "सर्वं तदभिसमेति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद" इति श्रुतेः 'सर्वं कर्माखिलं' इति च वक्ष्यति । तस्मात्प्रागज्ञाननिष्ठाधिकारप्राप्तेः कर्मण्याधिकृतेन कूपतडागाद्यर्थस्थानीयमपि कर्म कतर्व्यम् ॥ ४६ ॥

ज्याप्रमाणें व्यवहारामध्यें विहिरी, तळीं इत्यादि लहान लहान निरनिराळ्या उदकसंचयांमध्यें कोठें आचमन, कोठें स्नान, कोठें पान इत्यादि निरनिराळे कार्यभाग आपण उरकून घेतो; ते सर्वच कार्यभाग अगाध अशा गोड महासागरामध्यें एके ठिकाणींच आपल्याला साध्य करून घेतां येतात; ह्मणजे निरनिराळ्या ठिकाणीं साध्य होणारीं प्रयोजनें एका गोड समुद्रामध्यें अगर सरोवरामध्यें आपल्यास सहज उरकून घेतां येतात; अर्थात् हीं सर्व कामें एका गोड पाण्याच्या सरोवरामध्यें अंतर्भूत होतात; त्याचप्रमाणें सर्व वेदमंत्रांनीं सांगितलेल्या कर्मांपासून जें कर्मफल प्राप्त होतें तें फल, परमार्थतत्त्वाचें ज्ञान झालें आहे अशा ब्रह्मज्ञानास जें ब्रह्मज्ञानाचें, स्वस्वरूपज्ञानाचें फल प्राप्त होतें, त्यांतच अंतर्भूत होतें.—"**एतस्यैवाऽऽनन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति,** इति श्रुतेः" ( विषयांपासून होणारे आनंद ब्रह्मानंदाचा एक अंश मात्र आहेत. ह्या अंशावरच त्यांचें उपजीवन होत असतें. ) असो; तेव्हां हा ब्रह्मानंद वर दिलेल्या दृष्टांतांतील गोड पाण्याचा समुद्र होय. आणि म्हणूनच यांत बाकीचे सर्व आनंद अंतर्लीन होतात. छांदोग्य उपनिषदांत असें ह्मटलें

* 'येथें—यथा कृताय विजितायाधरेयाः संत्यन्त्येवमेनं' हा पाठ कांहीं प्रतींत अधिक आहे.

आहे कीं ' ज्याला ब्रह्मज्ञान झालें त्या पुरुषाला, बाकीचे लोक जें काय चांगलें कर्म करितात त्या कर्मफलापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाइतकें----त्याला सुख होतें. ' ' अर्जुना! सर्व कर्मांचा अंतर्भाव ज्ञानामध्यें होतो ' असें भगवानच अ० ४ श्लोक ३३ मध्यें सांगतील. ह्मणून ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त होण्यापूर्वीं कर्माधिकाऱ्यानें दृष्टांतांतील विहिरी, तळीं वगैरेचीं कार्यें करणारीं कर्मेंच निष्कामत्वानें करावीं. तात्पर्य गोड पाण्याचें महासरोवर मिळालें नाहीं ह्मणून स्नानपानादिक क्रिया जशा आपण कूप वगैरे निरनिराळ्या तडागादिकांवरच भागवून घेतों, त्याप्रमाणें महानंद देणारें ब्रम्हज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत लहान लहान आनंद देणारीं सात्विक कृत्यें व कर्तव्यें निष्कामबुद्धीनें करून घ्यावीं.

**प्रपाकार, श्रीधर, मधुसूदनीकार शंकरानंद** इत्यादी सर्व अद्वैतमती टीकाकारांच्या मतें या श्लोकांत निष्काम कर्म केल्यावर चित्तशुद्धि होऊन उत्पन्न होणारा ब्रह्मानंद हा प्रत्येक विषयोपभोगापासून होणाऱ्या आनंदापेक्षां अत्यंत अधिक आहे असें भगवंतांनीं सांगितलें आहे. ' **स मोदते मोदनीयं हि लब्धा**' आनंदस्वरूपच त्यास मिळाल्यामुळें ब्रह्मज्ञास अत्यानंद होतो' 'विषयसुखें हीं ब्रह्मानंदाचा एक अंश मात्र आहेत. ' 'श्रुतिही समर्थनार्थ देतात, तात्पर्य वेदोक्तकर्मं सकामत्वानें केलीं असतां जें फलजन्य सुख होतें त्यास आपण आंचवूं अशी शंका कोणास येईल तिचें निराकरण या श्लोकांत करून निष्काम कर्मानें चित्तशुद्धि व पुढें ज्ञानमार्गानें ब्रह्मज्ञान, हीं प्राप्त झालीं असत अत्यंत आनंद होतो. किंबहुना आपण आनंदस्वरूपच होऊन जातों असें या श्लोकांत सांगितलें आहे. असें अद्वैतमतधारकांचें ह्मणणें आहे. ' पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा वगैरे **दर्शना**मध्यें निष्काम कर्म करावें असा जो अर्थ सांगितला आहे, तोच वेदतात्पर्य जाणणाऱ्या ब्रम्हज्ञ पुरुषासही साध्य होतो असें **प्रपाकार** ह्मणतात. ' तात्पर्य वेदाचा खरा अर्थ ब्रह्मपरच आहे, वेद त्या ब्रह्मपदाचीच स्तुति करितात ह्मणून वेदतात्पर्य समजून घेऊन कर्तव्यकर्म करावें. **वल्लभ** ह्मणतात :—

' **आनन्दं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन** ' ब्रह्मानंद जाणणाऱ्याला कसलीच भीति उरत नाहीं. ' ' **तमेव विदित्वाऽति मृत्युमेति** ' ब्रह्म जाणल्यानंतर मरण नाहीं. ' अशा श्रुति अर्थसमर्थनार्थ देतात. **मध्वः**— 'ब्राह्मण याचा अर्थ परोक्षज्ञानी असा करितात. **सत्यानंद** 'विजानतः '

याचा अर्थ 'परोक्षज्ञानी जो त्याचे' असा करितात. **दुसरा अर्थः** 'सर्वतः संप्लुतोदके' ह्मणजे प्रलय; उदपान ह्मणजे हरि, विष्णु; तेव्हां प्रलयकालीं-सुद्धां विष्णु प्रसन्न असतील तर जसे आपले इष्ट हेतु साध्य होतात त्याच-प्रमाणें वेदतात्पर्य जाणणाऱ्याचेही सर्व अर्थ सिद्ध होतात! **विद्याधिराज** ही 'वेदफल' ह्मणजे ज्ञान होय असें म्हणतात.

**रामानुजां**नीं या श्लोकाचा अर्थ केला आहे तो पहाः—ज्याप्रमाणें सर्व बाजूंनीं जलमय असलेल्या महासागरामधून आपल्यास हवें तितकेंच पाणी मनुष्य ग्रहण करितो, त्याप्रमाणें मुमुक्षू पुरुष आपल्यास हवें तेंच वेदामधून ग्रहण करितो. यांच्या अर्थसरणीनें 'जितका;' 'तितका' हे मूळ श्लोकांत शब्द आहेत ते दोन दोनदां घ्यावे लागत नाहींत. बाकीच्या टीकाकारांनीं हे शब्द दोन दोनदां घेतले आहेत. यांनीं वेदसंरक्षणासाठीं असा अर्थ केल हें उघड आहे.

प्रो० **द्विवेदी** खेरीज करून बाकी बहुतेक अद्वैती व सर्व द्वैती आणि विशिष्टाद्वैती टीकाकारांचा कटाक्ष वेदांचें प्रामाण्य कायम ठेवण्याचा आहे. प्रो. **द्विवेदी**प्रमाणें मीही असें म्हणतों कीं सकाम कर्म करावयास सांगणाऱ्या वेद-मंत्रांची भगवान् निंदा करीत आहेत हें प्रस्तुत प्रकरण आहे व चित्तशुद्धि करणाऱ्या निष्काम कर्माचा गौरव करावयाचा आहे; कारण चित्तशुद्धीनें मात्र ज्ञान—ब्रह्मज्ञान—साध्य होतें. म्हणून येथें वरवर तरी, सकृद्दर्शनींच, कर्मठांच्या मतें सकाम कर्म करण्यास सांगणाऱ्या वेदमंत्राची निंदा आहे हें सिद्ध आहे.

**ज्ञानेश्वर**ही बहुतेक रामानुजाप्रमाणेंच अर्थ करितातः—जरी वेदें बहुत बोलिलें। विविध भेद सूचिले (सुचविले)। तऱ्ही आपण हित आपुलें। तेंचि घेणें (घ्यावें)॥ जैसा प्रगटलिया गभस्ती। अशेषही मार्ग दिसती। तरी तेतुलेही (तितकेही) काय चालीजती (चालले जातात)?। सांगे मज॥ कां उदकमय सकळ। जऱ्ही जाहालें महीतळ। तरी आपण घेणें केवळ। आर्तीच जोगें (इच्छे पुरते)॥ तैसे जे ज्ञानी होती। ते वेदार्थातें विचाविती (स्पष्ट करितात)। मग अपेक्षित ते स्वीकारिती। शाश्वत जें॥

**वामतपंडित मधुसूदनीकारा**प्रमाणें म्हणतात. नाना क्षुद्रें जळें। जीं जीं साधितीं क्षुद्रफळें। कार्यें घडतीं सकळें। जळीं खोल एकाची!॥ नाना क्षुद्र कामना। सिद्ध होतां, जें सुख जना। तें अनुभवितां एका निरंजना।

सकळ सुखें ब्रह्मनिष्ठातें ॥ विषय सुखें दुःखमय कशीं आहेत याचें विवरण पंडितांनीं फार चांगलें केलें आहे. अर्थसमर्थनासाठीं **सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म यो वेद निहितं गुहायां परमेव्योमन्। सोऽश्नुते सर्वान्कामान्सह।'** अशा श्रुति देतात. ब्रह्म हें सत्य आहे, ज्ञान आहे, अनन्त आहे, तें परम तत्त्व बुद्धिरूपी गुहेंत आहे हें ज्यास समजलें तो ब्रह्मानन्दासह सर्व विषयसुखांचा एकदम अनुभव घेतो. ॥ ४६ ॥

वरील श्लोकाष्टकांतील ३९ व्या श्लोकांत प्रथमतः अज्ञानी मनुष्याला, ज्या मनुष्याला ब्रह्म आणि आत्मा यांचें ऐक्य समजत नाहीं व म्हणून त्याच्यावर श्रद्धा नाहीं त्याला चित्तशुद्धि संपादन करावयास लागणाऱ्या कर्माची स्तुति करून संसारनाश हें त्या कर्माचें फल आहे, असें सांगितलें आहे. दुसऱ्या ह्मणजे ४० व्या श्लोकांत या निष्काम कर्माचा नाश होत नाहीं व संसारसागर सुखानें तरून जाण्यास हें कर्म ह्मणजे उत्कृष्ट नौका आहे असें कथन केलें आहे. नंतर ४१ व्या श्लोकांत निष्काम कर्म करण्यास अवश्यक साधन जें निश्चयात्मक बुद्धि तिचें संकीर्तन केलें आहे, 'सर्वत्र परमेश्वर भरला आहे, व माझें सर्व कर्म मी त्यासच अर्पण करीत आहे, माझें असें कांहींच नाहीं, ईश्वराचा अनुग्रह झाला तरच मला मोक्ष मिळण्याचा मार्ग ह्मणजे चित्तशुद्धि हस्तगत होईल,' असा जो निश्चय त्यास निश्चितबुद्धि म्हणावें. पुढें ४५ व्या श्लोकापर्यंत वासनायुक्त बुद्धीनें वेदोक्त कर्म करणाऱ्या अज्ञानी लोकांचें निंद्य आचरण, त्यांचा घोंटाळा आणि असमाधानजन्य दुःख व जन्ममरण यांचें फारच सुरेख वर्णन आलें आहे. नंतर निश्चय झालेला पुरुष कसा असावा व स्वस्वरूपाप्रत पावलेल्या जीवन्मुक्ताचा आनंद किती अमर्याद असतो या विषयाचें संकीर्तन ४५ श्लोकांचा उत्तरार्ध व ४६ श्लोक यांत अनुक्रमें केलें आहे. कर्मठ लोकांच्या कर्ममार्गाचें खंडनही तेथेंच आलें आहे.

कामना ठेवून वेदोक्तकर्में करणारे कर्मठ वेदांत 'कर्म करावें व कर्माचें फळ स्वर्गसुखादि भोग व ऐश्वर्य यांत परिणत होतें' असें ह्मणतात. भगवंतांनीं यांस इतकेंच उत्तर दिलें आहे कीं, असल्या कर्मानें कर्मनाश अथवा संसारनाश कधींही व्हावयाचा नाहीं; आणि चित्तशुद्धि झाल्यानंतर ज्ञानमार्गानें नित्य, निरंजन, निर्विकार अशा ब्रह्मसुखाचा आस्वाद घेण्याला व शेवटीं

तद्रूप होण्याला तुह्मांस संधीच सांपडावयाची नाहीं ! मार्टिनो नामक प्रसिद्ध नीतिमीमांसक ह्मणतातः ' Self is the centre and essence of all Sin, and the surrender of self, the one simple condition of union with God ' ( अहंकार, मीपणा, हा सर्व पापाचा उगम आणि मूलद्रव्य आहे. आत्मत्याग केल्याशिवाय ईश्वराशीं एकरूप होणें शक्यच नाहीं ). हीं पूर्वतत्त्वज्ञ ख्रिस्त भक्तांचीं वाक्यें आहेत. त्यांचा एक अर्थ प्रस्तुत प्रकरणास उपयोगी असा मार्टिनो साहेबांनीं केला आहे. ते ह्मणतातः ' The Will, whenever it goes astray, follows the direction of inaividual tendency and wish,—the ïorces of the Ego unrestrained by reverence for a good that is not ours. ' ( जेव्हां जेव्हां इच्छा, कामना, मार्गभ्रष्ट होते, तेव्हां तेव्हां तीं अहंकाराच्या कलास व इच्छेस पूर्णपणानें वश असते. हा कल व ही इच्छा हे अहंकाराचे वाहक आहेत. जे व्यक्तीचें सुख नव्हे, अथवा जें परमात्म्याचें सुख आहे, त्या सुखाविषयीं अनादर उत्पन्न होऊन हे अहंकाराचे घोडे उच्छृंखल झाले ह्मणजे मानवी वासनांचा रथ कसा मार्गभ्रष्ट होईल हें सांगावयास नकोच !) मार्गभ्रष्ट झालेल्या मनुष्याला हजारो वाटांनींही इष्ट देश सांपडत नाहीं हें सर्वानुभूतच आहे.

निश्चयात्मिका बुद्धि यांत बुद्धि श्रद्धा असा अर्थ **चतरजी** नामक विद्वान ग्रंथकारानें केला आहे. ईश्वर एकच आहे. अद्वितीय आहे, त्याला सजातीय अगर विजातीय असा दुसरा कोणीच नाहीं असा जो दृढ निश्चय त्याचें नांव निश्चयात्मिका बुद्धि या संबंधानें व ४२ ४५, ४६ श्लोकासंबंधानें बायबल-मधील रोमन्म हा भाग वाचावा अशी यांची शिफारस आहे. ' ईश्वराचें पूर्ण ज्ञान व्हावें म्हणून जीवांस अमर केलें आहे ' असें **ख्राईस्ट** ह्मणतो ( पहा जानचें शुभ, वर्तमान अ० १७ ) व पूर्णावस्था प्राप्त होते तेव्हां,— ईश्वराशीं प्रत्यक्ष परिचय होतो तेव्हां—अपूर्ण सृष्टीवरील प्रेम नष्ट होतें. ( पहा कोरिंथिअन्स अ० १० ) मनुष्यांस सात्विक गुणांची प्राप्ति झाली नाहीं, कारण निश्चयात्मकबुद्धि अगर विश्वास न ठेवितां केवळ कायद्यांच्या शब्दार्थालाच ते मोहित झाले. ' ( पहा रोमन्स अ० ९ ) ' बायबलच्या नियमाप्रमाणें कर्म केलें म्हणजे पुरुषार्थ साध्य होतो—जीव पवित्र होतो, असें नाहीं; नियमांनीं

फक्त पापाचें ज्ञान होतें. नियमांनीं तामस गुणांस प्रगटता येतें. विश्वास, निश्चयात्मकबुद्धि, उत्पन्न झाली ह्मणजे नियमांस अंधत्व येतें म्हणजे आपण निश्चयात्मक विश्वासबुद्धीनें वागावें, नियमांच्या शब्दाकडे लक्ष्य देऊं नये. जे आपण परमात्मभजनीं लागलों व विषयभजन सोडून देतें झालों त्यांच्यामध्यें ईश्वराचा पूर्ण सात्विकगुण अवतीर्ण होईल. ( पहा रोमन्स अ. ३,४,७ व ८)

**तव च—**

आणि तुझा तर—

## कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ॥
## मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥४७॥

**ते** (तुझा) **कर्मणि एव** (कर्म करण्याचा मात्र) **अधिकारः** ( अधिकार आहे); **कदाचन** (केव्हांही) **फलेषु** (फल मिळण्याच्या कामीं) **मा** (--अधिकार आहे असें समजूं--नको ). **कर्मफलहेतुः** (कर्माचें फल मिळावें असा हेतु ज्याचा आहे असा ) **मा भूः** (होऊं नको ) **तु** ( पण—तरी--) **ते** (तुझी) **अकर्मणि** (कर्म न करण्यामध्यें) **सङ्गः** (संगति, इच्छा भक्ति) **माऽस्तु** (--असूं देऊं--नको ).--सारांश भगवान सांगतातः--तुझा अधिकार, केवळ, विहितकर्म करणें इतकाच आहे. आपल्यास फल मिळेल कीं नाहीं, मिळालें तर काय मिळेल, वगैरे विचार अगर आशा करण्याचें तुझें कामच नाहीं; ह्मणून फलाच्या आशेनें केव्हांही कर्म करण्याला प्रवृत्त होऊं नको. 'फळच मिळावयाचें नाहीं. मग कर्म कशाला करूं ?' असेंही विचारूं नको, विहित कर्म न करणें हें तुझें कर्तव्य नाहीं, व कर्मसंन्यास करण्याला तुला अधिकारही नाहीं.—

कर्मणीति । कर्मण्येवाधिकारो न ज्ञाननिष्ठायां ते तव । तत्र च कर्म कुर्वतो मा फलेष्वधिकारोऽस्तु कर्मफले तृष्णा मा भूत्कदाचन कस्यांचिदप्यवस्थायामित्यर्थः। यदा कर्मफले तृष्णा ते स्यात्तदा कर्मप्राप्तेर्हेतुः स्याः एवं मा कर्मफलहेतुर्भूः । यदा हि कर्मफलतृष्णाप्रयुक्तः कर्मणि प्रवर्तते तदा कर्मफलस्यैव जन्मनो हेतुर्भवेत । यदि फलं नेष्यते किं कर्मणा दुःखरूपेणेति मा ते तव सङ्गोऽस्त्वकर्मण्यकरणे प्रीतिर्मा भूत् ॥ ४७ ॥

**पूर्व०**—भगवंता ! ब्रह्मज्ञानाला जर सर्व प्रकारचा संपूर्ण आनंद प्राप्त होतो तर कर्म करून चित्तशुद्धि करावयाची, मग ज्ञानसंपादन करावयाचें, ही यातायात मला कां सांगतां ? मी ज्ञानमार्गाचेंच अवलंबन करितों.

**सिध्दां०**—छेः ! अर्जुना ! ब्रह्मज्ञान मिळविण्याला तूं अद्यापि अधिकारी झाला नाहींस. कारण 'हा मी,' 'हें माझें,' 'हें तुझें' असें अज्ञान तुझ्यामध्यें कायम आहे; म्हणून तुझी योग्यता कर्म करण्याचीच आहे. कर्ममार्गच तुला योग्य आहे.

**पूर्व०**—बरें तर मला कर्मफलाचा उपभोग तरी असूं दे; ब्रह्मसुखही नाहीं आणि कर्मसुखही नाहीं, असा मी सुखशून्यच रहाणार, नाहीं का ?

**सिध्दां०**—काय वेडा आहेस ! कर्माच्या फलाची आशा ठेवून तूं कर्म करणार ह्मणजे निष्काम कर्मानें जी चित्तशुद्धि व्हावयाची तिला तूं मुकणार नाहींस काय ? चित्तशुद्धीनंतर महावाक्यांच्या श्रवणानें व निदिध्यासानें ज्ञान व ब्रह्म ह्याचा साक्षात्कार होऊन जो परमावधीचा आनंद व्हावयाचा त्यास तूं मुकणार वाटतें ?--असें करणें ह्मणजे आंब्याचें फळ येण्याची व पिकण्याची वाट न बघतां झाडांस मोहोर पाहिल्याबरोबर तो तोडून खाण्यासारखें होय ! पार्था ! असें करूं नको. तुला कोणतीही अवस्था प्राप्त झाली तथापि कर्मफलाची आशा केव्हांही धारण करूं नको. व वेदशास्त्रनिषिद्ध कर्म करूं नको. कारण सकाम कर्म करावें आणि फळ मिळवावें, असें तुला वाटूं लागलें कीं, त्या कर्मफलाचा उपभोग घेण्यासाठीं संसाराचें व जन्ममरणाचें चक्र तुझ्या पाठीमागें लागलेंचअसें समज म्हणजे जन्ममरणाला तुझा तूंच कारण झालास असें समज !—ही आपल्या हातानें आपल्या पायावर कशाला धोंड पाडून घेतोस ? कर्म करणारा मीच आहे असा अभिमान धरला, त्याचें फलही मलाच मिळणार अशी आशा धरिली, म्हणजे जन्म प्राप्त होतें, जन्म झाल्यावर कर्म होतें, कर्मानें जन्म मिळतें ! हें रहाटगाडगें लोभ आहे तोंपर्यंत अखंड चालावयाचेंच म्हणून म्हणतों—बाबा ! बंध उत्पन्न करणाऱ्या कर्मफलाची आशा ठेवून कर्म करूं नको.

**पूर्व०**—फलाची आशा ठेवावयाची जर नाहीं तर मग कर्म तरी कशाला करूं ? ती कर्माची दुःखदायक यातायात तरी कशाला हवी ?

**सिध्दां०**—अशासाठीं कीं तुझ्या चित्तांतील अहंकारबुद्धि नष्ट व्हावी. परमेश्वराला सर्व क्रिया व क्रियाफळें अर्पण केलीं म्हणजे चित्तशुद्धि होते. तूं

कर्मच करावयाचें नाहीं असें आळसानें अगर अविश्वासी झालेल्या बुद्धीनें म्हणूं नयेस. आळसानें कर्मच केलें नाहींस तर ज्याच्या साहाय्यानें चित्तशुद्धि, व ज्ञान, साक्षात्कार वगैरे होऊन तुला मोक्ष मिळणार त्या देहाचें संरक्षण व्हावयाचें नाहीं. कर्मत्याग करण्याइतकें सामर्थ्यही तुला अद्यापि प्राप्त झालें नाहीं ह्मणून तुला श्रद्धेनें कर्म केलेंच पाहिजे. मात्र पुढचा जन्म टाळण्यासाठीं निष्कामबुद्धीनें तें केलें पाहिजे. एतावता तुला युद्ध केलेंच पाहिजे.

**मधुसूदनीकार, प्रपाकार, श्रीधर, शंकरानंद द्विवेदी** वगैरेंचा अर्थ वरीलप्रमाणेंच आहे. ' कर्म ' म्हणजे युद्धच नव्हे, तर सामान्यतः सर्व कर्म असें **मधुसूदनीकार** म्हणतात तें नीटच आहे ज्ञानाला अधिकार नाहीं अशा मुमुक्षूनें स्वधर्मानुष्ठान केलें नाहीं तर त्याला तें अकारण प्रतिबंधक होते, सारांश ज्ञान होईपर्यंत कर्मत्याग इष्ट नाहीं असें **शंकारानंद** म्हणतात **वल्लभ** म्हणतात,—

' तावत्कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता '

( जोंपर्यंत वैराग्य उत्पन्न झालें नाहीं तोंवर कर्म केलेंच पाहिजे. ) आशेच्या तृप्तीसाठीं मात्र कर्म करूं नको असें **प्रपाकार** सुचवितात.

**मध्वाचार्य** म्हणतातः—' येथें वासनेचा निषेध केला आहे वासनारहित कर्म केलें म्हणजे परमेश्वर प्रसन्न होतो. यावरून आत्मा व परमात्मा यांत ऐकात्म्य होणें शक्य नाहीं. ' **सत्यानंद** हें सांगून आणखी विशेषतः म्हणतात कीं काम फलद्रूप होण्याचें ईश्वराधीन आहे आणि कर्म करणें मानवाचें कर्तव्य आहे. आंग्लभाषेंतील Man proposes and God disposes हीं म्हण आणि ' **मनसा चिन्तितं कार्यं दैवमन्यत्र नीयते** ' (?) वगैरे हीं समनार्थकच आहेत हे स्वामी ' जिवंत राहूं इच्छिणाऱ्या मनुष्यानें कर्म केलेंच पाहिजे' हा **ईशावास्यांतील** दुसरा मंत्र समर्थनार्थ देतात. कर्म करण्याचा अधिकार आहे तरी ' मी अकर्ता आहे असें मान ' हें **रामानुजांचें** सांगणें आहे.

**चतरजी** नामक विख्यात बंगाली ग्रंथकारांनीं बायबल नामक ख्रिस्ती पवित्र पुस्तकांतील उतारे दिले आहेत. ' जेव्हां तूं सत्कर्म करशील तेव्हां डाव्या हाताला सुद्धां कळूं नये; इतक्या गुप्तपणें सत्कर्म करशील तें ईश्वराला प्रिय होईल असें कर ' ' आळशी राहूं नको ' ' ईश्वराची उपासना कर '

'ईश्वरावर पूर्ण निष्ठा असल्यामुळें जो ईश्वरी तत्त्वांचा प्रसार करितो, तो संसारांत पडत नाहीं.'

**ज्ञानेश्वरः**—आम्ही समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें । जें न सांडिजे तुवां आपुलें । विहित कर्म ।........हें सत्क्रियाचि आचरावीं । हेतुविण ॥

**पंडितांचें** एक दोन दृष्टांत समर्पक आहेतः—समुद्र बुडवी खरा। तथापि जाती द्वीपांतरा । धनें मिळवून येती घरा । दृढ नौका आश्रयें ॥ कर्में करितां जन्ममरण । तथापि निष्कामपण । भवसमुद्रीं तारू जाण । पाववी ब्रम्हात्मतेसी ॥ राजसेवेविण । लभ्य नव्हे थोरपण । तेंथें जे घातुक गुण । तास्कर्यादि ( चोरटेपणा वगैरे ) टाकावे ॥ गोष्टी आइकता । भिऊनि आपल्या घाता । राजसेवाच टाकितां । पद प्राप्ति ( मोठेपणा ) न घडे ! ॥ ........**कर्मणा पित्रलोकः** ( कर्म केलें असतां मनुष्य पितृलोकास जातो ) या श्रुतीचें विवेचन असें करितातः----कर्म ( सकाम अगर निष्काम ) न अर्पितां ईश्वरीं । तें अवश्य आपला गुण करी । जन्म मरण हें तरीं । अढळचि कीं ॥ ह्याचें स्पष्टीकरण पुढील श्लोकांत आहे ॥ ४७ ॥

यदि कर्मफलप्रयुक्तेन न कर्तव्य कर्मकथं तर्हि कर्तव्यमित्युच्यते—

अ०----कर्मफलाच्या आशेनें जर कर्म करणें अनिष्ट आहे, तर हें क्लेशात्मक कर्म करावयाचें तरीं कसें ?

**भग०**----सांगतों ऐक---

**योगस्थः कुरू कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ॥**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

**धनंजय** ( संपत्ति, स्वर्गादिसुख, यांस जिंकणारा, हीं तुच्छ म्हणून टाकून देण्याची योग्यता आहे ज्याला अशा अर्जुना ! **सङ्गं त्यक्त्वा**( मी) कर्ता आहे व मलाच फल मिळेल असा अभिमान अगर लोभ टाकून देऊन) —आणि—**सिद्ध्यसिद्ध्योः समः भूत्वा** ( आपलें कर्म फलद्रूप अगर निष्फळ झालें तरी मनाची समता कायम ठेवून )—व—**योगस्थः** ( ईश्वराच्या ठिकाणीं पूर्ण निष्ठा ठेवून समतेनें व निर्लोभपणानें वागणारा–असा होऊन ) **कर्माणि** ( सर्व विहित कर्में ) **कुरु** ( कर )—सारांश कर्म करावयाचें तें पर-

मेश्वरास वासनाशून्यत्वानें अर्पण करावयाचें, ' मी कर्ता असा अभिमान ठेवावयाचा नाहीं. लाभ, हानी झाली तरी चित्ताच्या समतेचा भंग होऊं द्यावयाचा नाहीं ( अ० २ श्लोक ३८ पहा ) अशी तुझी वृत्ति असूं दे.— **समत्वं** ( समत्व—ठेवणें यालाच-- ) **योग उच्यते** ( योग असें म्हणतात. )

योगस्थ इति । योगस्थः सन्कुरु कर्माणि केवलमीश्वरार्थं, तत्रापीश्वरो मे तुष्यत्विति संङ्गं त्यक्त्वा, धनंजय । फलतृष्णाशून्येन क्रियमाणे कर्मणि सत्त्वशुद्धिजा ज्ञानप्राप्तिलक्षणा सिद्धिस्तद्विपर्ययजाऽसिद्धिस्तयोः सिद्ध्यसिद्ध्योरपि समतुल्यो भुत्वा कुरु कर्माणि । कोऽसो योगो यत्रस्थ कुर्वित्युक्तमिदमेव तत्सिद्ध्यसिद्ध्योः समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

**सि०**—हे धनंजया ! संपत्तीस व स्वर्गादिसुखांस तुच्छ मानणाऱ्या अर्जुना ! योगामध्यें राहून कर्म कर.

**पू०**—महाराज ! योग म्हणजे काय ?

**सि०**—योग म्हणजे कर्मफल प्राप्त होवो अगर न होवो. चित्ताचें समाधान व समता सोडून न देतां केवळ परमेश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धीनें कर्मे करणें यास योग म्हणतात. ईश्वर माझ्यावर प्रसन्न होईल असा सुद्धां लोभ व मी करणारा ' असा अभिमान येथें असतां उपयोगी नाहीं. असो, तेंव्हां फलाशाविरहित कर्म केलें असतां ज्ञानाच्या उत्पत्तीस उपयोगी पडणारी चित्तशुद्धि प्राप्त होते हें खरें. पण हें फल मिळालें किंवा--कांहीं कारणानें--मिळालें नाहीं, तरी मनाची समता कायम ठेवून-सारांश हर्षखेदांनीं चित्ताचा भंग होऊं न देतां मुमुक्षूनें यज्ञयुद्धादि सर्व स्वकर्म केलें पाहिजे. असेंच तूंही कर. चित्ताच्या समतेचा भंग कालत्रयीं होऊं न देणें यालाच योग म्हणतात बरें ! सारांश ' कर्म करणें ' हेंच आपलें कर्तव्यकर्म आहे--दृष्ट अगर अदृष्ट-फळ मिळण्याची आशा न करणें व चित्ताचें समत्व ठेवणें हींही आपलीं कर्तव्यें आहेत असें समजून कर्म कर.

**अद्वैतवादी** टीकाकारांचा वरीलप्रमाणेंच अर्थ आहे. ' योग ह्मणजे चित्तवृत्तीचा निरोध किंवा अमृतस्वरूपीं मग्नता ' असें **पतंजलीकृत** लक्षण **द्विवेदी** देतात. ' सिद्धी ' ह्मणजे आत्मस्वरूपाची प्राप्ति असें **सरकार** समजतात. ' **योगस्थ** '=भगवंताकडे ज्यांचें चित्त सर्वस्व आहे तो मनुष्य, असें

**वल्लभ** म्हणतात. **शंकरानंद** ‘ सम ’ याचा अर्थ ब्रह्म आणि ‘ सिद्धि ’ याचा चित्तप्रसाक्ति असा अर्थ करितात.

**रामानुज**.—‘संङ्गं ’=राज्य बंधु वगैरे विषयींचें ममत्व. ‘ योग ’=चित्ताचें समाधान. **मध्व सत्यानंद** वगैरे ‘ योगस्थ ’=ज्ञान प्राप्त होण्यास साधन जें कर्म तें करण्यास अधिकारी व फलाविषयीं अनधिकारी--सारांश ईश्वराच्या प्रसन्नतेसाठीं कर्म करणारा.

**चतरजीः**—योग=ईश्वराची अनन्यभक्ति. ईश्वर प्रसन्न होईल ही इच्छा. ‘ कर्तव्य केल्यावर असें म्हणावें कीं आम्ही निष्काम सेवक आहोंत व आम्हीं कर्तव्य ह्मणून कर्तव्य केलें. ’ **ल्यूक**.

निष्काम कर्म ईश्वरास समर्पिलें असतां तें बंध देणारें होत नाहीं याला **पंडितांचा** दृष्टांतः--बचनाग विष मारी । तो देतां वैद्याचे करी । तो त्याचा रस करी । ज्या रसे आरोग्य देहासी ॥ ईश्वरार्पित कर्में बंधप्रद होणार नाहींत याचा विस्तार तिसऱ्या व नवव्या अध्यायांत येणारच आहे. ॥ ४८ ॥

यत्पुनः समत्वबुद्धियुक्तमीश्वराराधनार्थं कर्मैतस्मात्कर्मणः—

**पू०**—भगवंता ! चित्ताची समता सदैव ठेवून ईश्वरार्पणबुद्धीनें निष्काम कर्म करणें अवघड आहे, सकाम कर्म करणें सोपें आहे नाहीं बरें ? मग सकाम कर्मच कां करूं नये ?

**सि०**—सकाम कर्मापेक्षां निष्काम कर्म फार श्रेष्ठ आहे. पहा. सांगतों कसें तें---

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ॥**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

**धनंजय** ( अर्जुना !) **बुध्दियोगात्** ( बुद्धियोगापेक्षां, ईश्वरास अर्पण केलेल्या निष्काम कर्मापेक्षां ) **कर्म** ( सकाम कर्म ) **दूरेण हि अवरं** ( अतिशय अधम--आहे-- )—ह्मणून--**बुद्धौ** ( बुद्धियोगाला ) **शरणं अन्विच्छ** ( आपला आश्रय आहे असें मान—शरण जा **फलहेतवः** ( केलेल्या कर्मांचें फळ मिळावें असा ज्यांचा हेतु असतो असे लोक ) **कृपणाः** ( नीच, अज्ञानी, पामर आहेत.--) सारांश बुद्धीनें मात्र कळणाऱ्या निष्काम आणि ईश्वरार्पित कर्मापेक्षां आशेला तृप्त करून जन्ममरण देणारीं सकाम कर्में अत्यंत नीच

असतात. म्हणून तूं बुद्धियोगाचा आश्रय कर. आशा ठेवून कामें करणारे लोक फारच अज्ञानी असतात.

दूरेणेति । दूरेणातिविप्रकर्षेण ह्यवरं निकृष्टं कर्म फलार्थिना क्रियमाणं, बुद्धियोगात्समत्वबुद्धियुक्तात्कर्मणो जन्ममरणादिहेतुत्वाद्धनंजय । यत एवं योगविषयायां बुद्धौ तत्परिपाकजायां वा सांख्यबुद्धौ शरणमाश्रयमभयप्राप्तिकारणमान्विच्छ प्रार्थयस्व, परमार्थज्ञानशरणो भवेत्यर्थः। यतोऽवरं कर्म कुर्वाणाः कृपणा हीनाः फलहेतवः फलतृष्णाप्रयुक्ताः सन्तः 'यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वाऽस्माल्लोकात्प्रैति स कृपणः' इति श्रुतेः ॥ ४९ ॥

**अर्जुना !** समत्वबुद्धि ठेवून निष्कामत्वानें कर्म करणाऱ्या व त्यायोगें आत्मज्ञानाचा मार्ग जवळ करणाऱ्या मुमुक्षूच्या निर्लोभ कर्मापेक्षां कामी ह्मणजे फलाची आशा ठेवून कर्म करणाऱ्या आणि म्हणूनच बुद्धिशून्यत्वानें कर्म करणाऱ्या कर्मठाचे क्लेश उत्पन्न करणारे कर्म अतिशय कमी योग्यतेचें असतें, कारण ह्या सकाम कर्मामुळें अभिमानी कर्त्याच्या मागें जन्ममरणाचें चक्र लागतें. आणि मुक्तीला अवश्य अशा निष्काम कर्मापेक्षां, जन्ममरणाचें चक्र अत्यंत तापदायक आहे.—असें आहे म्हणून चित्तवृत्ति शांत ठेवणारी व सर्व क्लेश चुकविणारी—जी योगबुद्धि किंवा तिच्या पूर्णत्वानें होणारी जी सांख्यबुद्धि तिला शरण जा. मुमुक्षूस अभय देणारी हीच बुद्धि आहे. सारांश परमार्थज्ञानाकडे तुझ्या कर्माची व शेवटीं चित्ताची वृत्ति असूं दे.—परमार्थ ज्ञानाला तूं शरण जा. कारण फलाच्या तृष्णेनें कर्म करण्यास प्रवृत्त झालेले लोक कृपण, दीन, पामर, अज्ञानी, असतात. म्हणून त्यांच्या मार्गानें जाऊं नको. **बृहदारण्यक** श्रुतिही असेंच सांगतेः ' हे गार्गि ! जो या अक्षरास ( नित्य आणि निश्चित अशा सद्वस्तूंस ) न जाणतां या लोकांतून निघून जातो त्यालाच मूर्ख ह्मणावें. '—उघडच आहे मनुष्यदेह प्राप्त झाला असूनही जो मोक्ष मिळण्याची, स्वस्वरूपास जाणण्याची खटपट करीत नाहीं, तो मूर्खच होय.

**मधुसुदनीकार** म्हणतात कीं मिळविलेलें धन दानधर्मामध्यें खर्च न करणारा कद्रू मूर्खच होय. कारण मृत्युसमयीं आपल्यापासून नष्ट होणाऱ्या

धनाचाही तो आपल्या हातानें व्यय करीत नाहीं ! **शंकरानंद**—कर्म सांग झालें तर जन्ममरणाचें दुःख देतें आणि कोठें व्यंग पडलें तर नरकास नेतें एतावता सकाम कर्म तापदायकच होय.

(अविद्या आणि विद्या ह्या एकमेकांपासून फार दूर आहेत, एकमेकांशीं अत्यंत विरुद्ध आहेत आणि अत्यंत भिन्न आहेत) अशी **कठ** श्रुति आहे.

स्वर्गसुख हेंच अत्यंत कल्याण होय असें जे मानतात, ते मूर्खलोक म्हातारपण आणि मृत्यु यांप्रत जातात. लोभाच्या योगानें कर्मठ लोकांस हें ब्रह्मतत्त्व न समजल्यामुळें हे धैर्यशून्य लोक जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात. (मुंडकोपनिषद्.)--' धीराचे लोक, बुद्धिमान् लोक, ब्रह्मतत्त्व जाणतात ह्मणून येथील अत्यंत स्थिर गोष्टीविषयीं, स्वर्गसुखाविषयीं, सुद्धां ते लोलुप नसतात. (कठोपनिषद्) ह्यावरून चित्तप्रसाद होईपर्यंत निष्काम कर्मयोगच केला पाहिजे असें दिसतें **वल्लभ**--' बुद्धौ ' बुद्धीला मात्र समजणाऱ्या ईश्वराचे ठायीं. '

**मध्व, सत्यानंद, विद्याधिराज** व **राघवेंद्रयतिः**--' ज्ञान झालें तरी बाकीचे सर्व उपाय सोडून माझी उपासना कर ' असा या श्लोकाचा द्वैतपर तात्पर्यार्थ आहे, असें सांगतात. ज्याचे गुण आणि इच्छा जीवाच्या गुण, व इच्छेहून अत्यंत निराळ्या असा जो परमेश्वर तो व आपण एकच आहों असें जे अद्वैती मानतात तेच कृपण होत. हे असले कृपण अत्यंत घनांधकारांत जाऊन पडत असतील यांत संशय नाहीं ! ' अद्वैतवादी हे परमेश्वर व आपण दृश्यसृष्टींत एक नाहींत असेंच मानतात; मग त्यांच्याविरुद्ध एवढा कडाका कां ? मात्र शेवटीं अद्वितिय ब्रह्म एकच आहे; तेथें जीव शिव असा भेद नाहीं व तेथें गुण अगर इच्छा यांचें वास्तव्य नाहीं हें त्यांचें म्हणणें सयुक्तिक आहेच.

**रामानुजः**—मुख्य फलांचा त्याग करणें व जयापजयाच्या योगानें उत्पन्न होणारीं अवांतर फळें, यांच्या संबंधानें समत्वबुद्धि ठेवून कर्म करणें हें इतर कर्माहून श्रेष्ठ आहे.

**चतरजीः** ' ज्यांना ईश्वरी ज्ञान झालें नाहीं, ते पापांतच मरतील ' **जान. ईशावास्यांत** अज्ञानी लोकांचे हाल उत्तम रीतीनें वर्णन केले आहेत. ' संसारांत मग्न असणाऱ्या पापप्रियांनो ! तुम्हांस धिक्कार असो ! ' **माथ्यु.** ' ईश्वराचें पूर्ण ज्ञान झालेल्या मनुष्यानें शास्त्रविहित कर्में केलीं नाहींत ' तरी हरकत नाहीं. ' **रोमन्स** अ० ३

**ज्ञानेश्वर**–जेथ मन आणि बुद्धीचें। ऐक्य आथि ( आहे ) ॥ तो बुद्धियोग विवरितां ( विचार करितां ); । बहुत पाडें ( पुष्कळ परीनें ) पार्था ॥ दिसे हा अरुता ( अलीकडचा ) कर्मयोग ॥

**पंडित** कृपणाविषयीं म्हणतातः—तरी हे जाले दीन। काम्यकर्म फळभोगाधीन। नेत्र असोनि नेत्रहीन। जाले फळयोग हेतुनें! ॥४९॥

समत्वबुद्धियुक्त सन्स्वधर्ममनुतिष्ठन्यत्फलं प्राप्नोति तच्छृणु–

अशी वर सांगितलेली समबुद्धि ठेवून तटस्थ वृत्तीनें स्वधर्माचें आचरण करणाऱ्यास काय फळ मिळतें तें सांगतों ऐकः

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥**

इह ( ह्या लोकामध्येंच ) **उभे** ( दोन्ही ) **सुकृतदुष्कृते** ( पुण्यें व पापें ) **बुद्धियुक्तः** ( समत्वाची बुद्धि प्राप्त झालेला साधक ) **जहाति** ( सोडून देतो ) **तस्मात्** ( म्हणून ) **योगाय** ( समत्व चित्तवृत्तीला ) **युज्यस्व** ( मिळवून घे ) **कर्मसु** ( कर्मामध्यें ) **कौशलं** ( कुशलता असणें ) **योगः** (--हाच--योग--होय) —सारांश, समत्वाची शांतवृत्ति ज्याला प्राप्त झाली असा बुद्धियोगी पापपुण्याचा या लोकींच त्याग करितो--आणि म्हणून जन्ममरणाच्या कचाट्यांतून सुटतो.—यासाठीं तूं या योगबुद्धीला साध्य करून घे. कर्म करूनही कर्माचा परिपाक ह्मणजे जन्ममरण, ज्याच्या योगानें चुकतें तोच योग म्हणावा. कर्मामध्यें कौशल्य तें हें होय.

बुद्धीति। बुद्धियुक्तः समत्वविषयया बुद्ध्या युक्तो बुद्धियुक्तो जहाति परित्यजतीहास्मिँल्लोक उभे सुकृतदुष्कृते पुण्यपापे सत्त्वशुद्धिज्ञानप्राप्तिद्वारेण यतस्तस्मात्समत्वबुद्धियोगाय युज्यस्व घटस्व। योगो हि कर्मसु कौशलं स्वकर्माख्येषु कर्मसु वर्तमानस्य या सिद्ध्यसिद्ध्योः समत्वबुद्धिरीश्वरार्पितचेतस्तया तत्कौशलं कुशलभावः। तद्धि कौशलं यद्बन्धस्वभान्यपि कर्माणि समत्वबुद्ध्या स्वभावान्निवर्तन्ते। तस्मात्समत्वबुद्धियुक्तो भव त्वम् ॥ ५० ॥

चित्ताची समता कायम राहील अशा बुद्धीनें युक्त झालेला मुमुक्षु ह्या लोकांतच हजारो जन्मांचीं पुण्यें आणि पापें या दोहींचाही--जिवंत असतांनाच

--त्याग करितो. ही दोन्ही त्यांस बाधा करीत नाहींत अगर त्यास जन्ममरणांत घालूं शकत नाहींत--पापानें व तसाच पुण्यानेंही जन्ममरणाचा फेरा पाठी-मागें लागतो ह्मणून योगी लोक पुण्याचाही त्याग करितात.--ही गोष्ट द्वैत-वाद्यांस कळत नाहीं.—

**पूर्व०**—भगवन् ! जरा थांबा. समत्वबुद्धि झाली, हर्षविषाद थांबले, ह्मणजे लागलीच पापपुण्यें नाहींशीं होतात हें ह्मणणें मला समजत नाहीं. परमार्थज्ञान ज्याला झालें त्याचें पापपुण्य संपलें हें ठीक जुळतें; पण—

**सिद्धां०**—समजलों तूं काय ह्मणणार तें. अरे ! समत्वबुद्धीनें व ताट-स्थ्यवृत्तीनें मनुष्य कर्म करूं लागला ह्मणजे त्याचें चित्त शुध्द आणि निर्मळ होतें. निर्मळ चित्त झाल्यावर ईश्वराच्या अगर गुरूच्या कृपेनें ज्ञानप्राप्ति होती; आणि ती झाल्याबरोबर पापपुण्यें अस्तंगत होतात. आतां समजला कीं नाहीं क्रम ? बरें; आतां असें आहे म्हणजे समत्वबुद्धीनें स्वकर्म केलें म्हणजे जन्ममरण चुकतें ह्मणून तूं यापुढें समत्वबुद्धि प्राप्त होईल असें कर. हा बुद्धियोग तुला साध्य करून घेतला पाहिजे.

**पूर्व०**—श्रीकृष्णा ! स्वधर्मानें आचरण केल्यावर पुनः योगबुद्धीचा आश्रय करून घे ह्मणून आपण सांगतां तें कशाला ?

**सिद्धां०**—फिरून आपलेंच. अरे ! स्वधर्मानें सांगितलेलीं कर्मे करीत असतांना आपल्यास इष्टप्राप्ति व अनिष्टप्राप्ति होणार त्यांच्या संबंधानें आपल्या चित्ताची समता ढळूं द्यावयाची नाहीं हें सर्व धर्मविहित कर्में व कर्मफलें ईश्वरास समर्पण करावयाचीं असतात हें, यालाच योगाचें कौशल्य ह्मणतात. ही कर्मकुशलता अगर योगबुद्धि असल्याशिवाय कर्मांचा नाश कसा होईल ? ह्मणून योग पाहिजे बरें !

**पूर्व०**—पण यांत कुशलता ती काय ?

**सिद्धां०**—आतां मात्र कमाल केलीस ! अरे ! आपल्या स्वतःच्या स्वभा-वानें जीं सत्कर्मे किंवा दुःष्कर्मे मनुष्यास जन्ममरणाच्या चक्रांत बांधून घालतात त्या कर्मांच्या स्वभावास मूळच्या समूळ समत्वबुद्धीनें फिरविणें ही काय लहान-सहान कुशलता आहे ? सारांश अर्जुना ! स्वधर्माचरण करीत असतां तुला समत्वबुद्धीचा अंगीकार केलाच पाहिजे.

**ययाकार** एक श्रुति सांगतातः—

'पापमकरवमित्यतः कल्याणमकरवमित्युभे, एष एते तरत्यमृतः साध्वसाधुनी नैनं कृताकृते तपतः'

( जो ज्ञानी झाला, प्रत्यक्ष अमृतच ब्रह्म झाला, तो 'मी पाप केलें, 'मी पुण्य केलें' ह्या दोन्ही अभिमानांमधून तरून जातो; ह्या दोन्ही वृत्ति सोडून देतो. पुण्य अगर पाप, कर्म किंवा अकर्म हीं कोणींच त्यास त्रास देऊं शकत नाहींत.) चित्तशुद्धीनें ईश्वरीसाक्षात्कार झाल्यावर मुमुक्षु हा पापापुण्याची मुळींच परवा बाळगीत नाहीं. स्वधर्माप्रमाणें आचरण न केल्यामुळें आपले शत्रु दुर्योधनादि तूं जिवंत ठेविले आहेस, हें कौशल्य नव्हे असेंही **मधुसूदनीकार** ह्मणतात ईश्वर प्रेरणा करील तसें वागणारा मनुष्य योगी होय, असें **वल्लभ** म्हणतात. प्रायश्चित्तानें पापें जळतात, पण पुण्यें तशींच राहतात व वासनाही राहते; ह्मणून या सर्वांचा नाश करण्यासाठीं समत्वबुद्धीच पाहिजे असें **शंकरानंद** ह्मणतात. मंदाधिकाऱ्यास मोक्षप्राप्ति करून घेण्याला ह्या योगाशिवाय **दुसरें** साधनच नाहीं हा **द्विवेदीचा** अभिप्राय आहे.

**मध्व०**—'सुकृतं' मनुष्यजन्म देणारें फळ—उपासना वगैरे मोठें फळ—ज्ञानी मनुष्य टाकीत नाहीं; कारण ह्या महाफळाचा नाशच होत नाहीं व पापाचा मात्र नाश होतो असें हे टीकाकार ह्मणतात. यांचे द्वैतपर व्याख्यान ह्या श्लोकापुरतें तरी वाचावें अशी सप्रेम विनंति आहे. 'कौशलं' अत्यंतसामर्थ्यानें साध्य होणारी वस्तु असा **रामानुजांचा** अर्थ आहे पंडितांचें या श्लोकावर मोठेंच व्याख्यान आहे व त्यांत कर्म, कर्मनाश, माया, ब्रह्म वगैरे गहन विषयांचा चांगला ऊहापोह केला आहे. ॥ ५० ॥

**यस्मात्**—

**पूर्व०**—समत्बुद्धी प्राप्त झाली व सर्व पापपुण्यांचा त्याग केला त्याचा क्षय झाला, तथापि जन्ममरणाचा नाश होऊन मोक्ष कसा मिळतो ?

**सिद्धां०**—त्याचें कारण सांगतों; ऐक—

## कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ॥
## जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥

हि ( कारण प्रसिद्धच आहे कीं ) **बुद्धियुक्ताः** ( पापपुण्य अगर दुःखसुखाचे वेळीं निर्विकार बुद्धि अगर समबुद्धि झालेले अधिकारी **मनीषिणः**

( ज्ञानवंत होत्साते ) **कर्मजं फलं** ( कर्मापासून होणारे स्वर्गसुख, नरकयातना वगैरे सर्व फल ) **त्यक्त्वा** ( टाकून देऊन, परमेश्वरास अर्पण करून ) **जन्मबन्धविनिर्मुक्ताः** ( जन्ममरणाचें चक्र जो संसार त्यापासून–जिवंत असतांच–मुक्त–होतात आणि– **अनामयं पदं** ( जेथें कोणत्याही प्रकारचा उपद्रव नाहीं अशा पदाला, नित्य, बुद्ध, शुद्ध, मुक्त अशा परब्रह्माला ) **गच्छन्ति** ( जातात ). —सारांश, कर्मफलाचा त्याग केल्यानंतर अगर तें ईश्वरास समर्पण केल्यानंतर चित्तशुद्धि झालेल्या मनुष्यास ज्ञान होतें व त्याच्या मागचें जन्ममरणाचें लोढणें तुटतें. अर्थातच हें सुटल्यानंतर तो ज्ञानी मनुष्य जिवंत असतांनाही मोक्षाच्या नित्य आणि निरतिशय सुखाचा अनुभव घेतो—नव्हे तो सुखस्वरूपच होतो !–

कर्मजामीति । कर्मजं फलं त्यक्त्वेति व्यवहितेन संबन्धः । इष्टानिष्टदेहप्राप्तिः कर्मजं फलं कर्मभ्यो जातं बुद्धियुक्ताः समत्वबुद्धियुक्ता हि यस्मात्फलं त्यक्त्वा परित्यज्य मनीषिणो ज्ञानिनो भूत्वा जन्मबन्धविनिर्मुक्ता जन्मैव बन्धो जन्मबन्धस्तेन विनिर्मुक्ता जीवन्त एव जन्मबन्धविनिर्मुक्ताः सन्तः पदं परमं विष्णोर्मोक्षाख्यं गच्छन्त्यनामयं सर्वोपद्रवरहितमित्यर्थः । अथवा ‘ बुद्धियोगाद्धनंजय ’ इत्यारभ्य परमार्थदर्शनलक्षणैव सर्वतः संप्लुतोदकस्थानीया कर्मयोगजसत्त्वशुद्धिजनिताबुद्धिर्दर्शिता, साक्षात्सुकृतदुष्कृतप्रहाणादिहेतुत्वश्रवणात् ५१

‘ कर्मापासून होणारे ’ शब्दाचा फलाकडे संबंध आहे. असो. कर्मापासून अवश्य उत्पन्न होणारें फल—ह्मणजे इष्ट देह ( देव शरीर ), अनिष्ट देह ( पशुपक्ष्यादिकांचें शरीर )वगैरे फल, अथवा सुखदुःखाचा अनुभव देणारें फल—याचा धिःकार बुद्धिवंत लोक करतात; आणि चित्तशुद्धि होईपर्यंत कर्में करितात तीं सर्व ईश्वरास समर्पण करण्याच्या बुद्धीनेंच करितात. ज्यांस समत्वबुद्धि प्राप्त झाली, ज्यांचें चित्त विकारशून्य झालें तेच बुद्धिमान लोक होत. असें विकारशून्य लोकांस ज्ञान प्राप्त होतें तें ब्रह्म तूंच आहेस ’ वगैरे महावाक्यांच्या श्रवण, मनन, निदिध्यासानें होतें. हें ज्ञान झालें म्हणजे जन्मरूपी जी दुःखद शृंखला ती पूर्णत्वानें तुटून जाते; आणि हे ज्ञानी पुरुष जिवंत असतांनाच जन्मबंधांतून पार तुटून जाऊन

विष्णूचें पद जो मोक्ष, त्याप्रत जातात.—विद्वानाचा **अनुभव** असाच आहे.—हें मोक्षपद असें आहे कीं येथें कोणत्याही प्रकारचा शारीरिक मानसिक अगर इतर कसलाही रोग, उपद्रव, ( अगर अविद्या, आणि तिच्यापासून उत्पन्न होणारें कार्य यांचा उपद्रव ) होणें शक्य नाहीं. **आचार्य** म्हणतात कीं ४९ व्या श्लोकांत जी बुद्धि सांगितली आहे ती सांख्यबुद्धीच होय असाही अर्थ करावा. तेथपासून पुढें जेथें बुद्धि शब्द आला आहे तेथें बुद्धीचा अर्थ परमार्थदर्शन देणारी व २६ व्या श्लोकांतील दृष्टांतांत—महासरोवरच्या स्थानीं असणारी व कर्मयोगापासून उत्पन्न झालेल्या चित्तशुद्धीची कन्या ज्ञानबुद्धि असाच करावा. कारण ह्या ठिकाणीं प्रत्यक्ष सर्व कर्मांचा त्यागच सांगितला आहे.—सारांश, बुद्धि शब्दाचा अर्थ समत्वबुद्धि असा केला आहे तसाच त्या शब्दाचा अर्थ ' ब्रह्मज्ञान ' असा घेतला तरी चालेल असें आचार्य म्हणतात.

**शंकरानंद**—'ज्ञानी पुरुषाला कर्मफल बाधक होत नाहीं. कारण तेथें फलाचा रिघावच होत नाहीं.' **मधुसूदन** ' ह्या श्लोकानें अ० १ श्लोक ३१ यांतील शंकेस उत्तर दिलें. ' असें म्हणतात.

**रामानुजः**—कर्मफलाचा त्याग करितांच मोक्ष मिळतो.

**द्वैतीः**—कर्मफलवासनेची त्यागबुद्धि व ईश्वरार्पणबुद्धि प्राप्त झाल्यावर भगवंताचें ज्ञान करून घेणें हा योग होय. यानें परमेश्वराचा साक्षात्कार होऊन मोक्ष मिळतो.

**ज्ञानेश्वरांचा** सरळ अर्थ पहाः—ते कर्मीं तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती ( शिवत नाहीं ) । आणि यातायाती ( जन्ममरणांच्या येरझारा ) लोपती। अर्जुना ! तयां ॥ मग निरामयभरित । पावती पद अच्युत । ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा ॥ येथें यातायाती आणि अच्युत हे शब्द किती समर्पक आहेत हें तज्ज्ञांसच कळेल !

पंडितांची एकच ओंवी देतों, त्यावरून त्यांचा आशय कळेल, नित्यकर्मैं करितांही । फळ होतें जें कांहीं । तें ईश्वरार्पणें, होत नाहीं ( ईश्वरार्पण केलें ह्मणजे नित्यकर्माचें फळ नष्टच होते. ) । कृपा होते तयाची ॥.........बुद्धियुक्त होती केवळ । ते परम पदातें पावती ॥ येथें त्याग सांगितला तो नित्यकर्मफळाचाच होय, काम्यकर्माचा नाहीं; असा पंडितांचा आशय आहे. 'अमुक

एक फळ मिळणार असें ऐकिलें ह्मणजे उत्पन्न होते ती कामना, व न ऐकिलेलें फळ मिळावें अशी इच्छा असते त्यास वासना म्हणावें.' असा कामना व वासना या शब्दांत पंडितांनीं विशेष काढला आहे तो चिंतनीय आहे. वासना व कामना या दोघींचाही त्याग करावा असा यांचा उपदेश आहे. ५१

योगानुष्ठानजनितसत्त्वशुद्धिः कदा प्राप्स्यत इत्युच्यते—

योगबुद्धीच्या साहाय्यानें उत्पन्न झालेली चित्तशुद्धि केव्हां उत्पन्न होते, असें विचारशील तर सांगतों ऐकः—

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥**

**यदा** (जेव्हां) **ते बुद्धिः** (तुझी बुद्धि) **मोहकालिलं** (मोहानें उत्पन्न झालेले अज्ञानाला) **व्यतितरिष्यति** ( तरून जाईल, त्यांतून शुद्ध रीतीनें पार पडेल.) **तदा** (त्या वेळीं) **श्रोतव्यस्य** (जें ऐकावयाचें त्याचें) **च** (व) **श्रुतस्य** (जें ऐकलें आहे त्याचें) **निर्वेदं** (वैराग्य) **गन्तासि** (तुला प्राप्त झालेलें असेल, तुला प्राप्त होईल.) सारांश, तुझ्या बुद्धीवर जो अज्ञानाचा पडदा आला आहे तो दूर झाला ह्मणजे तुला ऐकलेल्या ज्ञानाचा अगर वेदमार्गाचा व ऐकावयाच्या ज्ञानाचा अगर वेदमार्गाचा कंटाळा येईल; ह्मणजे ऐकलेलें किंवा ऐकण्यासारखें असें कांहीं रहावयाचें नाहीं. आत्मज्ञान झालें, अद्वैत ह्मणजे ऐकण्यासारखें दुसरें काय राहणार?

यदेति । यदा यस्मिन्काले ते तव मोहकालिलं मोहात्मकमविवेकरूपंकालुष्यं येनाऽऽत्मानात्मविवेकबोधं कलुषीकृत्य विषयं प्रत्यन्तःकरणं प्रवर्तते तत्तव बुद्धिर्व्यतितरिष्यति व्यतिक्रमिष्यति शुद्धिभावमापत्स्यत इत्यर्थः, तदा तस्मिन्काले गन्तासि प्राप्स्यासि निर्वेदं वैराग्यं श्रोतव्यस्य श्रुतस्य च; तदा श्रोतव्यं श्रुतं च निष्फलं प्रतिपद्यत इत्यभिप्रायः ॥५२॥

ज्या वेळीं तुझ्या बुद्धीला शुद्धभाव प्राप्त होईल, तुझी बुद्धि निर्विषय होईल, त्या वेळीं तुला परमार्थज्ञान प्राप्त होईल पहाः—'मी आहे,' 'हें माझें आहे,' 'हें मला हवें' अशा प्रकारचें अहंतापूर्वक अज्ञान व वासना हीं असतात तीं एखाद्या गहन अरण्याप्रमाणें किंवा दुर्गाप्रमाणें दुर्गम असतात. तेथें अत्यंत घन व निबिड अंधकार भरला असल्यामुळें 'हा आत्मा नव्हे' असा नित्या-

नित्यविवेक नाहींसा होऊन आपलें अज्ञानी अंतःकरण सदासर्वदां विषयांच्या उपभोगांचें चिंतन करीत असतें. असो, तेव्हां या निबिड अंधकारांतून व घाणींतून जेव्हां तुझी बुद्धि समत्ववृत्तीच्या सहाय्यानें व परमेश्वराच्या कृपेनें निष्कलंक बाहेर येईल, तात्पर्य जेव्हां ती अभिमान, वासना व कामना यांचा त्याग करून मायेचे सर्व विषय सोडून दिल्यामुळें तुझी बुद्धि निर्विषय होईल, जेव्हां ती बुद्धि शुद्ध स्फटिकासारखी स्वच्छ आणि निर्विकार होईल, तेव्हां, ऐकिलेलें व ऐकावयाचें असें दोन्ही शास्त्रभागाचें फल सांगून विषयांत गुंतविणाऱ्या ग्रंथांचा तुला कंटाळा येईल; तुला वैराग्य प्राप्त होईल. कारण यांपासून मोक्षाचें ज्ञान मिळणें शक्य नाहीं असें तुला समजेल. सारांश मग तुला कर्म करण्याचें कारण राहणार नाहीं.

**मधुसूद०**—' श्रुतस्य ' = कर्मफलाचा. ' **परीक्ष्य लोकान्कर्मचितान्निर्वेदमायाति** ' ' कर्मानें उत्पन्न होणाऱ्या नश्वरफलांची, अनेक भुवनांची विचारपूर्वक परीक्षा केल्यानंतर त्याला वैराग्य प्राप्त होतें '—मुंडकोपानिषत्——

**शंकरानंद**—' श्रोतव्यस्य श्रुतस्य च ' = दृश्य जगाचा.

**वल्लभ**—' श्रुत ' = सांख्यशास्त्र ( हें ११ श्लोकापासून ३८ व्या पर्यंत सांगितलें आहे ). ' श्रोतव्य ' = भक्तिमार्ग. याचें विवेचन पुढें होणार आहे.

**प्रपाकार**—' बुद्धीनें उत्पन्न केलेल्या सुखदुःखानें पुरुषास बंधन कां होतें? तो बुद्धीचा स्वामी आहे ह्मणून तो बद्ध होतो. पुरुषार्थ ( मोक्ष ) प्राप्त होईपर्यंत बुद्धीच बंधास कारण असते. तिला शुद्ध करून पुरुषार्थ संपादन करणें याचेंच नांव मोक्ष होय ' असें **पतंजलींचें** ह्मणणें अवतीर्ण करितात.

**मध्व आणि सत्यानंद**— ' निर्वेद ' = अत्यंत मोठा लाभ. निर्वेद ह्म० वैराग्य नव्हे; कारण ज्ञानी पुरुष झाला तरी त्याची भक्ति सुटत नाहीं. **नारद शुकादिकांची** भक्ति कायमच आहे. सारांश; ' कर्मफलाचा त्याग करावयाचा तो परमेश्वराची भक्ति हा जो मोठा लाभ तो मिळण्यासाठींच होय. हें भक्तिमाहात्म्य अनेक वेळ ऐकिलें आहे व पुष्कळ वेळ ऐकावयाचेंही आहे. '

**चतरजी**—' विषयानुराग उत्पन्न करून वासना वृद्धिंगत करणाऱ्या शास्त्रांच्या वाटेला सुद्धां जाऊं नको. ' कोलोसिअन्स अ. २.

**रामानुजांचा** अर्थ आचार्यांप्रमाणेंच आहे.

**ज्ञानेश्वरांचा** ' श्रुतस्य च श्रोतव्यस्य ' याचा अर्थ :–तेथ आणिक कांहीं जाणावें । कां मागील तें स्मरावें । हें अर्जुना! आघवें ( सर्व ) पारुषेल ( राहील, संपेल, नष्ट होईल ) ॥

**पंडितांचा** याच शब्दांवरील अर्थ:--तेव्हां श्रुतफळाची कामना । अश्रुतफळाची वासना । टाकोनि, बुद्धि तुझी अर्जुना ! । निंवळ वैराग्य पावेल ॥ केव्हां ?........मोह निरसे । अलंकारीं हेम समरसें, ( एकरसानें ) तैसा चराचरीं गवसे । आत्मा जेव्हां ॥ ९२ ॥

मोहकलिलात्ययद्वारेण लब्धात्मविवेकप्रज्ञः कदा कर्मयोगजं फलं परमार्थयोगमवाप्स्यामीति चेत्तच्छृणु–

अहंतापूर्वक अज्ञानगहनाचा निरास होऊन आत्माविवेकाचें ज्ञान प्राप्त झाल्यानंतर कर्मयोगाचें फळ जो परमार्थयोग, परमार्थज्ञान व विज्ञान, तो मला केव्हां मिळेल असें ह्मणशील तर ऐक–

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ॥**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

**श्रुतिविप्रतिपन्ना** (अनेक प्रकारचे वेदमंत्र, कर्मफळें सांगणारे वेदमन्त्र ऐकल्यामुळें गोंधळून गेलेली ) **ते बुद्धिः** (तुझी बुद्धि) **यदा** (जेव्हां) **निश्चला स्थास्यति** ( निश्चल राहील, सद्वस्तूला सोडून इकडे तिकडे हिंडणार नाहीं )—आणि—**समाधौ अचला** (समाधीमध्यें अचल--राहील--) **तदा** (तेव्हां) **योगं अवाप्स्यसि** (--तुला--योगाची प्राप्ति होईल.): ज्या वेळीं तुझी बुद्धि कर्मफलाशेनें बावरणार नाहीं, आत्मचिंतनामध्यें स्थिर राहील तेव्हां तुला ज्ञानयोगाची प्राप्ति झाली असें समज; तेव्हां तुला आत्मब्रह्मैकज्ञान होऊन मोक्ष मिळाला असें समज.

श्रुतिविप्रतिपन्नेति । श्रुतिविप्रतिपन्नाऽनेकसाध्यसाधनसंबन्धप्रकाशनश्रुतिभिः श्रवणैर्विप्रतिपन्ना नानाप्रतिपन्ना श्रुतिविप्रतिपन्ना विक्षिप्तासति ते तवबुद्धिर्यदा यस्मिन्काले स्थास्यति स्थिरीभूता भविष्यति, निश्चला विक्षेपचलनवर्जिता सती समाधौ समाधीयते चित्तमस्मिन्निति समाधिरात्मा तस्मिन्नात्मनीत्येतत । अचला तत्रापि विकल्पवर्जितेत्ये-

तत्, बुद्धिरन्तःकरणम् । तदा तस्मिन्काले योगमवाप्स्यसि विवेकप्रज्ञ समाधिं प्राप्स्य ॥ ५३ ॥

**पूर्व**०—भगवंता ! आपण बुद्धीची शुद्धता, विवेक व वैराग्य प्राप्ति हें सर्व सांगितलें पण परमार्थबुद्धि केव्हां प्राप्त होईल तें अजून सांगितलें नाहीं.

**सिद्धां**०—अरे ! वत्सा ! विवेकानें वगैरे युक्त झालेल्या बुद्धीला आत्मस्वरूपामध्यें स्थिरता प्राप्त झाली ह्मणजे परमार्थबुद्धीचें संपादन होतें.

**पूर्व**०—हें कसें ?

**सिद्धां**०—सांगतों ऐक. 'स्वर्ग पाहिजे असेल तर अमुक करावें,' 'पुत्र पाहिजे असेल तर तमुक करावें;' इत्यादि प्रकारें साध्य वस्तू अनेक आहेत व साधनेंही अनेक आहेत व त्या उभयतांचे संबंध अमुक प्रकारचे आहेत असें वेदस्मृतिवाक्यांवरून ऐकल्यामुळें जिला नानाप्रकारचीं स्वरूपें प्राप्त होतात, अथवा जी निश्चयात्मक होत नाहीं, अशी बिचारी बुद्धि ( अंतःकरण ) प्रथमतः गोंधळून जाते पण पुढें दुःखमय संसारानें भाजून निघालेली बुद्धि=गुरुपदेशानें, श्रुतिस्मृतींतील वाक्यांनीं व चित्तशुद्धि झाल्यामुळें—स्वभानावर येऊन जेव्हां अनेक गौण पुरुषार्थ सोडून देते व इकडे तिकडे भ्रमण करण्याचा त्याग करिते व एक ठिकाणीं स्थिर होते, जेव्हां चित्ताचा लय करणाऱ्या आत्म्यामध्येंच ती गतिशून्य व निश्चयात्मक होऊन स्वस्थ राहते, तसेंच सर्व प्रकारचे संशय सोडून देऊन जेव्हां त्या आत्म्यामध्यें—वारा न लागणाऱ्या दिव्याप्रमाणें स्थिर—होते, तेव्हां मात्र खरी योगबुद्धि ( परमार्थ बुद्धि, जीव परमात्म्याचें ऐक्यविषयक ज्ञान ) साध्य होते—व मनुष्य कृतकृत्य होतो.

**प्रपाकार**—'श्रुतिविप्रतिपन्ना' याचा अर्थ फलश्रुतींचा अनादर करणारी, फलश्रुतीस टाकून देणारी, असा करतात. 'समाधि=परमेश्वररूपी योग=परमेश्वराचें सांनिध्य.

**मधु**०—'निश्चला' = जागृति, स्वप्न वगैरेमध्यें दिसणाऱ्या वस्तूंनीं न हलविलेली. ( २ ) संकल्प विकल्प रहित. 'अचला' = झोंप, मूर्छा, वायूचा झटका वगैरे येऊन आत्म्याशीं संबंध तुटला आहे अशी न झालेली.

**शंकरा**०—'योगं' = प्रज्ञेची स्थिरता.

**सत्यानंद**—'निश्चला' = खोट्या शास्त्रांत न बाधणारी. 'अचला'—कोणत्याही त्रासानें संतप्त न होणारी.

**रामानुज**—' अचला '=एकरूप. ' श्रुतिविप्रतिपन्ना '—श्रुतींच्या श्रवणानें इतर सर्व सजातीय व विजातीय सूक्ष्म पदार्थांचा विवेक करणारी. या श्लोकांचा अर्थ करितांना हे आचार्य म्हणतात कीं, शास्त्राच्या योगानें आत्मज्ञान होऊन नंतर केलेला कर्मयोग स्थितप्रज्ञा नांवाची ज्ञाननिष्ठा उत्पन्न करितो. आणि ही स्थितप्रज्ञा योग नांवाचे आत्मावलोकन साध्य करतें.

**ज्ञानेश्वरांनीं** ' श्रुतिविप्रतिपन्ना ' याचा अर्थः—इंद्रियांचिया संगति । जिये पसर होतसे मती ( जी बुद्धि विस्तृत होते, नानास्वरूपी होते. )

**पंडितांनीं** समाधि व योग यांत चमत्कारिक विशेष प्रकट केला आहे तो चिंतनीय आहे. मग ते आत्मबोधी । एकाग्रता बुद्धि साधी । त्यास ह्मणावें समाधि । अचळ समाधींत त्या होय ॥ आत्मसमाधींत बुद्धि । पावे जेव्हां अचलत्व सिध्दि । तेव्हां पावसी योगसमृध्दि । कर्में नासतीं ज्या योगीं ॥

प्रश्नबीजं प्रतिलभ्यार्जुन उवाच लब्धसमाधिप्रज्ञस्य लक्षणबुभुत्सया—

वर निश्चल व अचल बुध्दीचें वर्णन केलें तेव्हां समाधीमध्यें ज्याची बुध्दि स्थिर झाली आहे, त्याचें लक्षण कसें असतें, सारांश स्थिरबुध्दि पुरुष कसा असतो हें जाणण्याच्या इच्छेनें अर्जुनानें संधी साधून भगवंतास प्रश्न विचारला:--

**अर्जुन उवाच**—

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ॥**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

**अर्जुन** ह्मणाला :—**केशव** ( हे सर्वज्ञ केशवा ! ) **समाधिस्थस्य।स्थितप्रज्ञस्य** ( समाधीमध्यें परमात्म्याशीं लय लागलेल्या स्थितप्रज्ञाला ) **का भाषा** ( काय ह्मणावें ? त्याच्याशीं कसें बोलावें ? ) **स्थितधिः** ( स्थिरबुद्धीचा पुरुष ) **किं प्रभाषेत** ( कसें बोलतो ? ) **कीं आसीत** ( तो असतो, बसतो, कसा ? ) **किं व्रजेत**--व--( जातो कोठें ? ) सारांश समाधीमध्यें लय लावून ऐक्यत्वाप्रत पावलेल्या महापुरुषाचें लक्षण काय, तो बोलतो, बसतो, चालतो, व्यवहार करितो कसा ? हे प्रश्न अर्जुनानें विचारले आहेत.

स्थितप्रज्ञस्येति । स्थिता प्रतिष्ठिताऽहमस्मि परं ब्रह्मेति प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञस्तस्य का भाषा किं भाषणं वचनं कथमसौ परैर्भाष्यते

समाधिस्थस्य समाधौ स्थितस्य केशव । स्थितधिः स्थितप्रज्ञः स्वयं वा किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् । आसनं व्रजनं वा तस्य कथमित्यर्थः । स्थितप्रज्ञस्य लक्षणमनेन श्लोकेन पृच्छति ॥ ५४ ॥

आपण सर्वांच्या अंतर्यामीं असतां ह्मणून विचारतोः हे सर्वज्ञ केशवा! समाधीमध्यें एकचित्त होऊन ऐक्यत्वास पोहोंचलेला व 'मीच ब्रह्म आहें' अशी ज्याची बुद्धि झाली आहे असा सिद्ध पुरुष दुसऱ्यांनीं कसा ओळखावा, अशा सिद्ध पुरुषांचीं लक्षणें काय तें मला कृपा करून सांगावें. समाधींतून उठल्यानंतर तो पुरुष बोलतो कसा, समाधींत असतांना तो राहतो कसा व समाधि विसर्जन केल्यानंतर त्याचा व्यवहार कसा असतो हेंही मला सांगावें. हे चार प्रश्न करून अर्जुनानें स्थितप्रज्ञाचीं लक्षणें विचारलीं आहेत.

येथें मतभेदास जागाच नाहीं **मध्वाचार्य** मात्र 'कं ब्राह्मणे ईशं शंकरं वर्तयतीति केशवः'—ब्रह्मा व शंकर यांच्यावरही सत्ता करणारा तो केशव अशी वैष्णवी व्युत्पत्ति करितात आणि अर्जुनानें हे प्रश्न लोकांवर उपकार करण्याच्या बुद्धीनें विचारले असें सांगतात. ॥ ५४ ॥

यो ह्यादित एव संन्यस्य कर्माणि ज्ञानयोगनिष्ठायां प्रवृत्तो यश्च कर्मयोगेण तयोः स्थितप्रज्ञस्य प्रजहातीत्यारभ्याध्यायपरिसमाप्तिपर्यन्तं स्थितप्रज्ञलक्षणं साधनं चोपदिश्यते। सर्वत्रैव ह्यध्यत्मशास्त्रे कृतार्थलक्षणानि यानि तान्येव । साधनान्यूपादिश्यन्ते यत्नसाध्यत्वात्। यानि यत्नसाध्यानि साधनानि लक्षणानि च भवन्ति तानि—

( १ ) जो ब्रह्मचर्याश्रमींच कर्मसन्यास करून आत्मानात्मविवेकानें शुद्ध होत्साता ज्ञाननिष्ठ झाला व ( २ ) ज्यानें कर्म, उपासना निष्कामत्वानें करून चित्तशुद्धीनंतर ज्ञाननिष्ठ झाला त्या दोहोंपैकीं कोणत्याही अवस्थेच्या द्वारें जो स्थितप्रज्ञ झाला त्याचीं लक्षणें व स्थितप्रज्ञ होण्याचीं साधनें या ५५ व्या श्लोकापासून तों अध्यायसमाप्तीपर्यंत सांगितलीं आहेत.

**पूर्व०**—भगवन्! ज्ञानयोग आणि कर्मयोग असे दोन निरनिराळे मार्ग असतां दोघांसही एकच साधन कसें सांगितलें ?

**सिध्दां०**—शाबास उत्तम वेळीं शंका काढिलीस. अरे वत्सा! वेदांतशास्त्रामध्यें ब्रह्मज्ञानाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीं जिज्ञासू मुमुक्षूक-

रितां आहेत. सिध्द पुरुष तीं लक्षणेंच असतात तेव्हां त्यांना कांहीं कर्तव्य नसतें. असो; हीं साधनें यत्नसाध्य आहेत तेव्हां हीं ब्रह्मज्ञाचीं लक्षणें व मुमुक्षूंचीं साधनें ह्मणून जें मी आतां सांगणार तें ऐक—

**श्रीभगवानुवाच—**

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ॥**
**आत्मन्येवाऽऽत्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥**

**श्रीभगवान** ह्मणतातः--**पार्थ** ( अर्जुना ! ) **यदा** ( जेव्हां ) **सर्वान् मनोगतान् कामान्** ( मनामध्यें असलेल्या सर्व प्रकारच्या वासना व कामना ) **प्रजहाति** (मनःपूर्वक सोडून देतो)--आणि **आत्मनि एव** (आत्मस्वरूपामध्येंच) **आत्मना** (आत्मस्वरूपानें) **तुष्टः** । (संतुष्ट असतो ) **तदा** ( त्या वेळीं )—त्या पुरुषाला—**स्थितप्रज्ञः उच्यते** (स्थितप्रज्ञ असें ह्मणतात. सारांश मनामधील सर्व वासनांचें अहंकार वृत्तीसह जेव्हां ज्ञानी पुरुष उच्चाटन करितो आणि नेहमीं आत्मस्वरूपीं लय लावून आत्मानंदानें संतुष्ट असतो, ब्रह्म व आत्मा यांचें ऐक्य करून समाधानवृत्तींत असतो, तेव्हां त्या ज्ञानी पुरुषाला स्थितप्रज्ञ कसें म्हणावें--- हें पहिल्या प्रश्नाचें उत्तर होय. हेंच स्थितप्रज्ञाचें मुख्य लक्षण आहे.

श्रीभगवानुवाच—प्रजहातीति । प्रजहाति प्रकर्षेण जहाति परित्यजाति यदा यस्मिन्काले सर्वान्समस्तान्कामानिच्छाभेदान्हे पार्थ मनोगतान्मनसि प्रविष्टान्हृदि प्रविष्टान् । सर्वकामपरित्यागे तुष्टिकारणाभावाच्छरीरधारणनिमित्तशेषे च सत्युन्मत्तप्रमत्तस्येव प्रवृत्तिः प्राप्तेत्यत उच्यते—आत्मन्येव प्रत्यगात्मस्वरूप एवाऽऽमना स्वेनैव बाह्यालाभनिरपेक्षस्तुष्टः परमार्थदर्शनामृतरसलाभेनान्यस्मादलंप्रत्ययवान्स्थितप्रज्ञः स्थिता प्रतिष्टिताऽऽत्मानात्मविवेकजा प्रज्ञा यस्य स स्थितप्रज्ञो विद्वांस्तदोच्यते । त्यक्तपुत्रवित्तलोकैषणः संन्यस्याऽऽत्माराम आत्मक्रीडः स्थितप्रज्ञ इत्यर्थः ॥ ५५ ॥

श्रीभगवान सांगतातः—अर्जुना ! अंतःकरणामध्यें, हृदयामध्यें प्रवेश करून राहिलेल्या सर्व इच्छा व वासना, तशीच अहंकारवृत्ति--या सर्वांचा समूळ व सबीज त्याग ज्या वेळीं होतो त्यावेळीं ज्ञानी पुरुषाला स्थितप्रज्ञ असें म्हणतां येते, हें ऐक—

**पूर्व०**— भगवान् ! अमळ थांबा. महाराज ! सर्व कामनांचा त्याग केला तेव्हां अर्थातच सुखाचें व समाधानाचें कारण संपलें. सुख नाहीं तर कर्म करण्याचें कारण नाहीं. नव्हे ?

**सिध्दां०**—नाहीं. त्याला शरीर धारण करावयाचें नाहीं का देहप्रारब्ध आहे तोंपर्यंत ?

**पूर्व०**—बरें. शरीर धारण तर करावयाचें आहे व सुख आणि समाधान तर बिलकुल मिळावयाचें नाहीं, तेव्हां अर्थातच तो मनुष्य उन्मत्त ह्मणजे विवेक-शून्य आणि प्रमत्त ह्मणजे मस्तक फिरलेला, वेडा झालेला असा होईल नाहीं काय ?

**सिध्दां**—नाहीं त्याला संतोषाचें अत्युत्तम स्थळ आहे. तें कोणतें ह्मणशील तर ब्रम्हस्वरूपीं लय लावणें हें होय. बाह्यवस्तूंचा, विषयांचा त्याग करून आत्मानंदामध्येंच तो रममाण होतो. परमार्थ रस जो ब्रम्हानंद त्याच्या लाभामध्यें रममाण होऊन तो निमग्न झाला म्हणजे बाह्य विषयांविषयीं त्याला बळकट वैराग्य उत्पन्न होतें समजलास; बाह्यविषयांचा सर्वथा त्याग करणें तो इतका कीं, विषयाचें भानच सर्वस्वीं नाहींसें व्हावें व आत्मस्वरूपीं लय लावून राहणें हा त्याचा आनंद होय. वत्सा ! आनंदाची ही पराकाष्ठा आहे. ह्मणून ह्मणातों कीं या असल्या शुध्द, निर्मळ आणि नित्य आनंदामध्यें ज्याची बुध्दि स्थिर झाली, बाणून गेली त्या विद्वानासच स्थितप्रज्ञ ह्मणावें. बाबा ! प्रपंचांत घालणाऱ्या ज्या पुत्र, मित्र, कलत्रादि वासना आहेत त्यांचा सर्वथैव त्याग करून सर्व वृत्ति शून्य होऊन संन्यास घेऊन ज्यानें परब्रम्हामध्यें विश्रांति घेतली, परब्रह्माबरोबरच क्रीडा करण्यास आरंभ केला, सारांश जो परब्रम्हाशीं ऐक्यात्म्य पावला त्यालाच स्थितप्रज्ञ म्हणावें बरें ! परब्रह्माशीं ऐक्य झालें, ब्रह्म व दृश्य जग मीच आहें असें झालें म्हणजे वासना किंवा संकल्प किंवा कामना ह्या बाया राहतात कशाला ?

अद्वैतवाद्यांत एकवाक्यता आहे. **मधु०, शंकरा०**--व **प्रपा०**--एक मंत्र देतातः—‘**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि स्थिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते** ॥ ज्यावेळीं हृदयांतलि सर्व वासनांचा क्षय होतो तेव्हां मरणधर्मी मनुष्य अमर होतो ! व ब्रह्मांत लीन होऊन जातो. ज्याचें ज्ञान स्थिर झालें तो स्थितप्रज्ञ असें **चतरजी** ह्मणतात. तसेंच जीव-

न्मुक्ताची प्रवृत्ति वेडयासारखी दिसते ती त्याचे भान दृश्यावर नसतें ह्मणून होय असें सांगतात. 'ईश्वराकडे आम्हीं तनमन लाविलें ह्मणून आम्हीं मूर्ख झालों!' पाल.

या अवस्थेला **रामानुज** 'वशीकारसंज्ञा' असें ह्मणतात. ही चवथी अवस्था आहे.

द्वैतवादी 'सर्वान्' याचा 'बहुतेक सर्व' असा अर्थ कारितात. शुक, नारदादि ज्ञानी सुद्धां भक्तिरसाची वासना सोडीत नाहींत अर्थातच ही ओढाताण आहे. आत्मनि=विष्णुदेवतेंत. यांचा ह्मणण्याचा कटाक्ष हा आहे कीं जीवाला परमात्मस्वरूप ऐक्यत्वानें कधींही मिळणार नाहीं.

**ज्ञानेश्वर** व **पंडिश** यांस वरील अद्वैतपर अर्थ मान्य आहे. ॥ ५५ ॥

किंच—

आणखी पहा:—

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

**दुःखेषु** ( शरीरासंबंधीं, मनसंबंधीं, आकस्मिक व दैविक संकटें प्राप्त झालीं असतां ) **अनुद्विग्नमनाः** ( ज्याचें मन उद्विग्न, खिन्न होत नाहीं )—व **सुखेषु** ( शारीरादिक सुखें प्राप्त झालीं असतां ) **विगतस्पृहः** ( ज्याची भोगतृष्णा नष्ट झाली आहे )—व **वीतरागभयक्रोधः** ( लोभ, भय, संताप वगैरे सर्व मनोविकार ज्याचे नष्ट झाले आहेत )—असा--**मुनिः** ( ब्रह्मचिंतनामध्यें मग्न झालेला पुरुष )—त्याला--**स्थितधीः** ( स्थिर बुद्धीचा--असें-- ) **उच्यते** ( ह्मणतात. ) सारांश कसलेंही दुःख प्राप्त झालें तरी जो खिन्न होत नाहीं, किंवा कोणतेंही सुख मिळालें तरी ज्याची भोगतृष्णा जिवंत होत नाहीं, ज्याचा लोभ, किंवा भय, किंवा क्रोध वगैरे सर्व विकार नामरूपासकट नाहींसे झाले, अशा सिद्ध पुरुषालाच स्थितप्रज्ञ म्हणावें. पाठीमागील श्लोकांत या श्लोकांत व पुढें जीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं प्रयत्नसाध्य आहेत. मुमुक्षूनें ह्या लक्षणांचें श्रवण करून अभ्यास करावा; आणि वैराग्यानें तीं आपल्यामध्यें आलीं तरच त्याला ब्रह्मज्ञान होणार आहे हें साधकांनीं लक्ष्यांत ठेवावें.

दुःखेष्विति । दुःखेष्वाध्यात्मिकादिषु प्राप्तेषु नोद्विग्नं न प्रक्षुभितं दुःखप्राप्तौ मनो यस्य सोऽयमनुद्विग्नमनाः तथा सुखेषु प्राप्तेषु विगता स्पृहा तृष्णा यस्य नाग्निरिवेन्धनाद्याधाने सुखान्यनुविवर्धते स विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधो रागश्च भयं च क्रोधश्च वीता विगता यस्मात्स वीतरागभयक्रोधः स्थितधीः स्थितप्रज्ञो मुनिः संन्यासी तदोच्यते ॥ ५६ ॥

शारीरिक, मानसिक, दैविक व आकस्मिक दुःखें प्राप्त झालीं असतां ज्याचें मन प्रक्षुब्ध होत नाहीं--' आतां मी काय करूं ? माझ्यावरच कां हा प्रसंग आला ? आतां मला कोण मदत करील ? कोण तारील ? ' अशा प्रकारें हांसत कर्म करून मागाहून रडणारे मूर्ख लोक तमोगुणात्मक शोकानें ओरडत असतात, धीराचे लोक आंतल्या आंत जळत असतात, वगैरे कोणताच प्रकार ज्याच्या मनामध्यें होत नाहीं, किंवा शारिरिक वगैरे सुखें प्राप्त झालीं असतां जो हर्षाच्या उन्मादानें नाचावयास लागत नाहीं, ह्मणजे सुखभोगाविषयींची ज्याची व ज्याच्या मन, जिव्हा, नेत्र इत्यादि इंद्रियांची तृष्णाच नष्ट झाली; तो मनुष्य श्रेष्ठच होय. अर्जुना ! ही तृष्णा अनेक प्रकारची आहे. सुख प्राप्त झालें ह्मणजे तें संपेल कीं काय ही भीति, सुख संपल्यानंतर चुकल्यासारखें होऊन पुनः तें सुख असावें अशी आशा व इतरांस सुख प्राप्त झालें ह्मणून उत्पन्न होणारी असूया असे अनेक प्रकार तृष्णेचे आहेत.— असो; सुखाची तृष्णा नष्ट झाली ह्मणून ती सर्पण न घातलेल्या अग्निज्वालेप्रमाणें वृद्धिंगत होण्याचें बंदच झालें; सारांश स्वानंदरसामध्यें निमग्न झाल्यामुळें त्याची सुखतृष्णा समूळ नाहींशी झाली, व प्रियवस्तूवर लोभ, मृत्यूचें भय, शत्रूविरुद्ध क्रोध, इत्यादि मनोविकारांनीं ज्याच्यापासून सोडचिठ्ठी घेतली तो ब्रह्मज्ञानी संन्यासी स्थितप्रज्ञ होय. [ पहा अ० ५ श्लोक २० ]

**राजानुज** या अवस्थेस ' एकेंद्रियसंज्ञा ' ह्मणतात.

या श्लोकावरील ' पंडिताचें व्याख्यान फार सुरस आहे इतकेंच सांगणें शक्य आहे. '

किंच—

आणखी पहाः—

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ॥**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**

**यः** (जो–पुरुष) **सर्वत्र** (सर्व ठिकाणीं) **अनभिस्नेहः** (अत्यंत स्नेह-शून्य, ममत्वशून्य–असतो)–तसेंच–**तत्तत्** (तें, तें) **शुभाशुभं** (सुख किंवा दुःख) **प्राप्य** (प्राप्त झालें असतां) **न अभिनन्दति** (–तो–हर्षभरित होत नाहीं) **न द्वेष्टि** (—किंवा द्वेषयुक्त व खिन्न होत नाहीं) **तस्य** (त्या पुरुषाची) **प्रज्ञा** (बुद्धि) **प्रतिष्ठिता** (स्थिर झाली—असें ज़ाण)—सारांश ज्या पुरुषाला ह्या दृश्यजगांत आपलें असें कांहींच न दिसल्यामुळें कोठेंच प्रीति उत्पन्न होत नाहीं, तसेंच नानाप्रकारचीं सुखदुःखें प्राप्त झालीं असतां ज्याला कधींहि हर्षविषाद वगैरे कांहीं होत नाहीं, त्याची बुद्धि स्थिर झाली असें जाणावें.

यः सर्वत्रेति । यो मुनिः सर्वत्र देहजीवितादिष्वप्यनभिस्नेहोऽभि-स्नेहवर्जितस्तत्तत्प्राप्य शुभाशुभं तत्तच्छुभमशुभं वा लब्ध्वा नाभिनन्दति न द्वेष्टि शुभं प्राप्य न तुष्यति न हृष्यत्यशुभं च प्राप्य न द्वेष्टीत्यर्थः तस्यैवं हर्षविषादवर्जितस्य विवेकजा प्रज्ञा प्रतिष्ठिता भवति ॥ ५७ ॥

ज्या सिद्ध पुरुषाची कोणत्याही दृश्य पदार्थावर--मग तो स्वतःचा देह, असो, वा जीव असो--कोणत्याही पदार्थावर--अत्यंत किंवा अल्प आसक्ति नसते प्रेम नसतें, सारांश जो उदासीन असतो, तसेंच प्रारब्धवशात् चांगलें झालें, सुखकारक वस्तु प्राप्त झाली किंवा वाईट झालें, दुःखकारक प्रसंग गुदरला, तर आनंददायक गोष्ट झाली म्हणून ज्याला हर्ष, आनंद, होत नाहीं, किंवा प्रतिकूल प्रसंग प्राप्त झाला ह्मणून ज्याला त्वेष (दुःख) उत्पन्न होत नाहीं, त्या हर्षखेदशून्य पुरुषाची ज्ञानजन्य बुध्दि स्थिर झाली, असें म्हणावें.--सारांश त्याच सिध्दपुरुषाला परमार्थ साध्य झाला असें समजावें.—

**मधुसूदनीकार, शंकरानंद** वगैरे सर्व अद्वैती टीकाकारांचा एकच अभिप्राय आहे.

**मधुसूदनीकार** हे स्नेह, हर्ष, विषाद वगैरे तामसवृत्ति आहेत असें सांगून त्यांचा उद्भव सिद्ध पुरुषांचे ठायीं होणारच नाहीं असें म्हणतात. **द्विवेदी** म्हणतात कीं दृश्य जगावरील आसक्ति नष्ट होऊन सर्वच ब्रह्ममय

झालेल्या मुनीला हर्षखेद करण्यासारखें कांहींच दिसत नसल्यामुळें तो कोणाची स्तुति निंदा करीत नाहीं. त्याची वाणी नेहमी ब्रम्हानुवाद; व मुमुक्षूंस उपदेश, करण्यामध्यें गढून गेलेली असते

**मध्वाचार्य रामानुज** यांचाही अर्थ वरीलप्रमाणें आहे. **वल्लभ** यांनीं ‘ सर्व ’ सर्व या शब्दाचा संसारामध्यें असा अर्थ केला आहे.

**चतरजी** ह्मणतातः येथें स्थितप्रज्ञ बोलतो कसा यास उत्तर असें दिलें कीं त्याचें सर्व भाषण स्वार्थशून्य अहंकारशून्य असतें.

**ज्ञानेश्वर**--जो सर्वत्र सदा सरिसा ( सारखा ) । परिपूर्ण चंद्र का जैसा । ‘ अधमोत्तम, प्रकाशा ( ब्रम्हज्ञानरूपप्रकाश फांकला असतां त्यामध्यें न ह्मणे ॥ ) अनवाच्छिन्न ( अखंड ) समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालट नाहीं चित्ता । कवणे वेळे ॥

**वामन**—अहंता । ममता गुणें । मी, माझें ह्मणावें ॥ तरी देही नसे अहंता । त्यास कैची अन्यत्र ममता ? । स्नेहपाश नसे चित्ता । जो कांहीं दाटुनी बोलवी ॥....सारांश--भाव ऐसा निघाला । कीं जो ‘नाहीं’ ऐसा झाला । तों तो साधक बोलिला ( ह्मटला गेला. ) । साधन करावें त्या नरें ॥ साधकानें कसें वागावें ह्याबद्दल पंडितांनीं उत्कृष्ट उपदेश केला आहे, तो मुमुक्षूंनीं अवश्य वाचावा ॥ ९७ ॥

**किंच**—

आणखी—

## यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ॥
## इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

**यदा च** ( आणखी ज्या वेळीं ) **अयं** ( हा--सिद्ध पुरुष--) **सर्वशः** ( सर्व बाजूंनीं ) **इन्द्रियाणी** आपलीं सर्व इंद्रियें ) **इन्द्रियार्थेभ्यः** ( त्या त्या इंद्रियाच्या विषयापासून ) **संहरते** ( आंखडून घेतो, मागें घेतो ) **कूर्मः अङ्गानि इव** ( कूर्म, कांसव, ज्याप्रमाणें आपलीं अंगें आपल्या पोटाखालीं घेतें त्याप्रमाणें; ) तेव्हां--**तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता** (बुद्धि त्याची स्थिर झाली--असें समज.) सारांश एखादें भय प्राप्त झालें असतां ज्याप्रमाणें कांसव आपलीं सर्व अंगें एकदम आंखडून घेतें, त्याप्रमाणें जो सिध्द पुरुष प्रत्येक वेळीं आपलीं सर्व

इंद्रियें विषयांपासून परावृत्त करून घेतो, कोणताही बाह्यविषय प्राप्त झाल्या-बरोबर जो आपल्या इंद्रियांचें व मनाचें दमन करतो, त्यालाच स्थितप्रज्ञ असें ह्मणावें---' संहरते ' ह्या शब्दावरूनच असें व्यक्त होतें कीं या संन्याशाचीं इंद्रियें विषयोपभोग घेत असतांनाही त्या उपभोगांत लिप्त होत नाहींत! हा **चतरजींनीं** गूढार्थ काढला आहे.

यदा संहरत इति । यदा संहरते सम्यगुपसंहरते चायं ज्ञान-निष्ठायां प्रवृत्तों यतिः कूर्मोऽगानीव सर्वशो यथा कूर्मो भया-त्स्वान्यङ्गान्युपसंहराति सर्वत एवं ज्ञाननिष्ठ इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः सर्वविषयेभ्य उपसंहरते । तस्य प्रज्ञा प्रतिष्ठितेत्युक्तार्थं वाक्यम् ३८

कोणतेंही भय कारण उत्पन्न झालें असतां ज्याप्रमाणें कांसव आपल्या सर्वांगाचा संकोच एकदम करून निर्भय होतें, त्याप्रमाणें ज्ञाननिष्ठेनें मुक्ति-नामक पुरुषार्थ साध्य करणारा साधक पुरुष (संन्यासी) ज्या वेळीं स्वतःच्या मनास व इंद्रियांस रूप, रस, गंधादि सर्व सात्त्विक, राजस, व तामस (ही साधकाची स्थिति वर्णिली आहे, सिध्दाची नव्हे असें **चतरजी** म्हणतात. सिध्दपुरुषाला इंद्रियाची भीति असण्याचें कारण नसतें.)--विषयांपासून परा-वृत्त करण्याला समर्थ होतो व वस्तुतः निर्विषय होतो त्या वेळीं तो स्थितप्रज्ञ झाला, त्या वेळीं त्याची बुध्दि स्थिर झाली, त्या वेळीं त्याला समाधिभंगाची भीति राहिली नाहीं, असें समजावें.--सर्व इंद्रियें, मन, बुध्दि वगैरे निर्विषय झाल्यावर समाधिभंगाची भीति नाहींशी होते हें तज्ज्ञांस विदितच आहे. ज्ञाननिष्ठेला महद्वैराग्य, तीव्र मोक्षेच्छा व ब्रह्मपरत्व अवश्य असावीं लागतात हें खरें, पण प्रथम इंद्रियनिग्रह झाल्यावर मग हीं पुढची साधनें आहेत.

अद्वैत टीकाकारांचा हाच आशय आहे.

**रामानुज**--' विषयाचें दर्शन झाल्याबरोबर मुमुक्षु आपल्या विषयगामी इंद्रियांचा संकोच करितो ' **मध्वाचार्य** व त्यांचे अनुयायी ' अनायासानें आपल्या इंद्रियांचा संकोच करितो ' असें म्हणतात. कूर्माच्या दृष्टांतास अनु-रूप हा अर्थ आहे.

**ज्ञानेश्वर**--तैसीं (कूर्मावयवासारखीं) इंद्रियें आपैती (आपल्याआपण) । ज्याचें ह्मणितलें करितीं । तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पावली असे ॥

**पंडितांचा** दृष्टांतः—चेंडु भूमीवरी पडे । तो भूमी स्पर्शतां उडे । परी त्या भूमीस न जडे । मृत्पिंड जैसा ॥ प्रारब्धानें प्राप्त झालेले विषय साधक पुरुष कसे भोगतो व विषयाधीन कसा होत नाहीं यास हा दाखला फार चांगला आहे. पंडितांचें हेंही व्याख्यान वाचनीय आहे.

तत्र विषयाननाहरत आतुरस्यापीन्द्रियाणि निवर्तन्ते कूर्माङ्गाणीय संह्रियन्ते, न तु तद्विषयो रागः, स कथं संह्रियत इति । उच्यते—

**शिष्य**—महाराज ! ज्यांना ज्ञान नाहीं असे मूर्ख लोक सुद्धां तपश्चर्या करण्यास बसले, किंवा रोगादिकांच्या योगानें पीडित झाले म्हणजे ते लोक सुध्दां विषयांचें ग्रहण करीत नाहीं, विषयपराङ्मुख होतात, म्हणून त्यांसही स्थितप्रज्ञ म्हणावयाचें काय ?

**गुरु**—छेरे वेडया ! जोंपर्यंत वासना नष्ट झाली नाहीं, विषयतृष्णा नष्ट झाली नाहीं, तोंपर्यंत समाधिसिध्दि कोठून होणार ? सारांश बाह्यविषयांची आसक्तीच नष्ट झाली पाहिजे.

**शिष्य**—ही आसक्ति कशी नाहींशी करावी ?

**गुरु**—सांगतों, ऐक.

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ॥**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

**निराहारस्य** (इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण करण्याचें टाकून दिलें आहे ज्याच्या अशा) **देहिनः** ( देह धारण करणाऱ्या मूर्खापासून सुध्दां) **विषयाः** ( रूप, रस, गंधादि विषय ) **विनिवर्तन्ते** ( पराङ्मुख होतात ). पण कसे ?-- **रसवर्जं** ( विषयावरील आसक्ति खेरीज करून !)--एखाद्या मूर्खानें नियमच केला तर त्याचीं इंद्रियें व मन, हीं विषयापासून परावृत्त होतात हें खरें, पण त्या पुरुषाची विषयभक्ति कमी झाली आहे म्हणून नव्हे, तर त्यानें नियमच केला आहे. त्याला विषय मिळतच नाहींत म्हणून त्याचें मन व इंद्रियें विषयग्रहण करीत नाहींत !--असो; पण--**रसः अपि** ( ती प्रीति, ती आसक्तीसुद्धां ) **अस्य** ( ज्ञानी पुरुषाची ) **परं दृष्ट्वा** ( परब्रह्मवृत्ति झाली आहे, असें पाहून )

**निर्वतते** ( परावृत्त होते. ). सारांश ज्याला आत्मज्ञान झालें व जो ' मीच परब्रह्म आहें ' असें चिंतन करूं लागला, त्या पुरुषाची ती ब्रह्ममग्नता पाहून, विषयतृष्णा आपल्या आपणच नाहींशी होते. तात्पर्य ब्रह्मानंदीं ज्याची टाळी लागली, त्याची विषयवासनाही नष्ट होते.---नुसते विषयच पराङ्मुख होतात असें नाहीं तर विषयवासनाही अस्तंगत होते.

विषया इति । यद्यपि विषयोपलक्षितानि विषयशब्दवाच्यानीन्द्रियाण्यथवा विषया एव निराहारस्यानाह्रियमाणविषयस्य कष्टे तपसि स्थितस्य मूर्खस्यापि विनिवर्तन्ते देहिनो देहवतो रसवर्जं रसो रागो विषयेषु यस्तं वर्जयित्वा । रसशब्दो रागे प्रसिद्धः स्वरसेन प्रवृत्तो रसिको रसज्ञ इत्यादिदर्शनात् । सोऽपि रसो रञ्जनरूपः सूक्ष्मोऽस्य यतेः परं परमार्थतत्त्वं ब्रह्मदृष्ट्वोपलभ्याहमेव तदिति वर्तमानस्य निवर्तते निर्बीजं विषयविज्ञानं संपद्यत इत्यर्थः । नासति सम्यग्दर्शने रसस्योच्छेदः । तस्मात्सम्यग्दर्शनात्मिकायाः प्रज्ञायाः स्थैर्यं कर्तव्यमित्यभिप्रायः ॥ ५९ ॥

येथें आपण विषय शब्दानें डोळे, जिव्हा वगैरे इंद्रियें व मन हीं घेतलीं किंवा विषय शब्दाचा अर्थ रूप, रस, इत्यादि बाह्यविषयपर घेतला तरी तात्पर्य एकच आहे. तेव्हां जरी एखाद्या मूर्खानें व्रत किंवा तप करावयाचें ह्मणून विषयाचें इंद्रियाकरवीं ग्रहण केलें नाहीं तथापि त्या अज्ञ मनुष्यानें विषयत्याग केला किंवा इंद्रियदमन केलें असें म्हणतां यावयाचें नाहीं कारण उपभोग घेण्याची जी वासना, जी आसक्ती असते ती या मूर्खाच्या मनांतून नष्ट झालेली नसते.—तात्पर्य ' द्राक्षें आंबट ' ह्मणणाऱ्या कोल्ह्याप्रमाणेंच या अविद्वान् पुरुषाची स्थिति असते. विषयावरील प्रीति उडाली ह्मणून हे विषयत्याग करितात असें नव्हे, तर विषय मिळत नाहींत म्हणून किंवा विषय विषासारखे होतात ह्मणून, किंवा कांहीं व्रत, नेम केला आहे म्हणून हे लोक विषय ग्रहण करीत नाहींत.-- असो; रस शब्दाचा अर्थ प्रीति, आसक्ति, असाच अर्थ केला पाहिजे. रसिक, रसज्ञ इत्यादि शब्दांवरून रस शब्दाचा अर्थ प्रीति असाच होतो, गोड, आंबट, तिखट, रस असा होत नाहीं, हें उघड आहे. आतां परब्रह्माचें पूर्ण ज्ञान होऊन जो समाधीमध्येंच निमग्न झाला व मीच ब्रह्म असें ज्याचें अनुसंधान लागलें त्या सम्यग्ज्ञानी

पुरुषाची ब्रह्मवृत्ति पाहिली ह्मणजे विषयासक्ति किंवा सूक्ष्मरूपी व प्रियकर विषयवासना विषयासुद्धां आपण होऊनच पराङ्मुख होते. त्या ब्रह्मज्ञ पुरुषाचा ब्रह्मानंद पाहिला ह्मणजे वासना समूळ आणि सबीज नाहींशी होते. सारांश, सम्यग्ज्ञानी पुरुषाच्या सर्व वासना नष्ट होतात; अथवा सम्यग्ज्ञान होतांक्षणींच वासनांचा क्षय होतो.

**शिष्य**—गुरुजी! पूर्णज्ञान अथवा सम्यग्ज्ञान झाल्याशिवाय वासनानाश होत नाहीं असें आपण ह्मणतां आणि सामान्यतः आपण असें सांगत असतां कीं वासनानाश झाल्याविना सम्यग्ज्ञान होत नाहीं : तेव्हां हें मोठें कोडेंच झालें. सारांश कोणालाच सम्यग्ज्ञान व्हावयाचें नाहीं. परवानगीवांचून प्रवेश नाहीं आणि प्रवेशावांचून परवानगी नाहीं असाच हा प्रकार झाला म्हणावयाचा!

**गुरु**—वः तूं बरींच लांबलांब व्याख्यानें झोडायला लागलास! अरे, नुसतें येवढें ध्यानांत ठेव ह्मणजे तुझें कोडें उकलेल. प्रथमतः नित्य कोणतें, अनित्य कोणतें याचा विवेक केलास ह्मणजे विषयासंबंधीं जी आसक्ति असते, तिच्यापैकीं स्थूलभाग नष्ट होईल. हा स्थूलभाग नष्ट झाला ह्मणजे सम्यग्ज्ञान प्राप्त होईल. आणि सम्यग्ज्ञान झालें ह्मणजे स्थूल व सूक्ष्मरूपी विषयवासनेचा नाश होईल. समजलास? सारांश सम्यग्ज्ञान किंवा पूर्णज्ञान झाल्याविना विषयासक्तीचा उच्छेद व्हावयाचा नाहीं. ह्मणून सम्यग्ज्ञान मिळवून देणारी जी सांख्यबुद्धि तिचें स्थैर्य कर.

अद्वैतटीकाकारांचा हाच आशय आहे. **श्रीधर** निराहारी ह्मणजे भुकेलेला मनुष्य व रस ह्मणजे अन्नतृष्णा असाही एक अर्थ करून दाखवितात. **शंकरानंद** म्हणतात कीं, प्रीतीचें अस्तित्व हें अज्ञानाचें लक्षण आहे. श्लोकांत ‘ अपि ’ हा शब्द आहे तो प्रज्ञास्थैर्याचें सामर्थ्य प्रकट करून रसास सुद्धां मागें हटवितो! हटयोगानें इंद्रियदमन होतें पण वासनाक्षय होत नाहीं, राजयोगानें वासनेचा क्षय निर्मूळ होतो असें दाखविण्याचा भगवंताचा हेतु आहे असें **प्रो० द्विवेदी** म्हणतात.

**रामानुज** म्हणतातः—श्लोक ५५ तें ५९ पर्यंत ज्ञाननिष्ठेची प्रगति कस-

कशी होत जाते हें सांगितलें आहे. ह्या श्लोकांत ज्ञाननिष्ठा प्राप्त होणें दुर्घट आहे व वासनाक्षय झाल्याविना ज्ञान उत्पन्न होत नाहीं असें सांगतात.

**मध्वाचार्य** भागवतांतील एक श्लोक समानार्थक देतात.

"इंद्रियाणि जयन्त्याशु निराहारमनीषिणः । वर्जयित्वा तु रसनां, असौ रन्ये हि वर्धते" ॥

यज्ञयागामध्यें व निराहार केला असतां विषयोपभोगाचें सामर्थ्य मात्र नष्ट होतें पण रसाची आकांक्षा नष्ट होत नाहीं. ब्रह्मपदीं ( विष्णुपदीं ) ज्याची वृत्ति लीन झाली त्याचीच विषयवासना नष्ट होते; शिवाय इंद्रियदमन सुद्धां महाप्रयत्नसाध्य आहे असें याचें मत आहे.

**सत्यानंद** म्हणतात कीं, बाह्येंद्रियांचा निरोध निराहारानें होतोच मनोजय हा विष्णुसाक्षात्कारानें होतो. निराहार असला ह्मणजे इंद्रियें विषयांचें ग्रहण करीत नाहींत. व विष्णुपदीं चित्तवृत्ति लीन झालेली असली ह्मणजे मनांत विषयप्राप्तीचा अंकुर फुटत नाहीं व आत्माही क्षुब्ध होत नाहीं. **राघवें०**--बाह्येंद्रियांचा व वासनेचा क्षय झाल्याविना ज्ञाननिष्ठा नाहीं.

**ज्ञानेश्वराचा** दृष्टांतः--जैसी वरिवरी पालवी खुडिजे । आणि मुळीं उदक घालिजे । तरी कैसेनि नाश निपजे । तया वृक्षां; ॥ तो उदकाचेनि बळें अधिकें । जैसा आडवेनि अंगें फांके । तैसा मानसी विषय पोखे ( वाढत जातो, प्रवेश करितो ) । रसनाद्वारें ॥ ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावर--तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती । जैं सोहंभावप्रतीति । प्रकट होये ॥

**पंडितांच्या** व्याख्यानाचा मासलाः--अमृत पिऊं लागे रसना । तरी कांजी कां निरस होईना । राग तो विराग झाला अर्जुना ! । देखितां परमात्मयातें ॥ स्वरूप गोडी लागतां मना । सकळ जाती कामना । भोगेच्छा सर्वदा असेना । स्थितप्रज्ञासी ॥

**चतरजी** ह्मणतातः--'विषयाची आवड नष्ट झाली ह्मणजे समाधीची सिद्धता होते. विषय हे स्वतः सुख अगर दुःख देत नाहींत. आपल्या आवडीनुरूप अगर नावडीप्रमाणें विषय सुखकर किंवा दुःखकर होतात. गाणें सर्वांस सारखें आवडतें असें नाहीं. व एका मनुष्यास एकच सूर नेहमीं आवडतो असें नाहीं. एवंच विषयांत सुख नाहीं, आपल्या आवडींत आहे. ती आवड नष्ट केली ह्मणजे काम झालें ! ही आवड नष्ट

करावयास समाधीचें साधन उत्कृष्ट आहे.' आपल्या आवडीवरच पदार्थांस सुखदु:ख देण्याचें सामर्थ्य येतें, अगर पदार्थ सुखकारक (आयुष्य वाढविण्याचें साधन असणारे) आणि दु:खकारक (आयुष्याचा क्षय करणारे) आहेत ह्मणून आवड नावड उत्पन्न होते हा वादग्रस्त प्रश्न आहे. याचा वादविवाद तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत करूं. **चतरजींचे** ह्मणण्याप्रमाणें परमार्थस्वरूप समजलें ह्मणजे सर्व इच्छा नष्ट होतात व सर्व बाह्यसुखें कस्पटाप्रमाणें वाटूं लागतात, हें विचारी पुरुषांस मान्य होईल हें सांगावयास नकोच ! ॥ ५९ ॥

सम्यकदर्शनलक्षणप्रज्ञास्थैर्यं चिकीर्षिताऽऽदाविन्द्रियाणि स्ववशे स्थापयितव्यानि यस्मात्तदनवस्थापने दोषमाह—

**शिष्य**—गुरुजी ! मनुष्यानें आपलें मन मात्र स्वाधीन करून ठेविलें ह्मणजे झालें; मग इंद्रियांची इतकी प्रतिष्ठा आपण काय सांगावी ?--पेढीवरील मोहोर चांगली शाबूत आहे, असें पाहिल्यावर मग किल्लयावगैरेची चौकशी कशाला ?—

**गुरु**—देवप्रियच तूं ! तुला काय ह्मणावयाचें आहे ? वेड्या ! मन स्वाधीन ठेविलें आणि इंद्रियास वाटेल तसें बहकूं दिलें तर काय अनर्थ होतात ते पहा. तुझी युक्ति म्हणजे पुढच्या दरवाज्यावर चौकी पाहरा ठेवून मागचें दार मोकळें ठेवण्यासारखीच चतुराईची आहे ! असो, ऐकः—

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ॥**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

**कौन्तेय** ( कुन्तीपुत्रा अर्जुना !) **हि** ( प्रसिद्धच आहे कीं ) **यततः अपि विपश्चितः पुरुषस्य** ( मोठा प्रयत्न करणाऱ्या बुध्दिवंत पुरुषाचें सुद्धां ) **मनः** ( मन ) **प्रमाथीनि** ( अत्यंत बळकट व नाश करण्यास समर्थ अशीं ) **इंद्रियाणि** ( इंद्रियें ) **प्रसभं** ( बलात्कारानें ) **हरन्ति** ( हरण कारितात, खेंचून नेतात. ) सारांश मोठमोठ्या बुद्धिवान पुरुषांचें वश केलेलें मन सुध्दां इंद्रियांच्या प्रचंड सामर्थ्यानें विषयाभिमुख होतें ! म्हणून इंद्रियदमन करणें हें अत्यंत महत्वाचें आहे

**शिष्य**—गुरुजी ! विषयांचें दोषदर्शन झाल्यावर इंद्रियें आपसुखेंच त्या

त्या दुष्ट विषयांपासून माघारी परततात. मग प्रज्ञास्थैर्य मिळवूं पाहणाऱ्या साधकाला काय करावयाचें उरलें आहे इंद्रियांचें संबंधानें ?

गुरु—काय उरलें ? अरे तुला अद्यापि इंद्रियांचा सपाटा ठाऊक नाहीं वाटतें. हा त्याचा जोर त्याला काय करायला पाहिजे तें आतां पुढच्या दोन श्लोकांत सांगतात तें समजून घेः—

यतत इति । यततः प्रयत्नं कुर्वतोऽपि हि यस्मात्कौन्तेय पुरुषस्य विपश्चितो मेधाविनोऽपीति व्यवहितेन संबन्धः । इंद्रियाणि प्रमाथीनी प्रमथनशीलानि विषयाभिमुखं हि पुरुषं विक्षोभयन्त्याकुली कुर्वन्ति । आकुलीकृत्य च हरन्ति प्रसभं प्रसह्य प्रकाशमेव पश्यतो विवेकविज्ञानयुक्तं मनो यतस्तस्मात् ॥ ६० ॥

अर्जुना सर्व प्रकारचे बाह्य विषय दुष्ट आहेत असा नेहमीं अनुभव येणें याचें नांव प्रयत्न होय. अशा प्रकारें प्रयत्न करणाऱ्या विद्वान व बुद्धिवंत मनुष्याचें सुध्दां विवेकी व विज्ञानी मन हीं बलवान व नाशकारीं इंद्रियें खेंचून नेतात. आपलीं इंद्रियें अत्यंत सामर्थ्यवंत असून विवेकाचें उपमर्दन करणारीं आहेत. विवेकी पुरुषांपुढें विषयाला येऊं दे मात्र कीं त्यांनीं त्याच्या मनाला क्षुब्ध व आकुल केलेंच ह्मणून समजा. आत्मानात्मविवेकी मनुष्याचें मन व्याकूळ झालेलें पाहिलें कीं त्या विचारशील व अनुभवी मनाला देखत देखत हीं इंद्रियें विषयाकडे बलात्कारानें ओढून नेऊन बुडवितात ह्मणून इंद्रियांचें दमन फार महत्वाचें आहे,

**मधु०**—‘ क्षणमात्र मन निर्विषय केलें तरी, मनाचा स्वामी जो पुरुष त्याच्या समक्ष व विवेकरूपी रखवालदाराच्या देखत हीं जोरदार इंद्रियें विवेकी मनाला दिवसाढवळ्या नेतात ! मालकाच्या देखत रखवालदारास एकीकडे ढकलून देऊन डबोलेंच्या डबोलें उपटणाऱ्या दरवडेखोराचीच ही गत ! , **श्रीधर** साधकावस्थेंत इंद्रियांस फार जपलें पाहिजे. यततः = मोक्ष मिळविण्याची खटपट करीत असतां, प्रमाथिनी = प्रक्षोप करणारीं. ’ ‘ **शंकरानंदः**— रागद्वेषाची निवृत्ति, निष्प्रवृत्ति, ( कर्मसंन्यास ) विदेहमुक्ति आणि सम्यग्ज्ञानपूर्वक साक्षात्कार हीं सर्व मिळवायाला इंद्रियनिग्रह अत्यंत आवश्यक आहे यततः = समाधिविषयीं प्रयत्न करीत असतां. विपश्चितः=विषयाला अज्ञानी मनुष्य वश होतो हें ज्ञान ज्याला आहे तो. मनः = ब्रह्मविचार करण्याचें

साधन.' **द्विवेदी** ह्मणतात कीं, ' इंद्रियनिग्रह करून मनोजय केला ह्मणजे साक्षात्कार होतो व स्थैर्य येतें. असा ज्यानें इंद्रियनिग्रह केला तोच खरा स्थितप्रज्ञ होय.

**चतरजी**:----'या दृश्य विश्वांत काय दुःख भरलें आहे, उपाधिजन्य जीवाला कोण यातना भोगाव्या लागतात, निर्विकार सद्वस्तु कशी आहे हें ज्याला समजलें, आणि सर्व प्रकारचे विषयोपभोग नश्वर व दुःखदायक आहेत, सद्वस्तु मात्र शुध्द आनंदस्वरूपी व नित्य आहे म्हणून नश्वराची वासना नष्ट करावी असा ज्यांचा निश्चय झाला, तोच खरा विद्वान व खरा धार्मिक होय. बाकीचे धार्मिकंमन्य नुसते आडनांवाचे तरी आहेत कीं नाहीं ईश्वरास ठाऊक!'

**रामानुज**--' आत्मदर्शन झाल्याविना विषयासक्ति नष्ट होत नाहीं. या श्लोकांतही इंद्रियजयाची प्राप्ति आत्मदर्शन झाल्यावांचून होत नाहीं असें सांगितलें आहे. पुनः इंद्रियजय, मनोनिग्रह व वासनाक्षय सिद्ध झाल्यावांचून आत्मदर्शन होत नाहीं ! एवंच ज्ञाननिष्ठा सिध्द होणें अत्यंत कठिणच आहे!' या शंकेचें निवारण ५९ व्या श्लोकांत केलेंच आहे.

**मध्व**--' विपश्चित् = ज्याला श्रीविष्णूचा साक्षात्कार झाला नाहीं तो. हा शरीराभिमानी मनुष्य साधारणच यत्न करितो म्हणून त्याचीं इंद्रियें उच्छृंखळ असतात; ह्मणून शरीराभिमान सोडून विष्णुचरणीं लीन व्हावें ह्मणजे मात्र इंद्रियनिग्रह व मनोजय पूर्ण होऊन परमेश्वराचा साक्षात्कार होईल, इतर जे नुसते ज्ञानी आहेत व शरीराभिमानी आहेत, त्यांचीं इंद्रियें विषयाजवळ आलीं कीं तीं इंद्रियें मनास विषयाभिमुख करून विषयमग्न करितात. हाच अभिप्राय **सत्यानंद राघवेंद्रयति** व **विद्याधिराज** यांचा आहे.

**ज्ञानेश्वर**---या इंद्रियांची प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी ( भूत, विघ्नदेवता ) । भुलवी कां ॥ देखे विषय तैसे । पावती ऋद्धिसिध्दीचेनि मिषें । मग आकळती स्पर्शें । इंद्रियाचेनि ॥ तिये सांधि मन जावें । मग अभ्यासीं थोटावलें ( निर्बळ होऊन ) ठाये । ऐसें बळकटपण आहे । इंद्रियांचें ॥ **पंडितांचा** अभिप्राय आचार्यांप्रमाणेंच आहे. ॥ ६० ॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः॥**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥६१॥**

**तानि** ( तीं ) **सर्वाणि** (सर्व इंद्रियें) **सयम्य** (वश करून घेऊन) **युक्तः** ( ज्यानें आपलें मन विकल्परहित केलें आहे, ज्याचें मन परमार्थ सोडून इतरत्र जात नाहीं, सारांश विक्षेपरहित असा होत्साता ) **मत्परः** ( माझे ठिकाणीं ममत्वशून्य चित्त स्थापित केलें आहे असा ) **आसीत** (--होऊन बसावें ) **हि** ( कारण ) **यस्य** ( ज्याच्या ) **वशे** ( स्वाधनि ) **इंद्रियाणी** ( कर्मे व ज्ञानेंद्रियें ) --आहेत'--**तस्य** ( त्याची ) **प्रज्ञा** ( बुद्धि ) **प्रातिष्ठिता** ( स्थिर झाली असें समजावें. सारांश दोन्ही प्रकारचीं इंद्रियें ह्मणजे ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें स्वाधीन करून घेऊन व अनन्यभावानें माझे ठिकाणीं आपलें ममताशून्य चित्त समर्पण करून मुमुक्षूनें असावें. अर्जुना ! ज्याचें ताब्यांत वरील सर्व इंद्रियें आलीं त्याची बुद्धि स्थिर झाली, असेंच समजलें पाहिजे.--' स्थितप्रज्ञ बसतो कसा ह्या प्रश्नास प्रस्तुतच्या श्लोकांत उत्तर दिलें आहे.

तानीति । तानि सर्वाणी संयम्य संयमनं वशीकरणं कृत्वा युक्तः समाहितः सन्नासीत । मत्परोऽहं वासुदेवः सर्वप्रत्यगात्मा परो यस्य स मत्परो नान्योऽहं तस्मादित्यासीतेत्यर्थः । एवमासीनस्य यतेर्वशे हि यस्येन्द्रियाणि वर्तन्तेऽभ्यासबलात्तस्य प्रज्ञा प्रातिष्ठिता ॥ ६१ ॥

त्या सर्व ज्ञान आणि कर्म उत्पन्न करण्यास साधनीभूत होणाऱ्या इंद्रियांची विषयाकडे जाण्याची प्रवृत्ति बंद करून त्यांस आपल्या स्वाधीन करून घेऊन **मुमुक्षूनें** आपले अंतःकरण स्थिर करावें आणि सर्व विश्वाचा जो मी वासुदेव तोच परमात्मा सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, अशी भावना करून नंतर निर्विकल्प व्हावें आणि मी वासुदेवाहून भिन्न नाहीं ' असे चिंतन करीत बसावें. असा नित्य अभ्यास करणाऱ्या ( मीच परमात्मा आहें असे जें निरंतर चिंतन त्याला अभ्यास ह्मणावें, किंवा विषय दुष्ट आहेत असें नित्य समजणें व त्याप्रमाणें आचरण करणें यालाही अभ्यास ह्मणावें. )—असा दृढ अभ्यास करणाऱ्या ज्या संन्याशाच्या स्वाधीन मनासुद्धां सर्व इंद्रियें अभ्यासबलानें असतात, त्याची बुद्धि स्थिर झाली असें समज.

**मधुः**--मत्परः=माझा अनन्य भक्त.

‘ न वासुदेवभक्तानामशुभं विद्यते क्वचित् ’ ॥

( वासुदेवभक्तांचें अकल्याण कधींही व्हावयाचें नाहीं. ) राजसेवक पाहिल्यानंतर चोरांची वगैरे जशी तारंबळ होते व ते परत जातात, तसेंच वासुदेवभक्त दृष्टीस पडल्यावर इंद्रियें लज्जित होऊन परत फिरतात.

**शंकरानंदः**--युक्तः=चित्ताला ब्रह्माकार करून परब्रह्मच मी आहे अशी ज्याची बुद्धि झाली तोच ब्रह्मज्ञानी व तोच स्थितप्रज्ञ होय.

**प्रपाकारः**--

“ यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा सह । तस्येन्द्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ” ॥

( मनोनिग्रह करून जो विज्ञानवान झाला, त्याच्या मात्र स्वाधीन इंद्रियें राहतात. कशीं ? तर ज्याप्रमाणें चांगले घोडे सारथ्याच्या ताब्यांत असतात त्याप्रमाणें होय. ) मनाला व इंद्रियास अश्वाची शरीरास रथाची व आत्म्यास सारथ्याची उपमा प्लेटोनामक ग्रीसदेशस्थ महातत्ववेत्यानें दिली आहे ती व ही उपमा पाहून तद्भक्तांस वरील कल्पनासादृश्याचें किती बरें कौतुक वाटेल ?

**द्विवेदी**—मत्परः= ‘ परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेऊन, ’ [ पहा, भागवत स्कंध ३ अ० २७ ] दुष्टमार्गाला लागलेलें मनाला हळूहळू अनन्यभक्तिभावानें व विरक्तबुद्धीनें आपल्या ताब्यांत आणावें.

**पर्वतेः**--ईश्वरच आहे अत्यंतप्रिय ज्यास तो मत्पर असें म्हणतात.

**रामानुज**---इंद्रियनिग्रह झाल्याशियाय चित्तस्थैर्यता मिळत नाहीं. व चित्तास्थिर झाल्याविना इंद्रियनिग्रह होत नाहीं, हा परस्पराश्रित दोष काढून टाकण्यासाठीं दयाळु परमेश्वरानें ह्या श्लोकांत युक्ति सांगितली आहे ती अशी कीं, प्रथमतः विषयलोलुप असणाऱ्या अनावर इंद्रियांस बद्ध करून आपलें मन ईश्वरविषयकच करावें. असें केल्यानें कल्याण होईल ह्मणजे मन सद्विषयांचें ध्यान करूं लागेल, ह्याप्रमाणें मन शुद्ध व सात्विक झालें ह्मणजे ईश्वरप्रसादानें त्याला इंद्रियांचा पूर्ण निग्रह करितां येईल. इंद्रियनिग्रह झाला ह्मणजे आत्मदर्शनाला काय उशीर ?

“ यथाऽग्निरुद्धताशिखः कक्षं दहति सानिलः ।
तथा चित्तस्थितो विष्णुर्योगिनां सर्वकिल्बिषम् ”

(वायूचें साहाय्य असलें ह्मणजे ज्वालायुक्त अग्नि तृणाचें जसें क्षणमात्रांत दहन करितो, त्याप्रमाणें ज्यांच्या चित्तामध्यें श्रीविष्णुमूर्ति असेल त्या योग्यांचें सर्व पातक एका क्षणांत भस्म होऊन जातें) **मध्व, सत्यानंद, राघवेंद्रयति विद्याधिराज** यांचा हाच अभिप्राय असून **हरियोग** असल्याविना नुसत्या अल्पहार व एकांत या सामान्य गोष्टींनीं इंद्रियांचा निग्रह होणें शक्यच नाहीं असें ते ह्मणतात. निराहारानें इंद्रियजय साध्य नाहीं, कारण निराहारी मनुष्य जगत नाहीं; ब्रह्मज्ञानानेंही साध्य नाहीं; कारण इंद्रियजय असल्यावांचून ब्रह्मज्ञान नाहीं! **आचार्यांचें** यावर काय ह्मणणें आहे व कर्मयोगाचा **मूळ** उद्देश काय आहे हें मागें सांगितलेंच आहे. पुढेंही तिसऱ्या अध्यायांत याचा विचार व्हावयाचा आहे.

**चतरजी०**—आपण इंद्रियांच्या स्वाधीन न राहतां त्यांस आपलेंसें करणें म्हणजे खरें संमयन होय. नुसते इंद्रियव्यापार बंद केल्यानें त्यांचा निग्रह होत नाहीं. आपण सांगू तसें त्यांनीं वागणें हा खरा इंद्रियनिग्रह. या संबंधानें **कोरिंथिअन्स** नामक अध्याय वाचण्यायारखा आहे असें म्हणतात, **बायबल** नामक ख्रिस्तीलोकांच्या पवित्र पुस्तकांत हा अध्याय आहे.

**ज्ञानेश्वर**—तोचि तूं जाण। योग निष्ठेसी कारण। जयाचें विषय सुखें अंतःकरण। झकवेना ( फसाविलें जात नाहीं, ज्याचें मनाला विषयसुख फसवूं शकत नाहीं ) ॥ जो आत्मबोध युक्त। होऊन असे सतत। जो मातें हृदया आंत। विसंबेना ॥ येऱ्हवी बाह्य विषय तरी नाहीं। परि मानसीं होईल जरी कांहीं। तरी साद्यंतची पाही। संसार असे ( मनांत विषय आला कीं संसार लागलाच पाठीमागें )! ॥ जैसा कां विषयाचा लेश। घेतलिया होत बहुवस। मग निभ्रांत करी नाश। जीवितासी ॥ तैसी विषयाची शंका। मनीं वसती देखा। घात करी आशेखा। विवेक जाता ॥

**पंडितांची** मत्परा' ची व्याख्याः—अगा! तीं इंद्रियें आवरुनि। स्वस्वरूपीं चित्त योजुनि। असतो मत्पर होऊनि। सगुण भजनीं सादर ॥ कीं इंद्रियांतें नेमुनि ( इंद्रियनिग्रह करून ) ॥ आणि स्वस्वरूपीं चित्त योजुनि। असतां तिहीं ( इंद्रियांनीं ) मन हरुनि। न्यावेंचि, परी असे मत्पर ॥ मन ज्याचें मत्पर। तेथें मी सर्वेश्वर। प्रकटता सगुण सुंदर। न हरती इंद्रिय मनातें ॥ मीचि आत्मा हा निश्चय। परंतु निर्गुण निर्विषय। मन उदक नीचि भूमी

विषय ! । तें धांवें तिकडेची ॥ इंद्रियांच्या वृत्ति । त्या मनाच्याच शक्ती । विषय कांहीं कल्पिती । तेधवा लागे तिकडेची ॥ विवेकें विषय सोडी । तथापि निर्गुणीं न घे गोडी । म्हणूनि इंद्रियग्राम जोडी । मागुती गोडी विषयांची ॥ मी निर्गुणचि अर्जुना । आकार कल्पुनि दावी जना । परी तो आकार, निरंजना । आत्मयासीं भेट करी ॥ ज्ञान झालीया हें, सगुण । स्मरतां, स्फुरेंचि निखिल निर्गुण । सुवर्णमूर्तींत सुवर्ण । झांकेल काय? ॥ सर्वांस सरसकट अद्वैताचा बोध करूं पाहणाऱ्या गुरूंनीं या वामनोक्तीचा विचार करावा व सर्व अज्ञानी मुमुक्षूंनीं आपल्या मनाला उदक करून व विषयास नीच भूमि करून पंडितांनीं मनाची सहज प्रवृत्ति कशी सांगितली आहे याचा रसज्ञानपूर्वक अनुभव घ्यावा ॥ ६१ ॥

अथेदानीं पराभविष्यतः सर्वानर्थमूलमिदमुच्यते—

ज्याला विवेक नाहीं, विज्ञान नाहीं अशा अज्ञानी मनुष्यावर सर्व अनर्थांचा डोंगर—इंद्रियनिग्रह न केल्यानें—कसा येतो तो दोन श्लोकांत सांगतों.—

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ॥**
**सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२॥**

**विषयान्** ( रूप, रस, शब्द वगैरेचें ) **ध्यायतः** ( ध्यान करणाऱ्या, मनानें चिंतन करणाऱ्या ) **पुंसः** ( पुरुषाची ) **तेषु** ( त्या विषयामध्यें ) **सङ्गः** ( प्रीति आसक्ति ) **उपजायते** ( उत्पन्न होते ) **सङ्गात्** ( या प्रीतीपासून ) **कामः** ( इच्छा, तृष्णा ) **संजायते** ( उत्पन्न होते )—आणि **कामात्** ( तृष्णेपासून ) **क्रोधः** (संताप) **अभिजायते** ( उत्पन्न होतो, जन्म घेतो. )—सारांश विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषांच्या मनांत त्या विषयाविषयीं प्रीति उत्पन्न होते, प्रीतिमुळें तो विषय हवा अशी इच्छा होते आणि ती इच्छा फलद्रूप झाली नाहीं तर संताप उत्पन्न होतो.

ध्यायत इति । ध्यायतश्चिन्तयतो विषयाञ्शब्दादिविषयविशेषानालोचयतः पुंसः पुरुषस्य सङ्ग आसक्तिः प्रीतिस्तेषु विषयेषूपजायते । सङ्गात्प्रीतेः संजायते समुत्पद्यते कामस्तृष्णा । कामात्कुतश्चित्प्रतिहतात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥

शब्द, रूप, रसादि विषय प्रत्यक्ष नसले तरी मनानें त्यांचें चिंतन करणाऱ्या विषयी पुरुषांची प्रीति त्या त्या विषयावर बसते. प्रीति बसली ह्मणजे अर्थातच तो आल्हाद देणारा पदार्थ आपल्यास असावा अशी जोराची इच्छा प्रकट होते;—हाच काम होय.—आणि ही इच्छा कांहीं कारणानें फलवती झाली नाहीं, फसली, म्हणजे संताप उत्पन्न होतो.—शांतिपर्वाच्या प्रारंभीं विषयी पुरुषांचें अत्यंत सुरस वर्णन आहे, तें तज्ज्ञांनीं वाचावें.

अद्वैत व द्वैत टीकाकारांत ऐकमत्य आहे. प्राक्तन संस्कारामुळें व चिंतनामुळें विषयासक्ति उत्पन्न होते असें **शंकरनंद** ह्मणतात. विषय मिळविण्याच्या खटपटीस 'काम' असें **प्रपाकार** ह्मणतात. मनाला स्वातंत्र्य दिल्याचे हे दोष आहेत असे **श्रीधर** व **पर्वते** ह्मणतात. **द्विवेदी** भागवतांतील श्लोक देतात त्याचा अर्थ हा आहेः—'विषय नसले तरी विषयचिंतकाचा संसार सुटत नाहीं!' **रामानु०**—ईश्वरचरणीं चित्त लीन न झालेल्या पुरुषांच्या अनादिपापवासनेनें विषयप्रीति उत्पन्न होते. इच्छा अनावर झाली व ती सफल होण्याचा रंग नसला ह्मणजे जवळ असणाऱ्या पुरुषावर संताप होतो. **मध्वः**—कामाचे दोष सांगण्यासाठीं ह्या श्लोकाची योजना आहे. ज्ञानी पुरुषानें निष्काम असावें. **सत्यानं०**—विषय चांगले आहेत या बुद्धीनें विषयी पुरुष विषयचिंतन करितो! मूर्खच बेटा!! ॥ ६२ ॥

**क्रोधाद्भवति संमोह संमोहात्स्मृतिविभ्रमः।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ६३॥**

**क्रोधात्** ( संतापापासून ) **संमोहः** ( अविवेक ) **भवति** ( उत्पन्न होतो. ) **संमोहात्** ( अविवेक उत्पन्न झाल्यानें ) **स्मृतिविभ्रमः** ( स्मरण शक्तीचा घोंटाळा—होतो— ). **स्मृतिभ्रंशात्** ( स्मरण शक्ति, नष्ट झाली ह्मणजे ) **बुद्धिनाशः** ( मनाचा, बुद्धीचा नाश होतो ):-आणि **बुद्धिनाशात् प्रणश्यति** ( मन नष्ट झाल्याच्या योगानें, बुद्धिभ्रंशामुळें जीवाचा सर्वथैव नाश होतो. ) सारांश क्रोधापासून अविवेक, अविवेकानें स्मरण नाहींसें होणें, स्मरणशून्यतेनें विवेक बुद्धीचा क्षय आणि या क्षयानें जीवाची सर्वथैव हानि अशी परंपरा आहे. क्रोधापासून इतका अनर्थ होतो. Anger is second modness ( संताप हा वेडेपणाचा धाकटा भाऊ ) असें इंग्रजींत ह्मणतात तें

खोटें नाहीं. हा संताप इच्छेपासून होतो. तेव्हां जीवाचा नाश करण्याला इच्छा कशी कारण होते हें या दोन श्लोकावरून स्पष्ट दिसणार आहे. ' जाऊं नकारे विषयाटवीची....' ही जोशीबोवांची लावणी अवश्य वाचावी.

क्रोधाद्भवति संमोहोऽविवेकः कार्याकार्यविषयः। क्रुद्धो हि समूढः सन्गुरुमप्याक्रोशति । संमोहात्स्मृतिविभ्रमः शास्त्राचार्योपदेशाहितसंस्कारजनितायाः स्मृतेः स्याद्विभ्रमो भ्रंशः स्मृत्युत्पत्तिनिमित्तप्राप्तावनुत्पत्तिः । ततः स्मृतिभ्रंशाद्बुद्धेर्नाशः कार्याकार्यविषयविवेकायोग्यताऽन्तःकरणस्य बुद्धेर्नाश उच्यते । बुद्धिनाशात्प्रणश्यति । तावदेव हि पुरुषो यावदन्तःकरणं तदीयं कार्याकार्यविषयाविवेकयोग्यं तदयोग्यत्वे नष्ट एव पुरुषो भवत्यतस्तस्यान्तःकरणस्य बुद्धेर्नाशात्प्रणश्यति पुरुषार्थायोग्योभवतीत्यर्थः ॥ ६३ ॥

इच्छा विफल झाली ह्मणजे संताप उत्पन्न होतो संतापयुक्त मनुष्याला कर्तव्य काय, अकर्तव्य कोणतें याविषयीं अज्ञान उत्पन्न होतें. तो इतका अविचारी होतो कीं आपलें कल्याण करणारीं वडील माणसें व आपले गुरु यांच्या सुद्धां सर्वांचा अपमान करण्यास मागें पुढें पाहत नाहीं! या अविचाराच्या योगानें स्मरणशक्ति नष्ट होते. अर्जुना! वेदांतशास्त्रें व योग्य गुरु यांच्या उपदेशरूपी अनुग्रहानें ' मी कोण? व आलों कोठून, माझें कर्तव्य काय? ' वगैरेविषयीं चर्चा झाल्यानंतर जें आत्मस्वरूपाचें भान जागृत झालेलें असतें, स्वस्वरूपाचें स्मरण झालेलें असतें, त्या स्मरणापासून सुद्धां हा अविचारी मनुष्य भ्रष्ट होतो!

**अर्जुन**—भगवंता! स्मरण हेंच मुळीं क्षणजीवि असतें. स्मरण होतें आणि लागलींच तें नाहींसें होतें. स्मरण हा नुसता विकार आहे व तो क्षणभंगुर असतो, असें मीं ऐकिलें आहे. आणि आपण तर अविवेकानें स्मरणनाश होतो असें ह्मणतां हें काय?

**श्रीकृष्ण**—अर्जुना! तूं समजला नाहींस. विषयाचें स्मरण क्षणभंगुर असतें हें ठीक आहे. पण ज्ञानी पुरुषाला स्वस्वरूपाचें स्मरण नित्य आणि अविनाशी असतें; कारण स्मरण उत्पन्न होण्याचें कारण जो आत्मा तो नित्य आणि अविनाशी असून ज्ञानी पुरुष आत्मचिंतनांत निमग्न असल्यामुळें, त्यास

विस्मरण होत नाहीं. ह्मणजे आत्मा त्याजजवळ असल्यामुळें, अथवा तोच आत्मा असल्यामुळें आत्मस्वरूपाचें विस्मरण होणें शक्यच नसतें. पण अविवेकी पुरुषाचें तसें नाहीं. त्याच्या सन्निध नेहमीं आत्मा असतांही अथवा तोच आत्मा असूनही त्याला आत्म्याचा विसर पडतो! स्मरणाचें कारण हजर असूनही कार्य ह्मणजे स्मरण न होणें यालाच विसरभोळेपणा म्हणतात. हा विसराळूपणा अविवेकानें विषयचिंतनानें, उत्पन्न होतो हें कसें तें आतांच सांगितलें. झालें, स्मरण नष्ट झालें ह्मणजे बुद्धिनाश होतो; कर्तव्य काय अकर्तव्य काय, हें तारतम्यानें समजून घेण्याचें अंतःकरणाचें सामर्थ्य नाहींसें झालें ह्मणजे व्यवहारांत सुद्धां तो मनुष्य बुद्धिभ्रष्ट झाला असें आपण समजतों. वेदांत शास्त्रांतही असाच अनुभव आहे. स्वस्वरूपचिंतन करावयाचें कर्तव्य सोडून देऊन विषयाविषयीं चिंतन, जड भक्ति, संताप वगैरे अकर्तव्याच्या गोष्टी उत्पन्न करून घेऊं लागला ह्मणजे तो बुद्धिभ्रष्टच झाला नव्हे काय? असो, विवेकभ्रष्ट झालेला पुरुष मेला, नष्ट झाला असेंच म्हटलें पाहिजे.

**अर्जुन**—भगवंता! पुरुष नित्य आहेना? तो मरेल कसा?

**श्रीकृष्ण**—अरे! मेला ह्मणजे मेल्यासारखा झाला. पुरुषाचें अंतःकरण जोंपर्यंत चांगलें कोणतें, वाईट कोणतें हें तारतम्य जाणण्यास समर्थ असतें तोंपर्यंतच त्याला पुरुष अथवा जिवंत पुरुष म्हणतातना? हें सामर्थ्य नष्ट झालें ह्मणजे तो पुरुष मेल्यासारखाच नाहीं कां झाला? सारांश आत्मस्वरूप ओळखण्याचा जो मोक्षनामक परमपुरुषार्थ त्याला तो अयोग्य झाला—अंतरला—ह्मणून मेला असें म्हटलें.

**मधु**—बुद्धि=मी व ब्रह्म एकच अशी मनोवृत्ति. एका विषयध्यानानें हा अनर्थ गुजरतो ह्मणून मनोनिग्रह अवश्य आहे. **शंकराः**—प्रणश्यति=पुनः पुनः संसारांत पडतो; अमृत ह्मणून विषाचें प्राशन करितो!

**प्रपाकारः**—

'लोक एष विषयानुरञ्जनं दुःखगर्भमपि मन्यते सुखम् ॥
आमिषं बडिशगर्भमप्यहो मोहतो ग्रसति यद्वदण्डजः' ॥

(दुःख ज्यांच्या अंतीं असतें अशा विषयांच्या चिंतनालाच सुख ह्मणून लोक भजतात! काय वेडेपणा हा? आंतमध्यें गळ आहे असल्या आमिषाला मूर्खत्वजन्य मोहानें गिळल्यामुळें बद्ध झालेल्या पक्ष्याप्रमाणेंच हे लोक मूर्ख

होत!) **द्विवेदी**:–स्मृतिभ्रंशः=' आपण कोण, आपली योग्यता काय, जाती कोण, ज्ञान काय वगैरेविषयीं विस्मरण,' बाकी सर्वत्र अद्वैतवाद्यांत एक-वाक्यता आहे.

**रामानु०**—संमोहः=कृत्य, अकृत्य वगैरेविषयीं अविवेक. इंद्रियनिग्रहास आरंभ केला असतो तेथेंच विस्मरण ह्मणजे स्मृतिभ्रंश. बुद्धिनाशः=आत्मज्ञानासाठीं जो उद्योग केला त्याचा नाश. बाकी अर्थ आचार्यांसारखाच.

**मध्वः**—संमोहः=अकार्याविषयीं इच्छा अधर्माची इच्छा अगर अधर्माचे ठायीं धर्मबुद्धि. **सत्यानंद** हे ह्या अर्थाच्या समर्थनार्थ

' अधर्मलक्षणं चैव नियतं पापकर्मसु।'

उपगीता.

हें वाक्य देतात. अर्थ स्पष्टच आहे. निषिद्धाचें विस्मरण किंवा भलतेंच स्मरण तो स्मृतिविभ्रम. बुद्धिनाशः=पूर्वीं झालेल्या ज्ञानाचा नाश, तारतम्य-शक्तीचा नाश. प्रणश्यतिः=नरकास जातो. सारांश क्रोध उत्पन्न झाला ह्मणजे अधर्मबुद्धि होते. त्यामुळें विधिनिषेधांचें विस्मरण होतें, या विस्मरणानें पूर्वी झालेलें ज्ञान व तारतम्यशक्ति नष्ट होतात आणि धर्मबुद्धि सर्वथा नष्ट झाल्या-मुळें प्राणी नरकास जातो, असा कर्मपर अर्थ द्वैताचार्यांनीं व त्यांच्या शिष्यांनीं केला आहे.

' अधर्मकामिनः शास्त्रे विस्मृतिर्जायते यदा।
दोषदृष्टेस्तत्कृतेश्च नरकं प्रतिपद्यते' ॥

( अधर्मानें वागण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाला शास्त्रविस्मृति होऊन व दुष्ट गोष्टीच दिसून त्या करण्याविषयीं तत्परता उत्पन्न होते, तेव्हां तो मनुष्य नरकाला जातो. )–सारांश विषयचिंतनानें नरकप्राप्ति होते!

**वल्लभ**—स्मृति=भगवंताचें स्मरण.

**चतरजी**—सद्वस्तु समजली तरी तिचें विस्मरण या दुष्ट क्रोधानें होतें! पुढें तारत्म्याचा नाश, नंतर मिथ्यानिश्चय आणि शेवटीं विवेकशून्यता ही परंपरेनें येतात. विवेकच नष्ट झाल्यावर मनुष्याचें आणखी तें काय नाहींसें व्हायचें राहिलें! विवेकभाव आणि विषयलंपटता या दोन शक्तीमुळें अमर जीव नष्टप्राय होऊन प्रकृतीमध्यें, जडमूलप्रकृतीमध्यें लीन होते; अथवा चैतन्यास अचेतनत्व प्राप्त होतें; मनुष्य दगड होतो! मोक्ष मिळाला ह्मणजे सर्वच

मिळतें व आशा नष्ट होते. पुरुषाला जडत्व आल्यावर ही आशा नष्ट होते. पण मुक्तस्थितींतील समाधानानें आशानाश आणि जडास्थितींतील अज्ञानानें उत्पन्न झालेली निराशा यांमध्यें केव्हढें अंतर आहे बरें ? प्रत्यक्ष लक्ष्मीला पायानें लाथडून देणारा बुद्ध आणि स्वप्नांतही कपर्दिकेचें दर्शन न झाल्यामुळें नुसतेच पाय झाडणारा भिकारी यांचाही दृष्टांत प्रस्तुत प्रकरणीं तोकडाच होतो !

**ज्ञानेश्वर** मोहाविषयीं ह्मणतातः—संमोहा जालीया व्यक्ती । तरी नाश पावे स्मृती । चंडवातें (मोठया वाऱ्यानें) ज्योति । हत (विझते) जैसी ॥ कां अस्तमानीं निशी । जैसी सूर्य तेजाते ग्रासी । तैसी दशा स्मृतिभ्रंशी । प्राणीयासी ॥ मग ज्ञानांध केवळ । तेणें आप्लवीजे (बुडविले) सकळ । जेथ बुद्धि होय व्याकुळ । हृदयामाजीं ॥ जैसे जात्यंधा (जन्मांधा) पळणी (धांवाधांव) पावे (प्राप्त होते) । मग तें काकुळती सैरा धांवे । तैसी बुद्धीस होती भवें (जन्ममरणें) । धनुर्धरा ! ॥....सारांश....जैसा विस्फुलिंग (ठिणगी) लागे इंधना । मग तो प्रौढ झालिया त्रिभुवना । पुरो शके ॥ तैसें विषयाचें ध्यान । जरी विपायें (कदाचित्) पावें मन । तरी एसणें (एवढें) हें पतन ॥ गिवसीत पावें (शोधित येतें) ॥ ६२।६३ ॥

**पंडित** ह्मणतातः—विषयचिंतन करणारा........तो भरला विषयवासना रानीं । फाडूनि खादला लांडग्यांनीं । एवंच झाला देहाभिमानी ! यथा पूर्व ॥६३॥

सर्वानर्थस्य मूलमुक्तं विषयाभिध्यानमथेदानीं मोक्षकारणमिदमुच्यते—

**शिष्यः**—महाराज ! विषयाच्या ध्यानानें जर इतका अनर्थपात होतो, तर विषयांचा भोग घेऊन जिवंत राहणारे, किंवा जिवंत राहण्यासाठीं भोग घेणारे यांचा तर सर्वथा नाश व्हावा, नाहीं काय ?

**गुरुः**--सांगतों; ऐक. आतांपर्यंत सर्व अनर्थाचें मूळ जें विषयचिंतन त्याचा परिणाम व परिहार सांगितला. यानंतर विषय भोगूनही संसारांत न पडण्याचा अगर मोक्षाचा उपाय सांगतों, ऐकः

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ॥**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥**

**रागद्वेषवियुक्तैः** ( लोभ अगर द्वेष यांनीं वर्जित राग लोभशून्य अशीं ) **आत्मवश्यैः** ( आत्म्याच्या सर्वथा स्वाधीन आहेत अशीं ) **इन्द्रियैः** ( कर्म आणि ज्ञान इंद्रियें, त्यांच्या साहाय्यानें ) **विषयान् चरन्** ( रंग, रूप, राग, लोभ वगैरेचा उपभोग घेणारा ) **विधेयात्मा** ( वश करून घेतलें आहे अंतः-करण ज्यानें असा पुरुष ) **प्रसादं** ( शांति स्वस्थता ) **अधिगच्छति** ( मिळवितो. )—सारांश, विषयाविषयीं आदरबुद्धि नष्ट झाल्यामुळें इंद्रियें व मन ज्याच्या ताब्यांत आलीं आहेत त्याला शांति अगर चित्ताची स्वस्थता मिळते. त्यानें विषयोपभोग घेतला तरी त्याचे चित्त भ्रष्ट होत नाहीं.

रागद्वेषेति । रागद्वेषवियुक्तै रागश्च द्वेषश्च रागद्वेषौ । तत्पुरःसरा हीन्द्रियाणां प्रवृत्तिः स्वाभाविकी तत्र यो मुमुक्षुर्भवति स ताभ्यां वियुक्तैः श्रोत्रादिभिरिन्द्रियैर्विषयानवर्जनीयांश्चरन्नुपलभमानं आत्म-वश्यैरात्मनो वश्यानि वशीभूतानी तैरात्मवश्यैर्विधेयात्मेच्छातो विधेय आत्मान्तःकरणं यस्य सो, यं प्रसादमधिगच्छति । प्रसादः प्रसन्नता स्वास्थ्यम् ॥ ६४ ॥

अर्जुना ! हें प्रसिद्धच आहे कीं इंद्रियांची स्वाभाविक प्रवृत्ति स्नेहपुरःसर किंवा द्वेषपुरःसर असते; ह्मणजे सामान्यतः अज्ञानी मनुष्याचीं कर्में, कांहीं तरी विष-यप्राप्ति व्हावी ह्मणून किंवा कांहीं अनर्थाचें निवारण व्हावें ह्मणून,--कर्में होत असतात परंतु मुमुक्षू जो आहे तो आपल्या इंद्रियांस लोभ व क्रोध या दुष्ट-शत्रूपासून अलिप्त ठेवितो; आणि प्रारब्धानें प्राप्त झालेल्या व शरीराचें रक्षण करण्यासाठीं अवश्य असणाऱ्या खाणें, पिणें इत्यादि शुद्ध विष-यांचा मात्र उदासीनतेनें व इंद्रियांस मनद्वारा वश करून घेऊन, उपभोग घेत असतो. तसेंच त्याचे विकार व विचारात्मक अंतःकरण ही त्याच्या स्वाधीन पूर्णपणें असून तो सांगेल तसेंच वागत असतात. असो; असा जो मन आणि इंद्रियें यांस वश करणारा व त्यांस इतरत्र फिरकूं न देणारा मुमुक्षू त्यालाच चित्ताची शांति, अगर मनःप्रसाद मिळतो; त्याच्या चित्तशुद्धींत व्याघात होत नाहीं. अथवा त्याचें चित्त विषयशून्य असल्यामुळें निर्मळ असते.

इतर अद्वैत टीकाकारांचाही असाच अर्थ आहे. विषय असत्य, तुच्छ आणि बंधकारी आहेत ह्मणून त्याविषयीं राग, लोभ धरीत नाहीं असें **शंकारनंद** ह्मणतात.

**प्रपाकारः**—

अग्निसंगाद्यथा लोहमग्नित्वमुपगच्छति । आत्मसंगात्तथा गच्छत्या-त्मतामिन्द्रियादिकम् ' ॥

अग्नीच्या संगानें लोह अग्नीरूपी होतें, त्याचप्रमाणें आत्मसान्निध्यानें इंद्रियांदिकांसही आत्मता प्राप्त होऊन तीं निर्मळ होतात.

**रामा०**—ज्यानें ईश्वरचिंतनांत आपल्या मनास गोंवून तें निर्मळ केलें आहे, अशा पुरुषासंबंधानें हा श्लोक आहे. विषयांचा तिरस्कार करून निर्मळ अंतःकरणाचा तो पुरुष जीवमान असतो. **मध्वांचा** अर्थ आचार्यांहून भिन्न नाहीं. मात्र ते असा गूढार्थ काढितात कीं ह्या पुरुषाचीं बाह्येंद्रियें नसल्यासारखींच होतात. आणि ह्मणून यत्न केल्यावर सुद्धां या पुरुषाची विषयाकडे प्रवृत्ति होत नाहीं ! आपल्या सारख्या जीवांची प्रवृत्ति सामान्यतःच विषयाकडे असते, व विषयापासून मनादिकांस पराङ्मुख करण्यासाठीं आपल्यास प्रयत्न करावा लागतो. सिद्ध पुरुषाची स्वाभाविक प्रवृत्ति विषयपराङ्मुख असते ! हाच त्याच्यामध्यें व आपल्यामध्यें फरक होय !

**मध्व** ह्मणतात-:—इंद्रियनिग्रहाचें प्रत्यक्षफल म्हणजे प्रसाद होय. ज्ञान हें व्यवहित, दूरचें (Remote) फळ आहे. भगवंतास येथें साक्षात्फल ह्मणजे प्रसाद ह्याविषयीं बोलावयाचें आहे.

**ज्ञानेश्वरः**—जैसा सूर्य आकाशगत । रश्मिकरें ( किरणांनीं ) जगातें स्पर्शत । तरी संगदोषें ( संसर्गानें ) काय लिंपत ( लिप्त होतो काय ? ) । तेथिचेनी ॥ तैसा इंद्रियार्थी (इंद्रियें व विषय यांविषयीं) उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न ( परिपूर्ण ) । .... तरी विषयांतही, कांहीं । आपणपेवांचूनी (आपल्यावांचून ) नाहीं । मग विषय कवण कांहीं । बाधितील कवणा ? ॥ जरी उदकें उदकीं बुडिजे । कां अग्नि आगी पेळिजे । तरी विषयसंगें आप्लविजे ( बुडविजे ) परिपूर्ण तो ! ॥ दृष्टांत किती समर्पक आहेत ?

**पंडितः**—विषय लागला गोड । तरी तो न मानी कोड ( कौतुक ) कीं खाजवितां फोड । गोड वाटूनि दुःख दे ॥

प्रसादे सति किं स्यादित्युच्यते—

**शिष्य—**चित्तप्रसन्नता मिळाली तर काय होतें?

**गुरु**—ऐक काय होतें तें:—

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ॥**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

**प्रसादे** ( चित्ताला स्वस्थता प्राप्त झाल्यावर ) **अस्य** (ह्या--पुरुषाच्या--) **सर्वदुःखानां** ( सर्व व सर्व प्रकारच्या दुःखांची ) **हानिः उपजायते** (हानि उत्पन्न होते, सर्व दुःखांचा नाश होतो. )—आणि—**प्रसन्नचेतसः** ( शांत चित्त झालेल्या सिद्ध पुरुषाची ) **बुद्धिः** ( बुद्धि ) **आशु** (लवकरच) **पर्यवतिष्ठते** ( स्थैर्याला पावते )- सारांश चित्ताला शांति प्राप्त झाली ह्मणजे सर्व प्रकारच्या सर्व दुःखांचा नाश होतो आणि बुद्धि आपल्या स्वस्वरूपाचे ठायीं लवकरच जाऊन बसते, स्थिर होते.—

प्रसाद इति। **प्रसादे** सर्व दुःखानामाध्यात्मिकादीनां हानिर्विनाशोऽस्य यतेरुपजायते । किंच प्रसन्नचेतसः स्वस्थान्तःकरणस्य हि यस्मादाशु शीघ्रं बुद्धिः पर्यवतिष्ठत आकाशमिव परि समन्तादवतिष्ठत आत्मस्वरूपेणैव निश्चली भवतीत्यर्थः । एवं प्रसन्नचेतसोऽवस्थितबुद्धेः कृतकृत्यता यतस्तस्माद्रागद्वेषवियुक्तैरिन्द्रियैः शास्त्राविरुद्धेष्ववर्जनीयेषु युक्तः समाचरेदिति वाक्यार्थः

**अर्जुन**—भगवंता ! चित्त स्वस्थ झालें तरी संसारांत प्राप्त होणाऱ्या त्रिविधतापानें पुनः तळमळ उत्पन्न होणारचना ?

**श्रीकृष्ण**—नाहीं, अर्जुना ! तसें नाहीं. एकदां या यतीच्या चित्ताला स्वस्थता उत्पन्न होऊन त्याचें अंतःकरण प्रसन्न झालें म्हणजे शारीरिक, मानसिक, किंवा दैविक इत्यादि सर्व प्रकारच्या दुःखांचा अंतच होतो;—म्हणजे त्याला या दुःखांचें भानच होत नाहीं. इंद्रियें, अंतःकरण वगैरे सर्व ज्याच्या स्वाधीन झालीं त्याच्या, त्या आत्मज्ञ--व ब्रह्मचिंतन करण्याऱ्या--पुरुषाच्या चित्ताचा भंग करण्याचें सामर्थ्य कोणत्याही दुःखामध्यें असत नाहीं.

**अर्जुन**—बरें प्रसन्नता मिळाली; पुढें काय ? चित्तस्थैर्य कसें प्राप्त होणार ?

**श्रीकृष्ण**—काय सांगावें ? अर्जुना ! कोणत्याही बाह्यविषयाला वश न होणारे चित्ताला प्रसन्नता प्राप्त झाली, अंतःकरण स्वस्थ झालें, म्हणजे लवकरच

' मीच ब्रह्म आहे ' अशी वृत्ति होऊन 'कोठेंही माझ्या व्यतिरिक्त, ब्रह्म व्यतिरिक्त कांहीं नाहीं असा निश्चय होतो. आकाश जसें व्यापी आहे व म्हणून स्थिर आहे, तसेंच ब्रह्मवेत्याचें चित्तही निश्चल होतें. इतर सर्व बाह्यविषय नाहींसे होऊन ब्रह्मस्वरूपांत चित्तमग्न झालें अथवा आपलें चित्तच ब्रह्मस्वरूपी झालें म्हणजे स्थितप्रज्ञता मिळाली, मोक्ष मिळाला. सारांश याप्रमाणें प्रसन्न मनाच्या, स्वच्छ मनाच्या पुरुषाचें चित्त स्थिर होतें व तो कृतकृत्य होतो ह्मणून स्नेह किंवा द्वेष यांविरहित चित्त व इंद्रियें करून शास्त्रानें सांगितलेली नित्य व अवश्यक कर्में उदासीनतेनें करावीं हा या दोन श्लोकाचा अर्थ आहे.

**मधुः**—बुद्धिस्थैर्यानें अज्ञाननाश होतो व म्हणून दुःख देणाऱ्या संसाराचाही नाश होतो.

**शंकरानंदः**—त्रिविधताप, त्यांचीं कारणें व त्यांपासून उत्पन्न होणारा चित्ताविक्षेप हीं सर्वच चित्त प्रसन्न झालें ह्मणजे नष्ट होतात आणि अंतःकरण निर्विषय अथवा विषयशून्य होतें.

**प्रपाकारः**—

'विज्ञानामृतनिर्झरावनिरिव स्वानन्दपूर्णोदधेरूर्मिः शाश्वतसुप्रसा-
दसदनं भूतानुकम्पाप्रसूः ॥ निर्वातस्थितसुप्रदीपकलिका वैराग्यभा-
ग्यास्पदं दृश्यातीतपरावलम्बरसिका स्वान्तस्थितिस्तद्विदाम्—' ॥

विचारगोचर जें ब्रह्म त्यांतच रममाण झालेल्या ब्रह्मवेत्ते पुरुषांची अंतःकरणस्थिति कशी आहे? ती सांगतों ऐक. स्वस्वरूपी जो पूर्णानंद त्याची एक लाटच आहे, अथवा स्वानुभवरूपी अमृताचा एक झराच आहे किंवा प्रसन्नतेचें एक कायमचें वसतिगृहच आहे, अगर सर्वभूतीं दयेचें तें माहेरघरच आहे. फार काय सांगावें. ती निर्वात स्थळीं ठेविलेली एक शांत दीपज्योतीच होय; वैराग्याचें तें महाभाग्यस्थानच होय!

**द्विवेदीः**—मनोनिग्रह राखून निष्कामव्यवहार ज्ञान्यानें केला तर तो बाधक होत नाहीं.

**रामानुजां**चा अर्थ आचार्यासारखाच आहे. मात्र बुद्धि स्थिर होते ती परमेश्वराच्या ठिकाणीं होते आणि म्हणून दुःखनाश होतो असें जास्त म्हणतात.

**मध्वाचार्यांचा** अभिप्रायही आचार्यासारखा आहे. **सत्यानंदः**—मनःप्रसादानें दुःखहानी साक्षात् होत नाहीं, तर ज्ञान झाल्यावर होते. '**तरति शोक-**

मात्मवित्' ( आत्मवेत्ता शोकसमुद्राला तरून जातो. छांदोग्य ७।१।३. मन प्रसन्न झालें ह्मणजे ईशचरणीं निष्ठा उत्पन्न होऊन परमेश्वराचें दर्शन होतें; मग अपरोक्ष ( प्रत्यक्ष ) ज्ञान होतें, व ज्ञानाची पूर्वीच्या सुकृताची व दुष्कृताची हानि होते.

**चतरजींचा** कांहीं अर्थ वर भाष्यांतच आला आहे. ज्ञानी पुरुषाविषयीं बायबलांतील एका वाक्याचा अर्थ हा आहेः तो ईश्वरासारखाच असल्यामुळें ईश्वराच्या बरोबरीचा होतो.' [ **फिलिपियन्स** अ० ३ ]

**ज्ञानेश्वर**—जैसा अमृताचा निर्झर ( झरा ) । प्रसवे जयाचा जठर । तया क्षुधेतृषेचा अडदर ( भय ) । कांहींच नाहीं ॥ तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें ( कोठें ) आहे? ।....जैसा निर्वातिचा ( निवाऱ्यांतला ) दीप । सर्वथा नेणें कंप । तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूप । योगयुक्त ॥

बुद्धि स्थिर झाल्यावर जीवाचें भान राहत नाहीं हें दाखविण्यास **पंडितांचे** दृष्टांत पहाः—समुद्राचे तीरीं । दरडीच्या रूपें भूमीवरी । दरडीचें प्रतिबिंब नीरीं ( पाण्यांत ) तें न दिसे । जल स्पर्शतां दरडीतें॥.... दीप पहात होती। ते दृष्टि देखे सूर्याप्रति । सूर्य प्रभेनेंच जगतीं । पाहों लागे ॥ सूर्य प्रकाशें सृष्टि । देखतां दीप नाठवे दृष्टि । सर्वगतीं ( परब्रह्मांशीं ) चित्ताची मिठी । पडतां नाठवे प्रतिबिंब ॥ पांडितांनीं अव्यक्ताच्या ( निर्गुणाच्या ) उपासकांवर कडाका उडविला आहे, तो पाहण्यासारखा आहे. ॥ ६५ ॥

सेयं प्रसन्नता स्तूयते—

या चित्तप्रसादाची—अन्यप्रकारानें—स्तुति कारितातः—

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ॥**
**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥६६॥**

**अयुक्तस्य** ( चित्तस्थैर्य नाहीं, मनोनिग्रह नाहीं, त्याला ) **बुद्धिः** ( आत्मज्ञान ) **न अस्ति** ( असत नाहीं ); **अयुक्तस्य** ( आणि मनोनिग्रहशून्याला ) **भावना** ( आत्म्याचें ध्यान ) **न** (—करितां येत—नाहीं ( च आणि ) **अभावयतः** ( ध्यानशून्य पुरुषाला ) **न शान्तिः** ( चित्त स्वस्थता मिळत नाहीं );—आणि **अशान्तस्य कुतः सुखम्** ( चित्त स्वस्थ झालें नाहीं त्याला सुख कोठलें? )—सारांश हा वेळपर्यंत सांगितल्याप्रमाणें, योगाचा अभ्यास न कर-

णाऱ्या पुरुषाला आत्मज्ञान नसतें व आत्मध्यानही करितां येत नाहीं. अर्थातच आत्मज्ञान न करणाऱ्या पुरुषाला शांति काय असते हें ठाऊक नसतें आणि ज्याच्या चित्ताला शांति मिळाली नाहीं, तळमळ नाहींशी झाली नाहीं, त्याला सुखाची वार्ता तरी कोठून प्राप्त होणार ?

नास्तीति । नास्ति न विद्यते न भवतीत्यर्थः । बुद्धिरात्मस्वरूपविषयाऽयुक्तस्यासमाहितान्तःकरणस्य न चास्त्ययुक्तस्य भावनाऽऽत्मज्ञानाभिनिवेशः । तथा न चास्त्यभावयत आत्मज्ञानाभिनिवेशमकुर्वतः शान्तिरुपशमः अशान्तस्य कुतः सुखम्, इन्द्रियाणां हि विषयसेवा तृष्णातो निवृत्तिर्या तत्सुखं, न विषयविषया तृष्णा, दुःखमेव हि सा, न तृष्णायां सत्यां सुखस्य गन्धमात्रमप्युपपद्यत इत्यर्थः ॥ ६६ ॥

ज्याचें अंतःकरण हा वेळपर्यंत कथन केलेल्या योगाभ्यासानें स्थिर झालें नाहीं, ज्यानें मनोनिग्रह केला नाहीं, त्याचे बुद्धीला आत्मस्वरूपाच्या विषयाचें आकलनच व्हावयाचें नाहीं. निःसंग, निरंजन आत्माचा अनुभव, हाच विषय आहे जिच्या ज्ञानाचा अशी बुद्धि, त्याला कधींही होणार नाहीं; व त्याचमुळें त्याच्या बुद्धीला आत्मस्वरूपाचें ध्यानही कधीं करितां येणार नाहीं. सारांश बुद्धि स्थिर नसणाऱ्या पुरुषानें वेदांतश्रवण केलें तथापि मनन आणि निदिध्यास हे त्याला साध्य होणार नाहींत. झालें, ज्याला ब्रम्हज्ञान, ब्रह्मज्ञान साध्य झालें नाहीं त्याला शांति मिळत नाहीं हें उघडच आहे. आणि ज्याला शांति नाहीं, ज्याची तळमळ गेली नाहीं त्या पुरुषाला सुखाचें नुसतें स्वप्न पडण्याची सुद्धां मारामार होते ! ह्मणजे तात्पर्य हें कीं विषयांचा उपभोग घेण्यापासून इंद्रियें परावृत्त झालीं तरच सुख आहे. विषयांच्या भोगाचा अभिलाश धरून सुख झालें आहे असें होणेंच नाहीं. विषयतृष्णेपासून दुःखच व्हावयाचें. सारांश मला अमुक हवें अशी तृष्णा जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत शुद्ध सुखाचा वास सुद्धां मिळावयाचा नाहीं, मग सुखदर्शनाची अगर सुखस्पर्शाची वार्ता तरी कशाला पाहिजे ?

**मधु०**—शांति=अविद्या व तिचें कार्य जो ससार त्या उभयतांची निवृत्ति ज्या अवस्थेंत होते ती अवस्था. सुख=मोक्षसुख. बाकी एकवाक्यताच आहे. **शंकरानंद** आचार्यांप्रमाणेंच ह्मणतात कीं रागद्वेषांचा निःशेष त्याग केला ह्मणजे इंद्रियनिग्रह होतो, व त्यानें समाधि सिद्ध होते, समाधीनें सम्यग्ज्ञान

( वस्तूचें यथार्थ ज्ञान ) आणि ज्ञानानें मुक्ति मिळते. हें ६० तें ६५ श्लोकांचें सार आहे. विषयध्यानापासून काय अनर्थ होतात, तेंही यांतच सांगितलें आहेत. समाधीचें महात्म्य या स्वामींनीं उत्कृष्ठ वर्णिलें आहे. विषयास अगर देहास किंवा इंद्रियांसच आत्मा मारणारा व द्वैत पाहणारा पुरुष शांतिशून्य असतो असें हे स्वामी ह्मणतात. **श्रीधर** व **प्रपाकार** वरील अर्थाचेंच अनुसरण करितात. मनोनिग्रह हाच योग असें **द्विवेदी** ह्मणतात. नुसतें देहदमन अथवा हठयोग विशेष उपयोगी नाहीं असें यांचें मत आहे. ब्रह्मस्वरूपाच्या प्रमणांविषयीं येणाऱ्या शंकांचें निरसन न झाल्यामुळें अयुक्ताला बुद्धि होत नाहीं असें **पर्वते** म्हणतात.

**रामानु**०—ब्रह्मचिंतनाच्या ऐवजी परमेश्वराचें चिंतन योजून पुढें श्लोकार्थ आचार्यासारखाच करितात. **मध्व** व **तदनुयायांची** भिस्त मनःप्रसादावर आहे. मनःप्रसादानें योग, योगानें सम्यग्ज्ञान व ध्यान, ध्यानानें मोक्ष व मोक्षापासून परमसुख मिळतें अशी भजनपूर्वक परंपरा आहे. शांति=भगवंताची निष्ठा असा दुसराही अर्थ देतात.

**राघवेंद्रयतिः**—सुखं=मोक्ष. ‘ अशांत पुरुषाला सुख कोठून ? ’ या वाक्यानें मुक्तस्थितींत दुःखहानि होते इतकेंच नव्हे, तर विषयचिंतन करणाऱ्या संसारी लोकांस दुर्लभ असें सुख मिळतें; असा गूढार्थ हे यति काढितात !

**ज्ञाने**०—जेथ शांतीचा जिव्हाळा ( उद्भव ) नाहीं । तेथ सुख विसरोनि न रिघे कहीं ( केव्हांही )। जैसा पापीयाच्या ठायीं । मोक्ष न वसे ॥ देखें अग्नीमाजी धापती ( घातलेली ) । तिये बीजें जरी विरूढतीं ( वाढतीं ) । तरी अशांतता सुख प्राप्ती । घडो शके ! ॥

**पंडितः**—अयुक्ताला बुद्धि नसते असें नाहीं. ती गुप्त असते. इंद्रियसंयमनाचा वारा लागल्याखेरीज जीवकाष्टांतील बुद्ध्यग्नी प्रकट होत नाहीं ॥९६॥

आयुक्तस्य कस्माद्बुद्धिर्नास्तीत्युच्यते—

अयुक्त पुरुषाला आत्मज्ञान कां होत नाहीं. ते सांगतात—

**इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ॥**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥**

**हि** ( कारण ) **यन्मनः** ( जें मन ) **चरतां** ( फिरणाऱ्या, भटकणाऱ्या )

**इन्द्रियाणां** ( इंद्रियांच्या ) **अनुविधीयते** ( मागें ठेवलेलें असतें मागें धांवत असतें ) **तत्** ( तें–मन ) **अस्य** ( या पुरुषाची, या साधकाची ) **प्रज्ञां** ( विवेकबुद्धि ) **हराति** ( हरण करितें, नाहींशी करतें ).–सारांश आपआपले विषय शोधून काढण्यासाठीं भटकणाऱ्या इंद्रियाच्या मागें जें मन धावत असतें, तें इंद्रियाधीन झालेलें मन साधक पुरुषाच्या बुद्धीचा नाश करिते. यांस दृष्टांत,–**अम्भसि** ( पाण्यावर तरंगत असलेल्या ) **नावं** (नौकेला )**वायुः इव** [ वारा ज्याप्रमाणें नष्ट करितो त्याप्रमाणें ] ह्मणजे पाण्यावर असलेल्या नावेला ज्याप्रमाणें वारा वाटेल तिकडे फिरवून शेवटीं तिला खडकावर वगैरे आपटतो व तिचा नाश करितो, त्याप्रमाणें विषयान्वेषीं इंद्रियांच्या स्वाधीन झालेलें मन संन्याशाच्या–विवेक–बुद्धीचे शतशः तुकडे करिते. वारा जसा नावेला मूळ ठिकाणावर जाऊं देत नाहीं, तसेंच मनही बुद्धीला स्वस्वरूपाचें चिंतन करून देत नाहीं, दृष्टांत समर्पक नाहीं असें कोणता रसज्ञ ह्मणेल?--

इंन्द्रियाणामिति । इन्द्रियाणां हि यस्माच्चरतां स्वस्वविषयेषु प्रवर्तमानानां यन्मनोऽनुविधीयतेऽनुप्रवर्तते तदिन्द्रियविषयविकल्पनेन प्रवृत्तं मनोऽस्य यतेर्हरति प्रज्ञामात्मानात्मविवेकजां नाशयति । कथं, वायुर्नावमिवाम्भस्यूदके जिगमिषतां मार्गादुद्धृत्योन्मार्गे यथा वायूर्नावं प्रवर्तयत्येवमात्मविषयां प्रज्ञां हृत्वा मनो विषयाविषयां करोति । यततो ह्यपीत्युपन्यस्तस्यार्थस्यानेकधोपपत्तिमुक्त्वा तं चार्थमुपपाद्योपसंहराति ६७

आत्मविषयक बुद्धि कां उत्पन्न होत नाहीं याचें कारण ऐकः–रूप, शब्द, स्पर्श इत्यादि आपआपल्या विषयामध्यें निमग्न होणाऱ्या नेत्र कर्ण वगैरे इंद्रियांच्या मागें जें मन लागलें, विषयमग्न इंद्रियांच्या स्वाधीन जें मन झालें, तें इंद्रियांस प्रिय असणाऱ्या विषयांचें निरनिराळेपणानें ग्रहण करण्यांत गुंतलेलें मन काय करितें पहा तें मन यां साधकपुरुषाची प्रज्ञा नाहींशी करिते. प्रज्ञा ह्मणजे आत्मा कोणता व अनात्मक कोणतें हें तारतम्यानें ओळखणारी बुद्धि होय.-- ह्मणजे विषयाभिलाषांत गुंग झालेल्या इंद्रियांच्या आधीन जें मन झालें तें मन ' हें रूप कसें आहे? ' 'हा शब्द कसा आहे' वगैरे भिन्नभिन्न विषयांचें मात्र चिंतन करीत राहतें; सारांश विषयमग्न झाल्यामुळें त्या मनाला आत्मचिंतन करण्याला अगर अनात्मक विषयांचा त्याग करण्याला सामर्थ्यच

उरत नाहीं, ह्मणून इंद्रियनिग्रह न करणाऱ्या पुरुषाची विवेकबुद्धि नष्टच होऊन जाते. कशी ती पहा:--जलमार्गानें प्रवास करणाऱ्या पुरुषांची नाव,--चांगला कर्णधार व नावाडी नसेल तर,--ज्याप्रमाणें वाऱ्याच्या जोरानें हेलकावे खाण्यास लागते, आपला मार्ग सोडून देते व भलत्या मार्गानें जाण्यास प्रारंभ करून बुडते, खडकावर आपटते, डोहांत शिरते,--सारांश भोंवऱ्यांत सांपडते; त्याप्रमाणेंच हें विषयलंपट मन विवेकबुद्धीस आत्मस्वरूपाकडे न नेतां, विषयांत, कर्मांत, उपासनेंत मात्र अडकून ठेवितें आणि प्राण्याला संसारांत ढकलून शेवटीं त्यास जन्ममरणाच्या अमर्याद भोंवऱ्यांत फिरावयास लाविते! ६० व्या श्लोकांत ज्या अर्थाचा उपक्रम केला आहे तोच अर्थ दृढ व्हावा ह्मणून अनेक वेळीं [ पहा श्लोक ६२ ]भगवंतांनीं इंद्रियनिग्रहाचें फल व विषयाग्रतेचा दुष्परिणाम हीं निरनिराळ्या तऱ्हेनें सांगितलीं आहेत व पुढच्या श्लोकांत याच विषयाचा उपसंहार केला आहे. ॥ ६७ ॥

**मधु०**—'यत्'=एकच इंद्रिय. एका इंद्रियाच्या लगामीं मन राहिलें तरी जर विवेकबुद्धि नष्ट होते, तर सर्वच इंद्रियांचे दास तें मन बनल्यावर काय काय अनर्थ होतील? **आचार्यांनीं** 'यत्' (जें) हें मनाचें विशेषण केलें आहे. भटकणाऱ्या इंद्रियांपैकीं एक असा **मधुसूदनीकारांचा** अर्थ आहे. फलश्रुति एकच; पण **मधुसूदनीकारांच्या** गूढार्थानें इंद्रियांचें अनर्थकारित्व स्पष्टतर होतें. आचार्यांचा अर्थ सरळ दिसतो. **श्रीधर**, **प्रपाकार** व **पर्वते** यांनीं **मधुसूदनीकारांप्रमाणेंच** अर्थ केला आहे. **शंकरानंद** व **पर्वते** **आचार्यांप्रमाणें** अर्थ करितात **द्विवेदी**सुद्धां सर्वांचा कटाक्ष मनोनिग्रहावर आहे. तें ठिकच आहे. **रामानुजाचार्यही आचार्यांचाच** अनुवाद करितात. **मध्वाचार्यांचे** अनुयायी **सत्यानंद** व **राघवेंद्रयति** ह्मणतात कीं इंद्रियाच्या लगामीं मन राहतें तें ईश्वरी इच्छेमुळें होय! हरति ॥ उत्पन्न होत असलेलें परोक्षज्ञान नाहींसें करितें. सारांश चित्तनिरोधाशिवाय श्रवण, मनन, निरुपयोगी होय! एवंच चित्तनिरोध पाहिजे.

**चतरजी**ही **मधुसूदनीकारां**प्रमाणेंच अर्थ करून म्हणतात कीं इंद्रियें स्तब्ध झालींशीं दिसलीं तरी आपण दुर्लक्ष करितां कामा नये, व्यसन सुटलेंसें वाटतें तें पुनः जडतें म्हणून सावधपणा पाहिजे. एक इंद्रिय दुष्ट झालें तरी

मुमुक्षूचा नाश होतो. **माथ्यूच्या** शुभवर्तमानांतही असेंच सांगितलें आहे: ‘ तुझ्या उजव्या डोळ्यानें किंवा उजव्या हातानें अपराध केला तर तो डोळा अगर हात उपटून टाक, नाहींतर त्या दुष्टाच्या संगतीनें तुला नरकांत जाण्याची पाळी येईल !’ ॥ ६७ ॥

इन्द्रियाणां प्रवृत्तौ दोष उपपादितो यस्मात्—

समाधिनिष्ट जो मनुष्य नाहीं त्याची मोकळी व मनसोक्त वागणारीं इंद्रियें विवेकबुद्धीचा नाश करितात हा दोष ज्याअर्थी सिद्ध झाला त्याअर्थी—

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ॥**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **महाबाहो** ( शारीरिक व मानसिक शत्रूंचा नाश करण्यास समर्थ असणाऱ्या अर्जुना! ) **यस्य** ( ज्या पुरुषाची ) **इन्द्रियाणि** ( इंद्रियें ) **सर्वशः** ( सर्वथा, सर्व बाजूंनीं ) **इन्द्रियार्थेभ्यः** ( विषयांपासून ) **निगृहीतानि** ( परावृत्त झालीं आहेत ) **तस्य** ( त्याची ) **प्रज्ञा** ( विवेकबुद्धि ) **प्रतिष्ठिता** ( स्थिर झाली. )—सारांश इष्ट पुरुषार्थ मिळविण्यास समर्थ असणाऱ्या अर्जुना! ज्या पुरुषानें आपलीं सर्व इंद्रियें सर्व विषयांपासून सर्व प्रकारांनीं परावृत्त करून घेतलीं, काढून टाकिलीं, त्याची बुद्धि स्थिर झाली; तोच खरा स्थितप्रज्ञ होय.

तस्माद्यस्य यतेह महाबाहो निगृहीतानि सर्वशः सर्वप्रकारै-
र्मानसादिभेदैरिन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः शब्दादिभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ६८

म्हणून सांगतों कीं हे अंतर्बाह्य शत्रूंचा पराभव करण्यास समर्थ असणाऱ्या पराक्रमी व आजानुबाहु अर्जुना! ज्या संन्याशानें आपलीं सर्व मन, नेत्र, कर्णादि इंद्रियें रूप, रस, गंध शब्दादि विषयांपासून सर्वथा परावृत्त करून घेतलीं, विषयपराङ्मुख केलीं, त्या पुरुषाची बुद्धि स्थिर झाली. तोच स्थितप्रज्ञ होय. सारांश इंद्रियनिग्रह हें स्थितप्रज्ञाचें लक्षण आणि स्थितप्रज्ञ होण्याचें साधन होय. ज्याला ब्रह्मचिंतन करण्यासाठीं बुद्धि स्थिर करावयाची असेल त्यानें मनासकट सर्व इंद्रियांचें दमन केलेंच पाहिजे; अथवा इंद्रियें बाह्यमुख असतात तीं अंतर्मुख केलीं पाहिजेत. हा प्रस्तुत विषयाचा उपसंहार आहे.

अद्वैतटीकाकारांचें या अर्थांशीं सर्वत्र ऐकमत्य आहे. द्वैतटीकाकारही ह्याच अर्थाचा अनुवाद करितात. इंद्रियनिग्रहानें प्रसाद, प्रसादानें योग, योग आणि श्रवण, मनन यांच्या साहाय्यानें ध्यान आणि ध्यानानें परमेश्वराचा साक्षात्कार ही **द्वैतवादी** टीकाकारांची परंपरा आहे. सर्वशः—सर्व इंद्रियें. **आचार्य** सर्वशः ह्मणजे सर्वथा असा अर्थ करितात.

**चतरजी** म्हणतात जो आशाशून्य झाला व ब्रह्म तेवढें सुखमय आहे आणि विषय दुःखमयच आहेत असें ज्याला निश्चयपूर्वक समजलें, तो साधु मुक्त होय. त्याचा रागद्वेष संपला व फलेच्छाही अस्तंगत झाली. इंद्रियनिग्रह त्यालाच साध्य होतो. पुनः नुसता इंद्रियनिग्रह असल्यास दांभिकपणा येतो, व नुसती फलाशा नसल्यास इंद्रियें पुनः संसारांत ओढितात; म्हणून कायमचा इंद्रियनिग्रह पाहिजे व फलाशेचें नष्टत्वही नित्य पाहिजे. मग चित्तस्थैर्य प्राप्त होण्यास उशीर नाहीं.

> योऽयं लौकिको वैदिकश्चव्यवहारः स उत्पन्नविवेकज्ञानस्य स्थित-प्रज्ञस्याविद्याकार्यत्वादविद्यानिवृत्तौ निवर्तते । अविद्यायाश्च विद्याविरोधा न्निवृत्तिरित्येतमर्थं स्फुटी कुर्वन्नाह—

याप्रमाणें जो स्थितप्रज्ञ झाला, ज्याला आत्मानात्म ज्ञान झालें, विवेकबुद्धि जागृत होऊन जो ब्रह्मपर झाला, त्या पुरुषाला सामाजिक अगर धार्मिक व्यवहारांचा संबंधच रहात नाहीं; कारण हे दोन्ही व्यवहार अविद्येनें उत्पन्न केलेले असतात व ज्ञान झाल्यानंतर अज्ञानाचा अगर अविद्येचा अस्त होतो आणि त्याबरोबरच या उभयविध कर्मांचाही अस्त होतो. आतां अविद्या ही विद्या प्राप्त झाल्याबरोबर नष्ट होते; उजेड पडल्याबरोबर अंधकाराचा नाश होतो. कारण त्या उभयतांत तसाच विरोध आहे. असो, विद्येचा उदय झाल्यावर अविद्या अस्तंगत होते तें स्पष्ट करण्यासाठीं सांगतातः—

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुने ॥ ६९॥**

**या** (जी) **सर्वभूतानां निशा** (सर्वभूतमात्रांची रात्र असते) **तस्यां** (तीमध्यें) **संयमी** (मनोनिग्रही पुरुष) **जागर्ति** (जागत असतो)--आणि--

**यस्यां** ( जी मध्यें ) **भूतानि** (प्राणीमात्र) **जाग्रति** ( जागतात ) **सा** (ती) **पश्यतोमुने** ( विवेक दृष्टीनें पाहणाऱ्या ब्रह्मज्ञाची ) **निशा** ( रात्र--असते--) सारांश जी वेळ सर्व प्राणीमात्राला रात्र अशी वाटते, ती विवेकी पुरुषाला दिवस होते, आणि अविवेकी प्राण्यांस दिवसासारखी वाटणारी वेळ ब्रह्मज्ञास रात्री सारखी होते !

या निशेति । या निशा रात्रिः सर्वपदार्थानामविवेककरी तमः-स्वभावत्वात्सर्वेषां भूतानां सर्वभूतानाम् । किं तत्परमार्थतत्त्वं स्थितप्रज्ञस्य विषयः । यथा नक्तंचराणामहरेव सदन्येषां निशा भवति तद्वन्नक्तं चरस्थानीयानामज्ञानां सर्वभूतानां निशेव निद्रा परमार्थतत्त्वमगोचरात्वादतद्बुद्धीनाम्, तस्यां परमार्थतत्त्वलक्षणायामज्ञाननिद्रायाः प्रबुद्धो जागर्ति संयमी संयमवाञ्जितेन्द्रियो योगीत्यर्थः ॥

आपल्या स्वतःच्या निबिड अंधकारानें सर्व पदार्थांमधील भेदाभेद नष्ट करणारी रात्र सर्व प्राण्यांस घोटाळ्यांत घालिते, ती सद्वस्तूचें ज्ञान झालेल्या स्थिरबुद्धि पुरुषास कशी वाटते, म्हणून विचारशील तर सांगतों. हा भेदाभेद नष्ट करणारा प्रसंग त्या विवेकी पुरुषास मात्र सद्वस्तू दाखविणारा होतो. पहा, रात्रींच्या वेळीं आपआपले व्यवहार करणारे राक्षस अगर उलूक पक्षी यांची रात्र कोणती ? तर जी वेळ दुसऱ्यांस दिवसाप्रमाणें असते ती ! म्हणजे जेव्हां इतरांस दिसतें, तेव्हां या रात्रिंचरांस गडद अंधेर असतो ! ह्याचप्रमाणें निशाचरासारखें वागणारे अज्ञानपूर्ण लोकांची दृष्टि सद्वस्तूच्या, ब्रह्माच्या ज्ञानाकडे वळली नसल्यामुळें, त्यांस परमार्थतत्त्व ब्रह्मतत्त्व, सद्वस्तूचें ज्ञान, समजत नाहीं, त्यांच्या अशुद्ध बुद्धीला सद्वस्तूच्या प्रखर ज्ञानाचें देदीप्यमान किरण सहन होत नाहींत ह्मणून सद्वस्तूचें ज्ञान हें त्यांस गर्द अंधकाराप्रमाणें वाटतें. परंतु ह्या भेदबुद्धि नष्ट करणाऱ्या परमार्थतत्त्वाच्या ज्ञानाचे प्रसंगीं मनोनिग्रह केलेला योगी अज्ञाननिद्रेला झुगारून देऊन खडखडीत जागा असतो. सारांश वेदांत श्रवणाचे वेळीं व ब्रम्हानुभवाचे समयीं अज्ञ मनुष्यें झोंपेच्या डुकल्या घेत असतात, व ज्ञानी पुरुष ब्रह्मानंदांत मग्न होऊन डुलत असतो !

यस्यां ग्राह्यग्राहकभेदलक्षणायामविद्यानिशायां प्रसुप्तान्येव भूतानि जाग्रतीत्युच्यते, यस्यां निशायां प्रसुप्ता इव स्वप्नदृशः सा निशाऽविद्यारूपत्वात्परपरमार्थतत्त्वं पश्यतो मुनेःअतःकर्माण्यविद्यावस्थायामेव चोद्य-

न्ते न विद्यावस्थायाम्। विद्यायां हि सत्यामुदिते सवितरि शार्वरमिव तमः प्रणाशमुपगच्छत्यविद्या। प्राग्विद्योत्पत्तेरविद्याप्रमाणबुद्ध्या गृह्यमाणा क्रियाकारकफलभेदरूपा सती सर्वकर्महेतुत्वं प्रतिपद्यते। नाप्रमाणबुद्ध्या गृह्यमाणायाः कर्महेतुत्वोपपत्तिः। प्रमाणभूतेन वेदेन मम चोदितं कर्तव्यं कर्मेति हि कर्मणि कर्ता प्रवर्तते नाविद्यामात्रमिदं सर्वं निशेवेति।

तसेंच 'हा मीं,' 'हें माझें,' 'हा तूं' 'हें जग' वगैरे प्रकारची अहंप्रत्यय-रूपी ( Subjective ) आणि इदंप्रत्ययरूपी (Objective) भेदबुद्धि कायम करणें हाच स्वभाव आहे ज्या अविद्यारूपी रात्रीचा, त्या रात्रींत गाढ झोंप लागलेल्या मनुष्यासच जागणारीं माणसें असें ह्मणतात! ह्मणजे अविद्येनें भेद पाहणारे मूर्ख लोकांस व्यवहारज्ञ व चतुर असें ह्मणतात!—या अज्ञाननिद्रेंत घोरत पडलेले लोक स्वप्नांतील व्यवहार करीत आहेत. ह्मणजे त्यांचा व्यवहार खोटा आहे व बुद्धि अज्ञानांची आहे. असो, तेव्हां अज्ञानांत व्यवहार करणारे मिथ्या व्यवहारज्ञ लोकांचा जो दिवस त्याला आमचे परमार्थतत्त्व ओळखणारे मुनिराज रात्र असें म्हणतात! कारण उघडच आहे कीं व्यवहार करणारे भेद-बुद्धीचे लोक अज्ञानांत गुरफटलेले आहेत.

याप्रमाणें भेदशून्य दृष्टीनें सद्वस्तूचें स्वस्वरूपतः चिंतन करणाऱ्या आत्म-ज्ञानाचें जें श्रेष्ठ ज्ञान तें द्वैतवादी कर्मठाला अज्ञान वाटतें आणि भेदपूर्ण दृष्टीनें जें व्यवहाराचें, संसाराचें चिंतन, कर्तृत्व बुद्धीनें व फलाच्या आशेनें करणाऱ्या पुरुषाचें जें व्यवहारज्ञान, तें सर्व अद्वैतदृष्टिज्ञान्याला अज्ञान वाटतें. यावरून फलितार्थ काय निघाला कीं कर्म करण्याची अवश्यकता अविद्यामग्न लोकांसच आहे, विद्यावंतांस नाहीं. अविद्येमध्यें कर्म करण्यास सांगण्याचा वेदशास्त्रांचा उद्देश हा आहे कीं त्यानें चित्तशुद्धि व्हावी. ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे व ज्याला ज्ञान प्राप्त झालें आहे त्याला कर्म करण्याचें कारणच नाहीं. पुनः, विद्या प्राप्त झाली; ज्ञान झालें, ब्रह्मसाक्षात्कार झाला, अथवा स्वयंप्रकाश ज्ञानसूर्य उगवला ह्मणजे अज्ञानरूपी रात्र आणि काळोख हीं चटसारी निघून जातात, नव्हे, नाशच पावतात? पण हें सद्वस्तूचें ज्ञान होण्यापूर्वी मनुष्यमात्र अज्ञानामध्यें लिप्त झालेला असतो. 'मी कर्ता,' 'हें साधन अगर करण,' 'हे फल' इत्यादि भेद उत्पन्न करणारे व हे भेद खरे आहेत असें भासविणारे अज्ञान ह्मणजे अविद्या होय; आणि याच अविद्येच्या

जोरावर अज्ञानी मनुष्य कर्म करण्यास प्रवृत्त होतो. आतां हें उघड आहे कीं या भेददर्शी अविद्येला जर आपण खरें मानिलें नसतें, तर अविद्येचें कार्य जें कर्म तें आपण केलेंच नसतें; व अविद्येलाही प्राण्याकडून कर्म करवून घेण्याचें सामर्थ्य उरलें नसतें. सारांश अज्ञानी मनुष्य ह्मणत असतो कीं वेद हे प्रमाण आहेत व यांनीं आपल्यास कर्म करण्यास सांगितलें आहे; ह्मणून मला वेदप्रतिपादित कर्म केलेंच पाहिजे! एकसुद्धां असें ह्मणत नाहीं कीं हें संसारजन्य व संसारजनक कर्म करण्यास सांगणारे वेद हे सर्व अविद्येचे, मायेचे, मायारूपी रात्रीचे खेळ आहेत. म्हणून वेदांचा वरवरचा अर्थ प्रमाण मानणारे अज्ञानी लोकांनींच कर्म करणें योग्य आहे. विद्वानांस कर्माची व कर्म करण्यास सांगणाऱ्या वेदांची आपेक्षाच नाहीं.

यस्य पुनर्निशेवाविद्यामात्रमिदं सर्वं भेदजातमिति ज्ञानं तस्याऽऽत्मज्ञस्य सर्वकर्मसंन्यास एवाधिकारो न प्रवृत्तौ। तथाच दर्शयिष्यति 'तद्बुद्धयस्तदात्मानः इत्यादिना ज्ञाननिष्ठायामेव तस्याधिकारम्। तत्रापि प्रवर्तकप्रमाणाभावे प्रवृत्त्यनुपपत्तिरिति चेत्। न। स्वात्मविषयत्वादात्म ज्ञानस्य। न ह्यात्मनः स्वात्मनि प्रवर्तकप्रमाणापेक्षताऽऽत्मात्वादेव तदन्तत्वाच्च सर्वप्रमाणानां। प्रमाणत्वस्य। न ह्यात्मस्वरूपाधिगमे सति पुनः प्रमाणप्रमेयव्यवहारः संभवति प्रमातृत्वंह्यात्मनो निवर्तयत्यन्त्यं प्रमाणम्। निवर्तयेदव चाप्रमाणी भवति स्वप्नकालप्रमाणमिव प्रबोधे। लोके च वस्त्वधिगमे प्रवृत्तिहेतुत्वादर्शनात्प्रमाणस्य। तस्मान्नाऽऽत्मविदः कर्मण्यधिकार इति सिद्धम्॥६९॥

आतां ज्या आत्मज्ञानी पुरुषाला कर्म व कर्मप्रवर्तक वेद हीं सर्व अविद्येपासून झालीं आहेत, अविद्यामयच आहेत, म्हणून रात्रीसारखीं निष्प्रकाश आहेत, असें ज्ञान झालें त्याला मात्र सर्व कर्मांचा त्याग करण्याचा अधिकार प्राप्त होतो. 'कर्म कर' असें त्याला सांगण्याचा कोणालाही अधिकार नाहीं. **पांचव्या** अध्यायाच्या सतराव्या श्लोकांतही भगवान असेंच सांगतील कीं असल्या पुरुषाला मात्र केवळ ज्ञाननिष्ठेचा अधिकार आहे.

**शिष्य**—गुरु महाराज! अंमळ थांबावें. ज्ञाननिष्ठा तरी कर्मच आहेना? शिवाय 'ज्ञाननिष्ठा तूं कर' अशा कर्मप्रवर्तक आधाराची, प्रमाणाची, तरी

अपेक्षा आहेना ? आणि हें प्रवर्तक प्रमाण अगर विधि नसेल तर ज्ञाननिष्ठा होणार कशी ?

**गुरु**—हा खुळ्या ! बाहेरचे व आंतील सर्व विषय नष्ट करून जो निर्विषय झाला ह्मणजे ज्याचें अज्ञान समूळ नाहींसें होऊन आत्मस्वरूपाची ज्याला ओळख झाली, नव्हे, जो परब्रह्मस्वरूपच बनला, त्याची स्वस्वरूपांतच ज्ञानवृत्ति राहणार नाहीं तर जाईल रे कोठें ? आत्मज्ञानाचा विषय आत्माच ! तेव्हां आत्मस्वरूपांत तो लीन होणार ह्मणजे ज्ञाननिष्ठेंतच असणार नाहीं काय ? कांहीं दुसरी गोष्ट साध्य करून घ्यावयाची असली तर ' अमुक तऱ्हेनें ती साध्य करून घ्यावी ' अशा प्रकारचा आधार अगर विधि लागत असतो; येथें ब्रह्मज्ञाला आत्मा मिळालाच आहे तेव्हां प्रमाणाची अपेक्षा नसते हें उघड आहे; पुनः, प्रमाणांचा खरेपणा किंवा जोरा कोठपर्यंत ? आत्म्याचा लाभ झाला नाहीं तोंपर्यंत; आत्मलाभ झाला म्हणजे वेद, शास्त्र, मंत्र, तंत्र इत्यादिकांची मातब्बरी संपली; कारण सर्व प्रकारचा व्यवहारच संपल्यामुळें ' हें कर ' ' तें करूं नको ' ' हें खरें ' ' तें खोटें ' ' हा पुरावा ' ' तो पुरावा नव्हे ' असें सांगण्याला अवकाशच राहिला नाहीं, खरें कीं नाहीं ?

**शिष्य**—तें खरें, पण ' हें खरें आहे ' असें मानण्याची शक्ति तर आत्म्यांस राहील ?

**गुरु**—वत्सा सर्व प्रमाणांस खरेपणा देणारा आत्मा हें शेवटचें प्रमाण आहे, पण जेव्हां आत्मज्ञान होऊन दुसरें असें कांहीच राहत नाहीं, विषय, इंद्रियें, मन, बुद्धि, अहंकार इत्यादि सर्व मापन करावयाच्या गोष्टीच जेव्हां नाहींशा होतात तेव्हां सर्वांचा मापक जो आत्मा त्याचें मापकपणही नाहींसें होतें.— जगांतील सर्व प्रकारचे धान्य व मोजावयाच्या वस्तु नाहींशा झाल्यावर शेराचें शेरपण जसें नष्ट होईल तसेंच येथें समज ह्मणजे झालें.--

**शिष्य**—महाराज ! ज्ञानाच्या इच्छेनें प्रवृत्त झाल्यामुळें मी निर्भीडपणानें विचारीत आहें आपण रागावूं नये. बालकावर अनुग्रह करावा—

**गुरु**—अरे इतकी लांब प्रस्तावना कशाला! विचारावयाचें तें खुशाल विचार.

**शिष्य**—आत्म्याजवळचें ' खरें, खोटें पाहण्याचें सामर्थ्यच, मापकपणच जर नाहींसें झालें तर अद्वैतज्ञानच खरें आहे हें कशावरून जाणावयाचें ?

आत्मबोध झाल्यावरच अद्वैतज्ञान होणार आणि त्याच वेळीं आत्म्याजवळ खऱ्या खोट्याचा ताजवा नाहींसा होतो, ह्मणून विचारतों.

गुरु—अरे! असें पहा: तूं झोंपेंतून जागा झालास ह्मणजे आपल्यास स्वप्नें पडत होतीं, त्याचीं अमुक प्रमाणें आहेत, असें म्हणालास तर त्या तुझ्या स्वाप्निक प्रमाणांची सत्यता मानणें रास्त होईल काय? नाहीं; सारांश स्वप्नांतील प्रमाणें जशीं अप्रमाण ठरतात, त्याचप्रमाणें संसाररूपी स्वप्नांतून जागें झाल्यानंतर संसाररूपी स्वप्नांतील आत्म्याचें प्रमाणत्व प्रमाणशून्य होतें. झालें. आत्मा प्रमाणशून्य होतो, ह्मणजे आत्म्याकडे 'अमुक कर' किंवा 'करूं नको,' 'अमुक खरें' किंवा 'अमुक खोटें' असें सांगण्याचें राहतच नाहीं. सारांश कोणतें कर्म करण्याचें उरत नाहीं. आतां अद्वैताचें प्रामाण्य तूं विचारलेंस तर तुला काय ह्मणावें? सर्व आत्मस्वरूप आहे अशी जागृति होऊन प्रमाण, प्रमेय वगैरे सर्वच व्यवहार नामरूपासुद्धां नष्ट झाला तेथें 'खरें खोटें' हा प्रश्न तरी राहील कसा? एकच राहिलें तेथें 'खरेंही नाहींसें झालें व खोटेंही उरलें नाहीं. असो, हा विस्तार फारच होईल. तात्पर्य घ्यावयाचें हें कीं मुमुक्षूचें कर्म, आत्मज्ञान झाल्याबरोबर संपतें. लोकांमध्यें तरी आपण हेंच पाहतोंना कीं कोणा मनुष्याला इष्ट वस्तु प्राप्त झाली ह्मणजे 'अमुक केलें असतां ती वस्तु प्राप्त होते' ह्या नियमाचें प्राबल्य त्या पुरुषाला राहत नाहीं व तो त्या नियमानुसार कर्मही करीत नाहीं. सारांश, जो म्हणून आत्मवेत्ता झाला त्याला कोणतेंही कर्म करण्याची आवश्यकता राहिली नाहीं, व कोणतेंही कर्म त्याच्या हातून होत नाहीं हें सिद्ध झालें.

मधु०—'या' शब्दाचा प्रज्ञा म्हणजे वेदांतमहावाक्यावरून 'मीच ब्रह्म आहे' अशी झालेली बुद्धि असा अर्थ करून ही बुद्धि सामान्यजनांस अंधकारमय वाटते असें म्हणतात. समानार्थक श्लोकः—

"कारकव्यवहारे हि शुद्धं वस्तु न वीक्ष्यते । शुद्धे वस्तुनि सिद्धे च कारकव्यापृतिस्तथा" ॥

(कर्तृत्वबुद्धि असली म्हणजे ब्रह्मज्ञान नाहीं, आणि ब्रह्मज्ञान सिद्ध झालें म्हणजे कर्तृत्वबुद्धिही नाहीं!) तसेंच—

"काकोलूकनिशेवायं संसारोऽज्ञात्मवेदिनोः" ।

(अज्ञानी आणि विद्वान लोकांस संसार कसा भासतो? तर कावळा आणि

घुबड यांस रात्र भासते त्याप्रमाणें; म्हणजे कावळ्याची रात्र तो घुबडाचा दिवस आणि घुबडाची रात्र तो कावळ्याचा दिवस!)

" यत्र वाऽन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येत्। यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत् " ॥

(जेथें दुसरें कांहीं आहे, द्वैत आहे, असा भास असतो, तेथें एक दुसऱ्याला पाहतो हें म्हणणें शोभेल. पण जेथें ज्ञानी पुरुषाला—आपल्यासुद्धां—सर्वच आत्ममय झालें तेथें पाहणारा कोण? पाहणें काय? पहावयाचें कशानें? आणि पहावयाचें तरी काय?) सारांश ज्ञानी पुरुषाला सर्वत्र आत्मसूर्य उगवला आहे असें दिसेल, अथवा शुद्ध रीतीनें बोलावयाचेंच तर ज्ञानी पुरुषच आत्मसूर्य होईल. !

**श्रीधर**—यांनीं 'सर्वभूतानां' चा अर्थ 'आत्मज्ञानाभावरूपी जो अंधकार त्यानें लिप्त झाल्या आहेत बुद्धि ज्यांच्या असे प्राणी' असा करून 'ब्रह्मज्ञानें डोळे उघडले तरी त्यास ब्रह्मच दिसतें, नामरूपात्मक विषय दिसत नाहींत:' असें म्हटलें आहे.

**शंकरानंद** ज्ञानी पुरुषाची स्थिति सांगतात:—

'आत्मरतिरात्मक्रीड आत्मामिथुन आत्मज्योतिरात्मानन्दो भूत्वा सर्वदाऽऽस्ते'

अर्थ स्पष्टच आहे. 'निशा'=(१) नेहमीं अत्यंत निद्रा ज्या अवस्थेंत असते ती; (२) नेहमीं ज्या अवस्थेंत अत्यंत 'शं' म्हणजे सुख असतें ती अवस्था! **प्रपाकार** एक समानार्थक श्लोक देतात.

" आत्मा नहि स्फुरति सर्वशरीरभाजां
तेषां निशा भवति सा खलु तत्र योगी।
जागर्ति जाग्रति च ते व्यवहारजाते
तत्र स्फुरत्युरुधियः क्षणदाऽस्य सा ते ॥ "

मूळ श्लोकाचें प्रतिबिंबरूपच हा श्लोक आहे. तात्पर्य शरीरभोग भोगणारांस आत्मस्फुरण होत नाहीं, व योग्यांस व्यवहाराचें स्फुरण होत नाहीं. संसारी लोकांस समाधिस्थिति झोंपेसारखी वाटते! **योगवासिष्ठांत** म्हटलें आहे.

" निद्रादौ जागरस्यान्ते यो भाव उपपद्यते।
तं भावं भावयन्साक्षादक्षयानन्दमश्नुते ॥ "

( जागृतीच्या शेवटीं व निद्रा लागण्याच्या पूर्वी मनाची जी विषयशून्य-वृत्ति असते ती वृत्ति सर्वदा असून जो अद्वयाचा आनंद उपभोगितो तोच योगी होय. )

**रामानुजांचाही** वरीलप्रमाणेंच अर्थ आहे. निशा=प्रकाश न देणारी वेळ.

**मध्वमतवादी**:—' निशा '=योग्यास परमेश्वरस्वरूपानें भासामान होणारी अवस्था इतरांस अज्ञात असते ह्मणून अंधकारमय होते. संयमी =परमेश्वरास प्रत्यक्ष पाहणारा. व्यवहारिक विषयाचे वेळीं योगी निद्रा घेतो ह्मणजे मत्ता-सारखें आचरण करितो, तात्पर्य तो भानावर नाहीं असें सामान्य लोकांस दिसतें. हे एक श्लोक देतात त्याचें तात्पर्य हें आहे:—मदिरापानानें मदांध झाले-ल्या पुरुषाला जसें स्वतःचें वस्त्र आहे किंवा नाहीं याचें भान नसतें, त्याप्रमाणें ईश्वरचरणीं ज्या सिद्धाच्या मनाचा सर्वथैव लय लागला आहे, तो महायोगी शरीराची मुळींच फिकीर करीत नाहीं. देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ अशा पुरुषाला व्यवहाराची खबर नसते यांत काय आश्चर्य आहे ? **राघवेन्द्रयति**:—मुनेः पश्यतः=मनन करणाऱ्या स्वानुभवी पुरुषाला असा अन्वय सांगतात.

Lilly's Ancient Religion and Modern Thought P. 184. Dark is the world to thee; thyself art the reason why; For is He not all but thou, that has power to feel I am I !

' तुला हें सर्व अंधकारमय दिसत आहे. त्याचें कारण तूंच आहेस. ' मी मी आहें ' असें मानणाऱ्या तुझ्याशिवाय बाकी सर्व परमेश्वरमय आहे ! '

**चतरजी**—कर्मनिषेधासंबंधानें आचार्योंचेंच अनुकरण करितात. वेद, नीतिग्रंथ वगैरेची योजना ही मिथ्या जीवभाव, व कर्तृत्व, भोक्तृत्व मानणाऱ्या अज्ञानी लोकांसाठीं आहे मुमुक्षूला एकच कर्तृत्व आहे तें हें: मिथ्याजगताचा त्याग करणें व दृढनिश्चय ठेवून आत्मज्ञान संपादन करणें व नंतर ब्रह्मस्व-रूपांत मिसळून एकरूप होणें हेंच त्याचें कर्तव्य आहे. ( पहा कलोसियन्स अ० ३ )

For the wisdom of this world is foolishness with God... But the natural man reciveth not the things of the sdirit

of God for they are foolishness unto him : neither can he know *them* because they are spiritually disoerned.

'कारण ह्या लोकांचें शहाणपण ईश्वराच्या दृष्टीला मूर्खत्वाचें दिसतें. परंतु व्यावहारिक मनुष्याला ईश्वरी वस्तु आवडत नाहींत; कारण या वस्तु त्याला मूर्खपणाच्या दिसतात; पुनः त्या वस्तु या संसारी व धर्मशून्य मनुष्याला मजतसही नाहींत.' हा उतारा व गीतेंतील श्लोक यांचें अर्थसाम्य किती जवळ जवळ आहे हें दाखविण्यासाठींच हें विस्तृत अवतरण घेतलें आहे.

**पंडित** ह्मणतातः—या भावें श्रीकृष्ण म्हणे । सा निशापश्यतो मुनेः । विषय देखोनि वासना नेणे । न दिसे तमीं जेवी कांहीं ॥....दृष्टींत वासना न राहे । आणि ब्रह्मभावें विष पाहे । कीं मनन निदिध्यास घडला आहे । मुनि म्हणे हरी यास्तव ॥ सुवर्णक्रयविक्रय करी । अलंकार त्या सराफाच्या घरीं । वेश्यांची दृष्टी अलंकारीं । सराफ लक्ष्यी सोनें ॥ वेश्या देखे सरी । गळां घालियाची इच्छा करी । कांकणें देखतां, करीं । लेऊं पाहे ॥ सराफ सोनेंच लक्षीं । देखोनि अकारातें उपेक्षी । जन भोगाचि आपेक्षी। ज्ञानी पाहे ब्रह्मत्वें ॥....भोगी वासनारहित तो संयमींच जाणावा निश्चित । याप्रकारें अच्युत । समाधान करितो या श्लोकीं ॥ ६९ ॥

विदुषस्त्यक्तैषणस्य स्थितप्रज्ञस्य यतेरेव मोक्षप्राप्तिर्न त्वसंन्यासिनः कामकामिन इत्येतमर्थं दृष्टान्तेन प्रतिपादयिष्यन्नाह—

आतां ज्याला आत्मविद्या प्राप्त झाली व ज्यानें सर्व विषयांविषयींचा सर्वथा वासनात्याग केला अशा निश्चितबुद्धीच्या संन्याशालाच मात्र मोक्ष मिळतो, अहंताभिमानी व वासनाशील संसाऱ्याला मिळत नाहीं हें ६४ व्या श्लोकांत सांगितलेलें तत्व दृढ करण्यासाठीं एक दृष्टांत सांगतातः—

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं**
**समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ॥**
**तद्वत्कामा यंप्रविशन्ति सर्वे**
**सशान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥**

**आपूर्यमाणं** ( चोहीं बाजूंनीं भरला जाणारा )—परंतु—**अचलप्रतिष्ठं**

( आपलें स्थान, आपली सीमा मर्यादा, न सोडणारा ) **समुद्रं** ( जो समुद्र त्यामध्यें ) **यद्वत्** ( ज्याप्रमाणें ) **आपः** ( नद्या, जलसंचय ) **प्रविशन्ति** प्रवेश करितात, शिरतात ) **तद्वत्** ( त्याप्रमाणें ) **यं** ज्या-संन्याशाच्या मनामध्यें **सर्वे कामाः** ( सर्व प्रकारच्या, अनेक प्रकारच्या इच्छा ) **प्रविशन्ति** ( प्रवेश करितात. ). सारांश उदकानें पूर्ण असलेल्या महासागरामध्यें हजारों नद्यांनीं आपलीं विशाल पात्रें चोहींकडून जरी ओतलीं, तथापि तो शांत व गंभीर महासागर ज्याप्रमाणें आपली मर्यादा उल्लंघन करीत नाही, त्याप्रमाणें हजारों प्रकारच्या इच्छा मनांत शिरल्या काय व मनांत गेल्या काय, जो आमचा ब्रह्मज्ञ पुरुष नेहमीं शांत व अविकृत असा राहतो; **सः** ( तो ) **शांतिं आप्नोति** ( मुक्ति मिळवितो. ) **कामकामी न** ( वासनाधीन पुरुष, विषयांचें चिंतन करणारा पुरुष, मिळवीत नाहीं. )

आपूर्येति। आपूर्यमाणमद्भिरमचलप्रतिष्ठमचलतया प्रतिष्ठाऽवस्थितिर्यस्य तमचलप्रतिष्ठं समुद्रमापः सर्वतो गताः । प्रविशन्ति स्वात्मस्थमविक्रियमेव सन्तं यद्वत्तद्वत्कामा विषयसंनिधावपि सर्वत इच्छाविशेषा यं पुरुषं समुद्रमिवाऽऽपोऽविकुर्वन्तः प्रविशन्ति सर्वे आत्मन्येव प्रलीयन्ते न स्वात्मवशं कुर्वन्ति स शान्तिं मोक्षप्राप्नोति नेतरः कामकामी काम्यन्त इति कामा विषयास्तान्कामयितुं शीलं यस्य स कामकामी नैव प्राप्नोतीत्यर्थः ॥ ७० ॥

चोहींकडून पाण्याच्या व नद्यांच्या प्रचंड प्रवाहांनीं भरत असणारा समुद्र ज्याप्रमाणें आपली मर्यादा सोडीत नाहीं इतकेंच नव्हे, तर स्वतः अविकृत राहून मिळणाऱ्या नद्यांसही स्वस्वरूपच देतो आणि--ग्रीष्मऋतूंत नद्या आटल्या किंवा वर्षाऋतूंत फुगल्या तरी ज्या समुद्राचे स्वरूपांत फरक पडत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व प्रकारचे विषय जवळ असतांनाही व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अनंत प्रकारच्या वासनाही ज्या स्थिरबुद्धि मुनीला विकारवश करण्यास असमर्थ होऊन नंतर त्याच्या मनांत शिरतात व तेथें त्या वासना स्वतःआत्मस्वरूपच होऊन जातात, -सारांश प्रारब्धवशतेमुळें आवश्यक भोग भोगूनही जो विषयाधीन होत नाहीं. शांतच राहतो, त्या विकारशून्य यतीला मात्र मोक्ष मिळतो. निरनिराळ्या विषयांची आराधना करण्याचें ज्याचें व्रत असतें अशा वासनापूर्ण व ममत्वाभिमानी अविद्वानाला मोक्ष मिळत नाहीं.

**अद्वैत टीकाकारांचें** ऐक्यमत्य आहे **प्रपा०:**--शांति=शमसुख. **द्विवेदीः कामकामी**=बकासारखे ढोंगी संन्याशी ! **पर्वते:**—आचार्यानुयायीच आहेत **मधुः**—अर्थ आचार्याप्रमाणेंच. शांति=लौकिक व अलौकिक, अथवा व्यवहारिक आणि धार्मिक, कर्माच्या योगानें चित्तभ्रष्ट न होण्याची स्थिति. ज्ञानबलानेंही शांति मिळते या शांतिब्रह्मालाच संन्यास योग्य! ही शांति ज्याला मिळाली तो जीवनमुक्त झाला.

**श्रीधरः**—' यं '= अंतर्दृष्टि प्राप्त झालेला मुनि. **शंकरानंदः**—शांति= अविद्या व तिचें कार्य जो प्रपंच या उभयतांचा उपशम ज्या वृत्तींत होतो ती मनोवृत्ति. **सरकारः**—शांतिपर्व अ. २९७ हा अध्याय ह्यासंबधानें वाचावा असें ह्मणतात.

**रामानुजाचार्य, मध्वाचार्य** व **राघवेंद्रयतिः**—आचार्यप्रमाणेंच अर्थ करितात. **सत्यानंदः**—एक समानार्थ श्लोक देतातः—

" भुञ्जनोऽपि हि यः कामान्मर्यादां न तरेत्क्वचित् ।
समुद्रवद्धर्ममर्या नासौ कामी न उच्यते " ॥

( भोग भोगीत असतांही जो आपली धर्ममर्यादा—समुद्राप्रमाणें—उल्लंघित नाहीं, त्याला कामी—निषिद्धाची इच्छा करणारा—असें म्हणूं नये. ) यांचें मत असें आहे कीं इच्छा ही स्वभावतः मोक्षविरोधिनी नाहीं. दुष्ट इच्छा तेवढी मोक्षाच्या आड येते. इच्छा नष्टच केली तर, जिवंत राहणेंही अशक्य होईल ! द्वैतपक्षाचा मोक्ष म्हणजे ईश्वरासंनिध वास होय. ह्या स्थितींत इच्छा असणें नीट आहे. पण मूळ श्लोकांत हा भाव दिसत नाहीं. विषयाची आशा करून भोग भोगिले म्हणजे शांति नष्ट होते. निरिच्छ असून विषय भोगणें प्राप्त झालें असतांही निर्विकार राहणें, नव्हे ? भोगवृत्तीसच ब्रह्मस्वरूप देणें हें शांतीचें खरें लक्षण आहे. आचार्यांच्या भाष्यांत हाच सरळ अर्थ आला आहे.

**ज्ञाने०**—सांगे, सूर्याचे घरीं । प्रकाश काय वातीवेरी ( वातीवरच ! )। कां न लाविजे ( दिवा लावला नाहीं तर ) तरी अंधकारी । कोंडेल तो (सूर्य) ?। मुळाच्यावर ताण आहे कीं नाहीं या दृष्टांताची? आणखी; जो आपुलेनी नागरपणें ( आपल्या घरच्या सौन्दर्यानें ) । इंद्रभुवनातें पाबळें (तुच्छ) ह्मणे । तो केंवि रंजे पालवणें ( पर्णकुटीनें ) । भिल्लांचेंनि ॥ जो अमृतातें ठी ( नांव )

ठेवी । तो जैसा कांजी न सेवी । तैसा स्वसुखानुभवी ( ब्रह्मज्ञ ) । भोगी न ऋद्धि ॥....सारांश....जेथ स्वर्गसुखा लेखणी ( परवा, गणना ) नाहीं । तेथ ऋद्धि सिद्धि कार्या । प्राकृता ( सामान्य, अल्प ) । होती ! ॥

**रंगनाथ स्वामी**चे दृष्टांत पहाः—ज्याला सर्व विषय....परितयातें विकार उपजवूं न शकती। जैसे गगनी हे षड्ऋतु येती, जाती । परी गगनास विकार उपजवूं न शकती । कीं जळसंगति पद्मपत्र ॥ ७० ॥

**यस्मादेवं तस्यात्—**

**शिष्य**—गुरुमहाराज ! तर मग एखाद्या गृहस्थानें आपल्या मानसेंकरून मात्र सर्व प्रकारचा अभिमान टाकून दिला व तो स्वतःस ब्रह्मस्वरूपी असें मानावयास लागला ह्मणून त्यालाही मोक्ष मिळणार अशी स्थिती प्राप्त झाली ! माझ्या समजुतीनें हा तर खुळ्याचा बाजारच झाला.

**गुरु**—कां बरें ? ज्यानें सर्व प्रकारच्या इच्छा मनानें व कृतीनें टाकून दिल्या तोच संन्याशी व त्यासच मोक्ष मिळतो असें आहे म्हणून—

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥७१॥**

**सर्वान् कामान्** ( सर्व प्रकारच्या कामना ) **विहाय** ( टाकून देऊन ) **यः पुमान्** ( जो संन्यासी पुरुष ) **निस्पृहः** ( वासनाशून्य होत्साता उदासीनपणें ) **चरति** ( संचार करीत राहतो )—तसेंच—जो **निर्ममः** ( ममत्वशून्य आहे )--व **निरहंकारः** ( अहंत्वशून्य आहे ) **सः** ( तो ) **शान्तिं** ( निर्विकार अशी स्थिति, मोक्ष ) **अधिगच्छति** ( मिळविता होतो ) सारांश सर्वप्रकारच्या कामनांचा व वासनांचा त्याग करून उदासीनपणानें जो पृथ्वीवर संचार करितो, 'हें माझें' 'हा मी' ह्या प्रकारचें ममत्व आणि अभिमान हीं ज्याची नष्ट होतात त्याच पुरुषाला कायमची अशी निर्विकार स्थिति मिळते, त्यालाच मोक्ष मिळतो.

विहायेति। विहाय परित्यज्य कामान्यः संन्यासी पुमान्सर्वानशेषतः कार्त्स्न्येन चरति जीवन्मात्रचेष्टाशेषः पर्यटतीत्यर्थः, निस्पृहः शरीरजीवनमात्रेऽपि निर्गता स्पृहा यस्य स निस्पृहः सन्निर्ममः शरीरजीवनमात्राक्षिप्तपरिग्रहेऽपि ममेदमित्याभिनिवेशवर्जितः, निरहंकारो विद्यावत्त्वा-

दिनिमित्तात्मसंभावनारहित इत्यर्थः, स एवंभूता स्थितप्रज्ञो ब्रह्मविच्छान्ति सर्वसंसारदुःखोपरमलक्षणां निर्वाणाख्यामाधिगच्छाति प्राप्नोति ब्रह्मभूतो भवतीत्यर्थः ।। ७१ ।।

याप्रमाणें संन्यासी अथवा विद्वान पुरुष तिन्ही प्रकारच्या वासनांचा त्याग करितो.

**शिष्य**—मन वासनाशून्य झालेल्या व विषयत्याग केलेल्या संन्याशाला क्षणभर जिवंत राहतां यावयाचें नाहीं.

**गुरु**—अरे देहप्रारब्ध आहे तोंपर्यंत त्यास देह जिवंत ठेवण्यापुरतीं कार्यें करावींच लागतात. तूं एक गोष्ट समजला नाहींस ह्मणून अशी शंका विचारतोस. विषयत्याग करणें याचा अर्थ असा समजावयाचा कीं विषयापासून आपल्यास सुख मिळावें अशी जी इच्छा असते, त्या इच्छेचा त्याग करणें हा खरा विषयत्याग आहे. आपल्यास देह प्राप्त झाला आहे, त्याबरोबरच मन, चित्त, बुद्धि हीं प्राप्त झालीं आहेत. यांची शुद्धि झाल्याशिवाय मोक्ष नाहीं. चित्तशुद्धि व्हावयास बराच काल लागतो, तसेंच श्रवण, मनन, निदिध्यासाचीही आवश्यकता असते. परंतु हें सर्व देह जिवंत आहे तोंपर्यंतच होणार; ह्मणून देह जिवंत ठेवणें आवश्यक आहे व देह जिवंत राहील अशीं कर्में करणें अवश्य आहे—असो; तेव्हां हा योगी पुरुष देहयात्रा चालेल अशीं कर्में करीत असतो.

**शिष्य**—मग ह्या कर्माला घरदार हवेंसें झालें व तो संसारांत पुनः पडलाच.

**गुरु**—नाहीं. तो एके ठिकाणीं राहतच नाहीं. असतो तेथें सुद्धां उदासीनपणानेंच वागतो, तो इतका कीं शरीर कोठेंही पडलें तरी तो त्याची क्षिती बाळगीत नाहीं. शरीराला लागणाऱ्या वस्तुवर सुद्धां ‘ ही माझी वस्तु ’ असें ममत्व किंवा अभिमान तो ठेवीत नाहीं.–सारांश प्रारब्ध कर्मवशात् तो भोग भोगीत राहतो.

**शिष्य**—निदान मी ब्रह्मवेत्ता आहे हा तरी अहंकार त्याला उत्पन्न होत असेल ?

**गुरु**—नाहीं. हाही अभिमान तो नष्ट करून टाकितो; अथवा हा त्याचा अभिमान नष्ट होतो.–तसेंच ‘ हा मी आहे ’ हाही अभिमान नष्ट होतो.–

ब्रह्ममय जो झाला त्याला 'मी अमुक आहे' असें भानच नसतें, मग अभिमान कोठील? याप्रमाणें स्थितप्रज्ञ करितो काय या प्रश्नाचें उत्तर सांगितलें. असो; ही स्थितप्रज्ञाची स्थिति झाली, त्याला ब्रह्म समजलें, ह्मणजे त्यास मोक्ष मिळतो. जन्ममरणरूपी संसार आणि त्यापासून होणारें दुःख-अथवा अविद्या व तिचें कार्य जो संसार—या सर्वांचा उपशम मोक्ष मिळाला ह्मणजे होतो. या मोक्षालाच निर्वाण असें नांव आहे. सारांश पूर्वोक्त वासनात्याग, निस्पृहत्व, निर्ममत्व, निरहंकारत्व इत्यादिकांच्या साहाय्यानें व वेदांतवाक्यश्रवणानें ब्रह्मज्ञ होतो, व पुढें ब्रह्मच होतो.

**मधु०**—हाच अर्थ सांगतात. **श्रीधर**—आलेले भोग निरिच्छपणानें भोगितो व अप्राप्तभोगाविषयीं निस्पृह, इच्छाशून्य असतो. **शंकरा०**:—पुमान् = पूं ह्मणजे मोक्ष तो मोठ्या प्रयासानें मिळविणारा पुरुष. कामान् = भोगान् = विषयान्, 'कामान्नी कामरूप्यनुसंचरन्,' ही श्रुति वरील अर्थच समर्थन करिते.

**प्रपा०**—पुमान् = साध्य केला आहे पुरुषार्थ ज्यानें तो पुरुष. **द्विवेदी** म्हणतात कीं हा श्रेष्ठ पुरुष मोक्षमार्गानें जात असतां वाटेनें लागणारे जे गृह, दार, पुत्र, संपत्ति इत्यादि जे विषय त्यांचा तृणाप्रमाणें कस्पटाप्रमाणें, उपभोग घेऊन ब्रह्मनिष्ठा कायम ठेवितो. हाच खरा योगी व खरा त्यागी. ह्याप्रमाणें अर्जुनाचे प्रश्नांचा निकाल झाला व ज्ञानबुद्धि यांचें कर्मसंन्यासासहित विवरण झालें.

**रामानुजः**—कामान्—शब्दादि विषय. अनात्मक जो देह त्यावरील आत्मत्वाचा अभिमान टाकून देऊन ज्ञानी वागतो.

**मध्वाचार्य, सत्या०, विद्या०ः**—'निस्पृहः' याचा अर्थ निस्पृहतेनें असा करून तो शब्द विहाय ( टाकून देतो ) इकडे घेतात. ह्मणजे सर्व विषयांचा त्याग हा भगवद्भक्त निस्पृहतेनें करून त्यांचा उपयोग घेतो. निषिद्ध वस्तूंविषयीं अभिलाषविरहित जो असतो तो निस्पृह. चरति = खातो, सेवन करितो. अहंकारः = अस्वरूपाचें ठिकाणीं स्वरूपाची मति, जो मी नव्हे त्यावरच मी अशी भावना होणें तो अहंकार होय.

'त्याज्या सर्वत्र ममता ज्ञात्वा सर्वं हरवेशम्'

( सर्व कांहीं हरीच्या आधीन आहे असें जाणून मनुष्यानें 'हें माझें' हा

अभिमान टाकून द्यावा. ) सारांश हा योगी ( भगवद्भक्त ) निषिद्धाचा त्याग करितो, विहित भोगावरही इच्छा ठेवीत नाहीं, आणि यदृच्छेनें प्राप्त झालेले विषयांचा ममत्वशून्यतेनें उपभोग घेतो.

**राघवेंद्रः**—असा जो भगवद्भक्त आहे, तोच खरा पुरुष आहे. बाकीचे सर्व पशु होत!

**ज्ञानेश्वर, पंडित, रंगनाथ** कांहीं विशेष सांगत नाहींत. ॥ ७१ ॥

सैषा ज्ञाननिष्ठा स्तूयते—

असो; याप्रमाणें स्थितप्रज्ञ ह्मणजे काय यावर व्याख्यान करितांना मुमुक्षूचें कर्तव्य काय आहे, व साधनें कोणतीं तें सांगून ज्ञाननिष्ठेचेंही विवरण येथपर्यंत केलें. आतां त्या ज्ञानानिष्ठेची फलश्रुति सांगितली असतां मुमुक्षूचे कर्तव्यास ह्मणजे कामनेचा नाश करण्यास दुजोरा येईल असा विचार करून ज्ञाननिष्ठेचें स्तवन कारितातः—

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ॥**
**स्थित्वाऽस्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

**पार्थ** ( कुन्तीपुत्रा अर्जुना ! ) **एषा** ( हा वेळपर्यंत वर्णन केलेली ही ) **ब्राह्मी स्थितिः** ( ब्रह्ममयच करणारी स्थितप्रज्ञाची स्थिति अथवा त्याचें ज्ञान, त्याचें कर्म, त्याच्या इच्छा, सारांश त्याचें शारीरिक, मानासिक, व धार्मिक वर्तन )—सांगितलें.—सारांश विद्वान पुरुषाचें मन ब्रह्ममय झाल्यानंतर त्याच्या आचार, उच्चार, विचारांची स्थिति सांगितली.--अर्जुना !--**एनां** ( ही स्थितप्रज्ञाची स्थिति ) **प्राप्य** ( प्राप्त ) झाली असतां ) **न विमुह्यति** ( कोणत्याही प्रकारचा मोह, अहंत्वाभिमान, उत्पन्न होत नाहीं. )**अस्यां** ( ह्या वृत्तीमध्यें ) **अन्तकालेऽपि** ( देह जीवांचा वियोग होणार त्या वेळीं सुद्धां ) **स्थित्वा** ( राहिलें तर, त्यावेळीं ही स्थिति प्राप्त झाली तरी सुद्धां ) **ब्रह्मनिर्वाणं** ( जन्ममरणरहित अशा ब्रम्हसुखाप्रत ) **ऋच्छति** ( पावतो ) सारांश ही स्थिति प्राप्त झाल्यावर ममत्वाचा मोह नष्ट होतो. आणि अंतकाळीं जरी

एखाद्याचा ममत्वाभिमान नष्ट होऊन ब्रम्हाकार वृत्ति झाली, तथापि तो मुक्त होतो.—

इति श्रीमहाभारते शतसाहस्त्र्यां संहितायां वैयासिक्यां भीष्मपर्वणि
श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो
नाम द्वितियोऽध्यायः ॥२॥

श्रीमन्महाभारतांतील व्यासमुनिप्रणीत शंभर हजार संहितेपैकीं भीष्मपर्वांतील श्रीमद्भगवद्गीतानामक उपनिषदांमधील श्रीकृष्णार्जुन संवादांत उत्पन्न झालेल्या वेदांतांतील योगशास्त्रांत **सांख्ययोग नामक** द्वितीय अध्यायाचें मूळ संपलें.

एषा ब्राह्मीति । एषा यथोक्ता ब्राह्मी ब्रह्मणि भवेयं स्थितिः सर्वं कर्म संन्यस्य ब्रह्मरूपेणैवावस्थानमित्येतत् । हे पार्थ नैनां स्थितिं प्राप्य लब्ध्वा न विमुह्यति न मोहं प्राप्नोति । स्थित्वाऽस्यां स्थितौ ब्राह्मयां यथोक्तायामन्तकालेऽप्यन्ते वयस्यापि ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मनिवृतिं मोक्षमृच्छति गच्छति किमु वक्तव्यं ब्रह्मचर्यादेव संन्यस्य यावज्जीवं यो ब्रह्मण्येवावतिष्ठते स ब्रह्मनिर्वाणमृच्छतीति ॥ ७२ ॥

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीम
च्छंकरभगवतः कृतौ श्रीमद्भगवद्गीताभाष्ये सांख्ययोगो नाम
द्वितियोऽध्यायः ॥ २ ॥

याप्रमाणें—स्थितप्रज्ञाचें लक्षण काय, तो बोलतो कसें, त्याचें कर्म कसें असतें, वगैरे जे चार प्रश्न, अर्जुना! तूं विचारिलें होतेंस त्यांचें उत्तर देण्यासाठीं ह्मणून ही ब्रह्मज्ञाची, सर्व ऐहिक व पारलौकिक वासनांचा व सकाम कर्मांचा त्याग करून ब्रह्म रूपानेंच राहणाऱ्या अद्वैतज्ञाची, स्थिति तुला सांगितली. ही स्थिति प्राप्त झाली, नित्य सुखासाठीं अनात्मक विषयांची व विषयवासनांची आराधना करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं अशी समजूत दृढ झाली म्हणजे त्या अधिकारी पुरुषाला कोणत्याही प्रकारचा मोह, कोणत्याही प्रकारचा ममत्वाभिमान, उरत नाहीं, व उत्पन्नही होत नाहीं. जड व अनात्मक विषयांविषयीं ज्याला बळकट तिरस्कार विचारपूर्वक उत्पन्न झाला तो पुरुष पुनः मायेच्या मोहजालांत सांपडत नाहीं.--अर्जुना,! हा आत्मानात्म-

विवेक व हें आत्मचिंतन आणि हें विषयवैराग्य केंव्हांही उत्पन्न झालें, फार काय सांगावें ?--उतार वयांत--निदान अगदीं देहावसान समयीं--जरी झालें तरी मोक्षाप्रत--जन्ममरणरहित अशा ब्रह्मस्थितीप्रत तो अधिकारी पुरुष जातो ! मग ब्रह्मचर्याच्या आश्रमांतच ह्मणजे अगदीं बालवयांतच विषयवैराग्य उत्पन्न होऊन त्यानें संन्यास घेतला, विषयत्याग, वासनात्याग, केला आणि देह आहे तोंपर्यंत ब्रह्मचिंतनांतच ब्रह्म होऊन राहिला तर देहावसान झाल्यानंतर तो पुरुष ब्रह्मच होतो हें सांगण्याची तरी अवश्यकता आहे काय ?

याप्रमाणें श्रीगोविंदपूज्यपादांचे शिष्य श्रीशंकराचार्य यांनीं केलेल्या द्वितीय सांख्ययोग नामक अध्यायाचें मूळ भाष्य संपलें. ॥ २ ॥

**मधुः**—स्थिति--निष्ठा, सांख्यनिष्ठा ही निष्काम कर्मयोगापासून निर्माण होते. यांनीं या अध्यायाचें तात्पर्य असें दिलें आहे:—

" ज्ञानं तत्साधनं कर्म सत्त्वशुद्धिश्च तत्फलम् ।
तत्फलं ज्ञाननिष्ठैवेत्यध्यायेऽस्मिन्प्रकीर्तितम् ॥ "

( प्रथम ज्ञान, मग तें प्राप्त करून देणारें कर्म, त्याचें साक्षात् फल चित्तशुद्धि, व तिचें फल ज्ञाननिष्ठा ह्या गोष्टी ह्या अध्यायांत सांगितल्या आहेत. )

**श्रीधरः**—कर्माच्या, परमेश्वराराधनेच्या योगानें सत्त्वशुद्धि होते असें म्हणतात. यांचें तात्पर्य.—

" शोकपङ्कनिमग्नं यः सांख्ययोगोपदेशतः ।
उज्जहारार्जुनं भक्तं स कृष्णः शरणं मम ॥ "

( शोकपंकांमध्यें बुडालेल्या, अडकलेल्या, अर्जुनास सांख्ययोगाचा उपदेश करून ज्या कृष्णानें आपल्या अर्जुन भक्तास बाहेर काढिलें तो श्रीकृष्ण माझें आश्रयस्थान आहे व असो. )

**शंकरा०**—खट्वांग राजाला मरण समयीं ज्ञानमार्ग कळला व तो त्या ज्ञानानें ब्रह्ममय होऊन मुक्त झाला असा दाखला देतात.

**मपा०ः**—यांचें तात्पर्य.

" शोको देहात्मबुद्धावनुभवति मृषा येन देहातिरिक्तो
देहद्रष्टैक आत्मा विभुरनुपहतो हन्तृहन्यत्वशून्यः ॥
तस्य ज्ञानान्न शोकस्तदिह निजमनःशुद्धितः सा स्वधर्मा
द्वेदोक्तः स द्वितीये भृशमिममवदत्सांख्ययोगाधिकारम् "

देहापासून भिन्न असून देहाचा साक्षी असणारा आत्मा एकच आहे, सर्वव्यापी आहे, अविकृत व अविकार्य आहे, मरणारा व मारणारा नाहीं, असें ज्ञान झालें असतां देह हाच आत्मा आहे असें मानणाऱ्या अज्ञानी लोकांचा शोक व्यर्थ होतो, अर्थात शोक नष्ट होतो. वरील लक्षणांनीं युक्त असणाऱ्या आत्म्याचें ज्ञान चित्तशुद्धीनें होते. चित्तशुद्धि स्वधर्माचरण निष्काम बुद्धीनें केलें असतां उत्पन्न होते आणि स्वधर्माचें ज्ञान वेदाध्ययनानें होते. असो; हें व सांख्य आणि त्यांचा अधिकार हीं सर्व प्रकरणें संक्षेपानें दुसऱ्या अध्यायांत सांगितलीं आहेत.

**द्विवेदी**—अंतकाले=मरणाच्या वेळीं. हाच अर्थ **पंचदशीकारांस** मान्य आहे. हें ज्ञान परिपक्क झालें तर याच जन्मीं मोक्ष मिळतो, परिपक्क नाहीं झालें तर पुढील जन्म चांगला येतो व तेथें ज्ञानदशा पूर्ण होऊन मोक्ष मिळतो. (पहा अध्याय २ श्लो० ४० व अध्याय ६ श्लो० ३७ ते ४७.) **पर्वते** यांचा असाच अभिप्राय आहे.

**रामानुज.**—एषा स्थितिः=आत्मा नित्य आहे असें ज्ञान प्राप्त झाल्यावर निष्काम कर्ममध्यें असणारी जी निश्चयात्मक व ब्रह्म मिळवून देणारी स्थिति. कर्म करीत असतां मनाची ही स्थिति असली ह्मणजे मनुष्य संसारात पडत नाहीं; तर आनंदच आहे लक्षण ज्याचें अशा आत्म्याप्रत जातो.' दुसऱ्या अध्यायाचें तात्पर्य सांगतातः—'याप्रमाणें आत्म्याचें यथार्थ ज्ञान आणि युद्ध नामक स्मार्त व निष्काम कर्मापासूनच तें उत्पन्न होत असतें ही गोष्ट, ह्या दोन्ही माहित नसणाऱ्या व शरीर हाच आत्मा आहे अशा अज्ञानानें मूढ होऊन युद्धापासून पराङ्मुख झालेल्या अर्जुनाचें समाधान करण्यासाठीं सांख्यज्ञान (यांत आत्मा नित्य आहे असें ज्ञान होतें) व निष्कामकर्मापासून उत्पन्न होणारी व पुढें आत्मज्ञान करून देणारी स्थितप्रज्ञता,--ह्मणजे आत्मा नित्य आहे हें ज्ञान मिळविण्याचा उपाय (निष्काम कर्मयोग व स्थिरबुद्धि) हे दोन विषय या अध्यायांत सांगितले आहेत. याच अर्थी श्लोकः—

"नित्यात्मासंगकर्मेहागोचरा सांख्ययोगधीः ।
द्वितीये स्थितधीलक्ष्या प्रोक्ता तन्मोहशान्तये ॥"

**मध्वाचार्य** व **सत्यानंद** ह्मणतातः—मरणकालीं जर ब्रह्माची, विष्णुपदाची स्मृति असेल तर मात्र ब्रम्हनिर्वाणाला ह्मणजे अशरीर जो विष्णु त्याच्या

पदाला जातो. ह्मणजे मरणसमयीं जर भगवत्स्मरण होईल तरच मोक्ष आहे. नाहीं तर नाहीं. ज्ञानी असो वा कर्मठ असो, अंतकालीं जर त्याला भगवत्स्मृति नसेल तर तो जन्मांतराला जातो ! संसारांत पुनः पडतो ! प्रारब्धकर्म संपलें तर ती स्मृति भगवद्भक्ताला मात्र होते. इतरांस होत नाहीं. नुसतें ज्ञान अगर नुसतें कर्म उपयोगीं नाहीं. प्रारब्ध संपलें नसलें तर पुनः जन्मास यावें लागतें, तसेंच प्रारब्ध संपूनही व ज्ञान असूनही भगवत्स्मरण झालें नाहीं तर पुनः जन्म घ्यावा लागतो; हें सिद्ध करण्यास या द्वैताचार्यांनीं वराहपुराण व गरुडपुराणाचे आधार व श्रुतिस्मृतींचें आधारांचा आभास दाखविणारीं वचनें दिलीं आहेत. त्यांतच सांख्य, योग, वेदांत वगैरे दर्शनें लोकांस मोह पाडण्यासाठीं भगवंताच्या आज्ञेनें शंकरानें निर्माण केलीं असें वराहपुराणांतील श्लोक अवतीर्ण करून ह्मटलें आहे ! शेवटीं श्रीविष्णु देवता सशरीर आहे असें सिद्ध करण्यासाठींही बरेच वेंचे घेतले आहेत. सारांश सगुण मूर्तीची उपासना केली तरच मोक्ष मिळतो असें द्वितीयाध्यायाचें सार काढलें आहे ! या अध्यायाच्या उपसंहारांत द्वैत व उपासना मार्गाचा विचार करूं. **राघवेंद्रयतींचा** अर्थ वरील अर्थाहून फारसा भिन्न नाहीं.

**ज्ञानेश्वरांचा** ' स्थित्वाऽस्यामंतकालेऽपि ' चा अर्थ पहाः--जे चिद्रूपीं मिळतां । देहांतीची व्याकुलता । आड ठाको न सके चित्ता । प्राज्ञा जया (ज्या ब्राम्ह स्थितीनें ) ॥ सारांश ब्रह्मस्वरूपी झाल्यावर अंतकालच्या वेदनाही कष्ट देण्यास असमर्थ होतात.

**पंडितांचा** अर्थ आचार्यांसारखाच आहे. उपसंहार :—हा अध्याय दुसरा । ज्यांत संक्षेप सारा । **अठरा अध्यायांच्या सारा** । वदे श्रीकृष्ण ॥

**रंगनाथस्वामींनीं** या द्वितीयाध्यायाचे माहात्म्यपर एक गोष्ट सांगून आपली ' चित्सदानंदलहरी ' नामक टीका या अध्यायापुरती समाप्त केली आहे.

**मधुसूदनीकारांनीं** या काण्डात्रितयात्मक गीताशास्त्रांतील प्रत्येक कांडाची व प्रत्येक अध्यायाची संगती दाखविली आहे ती अशी. प्रथम काण्डांत ह्मणजे पहिल्या सहा अध्यायांमध्यें कर्मत्याग मार्गानें विशुद्ध आत्मा जो ' त्वं ' पदार्थ त्याचें सोपपत्तिक निरूपण केलें आहे. ( दुसऱ्या व तिसऱ्या काण्डांतील विषयांचा विचार सातव्या व तेराव्या अध्यायाचे वेळीं करूं.

पहिल्या षडध्यायींतील पहिला अध्याय उपोद्घातरूप आहे. दुसऱ्या अध्यायांत सर्व गीताशास्त्राचें सार सूत्ररूपानें वर्णिलें आहे तें असें!—**'योगस्थः कुरु कर्माणि'** (एक निष्ठ चित्त करून कर्मे कर) या ४८ व्या श्लोकांत चित्तशुद्धि उत्पन्न करणाऱ्या निष्कामकर्मनिष्ठेचें सूत्र आहे. ह्मणजे या ४८ व्या श्लोकरूपी सूत्रावर निष्काम कर्मनिष्ठेचें सोपपत्तिक व्याख्यान तिसऱ्या व चवथ्या अध्यायांत आहे. तिसऱ्या अध्यायांत सामान्य स्वरूप आहे व चवथ्या अध्यायांत सत्त्वशुद्धिजनक निष्काम कर्मनिष्ठेचें विशेष स्वरूप आहे. **'विहाय कामान्यः सर्वान्'** (तिन्ही प्रकारच्या कामनांचा त्याग करून) या ७१ व्या श्लोकांत चित्तशुद्धि झालेल्या मुमुक्षूची शमदमादि साधनपूर्वक सर्वकर्मसंन्यासनिष्ठेचा पांचव्या व सहाव्या अध्यायांत सामान्य विशेष रूपानें प्रपंच केला आहे. याप्रमाणें पहिल्या कांडांतील तिसऱ्या चवथ्या व पांचव्या सहाव्या अध्यायांची सूत्रमालिका सांगितली. बाकीचा विचार पुढें करूं. याप्रमाणें 'तूं विशुद्धात्मा कोण आहेस' तुझा प्रपंच कसा नष्ट होईल, मुमुक्षु असशील तर निष्काम कर्माची व कर्म संन्यासाची कशी अपेक्षा आहे, निष्काम कर्म काय तें करून त्याही कर्माचा सर्वस्वी त्याग करणारा सोपाधिक आत्मा जो जीव त्याला मोक्षपदाची प्राप्ती करून ध्यावयाची असल्यास आपण कोण आहों याची ओळख पटली पाहिजे. विषय मी नव्हे बुद्धीपासून तों इंद्रियांपर्यंत अनेक मानासिक वृत्तीपैकीं कोणतीही किंवा सर्व मी नव्हें अशी समजूत दृढ करण्यासाठीं प्रथमकांडाची योजना आहे. सारांश 'तत् त्वं असि' या महावाक्यांतील त्वं पदार्थाची उपपत्ति पहिल्या कांडांत केली आहे असा मधुसूदनीकार यांचा व बहुतेक सर्व अद्वैतवादी तत्त्वज्ञांचा अभिप्राय आहे.

माझ्या अल्प समजुतीप्रमाणें पहिल्या सहा अध्यायांत गीताशास्त्राच्या प्रकटनसमयीं जे अनेक मोक्षमार्ग प्रचलित होते त्यांपैकीं सांख्य, योग, कर्म, उपासना वगैरे मार्गांचें परीक्षण व एकवाक्यता अथवा समीकरण आणि तत्त्वनिश्चय हे पहिल्या षडध्यायीचें कार्य आहे. असो; जेथें जेथें प्रचलित मार्गाचें परीक्षण आहेसें वाटतें तेथें तेथें मी नामानिर्देश करण्यास सुरुवात केलीच आहे. हा निर्देश होणें परमेश्वरी अनुभवावरच प्रायशः अवलंबून आहे. मानवी साधारण बुद्धि बिचारी किती धडपड करील!

---

# दुसऱ्या अध्यायाचा उपसंहार.

यप्रमाणें यथामति व यथाशक्ति दुसऱ्या अध्यायाचें निरूपण केलें. दुसऱ्या अध्यायांत गीताशास्त्राचें सर्व सार सूत्ररूपानें आलें आहे. तें कसें कसें आलें आहे त्याची व्यवस्था मधुसूदनी टीकाकारांनीं केली आहे, त्यापैकीं पहिल्या षडध्यायीचा प्रकार मागें सांगितलाच आहे. आतां माझें कर्तव्य इतकेंच राहिलें आहे कीं, पुनः एकदा विस्तृत रीतीनें सिंहावलोकन करून पुढाल मार्गक्रमणास लागावयाचें. हें सिंहावलोकन करण्यापूर्वीं ज्या **श्रीसच्चिदानंदाच्या** प्रेरणेनें **गीताशास्त्राचें** पुनरुज्जीवन महाराष्ट्रभाषाद्वारा करण्याची मला स्फुर्ति झाली त्याला आदरपूर्वक, नम्रतेनें आणि अनन्यभावकपूर्वक शरण जाऊन त्यापाशीं अशी करुणा भाकितों कीं विविधउपाधींनीं गांजून गेलेल्या मानवी चित्तास समाधानरूपी अमृतसंजीविनी मात्रा व कर्तव्यलालसारूपी रामबाण औषध देऊन गीताशास्त्रद्वारा ( निवृत्तिमार्गानें ) स्वस्वरूपाकडे जाण्याची सर्वांची प्रवृत्ति असूं दे.

मानवी देह हा श्रेष्ठ आहे; कारण ह्या देहाच्या साहाय्यानें जीवाचा मुख्य पुरुषार्थ जो मोक्ष त्याची प्राप्ति करून घेतां येते, सर्व प्रकारच्या आधिभौतिक अध्मात्मिक व आधिदैविक सुखदुःखांचा व वासनांचा परिहार होऊन स्वस्वरूपीं लीन होण्याची योग्यता व पात्रता नरदेहास येते, अशा प्रकारचा दुंदुभी सर्व संस्कृत धर्मामध्यें मानवी जगाच्या उत्पत्तीपासून एकसारखा दुमदुमत आहे. स्वस्वरूप कोणतें याविषयीं मतभेद आहे; तें निजरूप मिळविण्याचें उत्कृष्ट साधन कोणतें याविषयीं अभिमानवशतेमुळें मतवैचित्र्य आहे; तथापि **'धन्य धन्य हा नर देहो । येथील अपूर्वता पहाहो । जो जो कीजे परमार्थ लाहो । तो तो पावे सिद्धीतें'** या प्रसिद्ध **श्रीसमर्थांच्या** उक्तीनुसार सर्वत्र ऐकमत्यच आहे. असो; तेव्हां या जन्माचें सार्थक्य करावयाचें ही प्रत्येक सुजाण मनुष्याची लालसा असते व असावी हें निर्विवाद आहे. आतां जन्माचें सार्थक्य म्हणजे काय व तें साध्य करण्याचीं साधनें कोणतीं अगर साधन कोणतें

व दुसऱ्या अध्यायांत जें उत्कृष्ट साधन सांगितलें आहे तें जगामध्यें प्रचलित असणाऱ्या अनंत साधनांतून श्रेष्ठ आहे कीं नाहीं हें पाहून पुढील मार्गक्रमणास आरंभ करूं. सारांश जीवाचें कर्तव्य व त्याचें साधन यांचा विचार करूं.

ज्या निर्विकार, निरामय, निरंजन स्थितींतून बाहेर पडून आपण जन्ममरणाच्या चक्रांत सांपडलों व भवसागराच्या विषयरूपी अनंत लहरींवर हेलकावे खात राहिलों आहों, सर्व विश्व आपणच असतां, नेत्र, कर्ण इत्यादि पंचज्ञानेंद्रियांच्या द्वारा होणाऱ्या विकृत ज्ञानानें 'हें माझें,' 'हें तुझें' असें अज्ञानानें म्हणावयास लागून कामक्रोधलोभादिकांच्या तावडींत आपण सांपडलों, तें सर्व झिडकारून देऊन भवसागर तरून जावयाचें, जन्ममरणांतून सुटावयाचें व पुनश्च त्या अनंत व विकारशून्य अशा स्वस्वरूपामध्यें जाऊन मिळावयाचें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य असें असावें कीं आपण निजधामास गेलों असतां पुनः कर्तव्य ह्मणून उरूं नये, वासना, कामना, आशा, मनीषा वगैरे सर्व नष्ट व्हाव्या, सुखदुःख अस्तंगत व्हावें, आणि निजानंदामध्यें सुखरूप रहावयास सांपडावें. सारांश 'आपण कोण?' 'आलों कोठून?' 'जावयाचें कोठें?' 'करावयाचें काय?' 'व तें कां करावयाचें?' 'हें विश्व काय आहे?' याचा व आपला संबंध काय?' इत्यादि अनंत प्रश्नांचा सोपपत्तिक उलगडा होऊन कांहीं शिकावयाचें, करावयाचें अगर मिळवावयाचें राहूं नये. हीच मोक्षाची खरी स्थिति व खरें स्वरूप होय. बौद्ध, ख्रिस्ती अगर मुसलमानी इत्यादि धर्मांसही हें मोक्ष स्वरूप पुरेंसें न कळल्यांमुळें ते ते धर्म व त्यांतील भक्त व उपासक, तसेंच आमच्यांतीलही द्वैतवादी, विशिष्टाद्वैतवादी व शुद्धाद्वैतवादी संशयसागरांमध्यें गटंकळ्या खात राहिले आहेत. 'सर्व एकच आहे,' ही वृत्ति पुरी बाणल्याशिवाय मोक्ष नाहीं, व संशय फिटत नाहीं. आतां कर्म, उपासना व भेदज्ञान इत्यादिकांचे योगानें इतिकर्तव्य संपत नाहीं, असा सर्वत्र अनुभव आहे. एखाद्या अत्युत्कृष्ट चित्राची खरी पारख होण्यास किंवा एखाद्या तानसेनी गंधर्वाच्या मधुर गायनाचें रससर्वस्व प्रतीत होण्यास, अथवा एखाद्या गहन विषयाचें पूर्ण रहस्य कळण्यास ज्याप्रमाणें तल्लीन--नव्हे! तद्रूपच व्हावें लागतें, त्याचमार्गें--नव्हे! त्याच्याही पलीकडे जाऊन, विषयरूपच होऊन इतर भान अस्तंगत करून घ्यावें लागत असतें! ही जर एका मर्यादित विषयाची गोष्ट तर ज्या अमर्याद

विश्वचक्राची अघटित मांडणी आपल्या सभोंवतीं दिसत आहे, तिच्याशीं व ज्याच्या सत्तेनें आपण व हें विश्व निर्माण झालीं, त्या सच्चिदानंदघन व अखंडैकरस परब्रह्माशीं एकतानता, एकरूपता, सारांश एकत्व झाल्याखेरीज हा अनादि दिसणारा परंतु सांत असा प्रपंचही सुटावयाचा नाहीं व प्रपंच आहे तावत्कालपर्यंत आपलें कर्तव्यही सुटावयाचें नाहीं, हें स्पष्टच आहे. हाच मोक्षशास्त्राचा ह्मणजे गीता व उपनिषदांचा निराबाध सिद्धांत आहे. या सिद्धांताचें सत्यत्व आपण साधनांचा विचार साधकबुद्धीनें करीत असतां स्थापित करूं.

यच्चयावत जेवढे ह्मणून धर्म आहेत, त्यांत कर्म उपासना आणि ज्ञान या तीन मार्गांनीं किंवा या तिहींपैकीं एका मार्गानें मनुष्य मुक्त होतो असा सिद्धांत आहे. आग्रहवादी लोक मात्र म्हणत असतात कीं, मुक्ति मिळेल ती आमच्याच मार्गाचें अवलंबन केलें असतां मिळेल ! कोणी ह्मणतात कीं केवळ कर्मानें इतिकर्तव्यता संपते, कोणी उपासनेनेंच पुरुषार्थ साध्य करून घेण्यांत गुंतलेले असतात, व कोणी केवळ ज्ञानमार्गानें इष्ट हेतु साध्य होतो असें म्हणतात. प्रथम कर्मवादी लोक घेऊं. या सदरांत आमचे सनातन वैदिक धर्माभिमानी कर्मठ लोक, आधुनिक नास्तिक, स्याद्वादी ( scpties ) काय असेल तें असो असें ह्मणणारे ), अज्ञेयवादी ( agnostics, काय आहे तें आपल्यास माहित होणें नाहीं असें म्हणणारे ) नीतिवादी ( moralists) सत्कर्मवादी वगैरे लोकांचा अंतर्भाव होतो. स्वतःचें, स्वजातीचें, मानवी जातीचें किंवा भूतमात्रांचें कल्याण होईल अशीं कृत्यें चांगलीं व बाकीचीं वाईट असें अधिकारानुसार ह्मणणारे हे लोक आहेत. स्वतःचेंच कल्याण करून घेणारे खालच्या पायरीचे, स्वजातीचें कल्याण करणारे त्यांतून श्रेष्ठ, त्यांच्यापुढील यांहून श्रेष्ठ अशी उत्तरोत्तर श्रेष्ठपरंपरा आहे. सत्कर्म म्हणजे सुखोत्पादक कर्म केलें असतां येथें अगर अन्यत्र सुख उत्पन्न होतें व सुख मिळविणें हाच पुरुषार्थ आहे असें यांचें मत आहे. प्राणीमात्र स्वतःच्या संरक्षणासाठीं व स्वजातीच्या वृद्धीसाठीं नेहमीं कर्म करीतच असतो अगर त्याच्या हातून कर्म होत असतें. ही प्राथमिक स्थिति होय. पुढें स्वतःचें व स्वजातीचें संरक्षण व्हावें व त्यास सुख मिळावें ह्मणून जीं विचारपूर्वक कर्मे करावीं लागतात, तीं समाजाच्या व समाजाधिपतींच्या

साहाय्यानें होत असतात. याच्याही पुढें आपण म्हटलेला इष्ट हेतु आपल्या स्वतःच्या श्रमानें अगर समाजाच्या साहाय्यानेंही सिद्धीस जात नाहीं, असें पाहून जगास कोणी तरी नियंता असलाच पाहिजे व त्याचा अनुग्रह संपादन करून घेतलाच पाहिजे असें ज्ञान उत्पन्न झाल्यावर कामुकबुद्धीनें ईश्वराचें सहाय्य उपासनारूपानें मनुष्यें मिळवूं लागतात, व जोंपर्यंत शुद्धभाव व शुद्ध-भक्ति आहेत तोंपर्यंत ईश्वरांचा अनुग्रह होण्यासारखीं कर्में भक्तिबळानें मनु-ष्यांकडून होतही असतात. सारांश जगाची प्रगति होत असतां कर्म, संयुक्त कर्म व उपासनापूर्वक कर्म अशी कर्मामध्येंही प्रगति होत असते. येथें सुख, अथवा स्वसंरक्षण आणि जातिसंरक्षण, ही प्रधान वस्तु आहे व ही प्रयत्न-साध्य आहे. या प्रयत्नास अगर कर्मास जगन्नियंत्याची उपासना व ज्या विश्वामध्यें आपण असतो त्याचें यथाशक्ति ज्ञान या गोष्टी अवश्य आहेत म्हणजे उपासना व ज्ञान हीं कर्माचीं साधनें असून उपासनेसह व विषयज्ञा-नासह केलेलें कर्म इहपरत्र सुख देण्यास व जातिसंरक्षण करण्यास समर्थ आहे असा कर्मठांचा सिद्धांत आहे. हें सुख कां मिळवावयाचें व ही सचेतन सृष्टि जतन करून कां वृद्धिंगत करावयाची या प्रश्नाला कर्मठांपाशीं उत्तर नाहीं. सुखाचा उपभोग घेणें व सुख मिळविण्यासाठीं जगणें हाच आमचा पुरुषार्थ व या पुरुषार्थाविषयीं वासना उत्पन्न होणें हा आमचा देहधर्म येवढेंच काय तें उत्तर त्यास देतां येतें! दुःखाशिवाय उपभोग देणारें सुख असूं शकणार नाहीं, म्हणून सुख भोगण्याची इच्छा धारण केली असतां अनुषंगानें दुःख प्राप्त होण्याचा संभव असतोच असतो. सारांश कर्मठांनीं आपल्या इंद्रियजन्य व बुद्धिजन्य ज्ञानानें मानवी ज्ञानाची कितीही मर्यादा वाढ-विली, ज्ञानसहित कर्म करून उपभोगाचे पदार्थांत जरी अमर्याद भर घातली, तरी जोंपर्यंत मी निराळा व विश्व निराळें अशी बुद्धि कायम आहे, जोंपर्यंत उपासना मार्गही पतकरून ईश्वराजवळ 'मला सुख दे' अशी भिक्षा मागण्याची पद्धति जिवंत आहे, सारांश जोंपर्यंत भेदबुद्धि कायम ठेवून सुख मिळावें अशी वासना जिवंत ठेवावयाची आहे व त्या वासनेनुसार कर्तव्य करावयाचें शिलक राहणार आहे, तोंपर्यंत खरें, शुद्ध, नित्य आणि निर्विकार असें अद्वैत सुख मिळणें शक्य नाहीं. हिंदु कर्मठ यज्ञयागादिक करून कदाचित देवतादयेनें इहलोकीं व परत्र कांहीं सुख मिळवूं शकतील,

स्याद्वादी, अज्ञेयवादी, व नास्तिकवादी ज्ञानाचें व नीतिमत्तेचें प्रमाण वाढवून कदाचित हल्लीं मिळत आहेत त्यापेक्षां जास्त पदार्थभोगांचा उपभोग जास्त लोकांस मिळवून देतील, पण भेदबुद्धि कायम राहिली असल्यामुळें तें सुख व ते भोग हे कालाच्या तडाक्यांत सांपडून जातील व पुनः मनाला जें समाधान पाहिजे तें मिळणार नाहीं ! ह्या सर्व आर्य व अनार्य कर्मठवाद्यांत एक दोन सिद्धांत गृहीत घेतलेले असतात. ( १ ) ज्याप्रमाणें वासना असते त्याप्रमाणें कर्म करण्याची बुद्धि होते व ज्याप्रमाणें ह्या जन्मीं अगर पूर्वजन्मीं कर्म केलें असेल, तदनुसार वासना उत्पन्न होते. ह्मणजे कर्म आणि वासना ही परस्परांच्या आश्रयांवर अवलंबून आहेत; (२) दुसरे गृहीतकृत्य हें आहे कीं वासनायुक्त अगर वासनाशून्य कर्माचा कांहीं तरी परिणाम हटकून व्हावयाचाच. व तो परिणाम ज्याप्रमाणें कर्मसामर्थ्य असेल त्याप्रमाणें नियमित कालपर्यंत कांहीं ठराविक सामर्थ्यानें प्रकट व्हावयाचाच. अथवा कर्म वासनेनें उत्पन्न होतें आणि कोणतेंही कर्म कधींही व्यर्थ होत नाहीं. वासनेंत कलह झाला, कर्म व विरुद्ध कर्म यांचें रण माजलें तर परिणामाची दिशा बदलेल, पण परिणाम झाल्याखेरीज राहणार नाहीं. हे दोन्हीं असाध्य ( सिद्ध करावयास न येणारे ) सिद्धांत सर्व कर्मठांस मान्य आहेत, आणि ह्मणूनच त्यांची कर्माकडे प्रवृत्ति आहे. हे सिद्धांत आमच्या पूर्वजांनीं हजारों वर्षांपूर्वीं शोधून काढले व आलीकडील अनुभवशास्त्रांनींही हे खरे ठरत आहेत, यावरून आमच्या अतिप्राचीन पूर्वजांची प्रखर बुद्धिमत्ता प्रकट होते हा भाग स्वतंत्र आहे, व त्याचा येथें विचारही करावयाचा नाहीं. ध्यानांत ठेवावयाची गोष्ट इतकीच आहे कीं, जीवाचें सार्थक निवळ कर्ममार्गानें अगर सकाम ईश्वरोपासना आणि विषयज्ञान यांनी मिश्रित झालेल्या कर्मानें होत नाहीं, कारण वासना जिवंत राहते, कर्तव्य संपत नाहीं, भेदबुद्धि अस्तंगत होत नाहीं, आणि ह्मणून सद्वस्तुज्ञानपूर्वक शुद्ध समाधानही होत नाहीं.

याप्रमाणें कर्ममार्गानें इष्ट हेतु साध्य होत नाहीं, हें तत्त्व आमच्या पूर्वजांस उपनिषत्कालाच्या पूर्वींच ह्मणजे सुमारें तीन हजार वर्षांपूर्वींच समजलें होतें; ह्मणजे ईश्वर, विश्व आणि जीव या भिन्नत्वानें दिसणाऱ्या त्रयीपैकीं विश्वाचें ज्ञान भेदबुद्धीनें,—ईश्वराच्या सकाम उपासनेसह, जीवास सुख व्हावें यासाठीं,--संपादन करून तदनुसार सत्कर्म केलें, ज्ञानसीमा वाढविली तथापि

कार्यसिद्धि होत नाहीं असें त्यांस फार प्राचीन कालीं समजलें. शारीरिक यात्रेसाठीं कर्म करावयाचें हें ठरलें, पण शारीरयात्रा कशाला? ह्या प्रश्नाचें सयुक्तिक उत्तर त्यांस देतां येईना; तेव्हां जीवाचें सुख वाढवावयाचें हा संकल्प चांगला आहे, तथापि ' मी, तूं व तें ही भेदत्रयी कायम आहे तोंपर्यंत निर्मळ सुख मिळावयाचें नाहीं असें त्यास समजल्यावरून ते विषयसुखाला कंटाळले व स्वार्थ वाढविणाऱ्या कामक्रोधादिकांचा त्याग करून विषयत्यागाचा व स्वार्थत्यागाचा त्यांनीं अंगीकार केला व ज्ञानमार्गाच्या पाठीमागें ते लागले. आमच्या येथें ह्या ज्ञानमार्गाचे अनेक पंथ निघाले व हल्लीं जगावर अनेक ज्ञानमार्ग उपलब्ध आहेत. सांख्य, योगी, नैयायिक, मीमांसक, बौध्य, जैन, द्वैतवादी, मध्वानुयायी, विशिष्टाद्वैतवादी रामानुज, शुद्धाद्वैतवादी वल्लभ, व केवलाद्वैतवादी शंकराचार्य असे अनेक आचार्य प्राचीन व अर्वाचीन कालांत उत्पन्न झाले आहेत हे सर्व कमी अधिक प्रमाणानें ज्ञानमार्गीच आहेत. खिस्तानुयायी, महमदानुयायी, हेही ज्ञानमार्गाचेच होत. हे द्वैतवादी आहेत व यांच्या व आमच्या द्वैतवादामध्यें पुष्कळच साम्य आहे. उपासनाप्रकरण हें दोन्ही द्वैतवाद्यांत प्रधानत्वानें समान आहे. उपासनाप्रकरण प्रस्तुत प्रसंगीं अप्रस्तुत आहे व सध्या केवळ रामानुज, मध्व व आचार्य यांच्या ज्ञानमार्गाचाच विचार कर्तव्य आहे म्हणून सद्विकारांनीं प्रेरित झालेल्या उपासनेचा विचार एकीकडे ठेवून ज्ञानमार्गाकडे वळतो.

सत्कर्म करून किंवा असत्कर्म करून विषयांचा कितीही उपभोग घेतला तरी वासना नष्ट होत नाहीं इतकेंच नव्हे तर तैलपूरित दीपज्वालेप्रमाणें उपभोगानुसार वृद्धिंगतच होत जाते व तदनुसार कर्म वाढत राहून इतिकर्तव्यता संपत नाहीं व चित्तास समाधान होत नाहीं, असा अनुभव येऊन ज्यांस वासनेचा व कर्माचा वीट आला, 'हा मी,' ' हें माझें ' ' हा तूं ' 'हें तुझें,' अशी भेदबुद्धि कायम आहे तोंपर्यंत वासनेचा उच्छेद होत नाहीं व हा उच्छेद न झाल्यामुळें अनेक प्रसंगीं मनास मलिनता आणणारीं कर्में करावीं लागतात, अनाचार करावा लागतो आणि देहदंड व मनोदंड भोगावे लागतात असें ज्यांस स्वतःच्या व इतरांच्या अनुभवावरून कळून चुकलें. तसेंच ज्या विश्वाचा उपभोग घेण्यासाठीं विश्वज्ञानपूर्वक व ईश्वरोपासनापूर्वक मी कर्माची धडपड करीत आहें, तें विश्व मी नव्हे, तो देह मी नव्हे, ते उपभोगही

मी नव्हे, मी कोणी तरी निराळाच आहे, अशी ज्याची बालंबाल खातरी झाली, ज्ञानेंद्रियांस गोचर होणारें, कर्मेंद्रियांस उपलब्ध होणारें, मनबुद्धि इत्यादिकांच्या विचारदृष्टीस वश होणारें विश्व दिसतें तें तसें नसून तें व मी आणि आम्हां उभयतांस ज्याच्या सत्तेनें अस्तित्व प्राप्त झाल्यासारखें दिसतें तें विश्वजनक व जीवजनक ब्रह्म हीं सर्व एकच आहोंत, कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें, मन व बुद्धि हीं सर्व बहिर्मुख ह्मणजे बाहेर तोंड करून असलेलीं माझीं ज्ञान-साधनें आहेत व तीं सांत आहेत मर्यादित आहेत, म्हणून वस्तुतः अनंतत्वानें व एकत्वानें असणारें ब्रह्म ह्मणजे हें विश्व, हा मी व तो ईश्वर ही त्रयी, सांत ( मर्यादित finite ] आणि भिन्न दिसतात. अतएव हें बुद्धि, मन, इंद्रिया-दिकांकडून होणारें ज्ञान वास्तविक नसून भ्रमात्मक आहे ' वस्तुतः मी, विश्व व ब्रह्म भिन्न नसून एकच आहोंत, असा विचार ज्यांचे मनांत पूर्णत्वानें बाणला, ते लोक शुद्ध, निर्विषय ह्मणून निर्मळ, ज्ञानाचे पाठीमागें लागतात. विषयोपभोगाचा तिटकारा, इंद्रियांचें दमन, वासनेचें निर्मूलन, चित्ताची विषय-शून्य एकाग्रता, अहंकाराचा सर्वथैव अभाव इत्यादि साधनें ज्याला साध्य झालीं, तोच ज्ञानमार्गास अधिकारी होतो; तोच मुमुक्षु होय. त्याचें कर्तव्य संपलें, तो समाधानाच्या, मुक्तीच्या मार्गास लागला, स्वार्थशून्य झाला, म्हणून त्याची नीति अनीति, वगैरे सर्व मानवी बंधनें तुटलीं, आणि इहलोकचें भान विसरून तो ब्रह्मसमाधीमध्यें निमग्न होत्साता रममाण होऊं लागला म्हणजे तो मुक्त झाला असें म्हणायाचें. अशा अनंत दृष्टीनें, निर्मळ दृष्टीनें, जो सर्व ब्रह्ममय पाहूं लागला त्यास हें सांत व मर्यादित असें नामरूपा-त्मक जगत भ्रमात्मक वाटूं लागलें, अनंतकालपर्यंत संसारांत पाडणारें कर्म व भिन्नभाव कायम ठेवणारी व पुनः पुनः जन्म मरण देणारी सकाम उपासना हीं तुच्छ वाटलीं तर त्यांत काय आश्चर्य आहे ? जोंपर्यंत शुद्ध बुद्ध, नित्य आणि मुक्त आत्मारामास विषय, इंद्रियें, मन, बुद्धि अहंकार इत्यादि उपाधींनीं ग्रासून टाकिल्यासारखें भासत आहे, तोंपर्यंत हा संसार, हें विश्व, हें विश्वज्ञान व तो विश्वजनक ईश्वर हे कायम असतात; परंतु प्रेरणेनुरूप प्रकट झालेल्या उप-निषन्महावाक्यांनीं, युक्तीनें व स्वानुभवानें उपाधींची शृंखळा तोडून टाकून सर्व ब्रह्मच आहे, हें कधीं निर्माण झालें नाहीं व नाशही पावणार नाहीं असा वास्तविक विचार त्याच्या ब्रह्ममय बुद्धींत घोळूं लागला ह्मणजे तो स्वतःच

ब्रह्म होतो. गढूळ पाणी स्वच्छ करण्यासाठीं आंत घातलेली निवळी जसा मलाचा नाश करून आपणही नाहींशी होते, त्याचप्रमाणें ब्रह्मज्ञान करून देण्यास साधनभूत होणारें निष्काम कर्म निष्काम उपासना व उपनिषदांचें अध्ययन; हीं हीं सर्व अस्तंगत होऊन शेवटीं एकच एक ब्रह्म उरतें. तें निर्गुण, निर्विकार, निरामय, निरंजन असें असल्यामुळें उपाधियुक्त व भेद दाखविणाऱ्या वाणीलाही अगोचर असतें ! सारांश ब्रह्म अथवा सुखदु:खविरहित ब्रह्मानंद हें स्वसंवेद्य ( स्वत:स मात्र कळणारें ) व साखरेची गोडी ज्याप्रमाणें वर्णितां येत नाहीं त्याप्रमाणें अवर्णनीय असें ) आहे. असो; हाच मोक्षाचा, खऱ्या समाधानाचा, मुख्य पुरुषार्थाचा शेवट होय. हा ज्यास लाधला तोच सुटला; बाकीचे आपण सर्व भवचक्राच्या तावडींत सांपडलोंच आहों ! येथें सुटण्याचा मार्ग ह्मणजे वर सांगितलेला ज्ञानमार्गच होय. ज्ञानी पुरुषाला कर्तव्य उरतच नाहीं. ज्या पूर्वकर्मानें आपल्यास देह प्राप्त झाला त्या देहाचे सुखदु:खात्मक भोग संपेतोंपर्यंत निष्कामबुद्धीनें व भोगशून्यवृत्तीनें देह धारण व्हावयाचें व देह आहे तोंपर्यंत आपल्या आचरणानें दुसऱ्या तळमळणाऱ्या जीवांस मोक्षमार्ग दाखवावयाचा हेंच त्याचें देहकर्तव्य होय. स्वत: जरी तो ब्रह्म झाला व सर्व चेतनाचेतनात्मक विश्व त्यास ब्रह्ममय दिसूं लागलें, तथापि सुखदु:खामध्यें तळमळणारे दुसरे जीवांस त्याच्या शुध्द, निर्मळ व स्वार्थशून्य वर्तनानें बोध होऊन उपरति होते आणि 'खला येतें साधुत्व साधुसंगें' या न्यायानें इतर जीवही मुक्त होऊन जातात. हा ज्ञानमार्ग, हा खरें व निष्पाप समाधान करणारा मार्ग गीताशास्त्रांत सांगितलेला आहे, व त्या मार्गाला साधनीभूत जो निष्काम कर्ममार्ग अगर चित्तशुद्धि करणारा कर्ममार्ग व उपासनापंथ ह्या दोहोंचें अवतरण गीताशास्त्रांत केलें आहे: आणि हाच मार्ग खरा आहे हें दाखविण्यासाठीं भगवंतांनीं इतर पंथांचें परीक्षण केलें आहे. असो; कोणताही पंथ घ्या, कोणताही धर्म घ्या, गीताशास्त्रांत सांगितलेला कर्म व उपासना यांच्या सहाय्यानें उत्पन्न होणारा ज्ञानमार्ग त्याहून श्रेष्ठ आहे, असें विचारी पुरुषास दिसल्यावांचून राहणार नाहीं. हें अभिमानाचें बोलणें नव्हे वस्तुस्थिति आहे, ती कशी त्याचें थोडेंसें वर निरूपण केलेंच आहे व रामानुज व मध्व यांचा विचार करितांना आणखीही थोडासा उल्लेख करूं. हा विरक्तिपंथ होय. ह्यापासून प्रवृत्ति मार्गाचीं लक्षणें शोधून काढण्याची

अपेक्षा धरणें ह्मणजे शीतल जलाच्या साहाय्यानें अग्नि पेटविण्याचा प्रयत्न करण्यासारखेंच मूर्खत्वदर्शक होय! वैराग्याचें खरें रहस्य ज्यास प्राप्त झालें अशा पुरुषास मात्र हा मार्ग साध्य आहे. 'माझ्यामागें माझ्या पोराबाळांची, माझ्या देशाची मनुष्यांची, माझ्या विश्वाची व स्वर्गलोकीं जीवांची काय गति होईल? अशी चिंता कामुक बुद्धीनें वाहणाऱ्या सांसारिकासाठीं या मार्गाची योजना नाहीं. 'मी कोण आहे?' हा प्रश्न ज्याला अगत्याचा वाटतो त्याच्यासाठीं हा मार्ग आहे. विषयलोलुप जीव केव्हांना केव्हां तरी दृढवैराग्याच्या सपाट्यांत सांपडतील, निर्मळ चित्तानें ब्रह्माराधन करून शेवटीं ब्रह्म होतील व आधुनिक मताप्रमाणें चैतन्य उत्पन्न करणारे अचेतन पदार्थमात्र सचेतन होऊन शेवटीं तेही मुक्त होतील अशी माझी खात्री आहे. ब्रह्मदृष्टीनें, पूर्ण दृष्टीनें ते मुक्तच आहेत, तथापि अपूर्ण अथवा कर्मदृष्टी--जी जीवाच्या मागें उपाधि रूपानें लागलेली दिसते तीही नाहींशी होऊन ते मुक्त होतील असा माझा सिध्दांत आहे. असो; आजचें आपलें कर्तव्य ह्मणजे 'मला ब्रह्म व्हावयाचें आहे.' अशा दृष्टीनें प्रत्येक जीवाकडून निष्काम कर्म व निष्काम उपासना करावयाची आणि त्याला मुक्तीच्या मार्गावर कायमचें आणून सोडावयाचें हा आहे. ह्या मार्गाचें अवलंबन करणें हाच सद्यःकालीन खरा पुरुषार्थ आहे.

रामानुज, मध्व, ख्रिस्त, महंमद वगैरे यांस हा मार्ग संमत नाहीं; याचें कारण मोठ्या दुःखानें मला असें सांगण्याचें भाग पडत आहे कीं त्यांस उपनिषत्कारांची गीताशास्त्राची, आचार्यमताची खरी गुरुकिल्ली सांपडली नाहीं, किंवा सांपडूनही स्थूलबुद्धीमुळें त्या सांपडण्याचें चीज झालें नाहीं. विषयापलीकडे इंद्रियें, त्यांच्या पलीकडे मन, त्या मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आणि **बुद्धिपेक्षां आत्मा श्रेष्ठ** असें भगवंतांनीं गीतेंत सांगितलें असतांही केवळ बुद्धीच्या व अहंप्रत्ययाच्या (Consciousness) जोरावर हे सर्व उपासनापंथी आणि ह्मणून द्वैतवादी महापुरुष निर्गुणपंथी आत्ममार्ग हा जीवांस अगोचर आहे आणि ह्मणून असाध्य आहे असें ह्मणतात. बुद्धीच्या व अहंप्रत्ययाच्या पलीकडे आत्मा आहे व आपली बुद्धि विषयशून्य करून अंतर्मुख केली असतां व 'मी आहे' हा अहंभावही विसरून गेले असतां निर्विकल्प स्थिति प्राप्त होऊन नित्य, निर्गुण, निरामय अशा शुद्ध आत्मतत्त्वाचा अगर ब्रह्माचा परिचय होतो असें तज्ज्ञांनीं

मुमुक्षूंच्या उद्धारासाठीं मोठ्या कळकळीनें प्रकट केलें आहे. हा प्रकटित विधि खोटा व ब्रह्म हें थोतांड आहे. असें ह्मणण्याच्या अगोदर भक्तिपूर्वक परिश्रम करून वेदांत मार्गाचा निर्मळ आणि निर्विषय मनानें अनुभव घ्यावा आणि नंतर काय ह्मणावयाचें असेल तें ह्मणावें. ज्ञानमार्गानें परब्रह्माशीं एकरूपता होऊन जाते व सर्व सुखदुःखांचा परिहार होऊन जन्ममरण देणारा संसार चुकतो असा डिंडिम आज हजारों वर्षें वाजत आहे, **स्पेन्सर** व **कांट** सारखे अज्ञेयवादीही ' दृश्याच्या पलीकडे जी सद्वस्तु असते तीच बुद्धीच्या व अहंकाराच्या (अहंप्रत्ययाच्या) पलीकडे असावी, असली पाहिजे ' असें ह्मणूं लागले आहेत (पहा Secret Doctrines by Madam Blavetsky Vol 11.) ! यावरून भेदबुद्धि नष्ट करून त्रिविध दुःखांचा परिहार करणारा ज्ञानमार्गच सर्वथैव इष्ट आहे असें वाचकांस समजेल व वर केलेल्या दिग्दर्शनानें व गुरूच्या सहाय्यानें ते जर प्रवृत्तिमार्ग सोडून देऊन योग्य संधि प्राप्त झाल्याबरोबर निवृत्ति मार्गाकडे वळतील, तर, शुद्ध, केवल, निर्गुण अशा आत्मतत्त्वाचा त्यांस इहलोकींच स्वानुभव येऊन ते जन्ममरणांतून सुटतील यांत शंका नाहीं. असो; आतां रामानुजांचें मत पाहूं.

परब्रह्म एकच आहे खरें पण तें निर्गुण नाहीं. तें अनंतसदगुणगणांचें माहेरघर आहे. तें ज्ञानस्वरूप नसून ज्ञानी, सर्वव्यापी, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ व सर्वकृपावन असें आहे. तें अंतर्बाह्य एकस्वरूपी नसून अनेक सद्वस्तूंचें आश्रयस्थान आहे. हें दृश्य विश्व व यच्चावत् जीव, अथवा विषय आणि विषयी ( Objects ond Subject ), हें **खरें** असून ते परब्रह्माचे अवयव आहेत, अगर परब्रह्माचे हे प्रकार ( Modes ) आहेत; किंवा परब्रह्मापासून उत्पन्न झालेलीं हीं कार्येंच होत ! प्रलयकालीं हीं कार्यें परब्रह्मांत लीन होतात व सर्ग स्थितींत उदय पावतात. जीवास संसार प्राप्त होतो तो कर्मामुळें होय. संसारांतून मुक्त होण्यास ईश्वरी कृपा व उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें सगुणब्रह्मज्ञान ह्यांचा आश्रय केला पाहिजे. मुक्तीनें जन्ममरण चुकतें, तथापि सायुज्यता अथवा ब्रम्हाशीं पूर्ण तादात्स्य मिळत नाहीं. अद्वैत वाद्यांचा **मायावाद** खोटा आहे, कारण त्यास उपनिषदांत आधार नाहीं; व युक्तीनें मायावाद सिद्धही करितां येत नाहीं. जग तर आपल्यास, जीवास प्रत्यक्ष दिसतें यावरून दृश्य, द्रष्टा व दर्शन हीं खरीं आहेत; म्हणून विश्व

सत्य आहे, जीव सत्य आहे आणि परब्रह्म सत्य आहे. परब्रह्माच्या आंत या दोन्ही सद्वस्तूंचा अंतर्भाव आहे व परब्रह्म सर्वांतर्यामी आहे ह्मणून अद्वैतच आहे, तथापि **विशिष्टाद्वैत** आहे; ह्मणजे परब्रह्म गुणधर्मातीत नसून गुण-धर्मांनीं ओतप्रोत भरलेलें आहे; सारांश ब्रम्ह निर्गुण नाहीं, सगुण आहे. ' ब्रह्म सत्य, जगन्मिथ्या ' हा केवलाद्वैत सिद्धांत खोटा आहे. उपनिषदांतील माया शब्दाचा अर्थ ' उपादान कारण ' असा आहे. उदाहरणार्थ माती हें जसें घटाचें उपादान कारण, तशी प्रकृति ही जगाचें उपादान कारण आहे. प्रकृति ह्मणजे भ्रम उत्पन्न करणारी माया असा अर्थ घेणें उप-निषदांस व ब्रह्मसूत्रांस संमत नाहीं. माया ह्मणजे चमत्कृतिजनक प्रकृति होय. असो; कर्मांच्या योगानें जीव संसारांत पडतो म्हणजे प्रकृतीला वश होऊन येथें सुखदुःखाचा अनुभव घेतो. प्रकृति जड आहे, विकार पावणारी आहे ह्मणून प्रकृतींत अथवा विषयांत रममाण होणें हा पुरुषार्थ नव्हे. वेदविहित निष्काम कर्म आणि वासुदेवाची निष्काम उपासना करून वासुदेवस्वरूपानें ब्रह्मचिंतन केलें असतां ईश्वरानुग्रह होऊन जन्ममरण चुकते व मुक्ति मिळते; मात्र येथेंही ह्मणजे मुक्तिलोकांत अहंभाव कायम असतो! सेवा, पूजा, नैवेद्य, स्तोत्रपठन आणि ब्रह्मचिंतन हे भक्तीचे उत्तरो-त्तर श्रेष्ठ मार्ग आहेत. तसेंच चित्त स्थिर होण्यास प्रथम मूर्तिपूजा नंतर अवतारचिंतन, नंतर षड्गुणैश्वर्य परमेश्वराचें सूक्ष्म स्वरूपचिंतन आणि शेवटीं ' सर्वव्यापी ' या भावानें चिंतन असे मार्ग आहेत, देहांत प्राण आहे तोंपर्यंत वेदोक्त कर्म सुटत नाहीं. सारांश कर्म व ज्ञान यांच्या योगानें मुक्ति मिळते. मुक्ति ह्मणजे काय हें वर सांगितलेंच आहे.

हें **रामानुजपंथा**च्या मताचें केवळ दिग्दर्शनच होय. तथापि गीताशास्त्रांत लागणाऱ्या अवश्य तत्त्वांपैकीं बऱ्याच सिद्धांताचा वर उल्लेख केला आहे व कांहीं कालपर्यंत तरी तो उपयोगी पडेल असें वाटतें. यावर अद्वैत मताच्या दृष्टीनें टीका करण्याचें हें स्थळ नव्हे. प्रस्तुत प्रसंगीं इतकेंच म्हणतों कीं रामानुजाचें परब्रम्ह ह्मणजे अद्वैतवाद्यांचा मायासंवलित परमेश्वर होय. पर-मेश्वरापलीकडे रामानुजास कांहीं दिसत नाहीं व अनुभूतही होत नाहीं ह्मणून त्यांस मायावादाचें असत्यत्व व जीवजगतांचें सत्यत्व सत्य वाटत आहे. अपूर्ण दृष्टीनें अथवा दृश्य दृष्टीनें जीव व जगत हीं खरींच आहेत व माया ही

खोटीच आहे. पण पूर्ण दृष्टीनें, अनंत दृष्टीनें, ब्रह्मदृष्टीनें पाहिलें असतां दृश्य दृष्टीला मात्र गोचर होणारे व्यक्तिमात्र जीव व नानाविध सृष्टि हीं उभयतां ब्रह्ममय, भेदशून्य, एकरूपी होऊन जातात. सारांश विचार दृष्टीचा फरक आहे. राष्ट्रदृष्टीनें बोलत असतां जशीं आपण इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी, रशिया, जपान' इत्यादिकांचीं नांवें घेतों व अंतस्थ भेद तोंपर्यंत एकीकडे ठेवितों ( ह्मणजे इंग्लंडांत वेल्स, स्काटलंड, आयर्लंड वसाहती, हिंदुस्थानासारखे आश्रित वर्गांतील देश वगैरेचा भिन्नभाव लक्ष्यांत आणीत नाहीं. ) तसाच ब्रह्मदृष्टीचा प्रकार आहे. ब्रम्हदृष्टीला भेद दिसणें शक्यच नाहीं, कारण ब्रम्हभावांत भेद असू शकतच नाहीं. केवळ, निरवयव सद्वस्तूंत अवयव असणें संभवनीयच नाहीं. असो; तेव्हां **रामनुज, ख्राइस्ट, मंहमद** इत्यादिकांची दृष्टि बुद्धि साक्षेप आहे, शुद्ध नाहीं म्हणून त्या त्या सत्पुरुषास परब्रह्म ( ईश्वर ) सगुण आहे असें दिसतें, विश्व खरें आहे, जीव खरा आहे, असें वाटतें यांत आश्चर्य नाहीं पण जोंपर्यंत विश्व आहे आणि जीवास अस्तित्व असून **ज्ञान** आहे व **आनंदोपभोग** घेण्याची योग्यता आहे असें ठाम आहे, तोंपर्यंत तो जीव व तें विश्व **सच्चिदान्दब्रह्माशीं** एकरूपानेंच आहेत आणि उभयतांसही समान अशी पलीकडे 'परब्रह्म नामक स्थिति आहे कीं जेथें सर्व भेदाभेद गुणावगुण, धर्माधर्म, नष्ट होऊन सर्व एकरूपच होतात.' भेदमात्र असत्य आहे असा समज होणें व उपनिषदांच्या अभ्यासानें, सद्गुरूच्या कृपेनें, परमेश्वराच्या अनुग्रहानें व शेवटीं स्वानुभवानें ह्या समाजास सिद्धांताचें स्वरूप येणें हें अद्वैतास सहजिकच होय.

**मध्वाचार्य** हे कट्टे द्वैताभिमानी आहेत. भेद, भिन्नभाव हे सत्य आहेत असें यांनीं प्रत्यक्ष, अनुमान व शब्द तसेंच वेदोक्त पुराणोक्त, अशा तिन्ही प्रमाणांनीं सिद्ध करण्याचा यत्न केला आहे. वेदांत ग्रंथापेक्षां पुराणावरच या पंथाची मोठी भिस्त आहे. आतां जोंपर्यंत पहावयाचें आहे, तात्पर्य व्यवहार करावयाचा आहे, तोंपर्यंत भेद आहे हें व्यवहारदृष्टीनें विचार करणाऱ्या अद्वैतवाद्यांसही अमान्य नाहीं. जीव आणि शीव ( शिव ! शिव ! मी चुकलों ! मध्वास शिवाचें नांव खपावयाचें नाहीं ! म्हणून ईश्वर, विष्णु ) यांत नित्य सेव्यसेवकत्वभाव आहे. सेवकानें सेव्याची आराध्यदेवतेची, बरोबरी करण्याचा प्रयत्न

केला असतां ईश्वरास क्रोध येतो ! राजा जसा बरोबरी करूं इच्छिणाऱ्या शिरजोर सरदारांचें शासन करितो, तसाच ईश्वरही रागानें आपली बरोबरी करूं इच्छिणाऱ्या उन्मत्त दैत्यांचें व सैतान आदिकरून देवदूतांचें पारिपत्य करितो !--( पहा भागवत व बायबल. ) ईश्वर प्राप्तीचें उपाय तीन आहेत. ( १ ) ईश्वरी मुद्रा धारण करणें, ( २ ) नामस्मरण आणि (३) दशविधा भक्ति हे ते तीन उपाय होत. तथापि परमेश्वराच्या अनुग्रहाव्यतिरिक्त मुक्ति मिळत नाहीं. मुक्तिस्थितींतही सेव्यसेवकसंबंध तुटत नाहीं. विश्व हें अनादि व अनंत असून परमेश्वराहून भिन्न आहे. अज्ञान हें परमेश्वरकृतच आहे. ! 'तत्त्वमासि' ( आत्मा हा, तेंच तूं आहेस ) या महावाक्यांत 'आत्मा' या शब्दापुढें एक 'अ' ( 'नाहींवाचक' शब्द ) ढकलून देऊन ( तें तू नाहींस , असा या पंथानें कोरा परीटघडी अर्थ बनविला आहे ! 'एकाचें ज्ञान झालें असतां सर्वांचें ज्ञान होतें' या महावाक्याचा कांहींसा रामानुजाप्रमाणेंच 'श्रेष्ठ व सर्व कारण जो परमेश्वर त्याचें ज्ञान झालें असतां सर्व कार्यांचें ज्ञान होतें' असा अर्थ केला आहे. रामानुजाप्रमाणें हेही ह्मणतात कीं आचार्यांनीं विस्तृत केलेला मायावाद खोटा आहे. **विश्व खरें आहे** चाऱ्ही **वेद, महाभारत, पंचरात्रागमतंत्र** आणि मूळ **रामायण** यांचाही तात्पर्यार्थ विश्व खरें आहे असें मानण्याचाच आहे. सारांश विश्व व जीव हे सेवकवर्गांत असून खरे आहेत ब्रह्म ह्मणजे विष्णु हें आराध्य दैवत असून उत्पत्ति, स्थिति, संहार करणारा सर्वश्रेष्ट ईश्वर आहे. सेव्यसेवकांतील भिन्नभाव **नित्य** व **कायमचा** आहे. मुक्तस्थितींतही हाच संबंध आहे.

हें **रामानुजाचार्यां**च्याही आलीकडचें म्हणजे अद्वैतदृष्टीनें कमी योग्यतेचें मत आहे. यांतील अखंडद्वैतभाव, ईश्वराच्या घरीं कामक्रोधादिकांची वसति वगैरेनीं या सिद्धांतास बराच कमीपणा येतो.

असो. उपनिषदांचा तात्पर्य अद्वैतसिद्धांत सांगण्याचा आहे; युक्तीलाही हाच सिद्धांत संमत होतो, व अभ्यासी मुमुक्षूंस हाच अनुभव येतो म्हणून अद्वैत सिद्धांतच खरा आहे असें मला वाटतें. यावरून विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत, कर्ममार्ग हे मला सर्वांशीं संमत नाहींत असें मात्र समजूं नये. या प्रत्येकांचा उपभोग विशेषस्थलीं आहे. मुख्य मुक्तिनामक पुरुषार्थ साध्य करण्याच्या ह्या पायऱ्या आहेत. ज्याची जशी योग्यता असेल तशी पायरी तो स्वीकारतो व

श्रेष्ठ पायरीकडे जाण्याची खटपट कर्मानें, उपासनेनें व ज्ञानानें तो करीत असतो. येथें कोणी कोणाची निंदा करण्याचें कारण नाहीं; मात्र वरच्या पायरीवरील जीवानें खालच्या पायरीवर असणाऱ्या जीवास वर नेण्यासाठीं निष्काम श्रम करावे हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. अभेद झाल्यावर ब्रह्मदृष्टी झाल्यावर, सर्व ब्रह्मच आहे, एकच आहे, पूर्ण आहे, असा अनुभव आल्यावर खालच्या पायऱ्या, खालचीं साधनें, निरर्थक होतात व कर्तव्य संपतें. व्यवहारदृष्टि आहे, तोंपर्यंत धर्माधर्म, नीति अनीति यांची मीमांसा करणें व खालच्यांस वर नेणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे हें आतांच सांगितलें. असो; माझ्या सध्याच्या समजुतीप्रमाणें प्रगतीचा क्रम असा लागतो.

प्रथम कर्ममार्ग; यांत जीवाची ओढ प्रथमतः तात्कालिक सुख मिळविण्याकडे अगर जे जे विकार उत्पन्न होतील त्यांची शांति करण्याकडे असते. (२) पुढें जिवंत राहण्याची व संतति उत्पन्न करण्याची अशीं दोन कर्तव्यें होऊन यांच्या आड येणाऱ्या सुखाची गणना अधर्मांत होते. (३) पुढें स्वतःच्या सुखाची, जीविताची, व प्रजावृद्धीचीं साधनें जीवाच्या हातांत नाहींत असें दिसूं लागून यज्ञयागादिक कर्म व देवतांची उपासना हे मार्ग प्रचलित होतात. व यांस धर्म अशी संज्ञा मिळते. धर्माच्या विरुद्ध ज़र जीवित अगर प्रजावृद्धि आली तर त्यांचीही अधर्मांत गणना होते. (४) पुढें कौटुंबिक सुख, स्वजाति सुख, स्वदेशसुख, जीवितसुख, पारलौकिकसुख, इत्यादि पुरुषार्थ (Ideais) उत्पन्न होऊन सुख ह्मणजे जीवित राखणारे व जीवित वृद्धिंगत करणारे उपभोग असा अर्थ होतो. सारांश येथपर्यंत स्वतःचें सुख (आयुष्य मर्यादा) वाढविणाऱ्या कर्मास अगर उपभोगास पुरुषार्थ असें म्हटलें जातें; व या योगानें जगताचें ज्ञानही बरेंच वृद्धिंगत होते. (५( नंतर स्वसुखापेक्षां परकीय सुखाची मातब्बरी विशेष वाढूं लागून पुत्रभार्यादिकांचें संरक्षण करावयाचें व त्यांस सुख द्यावयाचें तें आपल्यास सुख होतें ह्मणून नव्हे, तर त्यांस सुखी केलें ह्मणजे आपलें कर्तव्य संपलें, असा पुष्कळच आधीपासून मंदपणानें असणारा विचार प्रज्वलित होतो. येथें निवृत्तिमार्गाची, स्वार्थत्यागाची परार्थस्वीकाराची मूर्ति प्रथम प्रकट होते. निष्काममनानें कुटुंबसंरक्षण, जातिसंरक्षण देशसंरक्षण, मानवीसंरक्षण, जीवसंरक्षण, व सर्वांची सुखसमृद्धि हे एकाहूनएक श्रेष्ठ पुरुषार्थ जीवांच्या कर्मानुसार व विश्वज्ञानानुसार प्रकट होऊन त्याचवेळीं

ईश्वराचें निष्काम भजन पूजन हेंही प्रचलित होतें. ज्ञानसंपादनासाठीं आपण उत्पन्न झालों, निष्काम उपासना करण्यासाठीं आपण जन्म घेतला, वासनाशून्यत्वानें कर्म करणें आपलें कर्तव्य आहे, हे सात्विक विचार या कालांत प्रचलित असतात. याच कालांत धर्म सांगतो ह्मणून कर्म करावयाचें, ईश्वरास आनंद होतो ह्मणून विश्वाचें ज्ञान संपादन करून अनन्यभावानें ईश्वराची उपासना करावयाची हे सात्विक धर्म प्रबल होतात. आणि ( ६ ) शेवटीं वरील कोणताही पुरुषार्थ साध्य केला तरी कर्म सुटत नाहीं, धर्म तुटत नाहीं, संशय फिटत नाहीं असें पाहून या विश्वाचा व माझा काय संबंध आहे, आम्ही उभयतां आलों कोठून व आम्हांस जावयाचें कोठें, माझ्या देहांत वास करणारा आत्मा शुद्ध चैतन्यस्वरूपी असतांना या अचेतन विषयांच्या लगामीं कां पडला ? विषयापासून होणारे सुख, शुद्ध व कायमचें आहे काय ? स्वर्गांतील विषयसुख अगर ईश्वर संनिधि कायमची आहे काय ? वगैरे अनंत प्रश्न निर्माण होऊन वैराग्य पूर्ण होऊं लागतें. हें वैराग्य, सात्विकवृत्तीचा अंगिकार, गुरूपदेश, ईश्वरी कृपा, उपनिषदांसारख्या प्रेरित ग्रंथांचें श्रवण व मनन आणि निदिध्यास यांच्या योगानें व केव्हां केव्हां राजयोगादि साधनांनीं अनुभव येऊन अद्वैताचा पूर्ण साक्षात्कार होतो व तो पुरुष अद्वैतमार्ग मुमुक्षूसाठीं प्रकट करितो. ही शेवटची पायरी होय. शेवटच्या मजल्यावर जाऊन तेथें कायमचें रहावयाचें असा सिद्धांत झाल्यावर ऐहिकसाधनांस वैय्यर्थ्य येतें. असो, हा क्रममुक्तीचा पंथ आहे. अनेक व्यक्तींचीं अनेक रीतीनें सुधारणा होत असल्यामुळें सर्व देशांत हाच क्रम ऐतिहासिकदृष्टीनें दिसेल असें नाहीं. तथापि माझ्या विचारदृष्टीला हा निवृत्तीच्या प्रगतीचा मार्ग असावा असें वाटतें.

असो; लिहावयास घेतलेल्या लेखाची मर्यादा केव्हांच आटपून गेली आहे; तथापि विचाराच्या व्यवस्थेसाठीं मला जितका विस्तार करणें अवश्य वाटलें तितका यथामति केला आहे. असो; आतां कर्ममार्गाचा सविस्तर विचार चवथ्या अध्यायाच्या शेवटीं करावयाचा असें सांगून व हें द्वैताद्वैत प्रकरण द्वितीध्यायाच्या प्रारंभीं घालावयाचें तसें न करितां त्यास अध्यायाच्या शेवटीं निमंत्रण दिलें तें ‘ अकरणान्मंदकरणं श्रेयः ’ ( अगदींच न केल्यापेक्षां उशीरानें तरी कर्तव्य केलेलें बरें ! ) या न्यायानें संभाळून घेऊन व्यावहारिक व ह्मणून मनोहर असा तिसरा अध्याय व गीता समजून घेण्यास उत्सुक झालेले मुमुक्षु वाचक यांच्यामध्यें आलेल्या या लांबच लांब लेखाची येथें इतिश्री करितों !

# अथ तृतीयोऽध्यायः ।

शास्त्रस्य प्रवृत्तिनिवृत्तिविषयभूते द्वे बुद्धी भगवता निर्दिष्टे सांख्ये बुद्धिर्योगे बुद्धिरिति च । तत्र "प्रजहाति यदा कामान्" इत्यारभ्याऽऽध्यायपरिसमाप्तेः सांख्यबुद्ध्याश्रितानां संन्यासं कर्तव्यमुक्त्वा तेषां तन्निष्ठतयैव च कृतार्थतोक्ता—"एषा ब्राह्मी स्थितिः" इति । अर्जुनाय च—' कर्मण्येवाधिकारस्ते " "मा ते सङ्गोऽस्त्व कर्मणि " इति कर्मैव कर्तव्यमुक्तवान्योगबुद्धिमाश्रित्य, न तत एव श्रेयःप्राप्तिमुक्तवान् ।

या गीताशास्त्रामध्यें दुसऱ्या अध्यायांत सांख्यबुद्धि व योगबुद्धि अथवा ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग, किंवा संन्यास आणि संसार, ह्या दोन मार्गांस उपयोगी पडणाऱ्या दोन सांख्यबुद्धि व योगबुद्धि भगवंतांनीं अर्जुनास सांगितल्या. 'सर्व इच्छा सोडून देऊन ' [ पहा अ० २ श्लो० ५५ ] येथपासून आरंभ करून थेट अध्याय समाप्त होईपर्यंत असें सांगितलें कीं सांख्यबुद्धीचा आश्रय करणारे ज्ञानी आहेत त्यांनींच संन्यास करणें योग्य आहे व संन्यास आणि परमार्थज्ञान ह्यांच्या योगानेंच ज्ञानी पुरुषांचा परमार्थ सिद्ध होतो. [ पहा अ० २ श्लोक ७२ ] ही ज्ञानी पुरुषाची गोष्ट झाली. अर्जुनास मात्र ' तुझा कर्मच करण्याचा अधिकार आहे, कर्मत्याग करण्याचा नाहीं. [ अ० २ श्लोक ४७ ] असें सांगितलें, सारांश योगबुद्धीचा* आश्रय करून तुला कर्म केलें पाहिजे इतकेंच सांगितलें आहे; कर्मापासून मोक्ष मिळेल असें सांगितलें नाहीं. [ अ० २ श्लोक ४९ ].

तदेतदालक्ष्य पर्याकुलीभूतबुद्धिरर्जुन उवाच । कथं भक्ताय श्रेयोर्थिने यत्साक्षाच्छ्रेयः साधनं सांख्यबुद्धिनिष्ठां श्रावयित्वा मां कर्मणि दृष्टानेकानर्थयुक्ते पारम्पर्येणाप्यनैकान्तिकश्रेयःप्राप्तिफले नियुञ्ज्यादिति युक्तः पर्याकुलीभावोऽर्जुनस्य । तत्स्वरूपश्च प्रश्नो ज्यायसी चेदित्यादिः । प्रश्नापाकरणवाक्यं च भगवतोक्तं यथोक्तविभागविषये शास्त्रे ।

---

* निर्विकारमनानें निष्काम कर्म करून तेंही परमेश्वरास अर्पण करावयाची जी बुद्धि तिला योगबुद्धि म्हणतात.

आपल्यास मुक्तीचा मार्ग सांगितला नाहीं हें पाहून अर्जुनास चुटपुट आणि तळमळ लागली. अर्जुन ह्मणतोः ' देवा ! मी आपला भक्त आहे व मोक्षार्थी आहे हें खरेंना ? आपण मला सांख्यबुद्धीपासून साक्षात् उत्पन्न होणारें मोक्षाचें साधन तेंही सांगितलें ना ? पण शेवटीं आपण मला कर्म करावयास लावितां हें काय ? या कर्मापासून महा अनर्थ ओढवतात, असें सर्व लोकांप्रमाणें आपणही ह्मणतांना ? कर्मापासून चित्तशुद्धि, चित्तशुद्धीनें ज्ञान आणि ज्ञानानें मोक्ष इतका कर्मापासून मोक्षाचा पल्ला लांब आहे. त्यांतही कर्म केलें तर परंपरेनें कां होईना, पण मोक्ष मिळेल असे खास असतें तरी हरकत नव्हती. पण तसाही प्रकार नाहीं ! महाराज ! मज दीनावर आपण अवकृपेची गदा कां घालितां बरें ? ' हा अर्जुनाला झालेला विषाद त्याच्या दृष्टीनें खरा आहे व त्याच धोरणावर त्यानें ' कर्मापेक्षां बुद्धि थोर आहे असें जर आपल्यास विदित आहे ' वगैरे प्रश्न केला तो योग्यच आहे. त्या प्रश्नाचे निराकरण भगवंतांनीं केलें आहे तेही गीताशास्त्रांत सांख्यनिष्टा व त्यामुळें कृतार्थता म्हणजे मोक्षप्राप्ति व कर्मनिष्ठा व तिच्या योगें चित्तशुद्धि ( मोक्षप्राप्ति साक्षात् नाहीं. ) असें जें दोन विभाग उपनिषदनुसार केलें आहेत त्यास अनुसरूनच आहे.

> केचित्त्वर्जुनस्य प्रश्नार्थमन्यथा कल्पयित्वा तत्प्रातिकूलं भगवतः प्रतिवचनं वर्णयन्ति, यथा चाऽऽत्मना संबन्धग्रन्थे गीतार्थो निरूपितस्तत्प्रतिकूलं चेह पुनः प्रश्नप्रतिवचनयोरर्थं निरूपयन्ति । कथं तत्र संबन्धग्रन्थे तावत्सर्वेषामाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निरूपितोऽर्थ इत्युक्तं पुनर्विशेषितं च यावज्जीवश्रुतिचोदितानि कर्माणि परित्यज्य केवलादेव ज्ञानान्मोक्षः प्राप्यत इत्येतदेकान्तेनैव प्रतिषिद्धमितीह त्वाश्रमविकल्पं दर्शयता यावज्जीवश्रुतिचोदितानामेव कर्मणां परित्याग उक्तः, तत्कथमीदृशं विरुद्धमर्थमर्जुनाय ब्रूयाद्भगवान्, श्रोता वा कथं विरुद्धमर्थमवधारयेत् ।

कांहीं वृत्तिकार तिसऱ्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकाचा अर्थ भलताच करून श्रीकृष्णांनीं जें उत्तर दिलें आहे त्याचाही प्रश्नाच्या उलट अर्थ करितात !

**शिष्य**—तो कसा ?

**गुरु**—ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही एकाच पुरुषाला साध्य असलीं पाहिजेत असा अर्जुनाचे प्रश्नाचा अर्थ करितात आणि भगवंताचें उत्तर ' ज्ञान

आणि कर्म ' याचा समुच्चय होणें शक्य नाहीं असा करून प्रश्न व उत्तर यांमध्यें आपणच विरोध दाखवितात! इतकेंच करून हे वृत्तिकार राहते तरी कमी अनर्थाचें होतें. पण आमचे वृत्तिकार याच्याही पलीकडे जाऊन संबंध ग्रंथांतच एकंदरीनें विरोध आहे असा प्रकार उत्पन्न करितात!

**शिष्य**—तो काय?

**गुरु**—अरे! या वृत्तिकारांनीं गतिचें सार ह्मणून जें प्रथमारंभीं व्याख्यान दिलें आहे त्यांत निरूपण केलें आहे त्याच्या उलट, ह्मणजे आपल्या सिद्धांताच्या उलट तिसऱ्या अध्यायांतील पहिल्या तीन चार श्लोकांचा यांनीं अर्थ केला आहे!

**शिष्य**—नाहीं, मी समजलों नाहीं.

**गुरु**—ह्मणजे असें: प्रथम जी त्यांनीं प्रस्तावना लिहिली तींत ते ह्मणतात कीं या गीताशास्त्रामध्यें ज्ञान आणि कर्म हीं दोन्ही यथाविधि झालीं तरच मोक्षप्राप्ति होईल—मग मनुष्य कोणत्याही आश्रमांतील असो. ज्ञान कर्मांचा समुच्चय झाल्याविना ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी यांपैकीं कोणाचाही पुरुषार्थ सिद्ध होत नाहीं असा गीताशास्त्राचा मथितार्थ आहे हा यांचा सामान्य सिद्धांत आहे; पुनः विशेष आग्रहानें ते असें सांगतात कीं "'यावज्जीव' या श्रुतीनें सांगितलेलीं कर्में न करितांही केवळ ज्ञानानें मात्र मोक्ष मिळतो" या मताचें तर गीताशास्त्रांत उत्कृष्ट खंडन आहे; आणि हेच आग्रही वृत्तिकार येथें ह्मणजे तिसऱ्या अध्यायांत मात्र निरानिराळे आश्रम दाखविणाऱ्या भगवंतांनीं 'यावज्जीव' या श्रुतीनें सांगितलेलीं कर्में मात्र ज्ञाननिष्ठांनीं सोडावीं, असें म्हणतात! कां? प्रथमच्या उपोद्घातांत गीताशास्त्रांत समुच्चयच सांगितला आहे, त्याला श्रुतीचें प्रमाण आहे वगैरे ठाम सिद्धांत सांगून तिसऱ्याच अध्यायांत ज्ञाननिष्ठांनीं कर्मत्याग करावा असा भगवद्वाक्यांचा अर्थ करणाऱ्या वृत्तिकारांच्या असंबद्ध वृत्तींमधील विरोध समजला कीं नाहीं?

**शिष्य**—विरोध समजला. पण भगवन्! मूळांतच विरोध असेल तर ह्या बिच्याऱ्याचा काय बरें दोष? भगवंतांनीं सांगितलें त्याचप्रमाणें ह्यांनीं भाष्यें लिहिलीं असावीं.

**गुरु**—खुळा कुठला! भगवान् कधीं असंबद्ध प्रलाप करितील काय? सर्वज्ञ आणि सर्वांचें व विशेषतः अर्जुनाचें परमकल्याण करणारे भगवान

विरोधी भाषणें करितील अशी कल्पना तरी तुझ्या डोक्यांत कोठून शिरली? खुळ्या! भगवंताचा अभिप्राय समजला नाहीं म्हणून मात्र या बिचाऱ्या वृत्तिकारांची उलटी सुलटी धांदल झाली आहे झालें!

**शिष्य**—महाराज! भगवान विरुद्ध बोलणार नाहींत हें खरें; पण ऐकणाराच भगवंताच्या बोलण्याचा खरा अभिप्राय समजला असेलच असें कशावरून? ऐकणाराच भलतें समजला असेल तर त्याला वृत्तिकारांनीं काय करावें?

**गुरु**—अरे! श्रोता अर्जुन होता, अर्जुन बरें! अर्जुनाची बुद्धि प्रसिद्धच आहे. तो भगवंताच्या बोलण्याकडे सावधान चित्तानें लक्ष्य देऊन बसला होता. त्याच्या मनांत रे विरुद्ध अर्थ कसा येईल? तात्पर्य वृत्तीकारांना हें गीताशास्त्र समजलें नाहीं हें उघड झालें.

> तत्रैतत्स्याद्गृहस्थानामेव श्रौतकर्मपरित्यागेन केवलादेव ज्ञानान्मोक्षः प्रतिषिध्यते न त्वाश्रमान्तराणामित्येतदापि पूर्वोत्तरविरुद्धमेव। कथ, सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयो गीताशास्त्रे निश्चितोऽर्थ इति प्रतिज्ञायेह कथं तद्विरुद्धं केवलादेव ज्ञानान्मोक्षं ब्रूयादाश्रमान्तराणाम्।

**शिष्य**—गुरुजी! मला वाटतें, वृत्तीकारांचा अभिप्राय असा असेल कीं फक्त गृहस्थांस मात्र श्रौतकर्में केल्याशिवाय नुसत्या ज्ञानानें मोक्ष मिळणें अशक्य आहे पण इतर आश्रमांतील पुरुषांस नुसत्या ज्ञानानें मोक्ष मिळणें संभवतें.

**गुरु**—तरी पण विरोधपरिहार होत नाहींच.

**शिष्य**—कां बरें?

**गुरु**—कां बरें काय? गीताशास्त्रांत चारी आश्रमांतील पुरुषांनीं ज्ञानकर्मांचा समुच्चय केला पाहिजेच असा सिद्धांत दीर्घ कंठरवानें सांगून येथें मात्र भगवंतांनीं गृहस्थांशिवाय इतरांस नुसत्या ज्ञानानें मोक्ष मिळेल म्हणून सांगितलें काय? बेटया! हा विरोध नव्हे तर काय?

**शिष्य**—गुरुजी! अर्थ निश्चित व्हावा म्हणून मी शंका काढीत आहे. क्षमा असावी. महाराज! वृत्तिकारांचा अभिप्राय असा असावा; श्रौतकर्में अत्यंत महत्वाचीं म्हणून **श्रौतकर्मांशिवाय** नुसत्या ज्ञानानें गृहस्थांस मोक्ष मिळावयाचा नाहीं.

अथ मतं श्रौतकर्मापेक्षयैतद्वचनं केवलादेव ज्ञानाच्छ्रौतकर्मरहिताद्गृहस्थानां मोक्षः प्रतिषिध्यत इति ।

तत्र गृहस्थानां विद्यमानमपि स्मार्तं कर्माविद्यमानवदुपेक्ष्य ज्ञानादेव केवलादित्युच्यत इति । एतदपि विरुद्धम् । कथं, ग्रहस्थस्यैव स्मार्तकर्मणा समुच्चिताज्ज्ञानान्मोक्षः प्रतिषिध्यते न त्वाश्रमान्तराणामिति कथं विवेकिभिः शक्यमवधारयितुम् ।

**शिष्य**—ह्मणजे सारांश असा कीं केवळ ज्ञान याचा अर्थ श्रौतकर्मरहित ज्ञान असा केला व या श्रौतकर्मशून्य ज्ञानानें मात्र गृहस्थांस मोक्ष मिळणार नाहीं असें ठरविलें. केवलज्ञान यांत स्मार्तकर्मांचा ही आम्हीं अंतर्भाव करितों. आतां गृहस्थांसही स्मार्तकर्म नाहीं असें नाहीं, पण तें अल्प असतें ह्मणून नाहींच असें समजून श्रौतकर्मशून्य ज्ञानानें मोक्ष मिळत नाहीं असें म्हटलें. तात्पर्य श्रौतकर्मांशिवाय केवळ ज्ञानानें ह्मणजे स्मार्तकर्मसहित ब्रह्मज्ञानानें मात्र गृहस्थांस मोक्ष मिळणार नाहीं; इतर आश्रमांतील लोकांस मिळेल.

**गुरु**—अरे! तू तरी बरीच लांब लांब व्याख्यानें झोडूं लागलास! काय म्हणतो आहेस तें पूर्ण ऐकण्यासाठीं मी तुला मध्यें थांबविलें नाहीं. असो; आपण जो हा प्रपंच केला आहे याला कांहीं युक्ति, आधार, कांहीं विवेक असें कांहीं असावें कीं नाहीं? केवलज्ञान याचा अर्थ स्मार्तकर्मसहित ब्रह्मज्ञान असा केलास त्याला कांहीं आधार? बरें तेंही असो; पण गृहस्थाला तेवढा स्मार्तकर्मसहित ब्रह्मज्ञानानें मोक्ष नाहीं, बाकींच्या आश्रम्यांना आहे, यांत गृहस्थांनींच काय तुझें घोडें मारलें होतें कीं त्या बिचाऱ्यांवर श्रौतकर्मांची धोंड आणून टाकिलीस! वेड्या! युक्तीला रुचेल तें बोलावें हा नियम तरी ध्यानांत ठेवून बोलत जा. केवळ कर्ममार्गाचें हवें तसें समर्थन करून तें गृहस्थांच्या माथीं मारिलें ह्मणजे वेदोक्त वचनें बोललास असें नाहीं होत बरें! वेड्या हें तुझें बोलणें शहाण्या माणसांस क्षणभर तरी पसंत पडेल?

किंच यदि मोक्षसाधनत्वेन स्मार्तानि कर्माण्यूर्ध्वरेतसां समुच्चीयन्ते तथा गृहस्थस्यापीष्यतां स्मार्तैरेव समुच्चयो न श्रौतैः । अथ श्रौतैः स्मार्तैश्च गृहस्थस्यैव समुच्चयो मोक्षायोर्ध्वरेतसां तु स्मार्तकर्ममात्रसमुच्चिताज्ज्ञानान्मोक्ष इति । तत्रैवं सति गृहस्थ

स्याऽऽयासबाहुल्याच्छ्रौतं स्मार्तं च बहुदुःखरूपं कर्म शिरस्यारोपितं स्यात् ।

**गुरु**—पुनः असें कीं स्मार्त कर्मे करीत असतांही ब्रह्मज्ञान करून घेऊन गृहस्थांशिवाय बाकी सर्व ब्रह्मचारी वगैरे लोक मुक्त होऊं शकतात, तसाच नियम गृहस्थांस लागू करून त्याचीही सुटका इतर लोकांप्रमाणेंच कां करून टाकीत नाहीं !

**शिष्य**—भगवन् ! तसें होणें नाहीं, कारण मग ' यावज्जीव ' श्रुतीशीं विरोध येतो. ह्मणून गृहस्थांस मोक्ष मिळविणें असेल तर त्यांनीं श्रौतस्मार्तकर्मे करीत असतां ब्रह्मज्ञान संपादन केलें पाहिजे व ज्ञान झाल्यावरही श्रौतस्मार्तकर्मे चालविलीं पाहिजेत. बाकीच्या ब्रह्मचारी वगैरे लोकांस मात्र स्मार्तकर्मासहित ब्रह्मज्ञानानें मोक्ष मिळेल.

**गुरु**—पण असें करण्यानें गृहस्थांच्या मात्र डोक्यांवर कर्मांच्या अनेक यातायातीमुळें अनंत कष्ट देणारें श्रौतस्मार्तादिकांचें ओझें विनाकारण लादलें जातें त्याची काय वाट ?

अथ गृहस्थस्यैवाऽऽयासबाहुल्यकारणान्मोक्षः स्यान्नाऽऽश्रमान्तराणां श्रौतनित्यकर्मरहितत्वादिति । तदप्यसत्, सर्वोपनिषत्स्वितिहासपुराणयोगशास्त्रेषु च ज्ञानाङ्गत्वेन मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानादाश्रम विकल्पसमुच्चयविधानाच्च श्रुतिस्मृत्योः ।

**शिष्य**—महाराज ! हें पुष्कळसें आयास गृहस्थांस मात्र सोसावे लागतात ह्मणून मोक्षसुख त्यांनाच कायतें मिळणार ! इतरांस नाहीं, कारण श्रौतानें सांगितलेलीं नित्यकर्मे ते करीत नाहींत ! असें समजलें तर ?

**गुरु**—आतां मात्र कमाल केलीस. एक क्षणाच्या पूर्वी इतर आश्रमांतील लोकांच्या मोक्षाची तूं व्यवस्था केलीस, आणि आतां असें बोलतोस ! शिवाय तुझीही वाचाळता व्यर्थ आहे. कारण सर्व उपनिषदें, भारतासारखे इतिहास, सर्व अठरान अठरा पुराणें, योग वगैरे सर्व ठिकाणीं मुमुक्षूला केवळ ज्ञानानें मोक्ष मिळतो असें अनंतवेळां सांगितलें आहे. तेथेंच त्यानें सर्व कर्मांचा त्याग केला पाहिजे असेंही सांगितलें आहे शिवाय असेंही सांगितलें आहे कीं ब्रह्मचारी असतांनाच संसार नकोसा झाल्यास मुमुक्षूनें संन्यास

घ्यावा. सारांश ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रास्थ्य अगर संन्यास अशा मार्गानें क्रमाक्रमानें जावें किंवा वाटेल त्या खऱ्या मुमुक्षूनें वाटेल तेव्हां वाटेल त्या आश्रमांत असतां कर्मत्याग करून संन्यास घ्यावा. सारांश गृहस्थाश्रम अवश्य आहे, श्रौतस्मार्तकर्में अवश्य आहेत असें सांगण्याचा कोणच्याच श्रुतिस्मृतीचा हेतु नाहीं.

सिद्धस्तर्हि सर्वाश्रमिणां ज्ञानकर्मणोः समुच्चयः। न, मुमुक्षोः सर्वकर्मसंन्यासविधानात् " व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति। तस्मात्संन्यासमेषां तपसामतिरिक्तमाहुः। न्यास एवात्यरेचयत् " इति। " न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनके अमृतत्वमानशुः इति च " ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् " इत्याद्याः।

" त्यज धर्ममधर्मं च उभेसत्यानृते त्यज। उभे सत्यानृते त्यक्त्वा येन त्यजसि तत्त्यज। संसारमेव निःसारं दृष्ट्वा सारदिदृक्षयः। प्रव्रजन्त्यकृतोद्वाहाः परं वैराग्यमाश्रिताः " इति बृहस्पतिः।

" कर्मणा बध्यते जन्तुर्विद्यया च विमुच्युते। तस्मात्कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिनः " इति शुकानुशासनम्।

इहापि—" सर्वकर्माणि मनसा संन्यस्य " इत्यादि। मोक्षस्य चाकार्यत्वान्मुमुक्षोः कर्मानर्थक्यम्।

**शिष्य**—तर मग ब्रह्मचारी वगैरे सर्व आश्रमांतील लोकांस ज्ञान आणि कर्म दोन्हीं अवश्य आहेत असें ठरलें. कारण श्रुतिस्मृति आपल्यास मान्य आहेत आणि श्रुतिस्मृतींनींच नित्य व नैमित्तिक कर्में सर्वांसही सांगितलीं आहेत !

**गुरु**—नाहीं; तूं चुकतोस. मुमुक्षूनें यच्चावत सर्व कर्मांचा संन्यास करावा असें स्पष्ट सांगितलें आहे. 'आत्माशून्य झाल्यानंतर संन्यासाश्रमास योग्य असें भिक्षाटन ते लोक करितात. सत्य, यम, नियम, न्यास वगैरे अल्प फल देणाऱ्या तपश्चर्येपेक्षा संन्यासाचें फल अतीशय मोठें आहे असें सांगितलें आहे. ज्ञानद्वारा न्यास करणें हें सर्वांपेक्षां श्रेष्ठ आहे.' 'कर्म करून मोक्ष मिळाला नाहीं, प्रजोत्पादन करून मिळाला नाहीं, किंवा संपत्ति मिळवूनही मोक्ष मिळाला नाहीं, तर सर्व प्रकारचा त्याग केला, तेव्हां त्यास मोक्ष मिळाला.

'ब्रह्मचर्यामध्यें सुद्धां संन्यास घ्यावा' ह्या सर्व श्रुतींवरून तुला कळेल कीं मुमुक्षूला कोणतेंही कर्म करण्याची अवश्यकता नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यानें कोणतेंही कर्म करूं नये असा सर्वांचा अभिप्राय आहे. आणखी संसाराला उत्पन्न करणारे धर्म, अधर्म यांचा त्याग कर; सत्य, असत्य या उभयतांचा त्याग कर आणि या सत्यासत्याचा त्याग केल्यावर ज्या अहंकाराच्या योगानें हा त्याग केलास त्या अहंकाराचाही त्याग कर.' तसेंच 'अनुभवपूर्वक विवेकदृष्टीनें संसार हा दुःखमूलक व दुःखफलक आहे, असें पाहून अत्यंत विरक्त झालेले लोक लग्न न करितां एकदम संन्यास ग्रहण करितात' असें **बृहस्पती** सांगते झाले. आणि 'कर्माच्या योगानें प्राणी बद्ध होतो व ज्ञानाच्या योगानें मुक्त होतो. ह्मणून परब्रह्माकडे ज्यांची दृष्टि लागली आहे, ते संन्यासी कर्मच करीत नाहींत. असें **शुकानुशासन** आहे. येथें **गीताशास्त्रामध्यें**ही सर्व कार्में मनानें त्याज्य करून अ० ५ श्लोक १३) असेंच सांगितलें आहे. पुनः मोक्षाला कर्मांचा कांहींच उपयोग नसल्यामुळें, उलट, कर्म केलें असतां, मोक्षनाश होण्याचा संभव असल्यामुळें मुमुक्षूला कर्म व कर्ममार्ग व्यर्थच आहेत.

> नित्यानि प्रत्यवायप्रतिहारार्थमनुष्ठेयानीति चेत, न, असंन्यासिविषयत्वात्प्रत्यवायप्राप्तेः। न ह्यग्निकार्याद्यकरणात्संन्यासिनः प्रत्यवायः कल्पयितुं शक्यो यथा ब्रह्मचारिणामसंन्यासिनामपि कर्मिणाम्। न तावन्नित्यानां कर्मणामभावादेव भावरूपस्य प्रत्यवायस्योक्तिः कल्पयितुं शक्या "कथमसतः सज्जायेत" इत्यसतः सज्जन्मासंभवश्रुतेः।

**पूर्व०**—येथपर्यंत आपलें सिद्धांत कबूल आहेत. पण आपल्यास येवढेंच विचारावयाचें कीं नित्य कर्में केलींच पाहिजेत; नाहीं तर नरकप्राप्ति होते; असें स्मृति ह्मणत आहेत त्याची काय वाट ?

**सिद्धां०**—अरे हीं कर्में केलीं नाहींत तर प्रत्यवाय कोणाला ? ज्याला तीं कर्में करावयास सांगितलीं आहेत त्यानें चुकविलीं तर त्याला दंड होईल; कां भलत्यालाही होईल ? कर्म करणें हा विषय असंन्यासी ह्मणजे ब्रह्मचारी, गृहस्थ वगैरेंचा आहे. त्यांनीं हीं कर्में नाहीं केलीं तर त्यांना दंड होणें योग्य होईल. ज्यानें सर्वच कर्म टाकिलें व वासना नष्ट केली त्याला तुझी बिचारी स्मृति काय करणारा ? पहाः--होम, अध्ययन वगैरे संन्याशानें केलें नाहीं तर त्यानें केलेल्या पापाचा दंड करणारा कोणी आहे अशी कल्पना सुद्धां करणें

शक्य नाहीं. ब्रह्मचारी असून ह्मणजे कर्ममार्गांत राहत असून त्यानें जर नित्य-कर्म केलें नाहीं तर, त्याला पाप लागेल. आणखी; नित्य अशीं जीं कर्में नाहींत तर, ह्मणजे त्यांचा अभावच असेल तर त्या अभावांपासून भावरूपी पापाची कशी उत्पत्ति होणार? अभावापासून भाव, असतापासून सत्, कसें उत्पन्न होईल? अशा अर्थाची एक श्रुतीच असें म्हणतेना?—सारांश देहाभिमान व कर्माभिमान असेल त्याला कर्म आहे. कर्मसंन्यास करणाऱ्याला कर्म करावयास सांगणें ह्मणजे निरोगी पुरुषास औषधाची योजना करण्यासारखें अप्रयोजक होईल!

> यदि विहिताकरणादसंभाव्यमपि प्रत्यवायं ब्रुयाद्वेदस्तदाऽनर्थकरो वेदोऽप्रमाणमित्युक्तं स्यात्, विहितस्य करणाकरणयोर्दुःखमात्रफलत्वात्। तथा च कारकं शास्त्रं न ज्ञापकमित्यनुमपन्नार्थकल्पितं स्यात्। न चैतदिष्टम्। तस्मान्न संन्यासिनां कर्माण्यतो ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः। "ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिः" इत्यर्जुनस्य प्रश्नानुपपत्तेश्च।

**पूर्व०**—पण वेदांमध्यें सांगितलें आहेना कीं विहित कर्में केलीं नाहींत तर पाप लागेल म्हणून?

**सिद्धां०**—वेद असें ह्मणत असतील तर ते अनर्थवाची आहेत, अप्रमाण आहेत, त्यांच्यावर कोणी विश्वास ठेवूं नये, कारण ते असल्या असंभावी गोष्टींचें कथन करितात; असें आह्मीं बेधडक ह्मणूं. असें पहा कीं वेदानें सांगितल्याप्रमाणें कर्म केलें तर जन्ममरण चुकत नाहीं, कर्म न केलें तर पाप लागतें; एवंच कर्म करा कीं नका करूं आपलें दुःख तुमच्यापुढें दत्त ह्मणून उभें आहे, असें सांगणाऱ्या वेदाला कोण प्रमाण मानील? पण वेदाचा खरा तात्पर्यार्थ तुह्मांला कळला आहे कोठें?

**पूर्व०**—आमचाच अर्थ खरा आहे. पुनः आमच्या वेदांमध्यें असें विलक्षण सामर्थ्य आहे कीं ज्यायोगें असतापासून ते सत् उत्पन्न करूं शकतात म्हणजे कर्म केलें नाहीं तर त्यापासून पापाची उत्पत्ति करूं शकतात!

**सिद्धां०**—खुळा आहेस तूं! अरे! कोणतेंही शास्त्र म्हटलें म्हणजे त्याला नवीन गोष्टी उत्पन्न करण्याचें सामर्थ्य नसतें. फक्त वस्तुस्थिति अशी

आहे असें मात्र शास्त्रें सांगतात. याच्या उलट कल्पना करणें म्हणजे 'सूर्य काळा ढुस्स आहे' अशा विजातीय कल्पनेप्रमाणें असमंजस होय. अपौरुषेय-वेदांच्या ठिकाणीं अशा तऱ्हेचा अर्थातच असमंजसत्वाचा आरोप करणें तुम्हांला व आह्मांस इष्ट नाहीं. असो; सारांश हा कीं वासनाशून्य संन्याशानें कर्म करावें असें कोणत्याही पद्धतीनें ठरवितां येणार नाहीं, कारण तसें करणें अशक्यच होय. म्हणून ज्ञान आणि कर्म यांचाही समुच्चय होणें अशक्य व अनिष्टच होय. पुनः 'कर्मापेक्षां बुद्धि (ज्ञान) श्रेष्ठ आहे असें जर तुझें मत असेल तर' वगैरे अर्जुनाच्या प्रश्नाची वाट कशी लावावयाची? ज्ञान आणि कर्म एक काळींच करून मोक्ष मिळीव असें भगवंतांनीं सांगितलें असतें तर अर्जुनानें हा असला प्रश्न कशाला विचारला असता?

> यदि हि भगवता द्वितीयेऽध्याये ज्ञानं कर्म च समुच्चयेन । त्वयाऽनुष्ठेयमित्युक्तं स्यात्ततोऽर्जुनस्य प्रश्नोऽनुपपन्नो ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिरिति । अर्जुनाय चेद् बुद्धिकर्मणी त्वयाऽनुष्ठेये इत्युक्ते या कर्मणो ज्यायसी बुद्धिः साऽप्युक्तैवेति "तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव" इति प्रश्नो न कथंचनोपपद्यते । न चार्जुनस्यैव ज्यायसी बुद्धिर्नानुष्ठेयेति भगवतोक्तं पूर्वमिति कल्पयितुं युक्तं येन ज्यायसी चोदीति प्रश्नः स्यात् ॥

**सिद्धां**—जर दुसऱ्या अध्यायामध्यें भगवंतांनीं 'ज्ञान आणि कर्मांचा समुच्चय केलास तरच तुला मोक्षाचा मार्ग सांपडेल' असें सांगितलें असेल तर 'आपल्या ह्मणण्याप्रमाणें कर्मापेक्षां बुद्धि, (ज्ञान) श्रेष्ठ असेल तर' वगैरे अर्जुनाच्या प्रश्नाची व्यवस्था लावितां येत नाहीं, तो व्यर्थ व असमंजस प्रश्न होतो. पुनः 'तुला दोन्हीं ज्ञान आणि कर्म यांचा आश्रय केला पाहिजे' असें भगवंतांनीं सांगितलें असें समजावयाचें तर कर्मापेक्षां श्रेष्ठ जें ज्ञान तेंही अर्जुनास सांगितलेंच असलें पाहिजे. असें सर्व धरून चाललें तरी 'हे केशवा! मला या घोर आणि हिंसामूलक कर्मामध्यें कां ढकलितोस?' या उपहासपूर्वक प्रश्नाचा उलगडा होत नाहीं तो नाहींच आतां जर असें ह्मणशील कीं बुद्धिच श्रेष्ठ, पण तिचा आश्रय तूं करूं नको.' असें भगवंतांनीं अर्जुनास पूर्वींच सांगितलें आहे; तर तसेंही ह्मणतां येत नाहीं. असें गृहीत

धरिलें तर ' जर मोठी असेल तर ' वगैरे प्रश्नाचा उलगडा होतो; पण भगवंतांनीं असें सांगितलें आहे, हें ह्मणणेंच असमंजसपणाचें आहे.

यदि पुनरेकस्य पुरुषस्य ज्ञानकर्मणोर्विरोधाद्युगपदनुष्ठानं न संभवतीति भिन्नपुरुषानुष्ठेयत्वं भगवता पूर्वमुक्तं स्यात्ततोऽयं प्रश्न उपपन्नो ज्यायसी चेदित्यादिः । अविवेकतः प्रश्नकल्पनायामपि भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन भगवतः प्रतिवचनं नोपपद्यते । न चाज्ञाननिमित्तं भगवत्प्रतिवचनं कल्प्यम् । अस्माच्च भिन्नपुरुषानुष्ठेयत्वेन ज्ञानकर्मनिष्ठयोर्भगवतः प्रतिवचनदर्शनाज्ज्ञानकर्मणोः समुच्चयानुपपत्तिः । तस्मात्केवलादेव ज्ञानान्मोक्ष इत्येषोऽर्थो निश्चितो गीतासु सर्वोपनिषत्सु च । ज्ञानकर्मणोरकं वद निश्चित्येति चैकविषयैव प्रार्थनाऽनुपपन्नोभयोः समुच्चयसंभवे । कुरु कर्मैव तस्मात्त्वमिति च ज्ञाननिष्ठासंभवमर्जुनस्यावधारणेन दर्शयिष्यति ।

**गुरु०**—वरील मूर्खपणाची कल्पना टाकून देऊन जर आपण असें समजलों कीं अभेद मानणारें ज्ञान व भेद मानणारें कर्म हीं दोन्हीं परस्पर विरुद्ध साधनें एकाच पुरुषाच्या हातून होणें असंभवनीय आहे असें समजून भगवंतांनीं ' ज्ञानाची व कर्माची आराधना निरनिराळ्या माणसांनीं निरनिराळ्या पद्धतीनें केली पाहिजे, ' असें सांगितलें आहे, असें आपण समजलों तर मात्र आपला समज खरा ठरून अर्जुनाचा प्रश्नही सार्थ आणि समंजस होतो. ज्ञानानें मोक्ष मिळतो, कर्मानें चित्त शुद्ध करून ज्ञानमार्गानें गेलें असतां मोक्ष मिळतो असें भगवंतांनीं सांगितलें आहे असें ध्यानांत ठेविलें तरच अर्जुनाच्या प्रश्नाचा गीताशास्त्रास अनुकूल असा उलगडा समंजस रीतीनें करितां येतो.

**शिष्य**—पण ज्ञान व कर्माचा समुच्चय झालाच पाहिजे असें ऐकूनही अर्जुनानें वेडयासारखा प्रश्न कशावरून नसेल विचारला ?

**गुरु०**—ठीक आहे. पण वेड्या ! भगवंताचें उत्तर काय आलें पाहिलेंसना ? निरनिराळ्या पुरुषांनीं ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग यांचें अवलंबन केलें पाहिजे असेंच भगवंतांचें उत्तर आहेना ? समुच्चय असावा हें भगवंतांस इष्ट असतें तर हें येथील उत्तर त्यांचे त्यांनाच विरोधी झालें असतें.

**शिष्य**—केला नसेल कशावरून भगवंतांनीं बोलण्यामध्यें विरोध ?

**गुरु**—विरोधानें सर्वज्ञ भगवंतांच्या अंगीं अज्ञानाचा आरोप येतो ! व हा आरोप करणें कालत्रयींही संभवत नाहीं. सारांश कोणी ज्ञाननिष्ठेनें मोक्षप्राप्ति करून घ्यावी व कोणी कर्मनिष्ठेनें चित्तशुद्धि करून घेऊन मग मोक्षप्राप्ति करून घ्यावी हें भगवंतांनीं स्पष्ट सांगितलें आहे, त्यावरून ज्ञानकर्मांचा समुच्चय होऊं शकत नाहीं असेंच स्पष्ट दिसतें. म्हणून सिद्धांत हा कीं केवळ शुद्ध असें अभेदस्वरूपीं आत्मज्ञान झालें तरच मोक्ष मिळेल; हाच अर्थ निश्चित करून गीताशास्त्रामध्यें ग्रथित केला आहे. उपनिषदांचाही हाच सिद्धांत आहे समुच्चय शक्यच असता तर ‘ दोहींपैकीं मी काय करूं तें एक ठरवून मला सांग. ’ [ अ० ३ श्लोक २ ] असें अर्जुन म्हणताचना ! पण अर्जुन असें म्हणत आहे यावरून समुच्चय शक्य नाहीं असें सिद्ध झालें.

**शिष्य**—गीताशास्त्रांत समुच्चय नाहीं अशी माझी पूर्ण खात्री झाली महाराज !

**गुरु**—आणि चवथ्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकांत ‘ म्हणून तूं कर्मच कर. ’ असें जें अर्जुनास निश्चयानें सांगितलें आहे, त्याचा अर्थ हा कीं ज्ञान-निष्ठा अर्जुनाच्या हातून होणें शक्य नाहीं असें भगवंतास दाखवावयाचें होतें. सारांश कसेंही जरी पाहिलें तरी ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय गीताशा-स्त्रांत अगर इतर कोणत्याही ठिकाणीं होणें शक्यच नाहीं.

—ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय होतो कीं नाहीं म्हणजे यज्ञयागादि कर्म आणि ब्रह्मचिंतन हीं एका कालीं असूं शकतील कीं नाहीं याबद्दलचा हा सर्व वाद आहे. ज्ञानकालीं कर्म असणें शक्य नाहीं व कर्म करीत असतां ब्रह्मज्ञान असणें शक्य नाहीं असें आचार्यांचें मत आहे. उपनिषदांत, गीतेंत वगैरे प्रायशः आचार्य म्हणतात तसेंच सांगितलेलें आहे. युक्तिही हेंच सांगेल. ‘ मींच ब्राम्ह ’ ‘ ब्राम्ह ’ ‘ कांहीं बोलतां न येणें ’ अशीं निर्विषय स्थिति झाल्यावर ‘ मला अमुक पाहिजे, मी तमुक करीन ’ अशी साहंकार वासनामयास्थिति राहणार कशी ? अपूर्णता आहे असें वाटत असलें ह्मणजे किंवा अभेद नाहीं असें ध्यान असलें म्हणजे वासनापूर्वक कर्म होतें पूर्ण स्थितींत साहंकार कर्म नसतें; आणि अर्थातच अपूर्ण स्थितींत ज्ञान नसतें. एवंच युक्तीला व स्वतःच्या अनुभवालाही आचार्यांचें म्हणणेंच सयु-क्तिक दिसतें.—

अर्जुन उवाच—

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ॥**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

**जनार्दन** ( आपल्या इच्छा सफल व्हाव्या म्हणून मनुष्यें ज्याचीं प्रार्थना करितात त्या तूं परमेश्वरा! **कर्मणा** ( कर्मापेक्षां ) **ते** ( तुला ) **मता** ( संमत असलेलें ) **बुद्धिः** ( ज्ञान ) **ज्यायसी चेत्** ( श्रेष्ठ असेल, श्रेष्ठ आहे ) **केशव** ( सर्वेश्वरा! दयाघन केशवा! **तत्किं** ( तर काय म्हणून ) **मां** ( मला ) **घोरे कर्मणि** ( ज्यांत क्रूरत्वाचीं कर्में करावीं लागणार अशा कर्मांत ) **नियोजयसि** ( युक्त करितोस, घालतोस? ) सारांश हे अभीष्ट देणाऱ्या परमेश्वरा! जर आपल्या मतानें कर्मापेक्षां ज्ञान हेंच अत्यंत श्रेष्ठ आहे, तर हे दयाघना! मला आपण कर्मांमध्यें आणि त्यांतही कामक्रोधादिकांचें उत्थापन करणाऱ्या निर्घृण कर्मांमध्यें—युद्धामध्यें—मला कां ढकलितां? मला हें घोर युद्ध करण्याचा कां उपदेश करिता?—

ज्यायसी श्रेयसी चेद्यदि कर्मणः सकाशात्ते तव मताऽभिप्रेता बुद्धिर्ज्ञानं हे जनार्दन यदि बुद्धिकर्मणी समुच्चिते इष्टे तदेकं श्रेयःसाधनमिति कर्मणो ज्यायसी बुद्धिरिति कर्मणोऽतिरिक्तकरणं बुद्धेरनुपपन्नमर्जुनेन कृतं स्यान्न हि तदेव तस्मात्फलतोऽतिरिक्तं स्यात्, तथा कर्मणः श्रेयस्करी भगवतोक्ता बुद्धिरश्रेयस्करं च कर्म कुर्विति मां प्रतिपादयति यत्किं नु कारणमिति भगवत उपालम्भमिव कुर्वंस्तत्किं कस्मात्कर्मणि घोरे क्रूरे हिंसालक्षणे मां नियोजयसि केशवेति च यदाह तच्च नोपपद्यते । अथ स्मार्तेनैव कर्मणा समुच्चयः सर्वेषां भगवतोक्तोऽर्जुनेन चावधारितश्चेत्तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसीत्यादि कथं युक्तं वचनम् ॥ १ ॥

हे जनार्दना! कर्मापेक्षां आत्मज्ञान हें अत्यंत श्रेष्ठ आहे असें जर आपलें मत आहे, कर्मापेक्षां ज्ञानच श्रेष्ठत्वानें आपल्यास जास्त आवडत आहे.—

**शिष्य**—गुरुजी? अंमळ थांबा समुच्चय कां असूं नये हें चांगलें समजलें नाहींसें वाटतें.

**गुरु**—अरे ! हो, तेंच स्पष्टतर करण्यासाठीं आचार्य पुनः काय म्हणतात तें ऐकः जर ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं एकत्र असावीं असा भगवंताचा आशय असता व ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा ह्या दोन्ही एकाच पुरुषानें चालवाव्या असा भगवंताचा आशय आहे असें अर्जुन समजला असता तर मोक्षमार्गाचें **एकच** साधन सांगा ' ( श्लोक २ अध्या. ३ ) असें व '**कर्मापेक्षां बुद्धि श्रेष्ठ** आहे' असें याच श्लोकांत ह्मणून बुद्धीचेंच श्रेष्ठत्व अर्जुनानें दाखविलें आहे तें उपपन्न होत नाहीं. त्यानें जें मागणें केलें तें वेड्यासारखें केलें आहे असें आपल्यास म्हणावें लागेल.

**शिष्य**—भगवन् यांत वेड्यासारखें काय झालें ?

**गुरु**—वेडेपणा नव्हे तर काय ? ज्ञान आणि कर्म यां दोहींवांचून मोक्ष मिळावयाचा नाहीं असा सिद्धांत समजावयाचा आणि कर्मापेक्षां ज्ञान मोठें आहे असें म्हणावयाचें हा वेडेपणा नव्हे ?—नाहीं समजलास अजून ? अरे हळद आणि चुना यांचा संयोग केला असतां मात्र रवा होतो, तांबडा रंग होतो, असा धडा घोकावयाचा आणि ' मला रवा करावयाचा आहे, हळकुंड **नाहीं तर** चुना द्या, किंवा चूनाच चांगला आहे, तेवढाच द्या ' असें म्हणून नुसत्या चुन्यानें तांबडा रंग करूं पहावयाचें हा वेडेपणा नव्हे काय ?—सारांश संयोगानें उत्पन्न होणाऱ्या फलापेक्षां संयोगास उपयोगी पडणारे पदार्थ मोठे असणे शक्य नाहीं, ह्मणजे ज्ञान आणि कर्म यांच्या साहचर्यानें मात्र उत्पन्न होणाऱ्या मोक्षरूपी फलापेक्षां एकटें ज्ञानच श्रेष्ठ आहे असें जें तुझें ह्मणणें आहे तें मूर्खदर्शक होतें. सारांश समुच्चय खरा आहे असें धरल्यास अर्जुनाचा प्रश्न वेडेपणाचा होतो.

**शिष्य**०—महाराज ! येवढ्यानेंच काय झालें आहे ?

**गुरु**—थांब, थांब. ' दयाघन केशवा ! मला, आपल्या भक्ताला व मित्राला, आपण युद्धासारखें क्रूर कर्म करावयास कां सांगता ? " असा जो प्रश्न अर्जुनानें विचारला आहे तो असा विचार करूनच विचारला आहे कीं भगवंतांनीं कर्मापेक्षां ज्ञानाची मातब्बरी जास्त ठरविली व मोक्ष न देणारें असें जें नीच कर्म तें करावयाला मला सांगतात हा काय चमत्कार आहे ? सारांश उपालंभपूर्वक हा प्रश्न आहे. भगवंतास जिव्हाळीं लागणारा हा प्रश्न आहे.

आतां समुच्चयच जर इष्ट असेल तर हा अर्जुनाचा छद्मी प्रश्न योग्य झाला असता काय ? तसेंच आणखी असें पहा कीं, श्रौतकर्मे सोडून दिलीं व स्मार्तकर्मे व ज्ञान हीं एकत्र झालीं तरच मोक्ष मिळेल असें भगवान बोलले व अर्जुन समजला असें तुझें म्हणणें असेल तर ' घोर कर्म करावयाला कां सांगतोस ? ' असा अर्जुनाचा स्मृतिविहित कर्माविषयींचा निंदासूचक प्रश्न सयुक्तिक आहे असें कसें ह्मणतां येईल ? सारांश समुच्चय सर्वथा इष्ट नाहीं.

**मधसूदनीकार, द्विवेदी, पर्वते, चतरजी**:–हे टीकाकार आचार्यांप्रमाणेंच अर्थ करितात. पण ते असा एक विशेष काढतात कीं दुसऱ्या अध्यायायध्यें कर्म आणि बुद्धि यांचा विचार झाला आहे त्यांत कर्म हें ज्ञानाचें एक साधन आहे, व ज्ञान हेंच कायतें एकच साध्य आहे असा स्पष्ट उल्लेख झाला नाहीं; आणि ज्ञानानें मोक्ष मिळतो व कर्मानें संसार पाठीमागें लागतो, तसेंच निष्काम कर्म केलें ह्मणजे इष्ट कार्य होतें असें मात्र सांगितलें आहे. यावरून सहज साध्य जें ज्ञान तें न सांगतां कष्टसाध्य आणि प्रायः दुःखपर्यवसायी कर्म करावयास भगवान, युद्धपराङ्मुख जो मी त्या मला, सांगतात हें ऐकून अर्जुन विव्हल झाला व त्यानें प्रस्तुतचा प्रश्न विचारला. तात्पर्य ज्ञान आणि कर्म हे मार्ग अधिकाराप्रमाणें अनुसरावयाचे आहेत, ही गोष्ट अर्जुन विसरला ! **वामन**पंडितही असेंच ह्मणतातः—वाटेल त्यानें वाटेल तो मार्ग पत्करावा अशी अर्जुनाची भ्रामक समजूत होती. निष्काम कर्म केलें तर मात्र चित्तशुद्धि होऊन ज्ञानमार्ग सांपडतो हें मुख्य तत्त्व बिचारा अर्जुन विसरला ! असो; यावरून ज्ञान आणि कर्म हीं एकदम साध्य नाहींत, किंवा नुसत्या कर्मानें मोक्ष मिळत नाहीं, चित्तशुद्धि करणारें कर्म केल्यावांचून ज्ञान मिळत नाहीं, व ज्ञान झाल्यावर कर्म नाहीं; ह्या गोष्टी वाचकमुमुक्षूंच्या हृदयांत पूर्णपणें बिंबाव्या असाच अर्जुनाच्या प्रश्नाचा इत्यर्थ घेऊन आपण तात्पर्य समजून घ्यावें. बुद्धि, चैतन्य, अहंप्रत्ययज्ञान असा ' बुद्धि ' शब्दाचा गीताशास्त्रांत सर्वत्र अर्थ आहे असें **चतरजी** ह्मणतात.

**श्रीधरः**—मोक्ष देते ह्मणून बुद्धि मोठी आहे. ज्ञानाची स्तुति व कर्माचीही स्तुति ऐकल्यामुळें अर्जुन घोटाळला असें **मपाकार** म्हणतात, **शंकरानंदः**-- " **विरक्तः प्रव्रजेद्धीमान्सरक्तस्तु गृहे वसेत् । प्रवृत्तिलक्षणं कर्म ज्ञानं संन्यासलक्षणम्** " ( वैराग्य झालें त्यानें संन्यास घ्यावा आणि संसारप्रीति

ज्याला आहे त्यानें घरीं बसावें कर्म करण्याची इच्छा असणाऱ्यानें कर्म करावें. संसाराला विटून कर्म टाकून दिलें त्यानें ज्ञानार्जन करावें. सारांश ज्याचे मनोविकार प्रबल आहेत त्यानें कर्म करावें व ज्याचे विकार वासनेसकट मृत झाले त्यानें संन्यास घ्यावा हा मथितार्थ आहे. ) प्राण गेल्यानंतर देहाला होणाऱ्या सुखदुःखाची जशी जीवाला खबर नसते, त्याप्रमाणें प्राण असतां-नाही ज्याला सुखदुःखाची खबर लागत नाहीं त्यानें संन्यास घ्यावा ह्या अर्थी **शंकरानंदांनीं** दिलेला श्लोक वैराग्याचा उत्कृष्ट परीक्षक आहे. अनाधिकाऱ्यांनीं कर्म करावें व ज्ञान व कर्म यांमधील विशेष स्पष्टतर व्हावा ह्मणून तिसऱ्या अध्यायाची योजना आहे असें स्वामी म्हणतात.

**रामानुजः**–तिसऱ्यापासून सहाव्या अध्यायाच्या शेवटपर्यंत प्रपंचाचें, कर्माचें साधनत्व आणि प्रत्यगात्म्याचें दर्शन यांचा विचार केलेला आहे.' अर्जुनाच्या प्रश्नाची मीमांसा पहाः ज्ञाननिष्ठा हें जर आत्मावलोकनाचें साधन आहे, कर्म-निष्ठेनें जर ज्ञाननिष्ठा उत्पन्न होते, मनाची, इंद्रियांची उपरति करण्याचें कर्म करूनच जर ज्ञाननिष्ठा मिळवावयाची आहे, व आत्मावलोकन साध्य करून घ्यावयाचें आहे तर 'मला **कर्मनिवृत्तिपूर्वक** ज्ञाननिष्ठा करायला सांगायचें सोडून देऊन आत्मावलोकनाचा संभव नाहींसा करणारें घोर कर्म करावयास आपण मला कां सांगता ?'

**मध्वादि**द्वैतवाद्यांचाही रामानुजांप्रमाणेंच अर्थ व प्रश्नमीमांसा आहेत " 'मेलास तर स्वर्ग मिळेल' वगैरे फलदायी कर्म करावयास सांगून मला मोक्षापासून दूर कां ढकलिता ? मला यतिधर्म सांगा, कर्म आणि त्यांतूनही घोर कर्म करावयास सांगूं नका."

**ज्ञानेश्वरः**–....तें म्या निकें परिसिलें । कृपानिधी ॥ तेथ कर्म आणि कर्ता । उरेचिना पाहतां । ऐसें मत तुझें श्रीअनंता । निश्चित जरी ॥ ( कर्ताही नाहीं आणि कर्मही नाहीं असें जर तुझें मत आहे ) तरी मातें केवी । श्रीहरी । म्हणसी 'पार्था ! संग्राम करी !' । इथें ( ह्या ) लाजसी ना ( लाज वाटत नाहीं ! ) महा घोरीं । कर्मीं सुता ( घालितांना ? ) ॥ अशाच अर्थाच्या पुढें २ ओव्या आहेत.

**पंडितः**—कर्म नीच, ज्ञान थोर, । तथापि माझें कर्म ( नशीब, प्राक्तन ) अत्यंत घोर । कां करूं सांगसी कर्म क्रूर ? । जनार्दना ! ॥....अगत्य स्वधर्मे तरावें । ह्मणूनि हें घोर कर्मही करावें । तरी त्याहूनि कोटिगुण वैभवें । तूंच म्हणसी ज्ञान थोर ! ॥ त्या ज्ञानाचा आश्रय । करीन ऐसा हा निश्चय । धरूनि ह्मणतों ज्ञान अद्वय । तरेन त्यानें मी आजि ॥ येथें अर्जुनानें 'केशव' असें भगवंतास ह्मटलें आहे, त्याचा इतकाच अर्थ कीं नित्य कर्में केलीं नाहींत तर जो सामान्य देवतांचा कोप होतो त्याला निवारण्याचें सामर्थ्य भगवंतास आहे.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ॥**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

**व्यामिश्रेण इव** ( अनिश्चित्, अस्पष्ट, घोटाळ्याचें असें, वाटणाऱ्या ) **वाक्येन** ( वाक्यानें ) **मे** ( माझी ) **बुद्धिं** ( बुद्धि, अंतःकरण ) **मोहयसि इव** ( मोहूनच टाकीत आहेस जणू कांहीं ) **तत्** ( म्हणून ) **निश्चित्य** ( निश्चय करून ठरवून ) **एकं वद** ( एकच गोष्ट मला सांग ) **येन** ( जिच्या योगानें ) **अहं** ( मी ) **श्रेयः** ( मोक्षाला ) **आप्नुयाम्** ( मिळवीन. ) सारांश हे भगवंता ! आपल्या अस्पष्टशा भासणाऱ्या वाक्यांनीं, शब्दांनीं, माझ्या अंतःकरणाचा घोटाळा होऊन गेलेला आहे. ह्मणून आपणास विनंति करितों कीं आपण निश्चयात्मक अशा शब्दांनीं मला एकच मार्ग असा सांगावा कीं ज्याच्या योगानें माझें उत्तम कल्याण होईल, ( पहा श्लो० ३१ अ. १ ) मला मोक्ष मिळेल.—

व्यामिश्रेणेति । व्यामिश्रेणेव यद्यपि विविक्ताभिधायी भगवांस्तथाऽपि मम मन्दबुद्धेर्व्यामिश्रमिव भगवद्वाक्यं प्रतिभाति । तेन मम बुद्धिं मोहयसीव, मम बुद्धि-व्यामोहापनयाय हि प्रवृत्तस्त्वं तु कथं मोहयस्यतो ब्रवीमि बुद्धिं मोहयसीव मे ममेति । त्वं तु भिन्नकर्तृकयोर्ज्ञानकर्मणोरेकपुरुषानुष्ठानासंभवं यदि मन्यसे तत्रैवं सति तत्तयोरेकं बुद्धिं कर्म वेदमेवार्जुनस्य योग्यं बुद्धिशक्त्यवस्थानुरूपमिति निश्चित्य वद ब्रूहि येन ज्ञानेन कर्मणा वाऽन्यतरेण श्रेयोऽहमाप्नुयां प्राप्नुयाम् । यदि हि कर्मनिष्ठायां गुणभूतमपि ज्ञानं भगवतोक्तं स्यात्तत्कथं तयोरेकं वदे त्येकविषयैवार्जुनस्य शुश्रूषा

स्यात् । न हि भगवतोक्तमन्यतरदेव ज्ञानकर्मणोर्वक्ष्यामि नैव द्वयमिति । येनोभयप्राप्त्यसंभवमात्मनो मन्यमान एकमे. पार्थयेत १

श्रीकृष्णा! आपण आपल्याकडून अर्थ स्पष्ट होईल व मला कळेल असें बोलतां, तसेंच आतांही बोललां असाल, पण माझी ग्राहकशक्ति अति अल्प असल्यामुळें, मी मंदबुद्धीचा असल्यामुळें, आपलें बोलणें मला अस्पष्ट व घोटाळ्यांत घालणारें आहे, असा भास होतो. 'तूं कर्मच कर,' असें आपण म्हणतां [ पहा अ० २ श्लोक ४७ ] व 'ज्ञानमार्गाला शरण जा' [ अ० २ श्लोक ४९ ] असेंही आपणच सांगतां. या अशा परस्परविरोधी वाक्यांनीं माझ्या अंतःकरणाचा घोटाळा झाल्यासारखें झालें आहे. मला काय करावें तें सुचेना हें पाहून माझा भ्रम दूर करण्यासाठीं आपण मला उपदेश करण्यास सुरुवात केली आहे, आणि मला तर भ्रम पडत आहे! ह्मणून ह्मणतों, आपण मला भ्रांति घालण्यासाठींच जणूं काय बोलत आहांत असें मला वाटतें. असो; आतां जर आपल्यास असें वाटत असेल कीं निरनिराळ्या पुरुषांनीं करावयास योग्य अशीं ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं एकाच पुरुषाच्या हातून एककालींच होणें शक्य नाहीं, तर त्या दोहोंपैकीं एक, ज्ञान किंवा कर्म, जें काय मला योग्य असेल, माझ्या बुद्धीला, शक्तीला व अवस्थेला या सर्वांना योग्य असेल, तें एक निश्चित करून मला सांगावें. माझें ज्ञान किती, माझें सामर्थ्य काय, माझी परिस्थिति कोणत्या प्रकारची आहे ह्या सगळ्यांचा विचार करून मला करावयास योग्य असें ज्ञान किंवा कर्म काय असेल तें ठरवावें व मला सांगावें. मग तें ज्ञान असो, किंवा कर्म असो. माझा इष्टहेतु साध्य झाला, मला साक्षात् किंवा परंपरेनें मोक्ष मिळाला ह्मणजे झालें, मग तो कोणत्याही साधनानें मिळो.

**शिष्य**—गुरुमहाराज! अर्जुनानें ज्ञान आणि कर्म यांच्या समुच्चयालाच एक कशावरून नाहीं ह्मटलें?

**गुरु**—आतां मात्र तूं झोंप घ्यायाला लागलास आँ! अरे? 'कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ असेल तर' असें अर्जुनानें आतांच विचारलें आहेना? आतां कदाचित् कल्पनेचे तारे तोडून विचारशील कीं कदाचित् कर्मनिष्ठेमध्यें अंतर्भूत होणारें, कर्मनिष्ठेला गौणत्वानें असणारें ज्ञानच भगवान् कशावरून नाहीं

बोलले? तर बाबा! कर्मामध्यें ज्ञानाचा समावेश होत नाहीं असें 'कर्म किंवा ज्ञान, यांपैकीं कोणतें तरी **एक** सांगा' या विनंतीवरूनच स्पष्ट होत नाहीं काय? कर्मांतच ज्ञानाचा अंतर्भाव होत असता तर 'त्या उभयतांतले **एक** मला ऐकूं दे' असें अर्जुनानें कशाला ह्मटलें असतें?

**शिष्य**—'एकच विचार' असें भगवंताच्या मुद्रेवरून अर्जुनानें ताडिलें असेल!

**गुरु**—तूं माझ्यापाशींच शंका काढीत आहेस ह्मणून बरें आहे. असो; ज्ञान व कर्म या जोडीपैकीं एक सांगेन, दोन्हीं सांगणार नाहीं, असें भगवान केव्हांही साक्षात् बोलले नाहींत आणि शिवाय अर्जुनावर त्यांचें प्रेम अत्यंत तेव्हां मिळण्यासारखा मार्ग एक किंवा दोन्हीं त्याला सांगण्यास भगवंतांनीं मागें पुढें पाहिलें नसतें. सारांश दोन्ही मार्ग सांगावयाची भगवंताची तयारी होती. तेव्हां 'दोन्ही मार्गांचें खरें ज्ञान संपादन करण्याचा संभव नाहीं ह्मणून आपण एकच मागूं या' असें समजून अर्जुनानें एक मार्ग मला सांगा असें ह्मटलें ही कल्पनाही संभवत नाहीं. सारांश ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग हे निरनिराळे स्वतंत्र मार्ग आहेत, त्यांचे अधिकारी निराळे असतात, तेव्हां अधिकार ठरवून मला कोणता तो एक मार्ग सांगा अशी अर्जुनाची प्रार्थना आहे. येथें समुच्चय किंवा प्रधानगौण हा प्रश्नच नाहीं.

**मधु०, द्विवेदी, श्रीधर, प्रपा० शंकरा०, पर्वते** वगैरे अद्वैतवादी आचार्यांप्रमाणेंच अर्थ करितात.

**मधुसूदनीकारांनीं** स्पष्ट ह्मटलें आहे.

"भाष्यकारमतसारदर्शिना ग्रन्थमात्रमिह योज्यते मया ॥
आशयो भगवतःप्रकाश्यते केवलंस्ववचसो विशुद्धये" ॥

'भाष्यकार जे आचार्य त्यांच्या मताचें तात्पर्य पाहूनच मी हा ग्रंथ विशद करण्यास सुरुवात केली आहे. भगवंतांचा आशय जो मी सांगत आहे, त्यांत कांहीं मी स्वतः विशेष उत्पन्न करून सांगत आहे, असे नाहीं, तर केवळ वाणीची शुद्धता व्हावी ह्मणून हा माझा प्रयत्न आहे. आचार्यांपेक्षां कोणी जास्त अर्थ काढील याची शंकाच नको हा भाव!

**बल्ल०**—मोहयसि 'इव' (जसें कांहीं) हा शब्द घालण्याचा हेतु

इतकाच कीं साक्षात् भगवान समोर उभे असतां ' भ्रांति झाल्यासारखें वाटतें ' असें अर्जुनास ह्मणावयाचें आहे. भ्रांतिनाशकासमक्ष भ्रांति होणें हा भयंकर विरोध अगर मोठा चमत्कार होय! ' एकं ' = मोक्ष देणारें, भक्तिप्रतिपादक. ' दोहोंतून एक ' असा आचार्यांनीं अर्थ केला आहे तो यांस संमत नाहीं.

**रामा०**—मोक्ष देणाऱ्या ज्ञाननिष्टेशीं अत्यंत विरुद्ध व विकारांस प्रज्वलित करणारें कर्म करावयास आपण मला सांगत आहां! ' एकं = अमिश्ररूप, शुद्ध, केवळ ज्ञान, किंवा केवळ कर्म.

**मध्व वगैरे राघवेंद्र यतिसह द्वैतवादी**:—एकदा कर्माची स्तुति व एकदा ज्ञानाची स्तुति ऐकून माझ्या मनाचा घोंटाळा झाला आहे. तसेंच ज्ञानानें मोक्ष मिळतो व कर्मानेंही मिळतो असें असेल तर युद्धासारख्या कामक्रोधादि विकारांस जागृत करणाऱ्या क्रूर कर्मामध्यें मला, आपल्या मित्राला, आपल्या निःसीम भक्ताला हे भगवन् आपण कां ढकलीत आहांत? कामक्रोधांस वश झालेले प्राणी नरकवासच भोगतात ना? असो; ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं सारख्याच योग्यतेचीं आहेत, असा अर्जुनाचा समज झाला आहे.

**ज्ञानेश्वर**महाराजांचें या श्लोकावरील व्याख्यान फारच मधुर आहे, ह्मणून त्यांतील बराच भाग सहृदय वाचकासाठीं येथें घेतों. देवानें मोह घातला आहे असें वाटून अर्जुन ह्मणतोः—वैद्य पथ्य वारूनि ( सांगून ) जाये। मग जरी आपणचि वीष सूये ( तो वैद्य विष घालील! )। तरी योगिया कैसेनि जिये? ( कसा जिवंत राहील! ) सांगे मज ॥ जैसें आंधळें सुईजे आन्हांटा ( आड वाटेला घालवावें )। कां माजवण ( माजविणारा कैफ ) दीजे मर्कटा। तैसा उपदेश गोमटा। वोढवला ( प्राप्त झाला ) आह्मा! ॥ मला मोह झाला ह्मणून तुला उपदेश विचारला आणि—तंव तुझी एकेक नवाई ( नवल मजा )। एथ उपदेशामाजीं गोवाई ( गुंतागुंत, गोंधळ, )। तरी अनुसरलिया ( शरण आलेल्या भक्ताला ) काई। ऐसें कीजे? ॥......ह्मणोनि आइके देवा!। हा भावार्थ आतां न बोलावा। मज विवेक सांगावा। मऱ्हाटाजी! ( मराठी भाषेंत, स्पष्ट भाषेंत मला आपण खरा विचार सांगावा. ज्ञानेश्वराचे वेळीं तरी संस्कृत भाषापंडितांच्या मात्र सेवेस खाशी लागली होती व सामान्य जनास उपदेश करावयाचा असल्यास तो मराठी भाषेंत करावा लागे हें स्पष्ट दिसत आहे. ) असो;....मी अत्यंत जड असे। परि ऐसाही निकें ( चांगलें )

परियेसें । श्रीकृष्णा ! बोलावें तुवां ऐसें । एक निष्ठ ॥ देखें रोगातें जिणावें (जिंकावें । औषध तरी देयावें । परि तें अतिरुच्य (रुचकर) व्हावें मधुर जसें ॥ तैसें सकळार्थ भरित । तत्त्व सांगावें तरी उचित । परि बोधें माझें चित्त । जयापरी (ज्यानें माझ्या मंद बुद्धीवरही प्रकाश पडेल !) ॥....पुढें परमेश्वराची स्तुति केली आहे तीही वाचण्यासारखी आहे.

पंडित ह्मणतातः—जरी माता घाली बाळासि विष । आणि विषरूप होय पीयूष । तरी मोहकत्व दोष लागे तुज ! ॥ सूर्यमंडळीं धारा। जरी घडे अंधकारा । तरी या दोषाचा वारा । लागे तुज ॥ कीं या स्थावर जंगमा । जाळूं लागे चंद्रमा । तरी हा दोष पुरुषोत्तमा! लागे तुज ॥ २ ॥

प्रश्नानुरूपमेव प्रतिवचनम् —

अर्जुनानें प्रश्न केला त्याचेंच योग्य उत्तर भगवान देतातः—

**श्रीभगवानुवाच—**

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् ॥३॥**

श्री भगवान म्हणालेः—

**अनघ** (निष्पापी अर्जुना ! कोणताही सदुपदेश घेण्यास योग्य असणाऱ्या अर्जुना !) **मया** (सर्वज्ञ जो मी त्यानें, मी, ) **अस्मिन् लोके** (ह्या लोकांमध्येंच) **द्विविधा** (दोन प्रकारची) **निष्ठा** (भक्ति, दोन प्रकारचे मार्ग) **पुरा** (सृष्टीच्या प्रारंभींच) **प्रोक्ता** (स्पष्ट करून सांगितल्या आहेत.) **सांख्यानां** (वेदांतवाक्यांवरून ज्याचें ज्ञान निश्चित झालें आहे अशा लोकांचा मार्ग.) **ज्ञानयोगेन** (ज्ञान हेंच परब्रह्माशीं ज्या योगानें सलग्न होतें तो योग., त्यानें—) **योगिनां** (शुद्धांतःकरण करणाऱ्या योग्यांचा—मार्ग) **कर्मयोगेण** (कर्म हेंच अंतःकरणशुद्धीसाठीं योजिलें जातें ज्यानें असा हा दोन प्रकारचा मार्ग आहे.) सारांश सृष्टीच्या आरंभींच मीं असें स्पष्ट करून सांगितलें आहे कीं ह्या लोकांतील मुमुक्षूंस मोक्ष मिळविणें असेल तर दोन प्रकारापैकीं एका निष्ठेचा आश्रय केला पाहिजे. ज्या निर्मळ चित्ताच्या लोकांस वेदांतमहावाक्यांच्या श्रवण, मनन, निदिध्यासानें ब्रह्मस्वरूपाचें आकलन झालें आहे त्यांनीं ज्ञान-

मार्गानें जावें व ज्या लोकांचें अंतःकरण निर्विषय झालें नाहीं, त्यांनीं कर्म-योगाचा अवलंब करावा. ज्ञान व कर्म एक नाहींत, एका योग्यतेचे नाहींत हें सांगण्याचा येथें उद्देश आहे.

श्रीभगवानुवाच—लोकेऽस्मिन्निति । लोकेऽस्मिञ्शास्त्रानुष्ठाना धिकृतानां त्रैवर्णिकानां द्विविधा द्विप्रकारा निष्ठा स्थितिरनुष्ठेयतात्पर्य पुरा पूर्वं सर्गादौ प्रजाः सृष्ट्वा तासामभ्युदयनिःश्रेयसप्राप्तिसाधनं वेदार्थसंप्रदायमाविष्कुर्वता प्रोक्ता मया सर्वज्ञेनेश्वरेण हेऽनघापाप ।

श्रीभगवान म्हणतातः—हे पापशून्य अर्जुना ! ह्या लोकांत शास्त्रप्रमाणें कर्म किंवा ज्ञानसंपादन करण्याचा ज्यांस अधिकार आहे असे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य लोकांनीं आपापल्या योग्यतेनुसार दोन प्रकारांनीं पुरुषार्थ साध्य करून घेण्याचें साधन करावें असें मी सांगितलें आहे.

**अर्जुन**—केव्हां सांगितलें हें आपण ?

**भगवान**—अरे ! ज्या वेळेला ही त्रिविध सृष्टि उत्पन्न करून तेथें प्रजा निर्माण केली, त्याच वेळेस सर्वज्ञ व सर्वसत्ताधीश असा जो वेदरूपी ईश्वर त्या मी ह्या साक्षात मोक्ष देणाऱ्या व परंपरेनें मोक्ष देणाऱ्या मार्गाचें स्पष्टीकरण करून सांगितलें आहे. ज्या प्रजा उत्पन्न केल्या त्यांचें ऐहिक व पारलौकिक कल्याण व्हावें एतदर्थ निर्माण केलेलें उत्कृष्ट साधन जो वेदप्रणीत संप्रदाय तो प्रकट करितानांच योग्यतेनुसार दोन प्रकारची निष्ठा ती सांगितली आहे बरें !

तत्र का सा द्विविधा निष्ठेत्याह—तत्र ज्ञानयोगन ज्ञानमेव योगस्तेन सांख्यानामात्मानात्मविषयविवेकज्ञानवतां ब्रह्मचर्याश्रमादेव कृतसंन्यासानां वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थानां परमहंसपरिव्राजकानां ब्रह्मण्येवावस्थितानां निष्ठा प्रोक्ता । कर्मयोगेण कर्मैव योगःकर्मयोगस्तेन कर्मयोगेण योगिनां कर्मिणां निष्ठा प्रोक्तेत्यर्थः । यदि चैकेन पुरुषेणैकस्मै पुरुषार्थाय ज्ञानं कर्म च समुच्चित्यानुष्ठेयं भगवतेष्टमुक्तं वक्ष्यमाणं वा गीतासु वेदेषु चोक्तं कथमिहार्जुनायोपसन्नाय प्रियाय विशिष्टभिन्नपुरुषकर्तृके एव ज्ञानकर्मनिष्ठे ब्रूयात् ।

**अर्जुन**—भगवान् ! हे दोन प्रकार कोणते ?

**भगवान**—ऐकः ज्यांनीं आत्मा कोणता व अनात्मक काय आहे याबद्दल

विचार करून तारतम्यानें कायमचे सिद्धांत ज्ञानपूर्वक ठरवून ठेविले आहेत, ज्यांनीं ब्रह्मचर्याश्रमापासून विषयाचा त्याग करून संन्यासाश्रम ग्रहण केला आहे, ज्यांनीं वेदांतांतील महावाक्यांचा अर्थ स्वानुभवपूर्वक सिद्ध केला आहे, ज्यांनीं परमहंस दीक्षा परिव्राजकांची दीक्षा घेतली आहे, सारांश जे ब्रह्मामध्यें राहतात ब्रह्ममयच जे बनून गेले आहेत, त्यांच्या साठीं ज्ञानयोग ( ज्ञान हाच योग, ज्ञान ह्मणजे ब्रह्मज्ञान होय असें ज्यानें समजतें तो योग ) स्पष्ट तऱ्हेनें सांगितला आहे, व ज्याचें अंतःकरण शुद्ध झालें नाहीं, ज्यांचीं वासना नष्ट झाली नाहीं, परंतु ज्यांस मोक्ष हवासा वाटत आहे. त्यांच्यासाठीं कर्मयोग ( कर्म हाच योग, ज्याच्या योगानें अंतःकरणशुद्धि होऊन मन निर्विषय व वासनाशून्य होतें, तो निष्काम असा श्रौत स्मार्तविधि करण्याचा योग ) सांगितला आहे समजलास ? शुद्धांतःकरण ज्याचें झालें त्याला ज्ञानयोग आणि चित्त शुद्ध झालें नाही त्याला कर्मयोग असा हा भेद आहे ज्ञानयोग आणि कर्मयोग एका योग्यतेचें नाहींत आणि म्हणून ‘ मला कर्म करायाला न सांगतां ज्ञानमार्गच सांगा ’ अशी तुझी विनंति व्यर्थ आहे. तुझें चित्त अद्यापि वासनाशून्य झालें नाहीं, मी कर्ता, भोक्ता वगैरे विकार अद्यापि नष्ट झाले नाहींत, म्हणून तुला तुझ्या वर्णास व आश्रमास योग्य असा कर्मयोग तुला केला पाहिजे. निष्काम कर्म करून ‘ चित्तशुद्धी झाली ’ गुरुकृपेनें वेदांत श्रवणानें व ईश्वरी अनुग्रहानें तूं ज्ञानी झालास म्हणजे मग तूं ज्ञानमार्गाला योग्य होशील. ज्ञान व कर्म एकाच योग्यतेचीं आहेत असें समजलास ही तुझी चुकी होय.

**पूर्व०**—गुरुजी! पण भगवंतास ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय इष्ट नव्हता असें कशावरून? आचार्यांनीं आपल्या मतास अनुकूल असा अर्थ केला आहे हें ठीक आहे, पण भगवंताचाही हाच आशय होता असें कोठें आहे?

**सिद्धां०**—अरे! भल्या गृहस्था! पुरुषार्थ सिद्धी होण्यासाठीं मोक्ष मिळवावयाला ज्ञान व कर्म ह्या दोन्हींचें अनुष्ठान केलें पाहिजे असा जर भगवंताचा आशय असता, जर कोठें गीताशास्त्रांत त्यांस असें सांगावयाचें असतें. किंवा उपनिषदांत कोठें असें सांगितलेलें असतें, तर भल्या चिकित्सका! त्यांनीं

आपल्या भगिनीचा पति, आपल्याजवळ नेहमीं राहणारा, आपला उत्तम स्नेही जो अर्जुन त्याला एका शब्दानें तरी 'निरनिराळ्या अधिकाराच्या पुरुषांनीं करावयास योग्य असें ज्ञानासहित कर्म ह्मणजे कर्मसहित ज्ञान हेंच तूं कर' असें सांगते कीं नाहीं ? अर्जुनासारख्या एकनिष्ठ भक्ताला व निष्कपट स्नेह्याला जर समुच्चय सांगितला नाहीं, तर तो इष्ट नाहीं, साध्य नाहीं व संभवनीय नाहीं असाच भगवंताचा व श्रुतींचा अभिप्राय असला पाहिजे.

यदि पुनरर्जुनो ज्ञानं कर्म च द्वयं श्रुत्वा स्वयमेवानुष्ठास्यत्यन्येषां तु भिन्नपुरुषानुष्ठेयतां वक्ष्यामीति मतं भगवतः कल्प्येत तदा रागद्वेषवानप्रमाणभूतो भगवान्कल्पितः स्यात् । तच्चायुक्तम् । तस्मात्कयाऽपि युक्त्या न समुच्चयो ज्ञानकर्मणोः । यदर्जुनेनोक्तं कर्मणो ज्यायस्त्वं बुद्धेस्तच्च स्थितमनिराकरणात् । तस्याश्च ज्ञाननिष्ठायाः संन्यासिनामेवानुष्ठेयत्वं भिन्नपुरुषानुष्ठेयत्ववचनाच्च भगवत एवमेवानुतममिति गम्यते ॥ ३ ॥

**पूर्व०**—मला वाटतें कीं भगवंतांनीं ज्ञान व कर्म हीं वेगळालीं आहेत असें जें येथें सांगितल्यासारखें दिसतें,—व तीं वेगळीं नाहींत असें कोठेंही प्रमाणभूत ग्रंथांत सांगितलें नाहीं,--याचें तात्पर्य इतकेंच कीं **इतर लोकांनीं** ज्ञान आणि कर्म हीं निरनिराळीं आहेत असें समजावें; बाकी आपला स्नेही अर्जुन जवळच होता, त्याला मात्र एकांतांत 'ज्ञानकर्माचा समुच्चय तूं मात्र स्वतः कर' असें सांगितलें असावें. खरें कीं नाहीं गुरुमहाराज !

**गुरु**—अगदीं विचार केल्याखेरीज तूं बोलतो आहेस हें ! तूं ह्मणतोस अशी जर क्षणमात्र कल्पना केली तर 'हा माझा, तो माझा नव्हे' असला पक्षपाती व क्रोधलोभविकारदर्शी परमेश्वर संसारांत पडला असें ह्मणावें लागेलना ? असल्या कपटपटु परमेश्वराचें वाक्य केव्हांही प्रमाणभूत व्हावयाचें नाहीं. 'हा माझा लाडका,' 'तो नाहीं,' असें परमेश्वराचें बोलण्यांत येणें व कृतींत निघणें शक्यच नाहीं. ह्मणून तुझी शंका व्यर्थ आहे. तात्पर्य कोणतीही युक्ति लढविलीस तरी ज्ञान आणि कर्म हीं एके ठिकाणीं असूं शकणार नाहींत. आतां 'बुद्धि ही कर्मापेक्षां श्रेष्ठ आहे,' असें अर्जुन ह्मणाला तें ह्मणणें तसें राहिलें आहे; त्याचें खंडन भगवंतांनीं केलें नाहीं हें खरें. पण ज्ञानाचे व कर्माचे अधिकारी निरनिराळे असतात असें सांगितलें आहे या-

वरून ज्ञानमार्गाचा अवलंब संन्याशांनींच करावा असें भगवंतांचें मत दिसतें. ह्मणून अर्जुनानें आपल्या मनाशींच गांठ घातली असेल कीं भगवंतानें आपल्यास कर्ममार्गच सांगितला आहे.

**मधु० श्रीधर, पर्वते, द्विवेदी** व **चतरजी** यांचा हाच अभिप्राय आहे. मोक्षास मार्ग एकच आणि तो ज्ञानमार्ग होय. कर्ममार्गानें ज्ञानाची तयारी होते ह्मणून ज्ञान व कर्म हीं एका योग्यतेचीं नाहींत. ज्ञान हें प्रधान आहे. कर्म गौण होय; ह्मणून 'ज्ञान संपादूं कां कर्म करूं?' असा विकल्पमूलक प्रश्न योग्य नाहीं. कर्मानें चित्त कसें शुद्ध होतें तें ४ ते १९ श्लोकांत सांगितलें आहे. कर्म आणि उपासना हीं ज्ञानाचीं साधनें होत. **प्रपा०**--'लोक'= मुमुक्षु. **शंकरा०**--"**तमेवैकं विजानथ**" "**नानुध्यायाद्बहूञ्शब्दान्वाचो विग्लापनं हि तत्**" (त्या एकट्याला ब्रह्माला, जाणा, पुष्कळसे शब्द उत्पन्न करून घटपटादि खटपट योग्य नाहीं. फार शब्द बोलणें ह्मणजे वाणीस व्यर्थ शिणविणें होय.) योगी=गृहस्थाश्रमी. यांचे कर्म पहा:, '**अहरहः स्नात्वा संध्यामुपासीत**' (प्रत्यहीं स्नान करून संध्यावंदन करावें) '**वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीत**' (वसंत ऋतूमध्यें ब्राह्मणानें अग्निप्रतिष्ठापन करावें) '**सत्यं वद, धर्मं चर**' (खरें बोल, धर्मानुसार वाग) वगैरे कर्म मंत्र सांगतात.

**रामा०**—'लोके' = निरनिराळ्या प्रकाराचे अधिकारी असतात अशा सृष्टिमध्यें. 'पुरा' = मागच्या अध्यायांत. 'प्रोक्ता' = स्पष्टपणानें कथन केलें आहे. निष्कामकर्मानें परमेश्वराचें आराधन करून चित्तशुद्धि संपादन केलेले सत्पुरुष मात्र ज्ञानमार्गास अधिकारी होतात. तूं वासनापूर्ण आहेस म्हणून कर्माधिकारीच आहेस. 'सांख्य' = आत्मा हाच ज्याच्या बुद्धीचा विषय आहे असें. योगी = विषयांनीं व्याकुल होते ज्याचें मन असे संसारी. ह्मणून मागील अध्यायांत विरोध नाहीं. ज्ञान आणि कर्म हीं दोन्हीं सारख्याच योग्यतेचीं आहेत ह्मणून मी वाटेल तो मार्ग स्वीकारीन असें तूं समजलास ही तुझी चुकी होय.

**द्वैतवादी**—'ज्ञानयोग = जेथें ज्ञानच पुष्कळ असून कर्म हें फारच अल्प असतें. सनकादिक ज्ञानी ईश्वरभक्ति करितात. यावरून ज्ञानी पुरुषासही

कर्म अवश्य आहे हें सिद्ध होतें ! कर्मयोगांत कर्म पुष्कळ आणि ज्ञान अल्प असतें. जनक, प्रियव्रत वगैरे कर्ममार्गांत राहूनही ज्ञानी झाले ! सारांश ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय असल्याशिवाय मोक्ष नाहीं. तात्पर्य कर्माचा क्षय कधींही होत नाहीं.'—जोंपर्यंत भेदबुद्धि कायम आहे, तोंपर्यंत कर्मक्षय होत नाहीं हें ह्मणणें ठीकच आहे; पण अभेदभाव होऊन पूर्णत्व प्राप्त झाल्यावर कर्म उरतें हा आग्रह होय. पूर्णज्ञान झाल्यावर नैष्कर्म्य असतें हा वेदांती-सिद्धांत कायमचा आहे.

**ज्ञानेश्वरः**—हे मार्ग (कर्म व ज्ञानयोग) तरी दोन्ही। परएकवटती निदानीं। जैशी सिद्धसाध्य भोजनी । तृप्ति एक ॥ कां पूर्वापर ( पूर्ववाहिनी व पश्चिम-वाहिनी ) सरिता । भिन्न दिसती वाहता । मग सिंधु मिळणी ऐक्यता । पावती शेखीं ॥ तैशीं दोन्हींही मतें । सुचिति ( सांगति ) एका कारणातें । पारि उपास्ति ( उपासना, निष्ठा, योग ) ते, **योग्यते आधीव असे** ॥ देखे उत्प्लवनासरिसा ( उडाल्या बरोबर ) । पक्षी फळासि झोंबे जैसा । सांगे नर केवि तैसा । पावे वेगें ? ॥ एकदम फळाशीं जाऊन झगटणारा पक्षी व हळू हळू पण निश्चयानें चालून शेवटीं फलास्वाद घेणारा मनुष्य या दृष्टांतानें ज्ञाने-श्वरांनीं सांख्य आणि कर्म यांतील विशेष किती चातुर्यानें प्रकट केला आहे हा !

**रंगनाथांचे** ' ज्ञान्यास कर्म नको ' यावरील एक दोन दृष्टांत पहाः—

........नेत्र असतां घटपटादि दिसे । त्यांसि कां वळसे स्नानादिकांचे ? । घट प्रकाशावया कारणें । एक शुद्ध नेत्राचि पाहिजे सर्व गुणें । पारि नेत्र आणि शौच, स्नान होम करणें ! । तरीच पाहणें घटास स्वयें ? ॥ अहो ! निद्रा लागावया कारणें । हिंडणें नलगे गा ! रानोरानें । तैसें ब्रह्मसुख नि-र्व्यापारपणें । तेथ कर्म करणें । कर्म काह्यां ( कशाला ? ) ॥

**डेविस साहेब** सांख्यशब्दानें ' कापिलसांख्य, प्रधानकारणवादी सांख्यमत' समजतात हें अर्थातच भ्रमात्मक आहे. ॥ ३ ॥

मां च बन्धकारणे कर्मण्येव नियोजयसीति विषण्णमनसमर्जुनं कर्मनाऽऽरभ इत्येवं मन्वानमालक्ष्याऽऽह भगवान्—न कर्मणामना-रम्भादिति । अथ वा ज्ञानकर्मनिष्ठयोः परस्परविरोधादेकेन पुरुषेण युगपदनुष्ठातुमशक्यत्वे सतीतरेतरानपेक्षयोरेव पुरुषार्थहेतुत्वे प्राप्ते

कर्मनिष्ठाया ज्ञानानिष्ठाप्राप्तिहेतुत्वेन पुरुषार्थहेतुत्वं न स्वातन्त्र्येण, ज्ञाननिष्ठा तु कर्मनिष्ठापायलब्धात्विका सती स्वातन्त्र्येण पुरुषार्थहेतुरन्यानपेक्षेत्येतमर्थं प्रदर्शयिष्यन्नाह भगवान् —

**अर्जुन**—आणि परमेश्वरा ! मला मात्र आपण या नीच व बंध उत्पन्न करणाऱ्या श्रमदायक कर्मामध्यें गुंतवून टाकित आहांत ! हर ! हर ! ! काय माझें दुर्दैव हें? असो; मी कर्मच करावयाचा नाहीं ह्मणजे झालें !

**भगवा०**—हा खुळ्या अर्जुना ! अरे असें खिन्न व्हायला काय झालें? माझें म्हणणें तुला अद्यापि समजलें नाहीं, ह्मणून तूं असा बावरल्यासारखा झाला आहेस 'कर्माला आरंभ केल्याखेरीज नैष्कर्म्य सिद्धि होत नाहीं' ह्या श्लोकांत मी जें तत्त्व सांगणार आहे तें नीट समजून घे. त्याचप्रमाणें तुला पुनः एकवार सांगतों कीं ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा हे दोन्ही मार्ग परस्पर विरोधी आहेत. 'मीं दोन्ही मार्गांचा एकदम अवलंब करीन' असें एखाद्या पुरुषानें ह्मटलें तर त्याला तसें करितां यावयाचें नाहीं ज्या कोणाला पुरुषार्थाचा ह्मणजे मोक्षाचा लाभ करून घ्यावयाचा असेल त्यानें ज्ञानामध्यें कर्माची किंवा कर्मामध्यें ज्ञानाची भेसळ न करितां स्वतःच्या योग्यतेनुसार अनुरूप मार्गाचा अवलंब केला पाहिजे.

**अर्जुन**—ह्मणजे ज्ञानमार्गानें मुक्ति मिळते व कर्ममार्गानेंही मिळते, असें झालें. आतां कर्ममार्ग जास्त दगदगीचा व ज्ञानहीन आहे ह्मणून सहज साध्य होणारा जो ज्ञानमार्ग त्याचेंच मी अवलंबन करितों ह्मणजे झालें.

**भगवा०**—अद्यापि तुला उमज पडला नाहीं. कर्मनिष्ठा हा एक मुक्ति मिळविण्याचा मार्ग आहे, याचा अर्थ असा कीं निर्मळ मनानें व निर्लोभ बुद्धीनें कर्मयोग यथासांग परमेश्वर कृपेनें सिद्धीस गेला असतां ज्ञानमार्गाचा लाभ होतो. कर्ममार्गाला मुक्ति देण्याचें स्वतंत्र सामर्थ्य नाहीं. ज्ञानमार्ग सांपडून देणारा कर्ममार्ग आहे कर्ममार्ग संपला व तो यथासांग सिद्ध झाला म्हणजे ज्ञानमार्गाची प्राप्ति होते. सारांश ज्ञानमार्गानें मात्र मोक्ष मिळतो, अन्यमार्गानें मिळत नाहीं. ज्ञानमार्गाची प्राप्ति कर्मानें होते. मोक्ष देण्यास एकटा ज्ञानमार्गच काय तो समर्थ आहे. ज्ञानमार्ग हा मुख्य पुरुषार्थ आहे. कर्म हें एक साधन आहे. त्यानें ज्ञानमार्ग सिद्ध झाला म्हणजे मोक्ष मिळतो. एवंच नुसत्या कर्मानें मोक्ष मिळत नाहीं, ज्ञान व कर्म यांचा समुच्चय होणें शक्य नाहीं; ज्ञानानें

मोक्ष मिळतो, पण तें ज्ञान योग्य कर्माचरणानें मात्र आपल्यास प्राप्त होतें. दोरीचें ज्ञान झाल्यावर ज्याप्रमाणें सर्पाचे ज्ञानाची अवश्यकता नसते, त्याप्रमाणेंच पूर्ण ज्ञान झाल्यावर कर्माची अपेक्षा राहत नाहीं हें नीट समजण्यासाठीं पुढील श्लोकाचें रहस्य पूर्णपणें अवगत करून घेः—

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥४॥**

**कर्मणां** ( कर्माच्या ) **अनारम्भात्** ( अनारंभानें, कर्में करण्याला आरंभच केला नाहीं तर ) **नैष्कर्म्यं** ( कर्मशून्यता ) **पुरुषः न अश्नुते** ( पुरुषाला मिळत नाहीं ). सारांश अनाधिकारी मनुष्यानें कर्मच करावयाचें तेवढें सोडून दिलें ह्मणजे तो कर्मशून्य होतो असें नाहींच ( आणि ) **संन्यसनात् एव** ( कर्मत्याग तेवढा नुसता केला म्हणजेच ) **सिद्धिं** ( इष्टकार्याची, मोक्षाची, प्राप्ति ) **न समधिगच्छति** ( होतें असेंही नाहीं. )--सारांश नुसता कर्मत्याग केला ह्मणजे मुक्ति मिळते असेंही नाहीं.

न कर्मणामनारम्भादप्रारम्भात्कमणां क्रियाणां यज्ञादीनामिह जन्मनि जन्मान्तरे वाऽनुष्ठितानामुपात्तदुरितक्षयहेतुत्वेन सत्वशुद्धिकारणानां तत्कारणत्वेन च ज्ञानोत्पत्तिद्वारेण ज्ञाननिष्ठाहेतूनां

" ज्ञानमुत्पद्यते पुसां क्षयात्पापस्य कर्मणः ।
यथाऽऽदर्शतलप्रख्ये पश्यत्यात्मानमात्मनि "

इत्यादिस्मरणादनारम्भादननुष्ठानान्नैष्कर्म्यं निष्कर्मभावं कर्मशून्यतां ज्ञानयोगेन निष्ठां निष्क्रियात्मस्वरूपेणैवावस्थानमिति यावत्, पुरुषो नाश्नुते न प्राप्नोतीत्यर्थः ।

स्नानसंध्या, यज्ञयागादिक नित्य व नैमित्तिक कर्माला आरंभ झाल्याखेरीज कर्मशून्यता प्राप्त व्हावयाची नाहीं.

**शिष्य**—महाराज ! एका जन्मामध्यें हीं सर्व कर्में कशीं होणार ?

**गुरुजी**—-अरे ! ह्या किंवा पूर्वजन्मीं सुद्धां केलेलीं सत्कर्में आपल्या हातून जीं काय पातकें झालीं असतील त्यांचा नाश करण्यास समर्थ होतात. सत्कर्में परमेश्वर चरणीं अर्पण केल्यानें पापवासना व फलाशा ह्या दोन्हीं अमंगलांचा नाश होत असतो; व चित्त निर्मळ होत असतें. चित्तशुद्धी झाली तरच—

अन्यथा नाहीं—ज्ञानमार्गाचा शोध लागून ज्ञानही प्राप्त होतें. सारांश ज्ञानमार्गाचा लाभ करून देणाऱ्या चित्तशुद्धीची उत्पत्ति, पापक्षय करणाऱ्या परमेश्वरार्पितसत्कर्माचरणानें होतें समजलास ? ह्मटलें आहे:—"पापमूलक कर्माचा नाश झाल्यानंतर मात्र ज्ञानाचा उदय होतो. उघड आहे कीं आरसा स्वच्छ झाल्यानंतर मात्र ज्याप्रमाणें आपलें स्वरूप यथास्थित रीतीनें आपल्यास दृग्गोचर होतें, त्याचप्रमाणें कर्मरूपी उपाधिशून्य झालेल्या आत्मारामास मात्र आपल्या स्वरूपाचें ह्मणजे ब्रह्माचें ज्ञान होतें, अथवा ब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊन अद्वैतज्ञान होतें." अशा अनेक स्मृति आणखी सांगतां येतील असो; तेव्हां जन्मजन्मांतरींच्या पापांचा क्षय झाला पाहिजे हा क्षय परमेश्वरार्पित सत्कर्मांनीं मात्र व्हावयाचा आहे. एवंच कर्म करूनच नैष्कर्म्य मिळवून घ्यावयाचें आहे.

> कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति वचनात्तद्विपर्ययात्तेषामारम्भान्नैष्कर्म्यमश्नुत इति गम्यते । कस्मात्पुनः कारणात्कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं नाश्नुत इति । उच्यते, कर्मारम्भस्यैव नैष्कर्म्योपायत्वात् । न ह्युपायमन्तरेणोपेयप्राप्तिरस्ति । कर्मयोगोपायत्वं च नैष्कर्म्यलक्षणस्य ज्ञानयोगस्य श्रुताविह च प्रतिपादनात् । श्रुतौ तावत्प्रकृतस्याऽऽत्मलोकस्य वेद्यस्य वेदनोपायत्वेन " तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन " इत्यादिना कर्मयोगस्य ज्ञानयोगोपायत्वं प्रतिपादितम् ।
>
> इहापि च—" संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः "
> " योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये "
> " यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् "
>
> इत्यादि प्रतिपादयिष्यति ।

**शिष्य**—गुरुजी ! कर्म करून नैष्कर्म्य संपादावयाचें हें विरोधात्मक आहे.

**गुरुजी**—यांत परमार्थदृष्टीनें विरोध नाहीं. आपण जें काय करतों, आपल्या हातून जें काय होतें, तें सर्व परमेश्वरच करीत असतो, असा निश्चय होऊन अहंकारबुद्धि सर्वथा नष्ट झाली व भोग भोगणाराही मी नव्हे तेव्हां मला कर्मफलाची आशा करण्याचें कारण नाहीं, असें निर्लोभ मन झालें ह्मणजे आपल्या हातून झालेलीं कर्में नैष्कर्म्य स्वरूपींच होतात. ही नैष्कर्म्य-

सिद्धि, ह्मणजे ज्ञाननिष्ठा किंवा निष्क्रय असें जें आपलें शुद्ध स्वरूप त्याची प्राप्ति होय. पण ही प्राप्ति कर्तव्यकर्म न केल्यानें होत नाहीं; तर चित्तशोधक नित्य नैमित्तिक कर्तव्यकर्माच्या निर्लोभ आचरणानें मात्र प्राप्त होते. अतएव तुझ्यासारख्या मलिन चित्ताच्या पुरुषानें कर्मच करावयाचें टाकून दिलें तर त्यास मोक्ष मिळण्याला अवश्य लागणारें नैष्कर्म्य साध्य व्हावयाचें नाहीं.

**शिष्य**—भगवन्! ‘ कर्माला आरंभ करून तीं सिद्धीस नेल्याशिवाय नैष्कर्म्य स्थिति प्राप्त व्हावयाची नाहीं ’ याचा अर्थ कर्माचरणानें नैष्कर्म्यसिद्धि होते, असाचना ?

**गुरुजी**—होय हाच आहे अर्थ. मग तुझें ह्मणणें काय आहे ?

**शिष्य**—ह्मणणें मिळून इतकेंच कीं हा विषय सरळ रीतीनें सांगावयाचें सोडून देऊन भगवंतांनीं इतका द्राविडी प्राणायाम कशाला केला ? कर्मानें नैष्कर्म्य प्राप्त होतें, असें कां सांगितलें नाहीं ? कर्माचरणाशिवाय नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं असें वेड्यावांकड्या पद्धतीनें कां सांगितलें ?

**गुरुजी**—याचा हेतु इतकाच आहे कीं **फलेच्छारहित कर्माचरणाशिवाय** नैष्कर्म्य मिळविण्याला **दुसरा मार्गच नाहीं** ’ हें स्पष्ट रीतीनें अर्जुनास कळावें कर्म करावें किंवा दुसरें कांहीं करावें असा विकल्प अर्जुनाच्या मनांत कदाचित् उत्पन्न होईल, त्याचा समूळ बीमोड करण्यासाठीं हा आवश्यक द्राविडी प्राणायाम भगवंतांनीं केला आहे. कर्म हाच एक उपाय कर्मशून्यता प्राप्त करून देणारा आहे. आणि या उपायाची आराधना केल्याखेरीज उपेय वस्तु ( इष्ट गोष्ट ) मिळावयाची नाहीं. समजलास ? कर्मशून्यता हें लक्षण ज्या ज्ञाननिष्ठेचें ती निष्ठा कर्माशिवाय लब्ध व्हावयाची नाहीं. असा सिद्धांत उपनिषदामध्यें व या गीताशास्त्रांत इतर ठिकाणीं, अनेक वेळीं प्रकट केला आहे. जाणून घेणाच्या गोष्टींमध्यें अत्यंत व सर्वांशीं प्रमुख जो आत्मलोक अथवा मोक्ष तो जाणून घेण्यास यज्ञयागादिक नित्यनैमित्तिक कर्तव्याचें सम्यगाचरण हाच आहे असें ब्रह्मविचार करितांना श्रुतीनें सांगितलें आहे. ‘ वेदांचें पठन करून व तदनुसार यज्ञाचें आचरण करून ब्रह्मजिज्ञासु लोक ब्रह्म जाणण्याचा प्रयत्न करितात. ’ असें श्रुति म्हणते. यावरून ज्ञानयोग

साध्य करून घेण्याला कर्म साधन आहे, असाच अर्थ निष्पन्न होतो. कर्माचरण केल्याशिवाय म्हणजे योगमार्गानें गेल्याशिवाय संन्यासाचा अधिकार प्राप्त होणें अत्यंत कष्टप्रद आहे' ( अ० ५ श्लो० ६. ) 'चित्तशुद्धि प्राप्त करून घेण्यासाठीं योगी लोक विहितकर्माचें आचरण करितात.' (अ० ५ श्लो. ११ 'बुद्धिमान लोकांचें चित्त पावन करण्यास यज्ञ, दान व तपाचरण हीं साधनें आहेत. ( अध्याय १८ श्लोक ५. ) या प्रमाणें गीताशास्त्रांतही भगवान प्रतिपादन करितील.

ननु च-'अभयं सर्वभूतेभ्यो दत्त्वा नैष्कर्म्यमाचरेत्' इत्यादौ कर्तव्यकर्मसंन्यासादपि नैष्कर्म्यप्राप्तिं दर्शयति लोके च कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यमिति प्रसिद्धतरमतश्च नैष्कर्म्यार्थिनः किं कर्मारम्भेणेति प्राप्तमत आह—न च संन्यसनादेवेति । नापि संन्यसनादेव केवलात्कर्मपरित्यागमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्यलक्षणां ज्ञानयोगेन निष्ठां समधिगच्छति न प्राप्नोति ॥ ४ ॥

**शिष्य**—महाराज ! 'सर्व भूतांस अभयप्रदान देऊन आपण निष्कर्म व्हावें' या व असल्या अर्थाच्या अनेक वाक्यांवरून 'कर्तव्यकर्माचा त्याग केला तरी सुद्धां नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त होते' असेंच सिद्ध होतें. ह्याचप्रमाणें व्यवहारांतही असेंच प्रसिद्ध आहे कीं, कर्म सोडलें ह्मणजे कर्मशून्यता प्राप्त होते. तेव्हां गुरुजी ! नैष्कर्म्य मागणारा जो अर्जुन त्याला भगवंतांनीं 'कर्मारंभ केल्याविना गति नाहीं' असें सांगितलें याचा अर्थ काय ?

**गुरु**—ठीकच आहे. या तुझ्या सारख्यांच्या शंकेचें निवारण व्हावें ह्मणूनच भगवान श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगतात कीं, केवळ कर्मत्याग केला ह्मणजेच ( ह्मणजे ज्ञानशून्य असून नुसता कर्मत्यागच केला तर ) नैष्कर्म्य ( निष्क्रियत्व ) हेंच आहे लक्षण जिचें अशी ज्ञाननिष्ठा प्राप्त होत नाहीं. सारांश, चित्त शुद्ध करणाऱ्या कर्माला आरंभच केला नाहीं, किंवा कर्तव्यकर्म करावयाचेंच सोडून दिलें तर जेथें निष्क्रिय अशा स्वरूपानें राहतां येतें अशा मोक्षस्थितीचा लाभ होत नाहीं.

**अद्वैतवादी** टीकाकारांचा हाच अभिप्राय आहे. ज्ञान उत्पन्न होईपर्यंत वर्णाश्रमास उचित अशा धर्माचें प्रत्येकानें पालन केलें पाहिजे. देहाभिमान

आहे तोंपर्यंत कर्म केलेंच पाहिजे. खरें ज्ञान व्हावयास वैराग्य असलें पाहिजे. अहंता नष्ट झाल्याशिवाय वैराग्य नाहीं. नित्यकर्मे करून तीं परमेश्वरार्पण केल्याशिवाय अहंता नष्ट होत नाहीं. म्हणून कर्म, निर्लोभ कर्म, परमेश्वरार्पण बुद्धीनें मनुष्याच्या हातून झालेंच पाहिजे. **शंकरानंद** मात्र 'संन्यास' या शब्दानें ब्रह्माचें ठायीं आरोपित केलेल्या नामरूपाचा त्याग असें समजतात. 'ब्रह्माशीं आपलें तादात्म्यच आहे असें समजून ज्ञानी पुरुष ज्ञाननिष्ठ होतो. हें तादात्म्य अनुभवसिद्ध झाल्यावर मात्र खरें वैराग्य बाणतें' असें **चतरजी** ह्मणतात.

**रामानुजाचार्य**—'सर्व इंद्रियांची त्यांच्या त्यांच्या व्यापारापासून निवृत्ति होणें, ह्मणजे डोळ्यांनीं विषय पहावयाचा नाहीं, कानांनीं ऐकावयाचा नाहीं, अशी सर्व इंद्रियांची स्वव्यापारापासून निवृत्ति होणें यालाच नैष्कर्म्य ह्मणतात. हें फार कठिण आहे. देहप्रारब्धानें प्राप्त झालेलें कर्म निष्काममनानें ईश्वरास समर्पण केलें तर चित्तशुद्धि व भक्ति उत्पन्न होतात आणि शेवटीं ईश्वरी अनुग्रह होऊन अनंत जन्मींचीं पातकें नष्ट होतात. म्हणून कर्मत्याग योग्य नाहीं.

**द्वैतवादी**—कर्मच केलें नाहीं ह्मणजे मुक्ति मिळते असें असतें तर पर्वतादिकांसही मुक्ति मिळाली असती. पण असा प्रकार नाहीं. शिवाय पूर्वजन्मींच्या कर्मानें तुला पुनः देह प्राप्त झाला आहे, ह्मणून कर्मफलाच्या बीजाचें शून्यत्व नाहीं. देहपातापर्यंत कर्म केलेंच पाहिजे. सारांश, नुसतें कर्माकरण व्यर्थ आहे. 'ईश्वरज्ञानपूर्वक कर्माकरण झालें तरच संन्यास योग्य आहे' असें **ब्रह्मपुराणांत** सांगितलें आहे. संसारांतून सुटावयाचें असल्यास आशापिशाचिकेचा त्याग केला पाहिजे व परमेश्वराचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे. शिवाय संन्यास म्हणजे कर्मपरित्याग नव्हे, तर काम्यकर्मांचा परित्याग होय, असें भगवानच सांगणार आहेत. ( पहा अ० १८ श्लोक २ ) नुसत्या वैराग्यानें मोक्ष नाहीं त्याला चित्तसमाधान आणि भगवत्संतोष हीं आवश्यक आहेत. अतएव जप. ध्यान, उपासना यांचा त्याग अनर्थकारी आहे. सारांश, कर्म केलेंच पाहिजे; प्रत्येक कर्म बद्धक आहे असें म्हणशील तर तसें नाहीं, ( अ० ३ श्लो० ९ पहा. )

**सरकार**—भक्तीशिवाय मुक्ति नाहीं.

**वल्लभाचार्यः**—नुसत्या कर्माचा त्याग केला ह्मणजे पुरुषार्थ साध्य होतो असें नाहीं. स्वरूपज्ञान होणें अवश्य आहे.

**ज्ञानेश्वर**—नातरी तृप्ति इच्छिजे । तरी कैसेनि पाक न कीजे ! । कीं सिद्ध हीन सेविजे ? । केवि सांगे ॥ जंव निरार्तता ( निरिच्छपणा ) नाहीं । तंव व्यापार असे पाही । मग संतुष्टीच्या ठायीं । कुंठे सहजीं ॥

**गीताव्याख्याकारः**—येथ उचित कर्म उबगावें । आणि निजहितासि मुकावें । आळसें पीयूष नेधावें । मग वर पडे व्हावें मरणासीं ! ॥

**भीमसेनः**—' कर्म ' = अग्निहोत्रादिक, अध्ययन, अध्यापन व उपदेश वगैरे सर्व सत्कर्मे सुख मिळावयासाठीं कर्म केलेंच पाहिजे. कर्म केलें पाहिजे व तें फलप्राप्तीपर्यंत सोडतां उपयोगी नाहीं. ॥ ४ ॥

कस्मात्पुनः कारणात्कर्मसंन्यासमात्रादेव ज्ञानरहितात्सिद्धिं नैष्कर्म्य-लक्षणां पुरुषो नाधिगच्छतीति हेत्वाकाङ्क्षायामाह—

**शिष्यः**—भगवन् ! नैष्कर्म्य नामक जी मोक्षासिद्धि ती ज्ञानशून्य पुरुषानें नुसता कर्मसंन्यासच केला तर त्याला कां प्राप्त होऊं नये ? कर्मसंन्यास केला ह्मणजे नैष्कर्म्य प्राप्त होऊन मोक्ष मिळावा असें कां नाहीं ?

**गुरुजीः**—कां नाहीं तें ऐकः—

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ॥**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

**हि** ( कारण ) **कश्चित् क्षणं अपि जातु** ( कोणताही प्राणी किंवा पदार्थ एक क्षणभर सुद्धां ) **अकर्मकृत्** ( कर्म न करणारा असा ) **न तिष्ठति** (असत नाहीं )—सारांश कर्म करीत नाहीं असा कोणाचा एक क्षणही जात नाहीं.—**हि** ( कारण हें प्रसिद्धच आहे कीं ) **अवशः** ( परतंत्र असल्याकारणानें ) **सर्वः** ( सर्व, पदार्थमात्र ) **प्रकृतिजैः गुणैः** ( प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्व, रज, तम, या गुणांच्या प्राबल्यामुळें ) **कर्म कार्यते** ( कर्म करविला जातो. ) —सारांश नित्य चंचलस्वरूपानें राहणाऱ्या प्रकृतीच्या तीन गुणांमुळें प्रत्येक पदार्थमात्रास कर्म करणें भागच पडत आहे. एवं च प्रत्येका करवीं कर्म होतच असतें; तेव्हां ' मी त्याचा त्याग करीन ' असा अभिमान धरणें मौर्ख्य-सूचक आहे.—

न होति । न हि यस्मात्क्षणमपि कालं जातु कदाचित्कश्चित्तिष्ठत्य कर्मकृत्सन् । कस्मात्कार्यते हि यस्मादवश एव कर्म सर्वः प्राणी प्रकृतिजैः प्रकृतितो जातैः सत्वरजस्तमोभिर्गुणैः । अज्ञ इति वाक्यशेषः, यतो वक्ष्यति—' गुणैर्यो न विचाल्यते ' इति । सांख्यांनां पृथक्करणादज्ञानामेव हि कर्मयोगो न ज्ञानिनाम् । ज्ञानिनां तु गुणैरचाल्यमानानां स्वतश्चलनाभावात्कर्मयोगो नोपपद्यते । तथा च व्याख्यातं वेदाविनाशिनमित्यत्र ॥ ५ ॥

कारण उघडच आहे कीं ' एक क्षणभर तरी मी कर्मशून्य राहिलों आहें असें वाटण्याची किंवा असण्याची स्थिति कोणास केव्हांही प्राप्त होणें संभवनीय नाहीं. कारण प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्वरजादिक गुण कोणाही प्राण्यास एक क्षणभर निष्कर्माच्या स्थितींत बसूं देणार नाहींत; कर्म करावयास लावतीलच.

**शिष्य**—मग ज्ञानी, अज्ञानी, असा भेदाभेद मांडलाच ह्मणायचा ! संन्यास कोणालाच साध्य नाहीं तर मग !

**गुरु**—हा खुळ्या ! अरे येथें ह्मणजे सर्व अज्ञ लोक असा अर्थ घ्यावयाचा. कारण ' प्रकृतीच्या गुणामुळें ज्याचा चेतोभंग होत नाहीं ' असें पुढें सांगणार आहेत. शिवाय सांख्य आणि योगी असे निरनिराळे विभाग केले आहेत त्यावरून अज्ञानी पुरुषांस मात्र कर्म आहे, ज्ञान्यांस नाहीं, असें स्पष्टच होतें. कारण ज्ञानी पुरुष स्वतः कर्म करीत नाहींत व प्रकृतीचे गुणही त्यांस कर्म करण्यास लावूं शकत नाहींत; आणि ह्मणून त्यांस कर्मयोग सांगणें अप्रयोजक होईल. दुसऱ्या अध्यायाच्या २१ व्या श्लोकांत ' ज्ञानी पुरुषाला कर्म नाहीं, हा विषय स्पष्ट केलाच आहे ' मी करितों हा अभिमान आणि ' मला पाहिजे' ही आशा नष्ट झाली ह्मणजे संन्यास योग्य होतो. देहपातापर्यंत ज्ञानी पुरुषाच्या हातून कर्म होतें, पण तें होत आहे अशी त्याच्या निरभिमानी आत्मारामास खबर नसते अद्वैतवाद्यांत ऐकमत्य आहे. **श्रीधर** व **मधुसूदनीकार** ' गुण ' रागद्वेष असाही अर्थ करितात. ' **सांख्ये प्रकीर्तितस्त्यागस्त्यागोऽपि मनसैव हि** ' ज्ञानमार्गामध्यें सांगितलेला कर्मत्याग ह्मणजे मनानें केलेला विषयत्याग होय ) असें एक **समर्थ** वाक्य **प्रो० द्विवेदी** देतात.

**प्रपाकार** विचारतातः 'कर्म होतेंच तर आपण शुद्ध सुख देणारें सत्कर्म तरी कां करूं नये ?'

**रामानुज**:---शुद्ध पूर्वजन्मार्जित पापपुण्यामुळें प्राप्त झालेल्या देहाकडून कर्म होणारच. ह्मणून सात्त्विकवृत्ति उत्पन्न होईल असें कर्म करावें. व ज्ञान संपादन करावें. ज्ञानी पुरुषाला सात्त्विकवृत्तीचा अवलंब सुद्धां इष्ट नाहीं. अहंता व वासना नष्ट करणें हा सात्विक वृत्तीचा अर्थ असेल तर ठीकच आहे.

**द्वैतवादी**:—'प्राणी पराधीन आहेत ह्मणून व ते ईश्वराचे दास आहेत ह्मणून ईश्वराचे आज्ञेनुसार मनुष्यानें कर्म केलेंच पाहिजे. 'अः= ब्रह्म=विष्णु; त्याला जे वश ते अवश होते !' सारांश, विष्णूच्या प्रेरणेमुळें अगर प्रकृतीच्या प्रेरणेमुळें प्राण्यास कसलें तरी कर्म करावेंच लागतें.

**चतरजी**:—प्रकृति गुणसमुदाय. आत्मा हा निर्गुण आहे. याच निर्गुण आत्म्यावर प्रकृतीचा म्हणजे गुणांचा आरोप करणें ही माया होय ही माया जोंपर्यंत आहे तोंपर्यंत विकारजन्यकर्म करणें हें मनुष्याच्या पाठीमागेंच लागलें आहे.

**भीमसेनः** प्रकृतिज = देह उत्पन्न झाला त्यावेळीं प्राप्त झालेल्या गुणांनीं.

**ज्ञानेश्वराचें** व्याख्यान अति सुंदर आहे. ते विचारतातः—देखे विहित कर्म जेतुलें ( जितकें ) तें सगळें जरी वोसांडिलें ( टाकिलें )। तरी स्वभाव काय निमालें ? । इंद्रियांचें ॥ सांगावें श्रवणीं ऐकावें ठेलें ? । कीं नेत्रींचें तेज गेलें ? । हें नासारंध्र बुझालें ? । परिमळ नेघे ? । नातारि प्राणापान गति । कीं निर्विकल्प झाली मति ? । कीं क्षुधा तृषादि आर्ति ( इच्छा ) खुंटलिया ? । हे स्वप्नावबोध ठेलें ? । कीं चरण चालों विसरले ? । हें असो; काय निमालें ? । जन्ममृत्यु ? ॥ हे न ठकेची ( रहात नाहीं ) जरी कांहीं ! तरी सांडिलें तें कायी ( काय ) ? । ह्मणोनि कर्मत्याग नाहीं ! प्रकृतिमंता ॥....देखे रथीं आरूरिजे । मग जरी निश्चळ बैसिजे । तरी चळ होउनि हिंडिजे ! । परतंत्रा ॥ ....सारांश — म्हणवूनि संग जंव प्रकृतीचा । तंव त्याग न घडे कर्माचा । ऐसियाही ( असें असतांही ) करूं ह्मणती तयांचा । आग्रहाचि उरे ! ॥ सारांश, कर्मत्याग ह्मणजे अहंकार व वासना यांचाच नाश होय.

**पंडित**—अर्जुना ! जरी संन्यासी । डोई बोडोनि झालासी । तरी कैसा

कर्म टाकिसी? । क्षण एकही ॥ लंगोटींही टाकणें । आणि नग्न होउनि असणें । तेंही नव्हे काय करणें । अगा कर्म ॥ प्रकृतीची संगति आहे, तोंपर्यंत कर्म टाकणें ह्मणजे,—भूचर टाकुनि भूमि । ह्मणे पळोन जाईन मी । पळतां पुढें रिकामी । भूमीच दिसे ! ॥ यासारखें मिथ्या होय. आतां स्तब्ध बसलें असतां कर्म नाहीं असें जरी घटकाभर धरलें तरी--प्रकृतीचे तिन्ही गुण । विषय, इंद्रियें, अंतःकरण । सर्वां अवशा स्ववशपणें । कर्मे करविती ॥

**रंगनाथ** ज्ञानेश्वराचेच पट्टशिष्य दिसतात.

**गीताव्याख्याकार**—येथ ' करीन ' ' न करीन ' हा आग्रहो । हाच बाधक सर्वथा हो । अज्ञानकृत व्यामोहो । तो हा मूर्तिमंत जाण ॥ ५ ॥

यस्त्वनात्मज्ञश्चोदितं कर्म नाऽऽरभत इति तदसदेवेत्याह—

जो अज्ञानी पुरुष विहितकर्म करीत नाहीं हें त्याचें करणें चांगलें नाहीं.—तो लुच्चाच होय.—

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

**कर्मेन्द्रियाणि संयम्य** ( कर्मेंद्रियांचें संयमन करून ) **यः विमूढात्मा** ( जो मूर्ख मनुष्य, ज्याचें आत्मस्वरूपीं ज्ञान मोहित झालें असा जो पुरुष ) **इन्द्रियार्थान्** ( इंद्रियांचे निरनिराळे विषय ) **मनसा स्मरन् आस्ते** ( मनानें चिंतन करीत राहतो ) सारांश इंद्रियांस मात्र बांधून टाकून निरनिराळ्या इंद्रियांच्या विषयांचें ध्यान करीत बसतो !—**सः** ( तो पुरुष ) **मिथ्याचारः** ( ढोंगी आहे, लुच्चा आहे. पापी आहे, )—असें-**उच्यते** ( म्हणतात. ) बाहेरून मात्र इंद्रियांचें दमन करून मनानें विषयाचें चिंतन करणारा पुरुष ढोंगी, भोंदु होय.

कर्मेन्द्रियाणीति । कर्मेन्द्रियाणि हस्तादीनि संयम्य संहृत्य य आस्ते तिष्ठति मनसा स्मरंश्चिन्तयन्निन्द्रियार्थान्विषयान्विमूढात्मा विमूढान्तःकरणो मिथ्याचारो मृषाचारः पापाचारः स उच्यते ॥ ६ ॥

हस्तपादादिक जीं आपलीं कर्मेंद्रियें आहेत त्यांस मात्र विषयांपासून परावृत्त करून जो अज्ञानी पुरुष स्वतःच्या अज्ञानामुळें त्या त्या विषयांचें चिंतन

मनानें करीत राहतो त्याला ढोंगी, पापकर्मा असें म्हणावें. सारांश, वासना नष्ट झाली नसतां जो बाहेरून इंद्रियाचें मात्र दमन करितो, तो टिळाटोपी करणाऱ्या सफेत साधूप्रमाणें लुच्चा होय. वासना हें मूळ आहे. वासनानाश झाला असतां मात्र खरा विषयनाश होऊन आत्मस्वरूपीं लीन होण्यास सांपडतें. एवं च मनोजयाव्यतिरिक्त केवळ विषयत्याग किंवा कर्मत्याग व्यर्थच होय. **अद्वैतवाद्यांत** एकवाक्यता आहे. **श्रीधर, मधुसूदन, द्विवेदी, पर्वते** वगैरेंनीं भोंदूंचा यथास्थित समाचार घेतला आहे, वासनानाशाशिवाय नुसता कर्मनाश उपयोगी नाहीं हें सांगणारा चवथा श्लोक अर्थात्च अप्रस्तुत नाहीं. '**त्वंपदार्थविवेकाय संन्यासः सर्वकर्मणां**' अर्थ स्पष्टच आहे. द्वैतवादी व रामानुज वगैरे सर्व सरळ अर्थाचेंच पोषण करितात.

**पंडितः**—' जैसें बकाचें ध्यान । मासेच आठवी मन । तैसे हे दांभिकजन । मिथ्याचार ॥ ६ ॥

# यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्याऽऽरभतेऽर्जुन ॥
# कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

**अर्जुन** ( अर्जुना ! ) **यः तु** ( परंतु जो ) **मनसा** ( मनाच्या योगानें ) **इन्द्रियाणि** ( ज्ञान व कर्म यांचीं इंद्रियें ) **नियम्य** ( नियमित करून ) **असक्तः** ( संगरहित होत्साता ) **कर्मेन्द्रियैः** ( हस्तपादादिकांच्या योगानें ) **कर्मयोगं** ( कर्ममार्गास ) **आरभते** ( आरंभ करितो, श्रुतिस्मृतिविहितकर्में करावयास लागतो. ) **सः** ( तो ) **विशिष्यते** ( श्रेष्ठ आहे. )--सारांश, मनानें सर्व इंद्रियांचें आकलन करून जो अनात्मज्ञ परंतु अनासक्त पुरुष कर्मयोगाचें अनुष्ठान कर्मेंद्रियद्वारा करितो तो पुरुष खरोखरच श्रेष्ठ होय.

यस्त्विति । यस्तु पुनः कर्मण्यधिकृतोऽज्ञो बुद्धीन्द्रियाणि मनसा नियम्याऽऽरभतेऽर्जुन कर्मेन्द्रियैर्वाक्पाण्यादीभिः । किमारभत इत्याह—कर्मयोगमसक्तः सन्स विशिष्यत इतरस्मान्मिथ्याचारात् ॥ ७॥

परंतु जो अज्ञानी आहे व म्हणून कर्म करण्याला अधिकारी आहे, त्या मनुष्यानें जर आपल्या ज्ञानेंद्रियांचें आकलन विवेकयुक्त मनानें केलें व आपली

वाणी, हस्तपाद, इत्यादिकांच्या करवीं कर्म करण्याला, रागद्वेषरहित निष्काम-बुद्धीनें व श्रद्धायुक्त होत्साता, आरंभ केला तर तो पुरुष वरील पापी व ढोंगी पुरुषापेक्षां विशेष श्रेष्ठ होतो.

**मधु०**—नियम्य=विषयापासून पराङ्मुख करून. हे टीकाकार या दोन श्लोकांमधील विशेष व्यक्त करितात तो पहाः एक अज्ञानी पुरुष आपल्या मनानें इंद्रियनिग्रह करून विषयासक्त न होतां कर्मयोग करितो आणि चित्त-शुद्धि संपादून सुखी होतो आणि दुसरा अज्ञानी कर्मसंन्यास करितो पण विषय चिंतनांत मग्न होऊन दुःखांत पडतो! विषयवासना टाकिली ह्मणजे सुख आणि नुसता विषयत्यागच केला तर दुःख होतें! एवं च चित्तशुद्धीसाठीं अज्ञानी मनुष्यास कर्म अवश्य आहे.

**प्रपा०**—मनसा=आत्मदृष्टीनें. **श्रीधर**--नियम्य=इंद्रियांस ईश्वरपर करून.

**रामानु०**--मनसा=आत्मावलोकन करून. हे आचार्य म्हणतात कीं, हा कर्मयोगानें अनुष्टान करणारा पुरुष पापमग्न होण्याचा संभवच नाहीं आणि ह्मणून हा ज्ञानीपुरुषापेक्षांही श्रेष्ठ आहे! अद्वैतवाद्यांशिवाय बाकी सर्वांची कर्म-योगावर केवढी भिस्त आहे ती पहा. ज्याचें मनन कीर्तन वगैरे सर्व आत्म-पर झालें, ज्याला आत्म्याव्यतिरिक्त कांहीं कर्तव्य उरलें नाहीं व ब्रह्माशीं जो एकरूप होऊन समरस झाला, त्याला कर्माची व उपासनेची जरूरी उरत नाहीं हें तत्व अद्वैतविरोधी आचार्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. असो; याचा विचार दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं केलाच आहे.

**द्वैतवादी** 'कर्मयोगः' वर्णाश्रमोचित कर्म. येथें कर्मयोग सर्व वर्णास व सर्व आश्रमांत सांगितला आहे कारण 'कर्मयोगी हा श्रेष्ठ आहे' असा सर्वगामी सिद्धांत सांगितला आहे व कर्मसंन्यासाचा निषेध स्पष्ट केला आहे. यावरून यज्ञयागादिक कर्में कोणासच टाकितां यावयाचीं नाहींत; हा या मताचा सारांश आहे. भगवंतांनीं मनोनिग्रह करावयास सांगितला आहे, 'कर्म करूं नको' असें सांगितलें नाहीं. मनोनिग्रहानें संसार सुटतो व मनोनिग्रह नसेल तर संसार उत्पन्न होतो, असें भगवंतांचें ह्मणणें आहे.—असो, हे सर्व वादी तिसऱ्या श्लोकांतील विभागरचना विसरून वरील सारांश काढण्यास प्रवृत्त होतात भगवंतांचा इत्यर्थ असा आहे काय? तर मनोनिग्रह अवश्य आहे. कोणाला? अज्ञानी व मलिन चित्त असेल त्याला! ज्याचें मन, बुद्धि वगैरे

इंद्रियासकट नष्ट होऊन आत्मस्वरूपीं झालीं, त्याला कर्माची उठाठेव सांगणें ह्मणजे महासागरास ओढ्याचें स्वरूप घेण्यास सांगण्यासारखेंच होय! मनच नाहीं तेथें निग्रह कसला असणार?

**ज्ञानेश्वर**—जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ । बाह्य तरी रूढ । लौकिक जैसा ( बाहेरून मात्र रूढीप्रमाणें वागतो ) ॥ जो इंद्रियां आज्ञा न करी । विषयांचें भय न धरी । प्राप्त कर्म नाव्हेरी । उचित जें जें ॥....तो कामनामात्रें न घेणें ( आकळला जात नाहीं ) मोहमळें न लिंपे । जैसें जळीं जळ न शिंपे ॥ ( भिजत नाहीं ) पद्मपत्र ॥ तैसा संसर्गामाजीं ( संसारामध्यें ) असे । सकळांसारिखा दिसे । जैसें तोयसंगें आभासें । भानुबिंब ॥ ....ऐशा चिन्हीं चिन्हित । देखसी तोचि मुक्त । अशापाशरहित । ओळख पां ॥ हा अर्थ निराळा आहे. **पंडितांनीं** अर्जुन शब्दावर कोटी केली आहे, पण ती विषयास निरूपयोगी ह्मणून घेतली नाहीं ॥ ७ ॥

यत एवमतः—

कर्माला अधिकारी असणाऱ्यानें कर्मयोग करावा असें सांगितलें आहे ह्मणून—

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ॥**
**शरीरयात्राऽपि च ते न प्रसिध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

**त्वं** ( त्वां ) **नियतं** ( नित्य, श्रुतिस्मृत्युक्त, अवश्य असें ) **कर्म** ( कर्म ) **कुरु** ( करावें ) **हि** ( कारण ) **अकर्मणः** ( कर्मशून्यतेपेक्षां ) --तुला--**कर्म** (कर्म करणें)हें **ज्यायः** ( अत्यंत श्रेष्ठ आहे ). **च** ( आणि ) **अकर्मणः ते** ( कर्म न करणारा जो तूं त्या तुझी ) **शरीरयात्राऽपि** ( शरीरयात्रां सुद्धां ) **न प्रसिध्येत** ( सिद्धीला जाणार नाहीं ). सारांश, अर्जुना! जोंपर्यंत तुझ्या चित्ताची शुद्धि झाली नाहीं, तोंपर्यंत श्रुतिस्मृतींनीं सांगितलेलें नित्य ह्मणजे संध्यावंदन, युद्ध वगैरे कर्म तुला केलेंच पाहिजे. तूं हें कर्म करावेंस. कारण, अज्ञानदशेंतील कर्मशून्यतेपेक्षां, नित्यकर्माचें अनुष्ठान अनेक प्रकारांनीं श्रेष्ठ आहे. शिवाय तूं जर युद्धादि नित्यकर्म करावयाचें नाहीं असा निश्चय केलास तर ज्या शरीराच्या द्वारानें तुला ज्ञान प्राप्त होणार, तें शरीरही अवश्यकालपर्यंत धड राहणार नाहीं.

नियतामिति । नियतं नित्यं यो यस्मिकर्मण्यधिकृतः फलाय चाश्रुतं तन्नियतं कर्म तत्कुरु त्वं हेऽर्जुन यतः कर्मज्यायोऽधिकतरं फलतो हि यस्मादकर्मणोऽकरणादनारम्भात् । कथं, शरीरयात्रा शरीरस्थितिरपि च ते तव न प्रसिध्येत्प्रसिद्धिं न गच्छेदकर्मणोऽकरणात् । अतो दृष्टः कर्माकर्मणोर्विशेषो लोके ॥ ८

अर्जुना! तूं नित्यकर्म कर. नित्यकर्म म्हणजे ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें पुरुषाला वेदशास्त्रानें सांगितलेलें कर्म होय. ह्या नित्यकर्माला फलाची प्राप्ति नसते. ह्मणजे हें कर्म केलें असतां कोणतीही फलप्राप्ति व्हावयाची नाहीं, सारांश, नित्य ह्मणजे आवश्यक कर्तव्यकर्म होय. हें कर्तव्यकर्म चित्तशुद्धीसाठीं तुला केलेंच पाहिजे. कारण उघडच आहे कीं, ज्ञानमार्ग अनुसरण्याचा अधिकार ज्याला प्राप्त झाला नाहीं, त्यानें कर्म टाकून देऊन कर्मशून्य होऊन बसण्यापेक्षां चित्त शुद्ध करणारें नित्यकर्म करणें हजार वाटांनीं श्रेष्ठ आहे. लाभदायक आहे.

**शिष्य**—गुरुजी ! हें कसें ? निष्कामबुद्धीनें नित्यकर्म करावें असें ह्मणून पुनः त्याच कर्तव्यकर्माचें अनुष्ठान लाभदायक आहे असें सांगतां हें काय ?

**गुरु०**—अरे ! आपण कर्तव्य करावयाचें तें निष्कामबुद्धीनेंच करीत असतों. पण या निष्काम कर्मानुष्ठानाचा साहजिक परिणाम असा घडतो कीं, आपले कामक्रोधादिक मनोविकार व मनोवासना नष्ट होऊन चित्तशुद्धि होते व ज्ञानयोगाचा अधिकार प्राप्त होतो. निष्काम कर्म करणें ह्मणजेच कामक्रोधादिकांचा नाश करणें होय. शिवाय दुसरें असें पहा कीं, अज्ञानी मनुष्यानें 'मी कोणतेंही कर्म करणार नाहीं आणि त्यांतल्या त्यांत वेदशास्त्रोक्त व चित्त शुद्ध करणारें कर्म करणारच नाहीं' असा हट्ट धरिला तर परिणाम असा होईल कीं, ज्या शरीर, मन, व बुद्धि इत्यादिकांच्या साहाय्यानें जीव कायम राहून व चित्तशुद्धि होऊन मोक्षाचा मार्ग सांपडणार, तें शरीरही नष्ट होऊन हा जीव पुनः पतित होणार! चित्तशुद्धि न झाल्याकारणानें संसारांत ह्मणून अज्ञानदशेमध्यें, कर्म केलें असतां व कर्म केलें नाहीं तर, काय काय भिन्न भिन्न परिणाम होतात ते ध्यानांत ठेवून तदनुसार योग्य तें वर्तन ठेव. वासनाशून्य होऊन कर्म कर असें तुला सांगितलेंच आहे.

**मधु०**—नियतं=आपल्या इंद्रियांचें आकलन करून. **पर्वते** ह्मणतात.

'क्षत्रियाच्या मनाची चित्तशुद्धि झाली तरी त्याला कर्मसंन्यास करण्याचा अधिकार नाहीं!' ब्राह्मणक्षत्रियादिकांच्या लक्षणांवरून पाहिलें तर ज्याच्या मनाची शुद्धि झाली तो क्षत्रिय न राहतां ब्राह्मणच होतो असा भगवंताच्या ह्मणण्याचा आशय दिसतो. मग 'क्षत्रिय' शब्दाचा आलीकडील अर्थ घेऊन क्षत्रियकुलांत जन्म पावलेल्या मनुष्याला संन्यासविधीचा अधिकार कौरवपांडवांच्या वेळींही नव्हता असें विद्वान **पर्वते** शास्त्री यांनीं कां विधान करावें बरें? उपनिषदांत तर कित्येक क्षत्रियगुरूनीं ब्राह्मणास उपदेश केला आहे! असो; ज्या वेळीं ज्या कोणालाही खरें व कायमचें वैराग्य प्राप्त होईल त्यावेळीं पुरुषानें संन्यास घ्यावा असें श्रुतिवाक्य निराबाध आहे हें खरें.

**प्रपा०**—संसार देणारें सकामकर्म कर किंवा ज्ञानप्राप्ति करून देणारें निष्काम कर्म कर.पण कर्म करून अज्ञानदर्शेत निष्कर्म होऊं नको. ह्या अज्ञानी परंतु **मानवी** स्थितींत कर्म केलें नाहींस तर हा श्रेष्ठ मनुष्यधर्म तुला प्राप्त झाला आहे हाही नाहींसा होऊन तुला पशुपक्ष्यादिकांत जन्म प्राप्त होईल.

**शंकरानंद०**—मूर्खानें संन्यास घेतला तर त्याला हजारों अडचणी उत्पन्न होतात. ह्या लोकांत आपली चांगली चलती चालेल म्हणून कर्म करणारे लोक अत्यंत मूढ होत, नव्हे! कृतघ्न होत! कारण विषयांची काळजी कारितां कारितां त्यास आत्मरामाचें विस्मरण होतें व ज्या आत्मनिष्ठेनें मोक्ष मिळून संसार संपावयाचा, त्या आत्म्यास ( येथें जीवास ) हे कृतघ्न लोक संसाराच्य अनंत यातनांमध्यें ढकलून देतात?

**चतरजीः**—मोक्ष मिळविणें हा जो मुख्य पुरुषार्थ तो साध्य करून घेण्यासाठीं ही शरीरयात्रा आहे. नुसतें मेलें ह्मणजे मोक्ष मिळत नाहीं.

**रामा०ः**—नियतं=प्रकृतीच्या संसर्गानें उत्पन्न होणारें अनादिवासनारूप-कर्म. अकर्मणः=ज्ञाननिष्ठेपेक्षां. 'ज्ञाननिष्ठ पुरुषानेंही शास्त्रोक्त कर्म केलेंच पाहिजे, कारण कर्म केलें नाहीं तर शरीरयात्रा चालणार नाहीं व इष्ट हेतुही सिद्ध होणार नाहीं.' खऱ्या ज्ञाननिष्ठ पुरुषाला शरीराची काय काळजी असते व ब्रह्मपर झालेल्या पुरुषाला कोणता हेतु साध्य करून घ्यावयाचा असतो हें **रामनु**जाचार्यांसच विदित असावें! कृपा करून हे आचार्य इतकें कबूल करितात कीं, निरभिमानबुद्धीनें कर्म केलें असतां तें कर्म निष्कर्मतुल्यच होतें. तरीही पण ज्ञानयोगापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे असें म्हणावयाचें तें हे आचार्य

म्हणतातच ! कर्मठाच्या दृष्टीनें हें म्हणणें अज्ञानजन्य प्रपंचांत मात्र खरें आहे, ज्ञानदृष्टीनें नाहीं.

**मध्वमतानुयायी**—नियतं=स्वधर्मास, वर्णास व आश्रमास उचित असें कर्म.

**वल्लभः**—नियतं=माझी सेवा ज्यांत आहे असें. हे आचार्य म्हणतात. ' कर्मत्याग करणाऱ्या ज्ञानी पुरुषाच्या नैष्कर्म्यापेक्षां भगवदुपासनारूप कर्म हें श्रेष्ठ आहे. दुसऱ्याओळींतील शब्दांचा अर्थ असा आहे कीं, उपासनाशून्य जो ज्ञानमार्ग त्यांत सांगितलेल्या कर्मशून्यत्वानें शरीरधारणाही होणें नाहीं. ' सेवा भक्ति, उपासना. हे पंथ चांगले आहेत हें खरें; पण जो खरा ज्ञानी झाला व ज्याला कांहीं मिळावयाचें राहिलें नाहीं, त्याला उपासनेचा उपयोग नाहीं हें भक्तिमार्गप्रतिपादकांच्या लक्षांत येत नाहीं ! अज्ञानस्थितींत कर्म, उपासना वगैरे मार्ग आहेत. त्यांच्यायोगें ज्ञान होतें. हें ज्ञान झालें व अभ्यासानें अनुभव आला म्हणजे कर्मांची व उपासनेची मातब्बरी संपली. सर्व घर सिद्ध झाल्यावर मग परांच्याचा काय उपयोग ?

**मराठी** टीकाकार कांहीं विशेष सांगत नाहींत. ॥ ८ ॥

यच्च मन्यसे बन्धार्थत्वात्कर्म न कर्तव्यमिति तदप्यसत् कथम्—

**शिष्य**—महाराज! ' कर्मानें जीव बद्ध होतो. ' असें स्मृति उघड रीतीनें सांगत असतांना व कर्मानें दुसरें कर्म उत्पन्न होतें हें माहित असतां भगवंतांनीं अर्जुनाला कर्म करावयास सांगितलें हें कसें ? बद्ध करणारें कर्म करावयास सांगूं नये.

**गुरुजी**—छेः छेः तसें नव्हे. अज्ञानी पुरुषाला कोणतीं कर्मे बद्धक होतात व कोणतीं होत नाहींत याविषयीं भगवान सांगतात तें प्रथम ऐका:-

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥**

**यज्ञार्थात्** ( यज्ञाप्रीत्यर्थ केलेल्या ) **कर्मणः** ( कर्मांहून ) **अन्यत्र** ( भिन्न प्रकारच्या कर्मांनीं ) **अयं लोकः** ( हा लोक, ह्या मृत्युलोकचे पुरुष ) **कर्मबन्धनः** ( कर्मांनीं बद्ध होतात. ) **कौन्तेय** ( हे कुन्तिपुत्रा अर्जुना ! ) **मुक्त-**

**सङ्गः** ( वासनाशून्य होऊन ) **तदर्थं** ( यज्ञाच्या प्रीतीसाठीं ) **कर्म** ( कर्म ) **समाचर** ( उत्कृष्टतऱ्हेनें कर. ) सारांश, यज्ञाप्रीत्यर्थ केलेल्या कर्मांशिवाय इतर कर्में बद्धक होतात व मनुष्यास जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालितात. आसक्तिविरहित अनुष्ठान कर. असें केलेंस तर तुला कर्मानेंही बंधन प्राप्त होणार नाहीं, इतकेंच नव्हे! तर हींच कर्में मोक्षप्राप्तीचा मार्ग दाखविण्यास कारण होतील!

यज्ञार्थादिति । "यज्ञो वै विष्णुः" इति श्रुतेर्यज्ञ ईश्वरस्तदर्थं यत्क्रियते तद्यज्ञार्थं कर्म, तस्मात्कर्मणोऽन्यत्रान्येन कर्मणा लोकोऽयमधिकृतः कर्मकृत्कर्मबन्धनः कर्म बन्धनं यस्य सोऽयं कर्मबन्धनो लोको न तु यज्ञार्थादतस्तदर्थं यज्ञार्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः कर्मफलसङ्गवर्जितः सन्समाचर निर्वर्तय ॥ ९ ॥

**शिष्य**—**गुरूजी**! आपण श्लोकाचा अर्थ सांगितला तो ठीकच आहे. पण यज्ञ ह्मणजे एक कर्मच आहे, त्याच्यासाठीं दुसरेंकर्म करावयास सांगणें योग्य नव्हे. कर्मासाठीं केलेलें कर्म बद्धक होत नाहीं असें सांगण्याचा हेतु आहे काय?

**गुरुजी**—अरे यज्ञ ह्मणजे विष्णु, ईश्वर, सर्वव्यापी परमेश्वर, बरें! श्रुतिच ह्मणते कीं, यज्ञ ह्मणजे विष्णु होय. त्याच्या अनुग्रहासाठीं जें कर्म करावयाचें त्याला 'यज्ञार्थ कर्म' असें ह्मणावें. असो; तेव्हां ईश्वराप्रीत्यर्थ केलेल्यां कर्माशिवाय बाकी जीं अनेक कर्में कर्माधिकारी मनुष्याच्या हातून होत असतात त्यांच्या योगानें ह्या मृत्युलोकांतील मनुष्यांस त्याचेंच कर्म त्यास बंधनप्रद होतें. ईश्वराप्रीत्यर्थ केलेलीं कर्में मात्र बद्धक होत नाहींत; ह्मणून कर्मापासून होणाऱ्या फलावरील आसक्ति टाकून देऊन तूं विष्णुप्रीत्यर्थ कर्मांचें अनुष्ठान श्रद्धापूर्वक, चांगल्या रीतीनें शेवटास जाईल असें कर; हा भगवंताचा भावार्थ आहे.

**श्रीधर व प्रपाकार** ह्मणतातः या श्लोकांत 'केव्हांच कोणीही कर्म करूं नये' असें म्हणणाऱ्या कापिलसांख्यमताचें येथें खंडन आहे.' **शंकरा०**— 'सकामकर्माचा येथें निषेध केला आहे.' बाकी सर्वत्र एकवाक्यता आहे.

**द्विवेदीः**—यज्ञ=परब्रह्मरूपयज्ञ. हे ह्मणतात, मनुष्याचें जीवित हा एक यज्ञ आहे व ज्या ज्या नियमानुसार ही सृष्टि चालत आहे त्या त्या नियमाचें फळ

मिळणें हाही एक यज्ञच होय. सारांश, सर्व जगत्, विश्व ब्रह्मरूप आहे व विश्वाची स्वतःसिद्ध प्रवृत्तिही ब्रह्ममयच आहे. तेव्हां ब्रह्मामध्यें दुःखाचा व पापाचा अंश सुद्धां मिळणें अघटित असतां विश्वमध्यें कर्म करणाऱ्या जीवांना बंधन कां होतें? याचें उत्तर इतकेंच कीं, विश्वाच्या स्वतःसिद्ध प्रवृत्तीस जीं तत्त्वें कारणीभूत होतात, त्या तत्त्वाच्या सूक्ष्म स्वरूपास देवतात्वाचा आरोप करून त्या त्या देवतांच्या प्रीत्यर्थ जीं कर्में होतात तीं बद्धक होत नाहींत; इतकेंच नव्हे पण, त्या त्या देवता विशेष प्रसंगीं मनुष्यांचें साहाय्य करितात; हें साहाय्य मिळतें ह्मणून आपण देवतांचे ऋणी आहोंत. हें ऋण फेडण्यासाठीं केलेलीं कर्में अर्थातच बद्धक होत नाहींत. बाकींची होतात हें सांगावयास नकोच. सारांश, परब्रह्माची अथवा कोणत्याही प्रतिनिधीदेवतेची निष्कामबुद्धीनें उपासना करणें हें साधकाला प्रतिबंधक न होतां मोक्षदायकच होतें.

**चतरजी**—‘मीं कर्म केलें’ हा अभिमान व ‘या कर्माचें फळ काय होईल’ ही वासना, यांचा त्याग करून परमेशानुग्रहासाठीं केलेलें कर्म बद्धक नाहीं.

**रामा०**—यज्ञाचा रूढ अर्थच घेऊन यज्ञासाठीं द्रव्य व साहित्य मिळविणें हें कर्म ईश्वरास संतोषदायक होतें, असें ह्मणतात. स्वार्थी कर्म बंधनशील आहे हें म्हणणें सयुक्तिकच होय.

**मध्वादि** द्वैतवादी—यः = यातः ( प्राप्त झालेला ) ज्ञः = विष्णुः येन, ज्याच्या योगानें विष्णु प्राप्त होतो तो यज्ञ होय! अन्यत्र = अवैष्णवकर्म. ‘कर्मानें जीव बद्ध होतो’ या शंकेचें उत्तर ह्मणून हा श्लोक आहे असें हेंही म्हणतात.

**ज्ञानेश्वर**—स्वधर्म जो बापा। तोचि यज्ञ जाण पां। ह्मणोनि वर्तता तेथ, पापा। संसार नाहीं॥ हा यज्ञशब्दाचा अर्थ चिंतनीय आहे.

**पंडितांनीं** यज्ञ=विष्णु=सगुणब्रह्म असा अर्थ करून आपलीं नित्य ह्मणजे निष्काम कर्में विष्णूस—इतर देवतांस नव्हे! अर्पण केलीं तर बंध उत्पन्न होत नाहीं असा अर्थ केला आहे. आपलीं कर्में सगुणासच कां अर्पावीं निर्गुणास कां अर्पू नयेत यावर यांचें बरेंच मोठें व्याख्यान आहे, तें वाचण्याची शिफारस करणें हेंच काय तें येथें शक्य आहे.

**रंगनाथस्वामींचा** सकामकर्म कसें बद्धक होतें यावरील दृष्टांत पहाः—( जैसें सत्पात्रीं दिधलिया धन। तरी तें देतसे परलोकस्थान। तेंची वेश्या-

भोगार्थ वेचितां जाण । नरक दारुण तेंची देत ! ॥ स्रक्चंदनधूपदीपादि उपचार । ईश्वरीं करितां होय मोक्ष साचार । तेंचि आपणासि करितां अनाचार । व्यर्थ उपचार जाण वायां ॥ ९ ॥

इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यम्—

ह्मणून कर्माधिकारी जो आहे त्यानें कर्म केलेंच पाहिजे. आणखी सांगतातः—

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ॥**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥**

**पुरा** ( सृष्टीचे आरंभीं ) **सहयज्ञः** ( यज्ञासहित ) **प्रजाः** ( मनुष्यें ) **सृष्ट्वा** ( उत्पन्न करून ) **प्रजापतिः** ( सृष्टिकर्ता ब्रह्मदेव ) **उवाच** (—त्या लोकांप्रत—बोलता झाला. ):—**अनेन** ( ह्या यज्ञाच्या साहाय्यानें ) **प्रसविष्वध्वं** ( प्रजोत्पादन करून प्रजावृद्धि करा. ) **एष** ( हा यज्ञ ) **वः** ( तुह्मास ) **इष्टकामधुक्** ( इच्छित मनोरथ पूर्ण करणारा ) **अस्तु** ( होवो ).—सारांश, सृष्टिनिर्माणकर्त्या ब्रह्मदेवानें सर्गाचे आरंभीं यज्ञयाग व प्रजा यांची बरोबरच उत्पत्ति करून लोकांस सांगितलें. अरे "तुम्ही यज्ञयाग करून प्रजावृद्धि करा. हा यज्ञ तुमच्या इच्छित कामना पूर्ण करणारी कामधेनूच होईल.— तेराव्या श्लोकापर्यंत ब्रह्मदेवाचें बोलणें आहे. )

सहेति । सहयज्ञा यज्ञसहिताः प्रजास्त्रयो वर्णास्ताः सृष्ट्वोत्पाद्य पुरा सर्गादावुवाचोक्तवान्प्रजापतिः प्रजानां स्रष्टा, अनेन यज्ञेन प्रसविष्वध्वं प्रसवो वृद्धिरुत्पत्तिस्तां कुरुध्वम् । एष यज्ञो वो युष्माकमस्तु भवत्विष्टकामधुगिष्टानभिप्रेतान्कामान्फलविशेषान्दोग्धीतीष्टकामधुक् ॥ १० ॥

सर्गाचे आरंभीं प्रजा म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांचे यज्ञकर्मासहित उत्पत्ति केल्यानंतर प्रजांची उत्पत्ति करणारा ब्रम्हदेव त्यांप्रत बोलता झाला; "हा जो यज्ञ आहे याच्या साहाय्यानें प्रजावृद्धि करण्याचें काम चालू ठेवा."

**शिष्य**—यज्ञयाग केल्यानें प्रजावृद्धि कशी होणार गुरुजी ?

**गुरुजी**—होय होय, सांगतों ऐक. ब्रह्मदेव ह्मणाले, 'हें यज्ञकर्म केलें असतां तुमचे जे इच्छित मनोरथ असतील, ज्या कांहीं तुमच्या इष्ट वासना असतील, त्या पूर्ण करणारी ही यज्ञक्रिया एक कामधेनूच होईल.'

**मधु०**—यज्ञ = शास्त्रोक्त कर्मांचा कलाप, सर्व नित्य व नैमित्तिक कर्मांचा संग्रह. हे स्वामी म्हणतात :—' ह्या शास्त्रोक्त कर्मानें उत्पन्न होणाऱ्या फलाची वासना मात्र बाळगावयाची नाहीं, आणि कर्म मात्र करावयाचें. '

**श्रीधर** व **पर्वते**—येथें काम्यकर्मांची प्रशंसा केली आहे ती अप्रस्तुत आहेशी वाटेल, पण तीं केवळ सन्मार्गाकडे मनुष्याच्या चित्ताची प्रवृत्ति व्हावी ह्मणून केली आहे.

**द्विवेदी**—सद्‌गुणमंडित पुरुषांच्या सर्व इच्छा येथें पूर्ण होतात असें या श्लोकानें सांगितलें.

**प्रपा०**—कर्मबद्ध लोकांची गति येथें वर्णन केली आहे. सहयज्ञाः=यज्ञ करण्यास अधिकार असणारे लोक; असा एक अर्थ करितात.

**शंकरा०**—नैष्कर्म्य, दांभिकत्व, निवृत्ति आणि शरीरयात्रा सिद्ध होण्या-साठीं कर्म करण्याची आवश्यकता सांगून ब्रह्मदेव यासंबंधानें काय ह्मणाले तें येथून तीन श्लोकांनीं सांगतात अशी प्रस्तावना करितात. **प्रजाः**=ब्राह्मण. **प्रसविष्यध्वम्** = यज्ञद्रव्यांनीं यज्ञ करून देवांची कृपा होईल असें करा. निष्कामबुद्धीनें यज्ञ केला तर मोक्ष व सकामबुद्धीनें केला तर स्वर्ग अशीं फळें आहेत.

ह्या अद्वैतवादी टीकाकारांची या श्लोकांत किंबहुना या अध्यायांत कशी धांदल उडाली आहे, हें तज्ज्ञांस सहज कळेल. कर्म करण्याचा मात्र अधिकार असणाऱ्या लोकांस हें सांगावयाचें आहे हें लक्ष्यांत न राहि-ल्यामुळें ' येथें कर्मफल कां सांगितलें ? ' या प्रश्नाचा उलगडा करण्याकडे आचार्यांशिवाय बाकींच्या टीकाकारांचें लक्ष्य वेधलें आहे. आचार्यांनीं ग्रंथाच्या आरंभींच सांगून ठेविलें आहे कीं, सृष्टिकर्त्यानें प्रथमतः **मरीची** आदिकरून प्रजापति उत्पन्न करून व त्यांस वेदोक्त अशा प्रवृत्ति-मार्गाचा उपदेश करून त्यांच्या करवीं प्रवृत्तिमार्ग, कर्ममार्ग, सकामकर्ममार्ग सुरू केला. पहा आचार्यांचा उपोद्‌घात अध्याय १. अशी स्पष्ट वस्तुस्थिति असतां व हीच स्थिति सर्गारंभीं युक्त असते हें सिद्ध असतांही येथील श्लोकां वर व्याख्यान करितांना फलाच्या ग्राह्याग्राह्यत्वाविषयीं शंका घेऊन समाधान करीत बसणें म्हणजे हल्लींच्या शाळांत जाणारीं पोरें प्रथमतः कां खाऊ माग-

तात याची मीमांसा एखाद्या विद्याधर पंडितानें करण्यासारखेंच असमंजस होय. शिवाय प्रजाः याचा अर्थ आचार्यांसुद्धां सगळ्यांनीं ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य असा केला आहे ! **शंकरानंदांनीं** मात्र नुसता 'ब्राह्मण' असा केला आहे ! आतां ब्राह्मणादि चारी वर्णांची अठराव्या अध्यायांत लक्षणें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें अर्थ केल्यास अर्थातच गीताशास्त्र हें केवळ आर्यभूमीसच सांगितलें असें नाहीं तर यच्चयावत् सृष्टींतील लोकांस सांगितलें आहे असें सिद्ध होतें. हल्लींचा अगर आचार्यांच्या वेळचा ब्राह्मणादि शब्दांचा अर्थ घेऊन गीताशास्त्राचा अर्थ लावणें ह्मणजे नित्य व निरामय; शुद्ध आणि निर्विकार अशा गीताशास्त्राला संकुचित करणें होय. असो; '**यज्ञासहित** प्रजा उत्पन्न करून' असे जे मूळ श्लोकांत शब्द आहेत त्यावरून केवळ यजन याजनच ज्या वेळीं प्रबलत्वानें प्रचलित होतें त्यावेळीं गीताशास्त्र प्रकट झालें असें सिद्ध होतें. या यज्ञयागादिकांच्या काळाची मर्यादा ठरविणें कठिण आहे; तथापि ज्या अर्थी विभूतियोगांत मार्गशीर्ष महिन्यास प्राधान्य दिलें आहे, नक्षत्रामध्यें चंद्राला प्राधान्य दिलें आहे, त्यावरून सूर्यचंद्राशिवाय इतर ग्रह ठाऊक नव्हते, मार्गशीर्ष महिन्यापासून वर्षारंभ मोजण्याची पद्धति होती वार वगैरेंची माहिती नव्हती अशा काळीं म्हणजे शकाचे पूर्वी निदान १५०० वर्षें तरी पूर्वी गीताशास्त्राची उत्पत्ति झाली असावी असें दिसतें; असो, याचा विस्तार बाराव्या अध्यायाच्या शेवटीं करूं.

**रामानु०**--प्रजापतिः=नारायण. '**पतिर्विश्वस्येत्यादि**' (विश्वाचा पति आहे वगैरे श्रुति आहे.) प्रजाः=जड वस्तूच्या संसर्गानें सर्वथा विषयवश झालेले लोक. यज्ञ हेंच परमेश्वराचा अनुग्रह संपादन करणारें साधन आहे. काम=परमपुरुषार्थ, मोक्ष.

**द्वैतवादी**—"हे सर्व, १० ते १३, श्लोक अर्थवादरूप आहेत. इष्टकामधुक् = धर्मादि पुरुषार्थदायक प्रसविष्यध्वं = आपआपलें इष्ट पुरुषार्थ साध्य करून घ्या. सारांश, यज्ञयागादिक कर्मे केलीं असतां मोक्ष नामक पुरुषार्थ मिळेल असें यांचें ह्मणणें आहे. सगुणब्रह्माचें दर्शन होणें, समीप राहणें, हाच मोक्ष आहे. मोक्षस्थितींतही स्वभान नाहींसें होत नाहीं, दृश्य, द्रष्टा, दर्शन ही त्रिपुटी कायम राहते." असें यांचें मत आहे. तेव्हां अर्थातच यज्ञयागादि उपासनामार्गानेंच यांस मोक्ष मिळणार असें वाटतें.

**ज्ञानेश्वर**—तुह्मा वर्ण विशेष वशें (जातिपरत्वें)। आम्हीं हा स्वधर्म

विहिला ( नेमिला ) असे । यातें उपासा, मग आपैसें ( आपोआप ) । पुरती काम ॥ तुह्मी व्रत नियम न करावें । शरीरातें न पिडावें । दूर केंही (कोठेंही) न वंचावें ( जावे ) । तीर्थासी गा ! ॥ योगादिकें साधनें । साकांक्ष ( कामनिक ) आराधनें । मंत्र, यंत्र, विधानें । झणी करा ( टाकून द्या ) ॥ देवतांतरा ( इतर देवतांस ) न भजावें । .... ॥ अहेतुकें चित्तें । अनुष्ठा पां यातें ( मीं सांगितलेल्या कर्ममार्गास ) । पतिव्रता पतीतें जीयापरी ॥

**पंडित**—तो कृष्ण म्हणे अगा किरीटी ! । ब्रह्मा निर्मितां प्रजांच्या कोटी। यज्ञही निर्मी त्या सांगातें ॥ उपतजांचि बाल मुग्ध । मातेच्या स्तनीं उपजे दुग्ध । हा मायागुण स्निग्ध । अनादि ॥ दृष्टांत खासा आहे कीं नाहीं ? हे श्लोक कामुक लोकांची व्यवस्था लावण्यासाठीं सांगितले आहेत असा पंडितांचा अभिप्राय आहे.

**रंगनाथस्वामी**—ज्ञानेश्वरांचेंच अनुकरण करितात. ॥ १० ॥

कथम्—

**शिष्य**—महाराज ! यज्ञ ही कामधेनु कशी बरें? देवतांचा प्रसाद झाल्यावांचून स्वर्गादि लोक मिळत नाहींत व खरें ज्ञान झाल्यावांचून मोक्ष मिळत नाहीं असें आपणच ह्मणतां आणि येथें तर यज्ञालाच कामधेनु म्हणतां हें कसें ?

**गुरु**—सांगतों, श्रवण करः—

**देवान्भावयतानेन ते देवा भवायन्तु वः ॥**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

ब्रह्मदेव ह्मणतातः—**अनेन** ( ह्या यज्ञाच्या साहाय्यानें ) **देवान्** ( इंद्र वगैरे देवतांस ) **भावयत** ( संतुष्ट करा ). **ते देवाः** ( ते देव ) **वः** ( तुमचें ) **भावयन्तु** ( वृष्टि वगैरे करून, सुख वृद्धिंगत करोत. ) **परस्परं भावयन्तः** ( तुह्मी परस्पर एकमेकांस संतोष होईल असें करा ) आणि --**परं** ( उत्तम प्रकारचें ) **श्रेयः** ( कल्याण ) **अवाप्स्यथ** ( प्राप्त करून ध्या ) —सारांश, या यज्ञकर्मानें देवता संतुष्ट होतील व पर्जन्यवृष्टि वगैरे करून तुमचें कल्याण करतील. याप्रमाणें तुम्ही एकमेकांस संतुष्ट करून अतिश्रेष्ठ प्रकारचें कल्याण प्राप्त करून ध्या, व विश्वचक्र कायम ठेवा.

देवानिति । देवानिन्द्रादीन्भावयत वर्धयतानेन यज्ञेन ते देवा भावयन्त्वाप्याययन्तु वृष्ट्यादिना वो युष्मानेवं परस्परमन्योन्यं भावयन्तः श्रेयः परमपि ज्ञानप्राप्तिक्रमेणावाप्स्यथ स्वर्गं वा परं श्रेयोऽवाप्स्यथ ॥११॥

ह्या तुमच्या देवयज्ञ, पितृयज्ञ वगैरे श्रौतस्मार्त यज्ञयागादिकांनीं इंद्रादि देव प्रसन्न होऊन पर्जन्यवृष्टि वगैरे तुमचें सुख वृद्धिंगत होईल असें करतील. याप्रमाणें परस्परांनीं परस्परांस प्रसन्न करून घेतलें ह्मणजे क्रमाक्रमानें मोक्ष नामक उत्तम पुरुषार्थ सुद्धां साध्य होईल, किंवा निदान स्वर्गसुख, सारांश इष्टफल, मिळेल.

**शिष्य**—कर्मानें मोक्ष मिळेल ? वाहवा ! वाहवा !

**गुरु**—शाबास ! खरा जिज्ञासु आहेस तूं. असो; पुरुषानें निष्काम कर्म केलें तर चित्त निर्मळ होऊन ज्ञान मिळूं शकतेंना ? तेव्हां ज्ञान प्राप्त होऊन मनन, निदिध्यास व अभ्यास इत्यादिकांच्या योगानें व ईश्वरी कृपेनें ज्ञानी मनुष्याला मोक्ष नाहीं कां मिळावयाचा ? नैष्कर्म्यसिद्धि करणारे कर्मानें चित्त-शुद्धि होते, मग ज्ञान होतें, मग अनुभव येऊन मोक्ष मिळतो. आला क्रम लक्ष्यांत ? कर्मठांच्या मताप्रमाणें सकाम कर्म केलें म्हणजे स्वर्गादि सुखें मिळतात.

**शंकरानंद** ह्मणतात कीं, हें बोलणें मनुष्यास मात्र अनुलक्षून आहे.

**रामानुजः—अहं हि सर्वयज्ञानां** भोक्ता' ( मीच सर्व यज्ञाचा भोक्ता आहें ) या वाक्यावरून देवता ह्मणजे विष्णूच होय.

**ज्ञानेश्वराचा** 'श्रेय' शब्दाचा अर्थः—तेथ तुम्ही जें करूं ह्मणाल । तें अपैसे सिद्धि जाईल । वांच्छित ही पुरेल । मानसीचें ॥ वाचा सिद्धि पावाल आज्ञापक होआल । म्हणिये ( चाकर; आज्ञा ) तुमते मागतील । महाऋद्धि ॥ जैसें ऋतुपतीचें ( वसंताचें ) द्वार । वनश्री सेवी निरंतर । वोळगे ( धारण करिते ) फळभार लावण्येसीं ॥

**पंडित** व **रंगनाथ** यांनींही हा श्लोक काम्यकर्मपरच लाविला आहे. कर्मठांच्या मताचें येथें परीक्षण चाललें आहे, म्हणून हे सर्व श्लोक केवळ प्रवृत्तिमार्गास उपयोगी पडणाऱ्या सकाम कर्मालाच अनुलक्षून लावावें हें बरें॥११॥

किंच—

आणखी ऐहिकसुखाच्या संबंधानें ह्या देवता काय करितात तें ऐकः—

# इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ॥
# तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥१२॥

हि (प्रसिद्धच आहे कीं) **यज्ञभाविताः देवाः** (यज्ञांतील हविर्भागानें संतुष्ट झालेल्या देवता) **वः** (तुह्माला) **इष्टान् भोगान्** (प्रियकर व सुखकारक असें विषयसुख) **दास्यन्ते** (देतील). **तैः दत्तान्** (त्या त्या देवतांनीं आपल्यास जे काय सुखकारक पदार्थ दिले असतील त्यांबद्दल) **एभ्यः** (त्या देवतांस) **अप्रदाय** (आपण उलट कांहीं एक न देतां) **यः भुङ्क्ते** (जो देवदत्त विषयसुखाचा उपभोग घेतो) **सः** (तो पुरुष) **स्तेन एव** (केवळ चोरच होय. आपण कांहीं झीज न सोसतां दुसऱ्याच्या वस्तूंचा उपभोग घेणारा तो चोरच होय. !) सारांश, यज्ञयागादिकांनीं संतुष्ट झालेल्या देवता ऐहिकसुखाचीहिं समृद्धि करितात. असो; पण कित्येक लोक असे शठ असतात कीं, देवतांच्या अनुग्रहानें जी काय सुखें आपल्यास मिळतात त्याबद्दल देवतांचे आभार मानीत नाहींत व देवतांस अग्निद्वारां हविर्भाग द्यावयाचे ते देत नाहींत ! अशा लोकांस चोर ह्मणूं नये तर काय ह्मणावें ?

> इष्टान्भोगानिति । इष्टानभिप्रेतान्भोगान्हि वो युष्मभ्यं देवा दास्यन्ते वितरिष्यन्ति स्त्रीपशुपुत्रादीन्यज्ञभाविता यज्ञैर्वर्धितास्तोषिता इत्यर्थः । तैर्देवैर्दत्तान्भोगानप्रदायादत्त्वाऽऽनृण्यमकृत्वेत्यर्थः, एभ्यो देवेभ्यो यो भुङ्क्ते स्वदेहेन्द्रियाण्येव तर्पयति स्तेन एव तस्कर एव स देवादिस्वापहारी ॥ १२ ॥

अनेक प्रकारच्या यज्ञयागादिकांनीं पुष्ट आणि ह्मणून संतुष्ट झालेल्या देवता केवळ स्वर्गादि सुखेंच देतात असें नाहीं, तर स्त्री, पशु, पुत्र, इत्यादि- सारांश, स्त्री, संतति आणि संपत्ति असे तिन्ही सकार देवतांकडून याचकांस प्राप्त होतात, परंतु कांहीं उन्मत्त लोक देवांनीं दिलेल्या या ऐहिक सुखाबद्दल आपण त्यांचे ऋणी आहोंत, असें समजत नाहींत व देवतांचे ऋणांतून आपल्यास मुक्तही करून घेत नाहींत.

**शिष्य**—देवतांच्या ऋणांतून कसें मुक्त व्हावयाचें ?

**गुरु**—अरे ! यज्ञांत हविर्भाग देऊन ! असो; हे लोक आपण घेतलेल्या

ऋणाची काळजी न करितां स्वतःचा देह व इंद्रियें यांसच संतुष्ट करीत बसतात! अशा लोकांना चोरच ह्मटलें पाहिजे. देवतादिकांच्या भागाचा अपहार करणारे लोक चोर आहेत. सारांश, देवऋण, पितृऋण व ऋषिऋण न फेडणारे सारे उन्मत्त लोक चोरच आहेत.

**रामानुजः**—इष्ट=मोक्ष. देवतांस प्रसन्न करून घेतलें असतां पुढें उपयोगीं पडतील अशीं सुखें मिळतात. कांहीं विशिष्ट कारणासाठीं दिलेल्या वस्तूंचा जो दुरुपयोग करितो तो चोरच होय. बाकी सर्वत्र एकवाक्यता आहे.

**ज्ञानेश्वरांचें** या श्लोकावरील व्याख्यान वाचनीय आहे. स्वधर्माप्रमाणें आचरण केलें नाहीं तर असतील तीं सुखें नष्ट होऊन कल्पांतपर्यंत दुःखें भोगावीं लागतात. स्वधर्म ह्मणजे अग्निद्वारा यज्ञ, देवतार्चन, अतिथिभोजन, गुरुभक्ति, ज्ञातीचा संतोष, वगैरे होय. यांपैकीं आपल्या येथें आजामित्तीस काय शिल्लक आहे? —असो; उन्मत्ताची गति काय होते पहाः—तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातिचें सकळ जाये । देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं! ॥ जैसें गतायुशरीरीं । चैतन्य वास न करी । कां निर्दैवाच्या घरीं । न राहे लक्ष्मी । तैसा स्वधर्म जरी लोपला । तरी सर्व सुखाचा थारा मोडला । जैसा दीपासवें हरपला । प्रकाश जाय ॥ तैसी निजवृत्ति जेथ सांडे तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे । आइका प्रजा हो फुढें । विरंची ह्मणे ॥ म्हणवूनी स्वधर्म जो सांडील । तयातें काळ दंडील । चोर म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ पुढें यमयातना कशा होतात हें सांगितलें आहे. कर्मठांनीं हें व्याख्यान अवश्य वाचून विचारांत घ्यावें.

**पंडित**—देवांचा भाग न देणाऱ्या चोरासंबंधें ह्मणतातः—तेव्हां अपराध लागे थोर । जो ऐसा, तो देवांचा चोर । ते न दिसती, परी हा समोर । त्या देवांस सर्वत्र ॥ राजद्रव्य चोरी । त्यास राजा मारी । मग देव ऐसेपरी । करिती त्यावरी शासन ॥

**रंगनाथी** म्हणजे **ज्ञानेश्वरीची** हुबेहूब नक्कल आहे असें येथें तरी दिसतें.

**चतरजी**—आपल्यास सद्वस्तु मिळतात त्या देवतांकडून मिळतात; त्यांपैकीं विशिष्ट भाग देवतांस यज्ञमार्गानें परत करावा असा सृष्टिकर्त्याचा नियम आहे. ॥ १२ ॥

ये पुनः—

परंतु जे कर्माधिकारी लोकः—

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ॥**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्॥१३॥**

**यज्ञशिष्टाशिनः** ( यज्ञांतील हविर्भाग देवतांस समर्पण पूर्ण श्रद्धेनें करून बाकींच्या पदार्थांचें सेवन करितात )—ते—**सन्तः** ) थोर श्रेष्ठ, साधु पुरुष आहेत )—आणि ते—**सर्वकिल्बिषैः** ( सर्व पूर्वकृत व अज्ञानकृत पापांपासून ] **मुच्यन्ते** [ मोकळे होतात ) **तु** ) परंतु ) **ये** ( जे लोक ) **आत्मकारणात्** ( आपल्या स्वतःच्या जड अशा देह, इंद्रियें, मन व बुद्धि यांच्यासाठीं मात्र ) **पचन्ति** (अन्न अथवा सर्व प्रकारचे उपभोग निर्माण करितात) **ते** ( ते लोक **अघं भुञ्जते** ( पापरूपी वस्तूंचा उपभोग घेतात ) सारांश देवतादिकांचे भाग त्यांस श्रद्धापूर्वक अर्पण करून व त्याप्रमाणें तिन्ही ऋणांतून मुक्त होऊन नंतर विषयोपभोग घेतात त्यांचीं सर्वही पापें नष्ट होतात. पण जे लोक केवळ देहेंद्रियादिक जड पदार्थास चिकटून राहणाऱ्या स्वार्थासाठीं मात्र विषय निर्माण करुन त्यांचा वासनातृप्तीसाठीं उपभोग घेतात, ते लोक मूर्तिमंत पापाचे सेवन करणारे मूर्ख होत. सन्तः ' याचा अर्थ असणारे असाही होईल.

---

यज्ञेति । देवयज्ञादीन्निर्वर्त्य तच्छिष्टमशनममृताख्यमाशितुं शीलं येषां ते यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः सर्वपापैश्चुल्ल्यादिपञ्चसूनाकृतैः प्रमादकृतहिंसादिजनितैश्चान्यैः । ये त्वात्मंभरयो भुञ्जते ते त्वघं पापं स्वयमपि पापा ये पचन्ति पाकं निर्वर्तयन्त्यात्मकारणादात्महेतोः ॥ १३ ॥

देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ वगैरे सर्व श्रौतस्मार्तविहित यज्ञ श्रद्धापूर्वक करून यज्ञावशिष्ट राहिलेला जो अमृत नांवाचा भाग तो मात्र सेवन करण्याचें ज्याचें व्रत आहे ते साधुपुरुष सर्व पापांपासून मुक्त होतात.

**शिष्य**—हीं सर्व पापें ह्मणजे कोणतीं ?

**गुरु**— हीं पापें ह्मणजे दळण, कांडण वगैरे करितांना जीं पांच प्रकारचीं हिंसारूप पातकें अज्ञानवशात् आपल्या हातून घडत असतात, तसेंच जाणून बुजून अथवा चुकून आपले हातून हिंसा झाली असतां तज्जन्य जीं पातकें

उत्पन्न होत असतात त्या सर्वांचें क्षालन होत असतें. समजलास? **कर्मठांचे हे सिद्धांत आहेत,** आतां मागील श्लोकांत सांगितलेले चोर कीं जे देवऋण पितृऋण वगैरे चटसारीं ऋणें गुंडाळून ठेवून केवळ स्वोदरपोषणासाठीं ह्मणजे ज्या देहांत त्यांची वसति आहे व ज्या इंद्रियें, मन आणि बुद्धि इत्यादिकांच्या योगें त्यांस विषयज्ञान होतें त्या शरीरांचें, इंद्रियांचे, मनाचें, व बुद्धीचें मात्र विषयसेवनानें पोषण करावें अशासाठीं—जे लोक—विषय निर्माण करून त्यांचा उपभोग घेतात ते लोक त्या त्या विषयांचें सेवन करीत नाहींत, तर त्या त्या विषयमिषानें मूर्तिमंत पापपुरुषाची, कालि पुरुषाचीच सेवा करीत असतात, व शेवटीं '**यथा बीजं तथाऽङ्कुरः**' या न्यायानें आपणच पापपुरुष होऊन बसतात ! [ पहा मनु. ३।११८ ]

**मधुः**—

" मोघमन्नं विन्दतेऽप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य ।
नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादि ॥ "

( मूर्खाचा विषयोपभोग व्यर्थ होय. हा उपभोग ह्मणजे स्वतःचा वधच होय ! कारण जो दिवसा सूर्याला वैश्वदेवरूपानें हविर्भाग देत नाहीं किंवा रात्रीं अग्नीचें संतर्पण करीत नाहीं, तो विषयलंपट पुरुष पापमूर्तिच होतो.)

**द्विवेदी**—' या असल्या पापी पुरुषांस कधींही मोक्ष मिळणार नाहीं.

**प्रपा०**—'**न स प्राप्मनो व्यावर्तते,** ( तो पापापासून मुक्त होत नाहीं. ) **शतपथब्राह्मण.**

**शंकरा०**—हा श्लोक कर्मपर लावून ज्ञानपर लावितात; " पापविमोचन झाल्यावर चित्तशुद्धि, मग ज्ञान, मुक्ति असा क्रम येथें आहे व '**एका क्रिया द्व्यर्थकरी बभूव**' यज्ञयागादिकांनीं पर्जन्य वगैरे पडून सुबत्ता होते व चित्तशुद्धि होऊन मोक्ष मिळतो; असा स्वार्थ व परमार्थ साधतो, अथवा कामांत काम व रामांत राम होते " असें ह्मणतात. पण चित्तशुद्धि होण्यास निष्कामकर्म पाहिजे हा भाग हे स्वामी विसरले नसतील तर वरील अर्थ संभवेल. भगवंतांनीं ह्या श्लोकांत कर्ममार्गाचें परीक्षण चालविलें आहे असें मागें एक दोन वेळ सांगितलें आहे तें वाचक विसरले नसतीलच !

**चतरजीः**—'यज्ञ याचा अर्थ सर्व प्रकारचीं कर्तव्यकर्में असा करून ह्मण-

तात. केवळ कर्तव्यकर्मच करणारा व कर्तव्यापासून यदृच्छेनें उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांचें समत्वबुद्धीनें सेवन करणारा पुरुष पापातीतच असतो.

**वल्लभ**—परमेश्वरासाठीं निर्माण झालेले पदार्थांचा जो स्वोपभोगाकडे अपव्यय करितो तो पापी होय. किल्बिषैः=भगद्भजनाच्या आड येणारीं कृत्यें.

**रामा०**—पूर्वजन्मकृत व ह्या जन्मींचीं पापें नष्ट होतात. आत्म्याचें सम्यग्ज्ञान होण्याला पापें प्रतिबंधक आहेत. पापसेवन करितात; म्हणजे ज्यापासून पापनिष्पात्ति होते त्याचें सेवन करितात.

**द्वैतवादी**—यज्ञ=विष्णु. विष्णूस वैश्वदेव वगैरे रूपानें समर्पण करून शिल्लक राहिलेले विषय ईश्वरानें दिले असें समजून उपभोग घेणारे पुरुष थोर आहेत त्यांचीं सर्व, ह्मणजे संसाराला उत्पन्न करणारी सर्व, पातकें नष्ट होतात.

" कर्मणा निरपेक्षेण विष्णवे चार्पितेन च।
समग्ज्ञानं भवेत्पुंसां देवतातृतिपूर्वकम् "

निरपेक्षबुद्धीनें कर्म करून तें विष्णुनामक परमेश्वरास समर्पण केलें असतां त्याचा म्हणजे परमेश्वराचा अनुग्रह होऊन सम्यग्ज्ञान प्राप्त होतें.

**ज्ञानेश्वराचें** व्याख्यान वाचनीय आहे. एक दोन दृष्टांत मात्र येथें घेणें शक्य आहे! स्वधर्मानें हवन करून अवशिष्ट पदार्थांचा उपभोग कसा कामीं पडतो पहाः—तें ( हुतशेष ) आपले घरीं। कुटुंबेसीं भोजन करी। कीं भोग्यचि तें निवारी। कल्मषातें! तें यज्ञावशिष्ट भोगी। ह्मणोनि सांडिजेतो अघीं। जयापरी महारोगी। अमृत सेवनीं॥ कीं तत्त्वनिष्ठ जैसा। नागवे ( सांपडत नाहीं. ) भ्रांति लेशा। तो शेष भोगी तैसा। नाकळे ( सांपडत नाहीं ) दोषा॥ ह्मणोनि स्वधर्में जें अर्जे ( संपादिलें जातें )। तें स्वधर्मेंचि बिनियोगिजे। मग उरे तें भोगिजे। स्वधर्मेंसीं॥....हें संपत्ति जात ( पदार्थ मात्र ) आघवें ( सर्व )। हवनद्रव्य मानावें। मग स्वधर्म यज्ञें अर्पावें आदिपुरुषा॥....हें ( अन्न न म्हणावें साधारण। अन्न ब्रह्मरूप जाण। हें जीवन हेतु कारण। विश्व यया॥

**पंडित** म्हणतातः—यज्ञ केले नाहींत, तर पर्जन्य वृष्टि होत नाहीं. आवर्षणामुळें जीवादिकांची झालेली हिंसा यज्ञ न करणाऱ्यांच्या माथीं पडते! पंचसूनादोष निवारण होतात पण त्यानें स्वर्ग मिळत नाहीं,

असें यांचें मत आहे. दया असेल तरच हीं पातकें नष्ट होतात. दया नसतां प्रायश्चित्त घेतलें तर 'पिशाचाचे हातीं कोलीत' दिल्याप्रमाणें 'प्रायश्चित्तें पापें जळती' ह्मणून मनुष्यें पुनः पुनः पापें करितातच! सारांश, **आचार्यां**सकट सर्व भाष्य व टीकाकारांस **पंडितांनीं** टोमणा मारिला आहे तो वाचण्यासारखा आहे. ॥ १३ ॥

इतश्चाधिकृतेन कर्म कर्तव्यम् । जगच्चक्रप्रवृत्तिहेतुर्हि कर्म । कथमिति उच्यते—

याप्रमाणें जो अधिकारी आहे, कर्म करण्याचाच ज्याचा अधिकार आहे, त्यानें कर्म करावें; अथवा त्याला कर्मच केलें पाहिजे.

**शिष्य**—स्वतःच्या कल्याणासाठीं किंवा स्वतःच्या चित्तशुद्धीसाठीं कर्म कोणीं करावें व तें कां करावें हें मला समजलें. कर्म करण्याचा येवढाच हेतु आहे काय?

**गुरु**—नाहीं. लोककल्याणासाठीं व जगाची रहाटी चालविण्यासाठींही कर्म केलें पाहिजे. कर्म हें जगाच्या सुस्थितीचें कारण आहे, कसें म्हणशील तर सांगतों ऐकः—

## अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
## यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

**अन्नात्** (अन्नापासून) **भूतानि** (सचेतन वस्तु वृक्ष सृष्टीसुद्धां प्राणिमात्र) **भवन्ति** (उत्पन्न होतात.) **पर्जन्यात्** (पर्जन्यापासून) **अन्नसंभवः** (अन्नाची उत्पत्ति होते.) **यज्ञात्** (यज्ञयागादिकांच्या योगानें) **पर्जन्यः** (पाऊस) **भवति** (उत्पन्न होतो, पडतो)--आणि--**यज्ञः** (यज्ञयागादिक हे) **कर्मसमुद्भवः** (कर्मापासून उत्पन्न होतात.)--सारांश, कर्माच्या योगानें यज्ञयाग सिद्ध होतात, यज्ञामुळें पर्जन्यवृष्टि होते, वृष्टीपासून अन्न निर्माण होतें आणि अन्नापासून प्राणिमात्राचें संरक्षण व प्रजावृद्धि होते.--पुनः प्रजा कर्म करितात. यज्ञयाग होतात--असें जगाचें रहाटगाडगें कर्मानें सुव्यवस्थित चालतें—

अन्नाद्भवन्तीति । अन्नाद्भुक्ताल्लोहितरेतःपरिणतात्प्रत्यक्षं भवन्ति

जायन्ते भूतानि, पर्जन्याद्वृष्टेरन्नस्य संभवोऽन्नसंभवः, यज्ञाद्भवति पर्जन्यः—

"अग्नौ प्रास्ताऽऽहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते । आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः" इति स्मृते । यज्ञोऽपूर्वं स च यज्ञः कर्मसमुद्भव ऋत्विग्यजमानयोश्च व्यापारः कर्म ततः समुद्भवो यस्य यज्ञस्यापूर्वस्य स यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

**शिष्यः**—गुरुजी ! अन्नापासून प्राणी जगतात हें समजतें; पण अन्नापासून प्राणी निर्माण होतात हें मात्र समजत नाहीं.

**गुरु**—हा वेड्या ! ईश्वराच्या घरीं असाच कांहीं चमत्कार आहे कीं, जें काय आपण खातों, त्यापासून मानवी प्राण्याचें शरीर संरक्षण करणारीं रक्त, मांस, अस्थि, मज्जा इत्यादि उत्पन्न होतात. इतकेंच नाहीं, तर अन्नरसापासून संतती उत्पन्न करणारें शुक्रशोणितही निर्माण होऊन त्यापासून प्रजावृद्धिही होते! सांराश, यावरून कर्मठांनीं ध्यावयाचें शिक्षण इतकेंच कीं, आपण योग्य रीतीनें उपभुक्त अन्नाचे जर जीवितसंरक्षण व प्रजावृद्धि असे सत्परिणाम होतात, तर उपभोगास अवश्य असें कर्म करितांनाही आपण आपल्यास व दुसऱ्यास उपयोगीं पडेल असें सत्कर्मही केलें पाहिजे. असो;—हें अन्न पर्जन्याच्या सुवेळीं झालेल्या वृष्टीपासून उत्पन्न होतें, व पर्जन्याचा उद्भव यज्ञयागादिक कर्मांपासून होतो.

**शिष्य**—भगवन् ! बाकीचें सर्व लक्ष्यांत आलें, पण यज्ञयागादि कर्म आणि पर्जन्यवृष्टि यांचा मात्र कार्यकारणसंबंध समजला नाहीं.

**गुरु**—बरोबरच आहे. तुझ्यासारख्या प्रत्यक्षवाद्याला प्रत्यक्ष प्रमाण सांगितल्याखेरीज हा संबंध लक्ष्यांत येणार नाहीं. स्मृतिकारांनीं म्हटलें आहेः 'अग्नीमध्यें अगर त्या देवतेच्या द्वारानें विधिपूर्वक समर्पण केलेली आहुति सूर्य देवतेस प्रसन्न करून घेते; सूर्यापासून पर्जन्यवृष्टि होते; वृष्टीपासून अन्न व अन्नापासून प्रजा, असा उत्पत्तिनियम आहे.'

अलीकडील अनुभवजन्य शोधांवरूनही असेंच ठरलें आहे कीं, अत्यंत उष्णता उत्पन्न झाली ह्मणजे सूर्यकिरणद्वारा पृथ्वीवरील पाण्याची वाफ होऊन ती आकाशांत वायुरूपानें जाते आणि तेथें मेघरूपानें परिणत होऊन पुनः

पृथ्वीवर पर्जन्यरूपानें अवतीर्ण होते. वरील स्मृतिकारांनीं दिलेला सिद्धांत व आलीकडील अनुभव, तसेंच साभ्र आकाशांत तोफा वगैरे उडविल्या असतां पर्जन्य पडेल ही कल्पना, हीं सर्व एकार्थक नाहींत असें कोण ह्मणेल? फार तर पूर्वकालीन लोकांच्या देवतांस महाभूतांचें स्वरूप दिलें म्हणजे झालें! कर्मानें सर्व गोष्टी साध्य आहेत हा प्राचीन व अर्वाचीन सिद्धांत सामान्यतः अबाधितच राहतो. असो;–यज्ञ हें अपूर्व, अलौकिक फल देणारें कर्म आहे. कारण, यज्ञ हा कर्मापासूनच, ऋत्विगादि याज्ञिक व यजमान यांनीं श्रद्धापूर्वक केलेल्या कर्मापासूनच, उत्पन्न होतो ना! आतां समजला कर्म आणि पर्जन्यवृष्टि यांमधील अन्योन्य कार्यकारणसंबध? सारांश, प्राण्यास संरक्षण करणारें व त्यांची वृद्धि होण्यास कारणीभूत होणारें कर्म यावरून किती प्रबल आहे तें पहा.—

**मधु०—द्विवेदी, पर्वते**—अष्टाध्यायी कांड व जनक याज्ञवल्क्यसंवादरूपी षट्प्रश्नी वाचनीय आहे, असें ह्मणतात.

**प्रजा०**—भवन्ति=होतात, राहतात व वाढतात. '**अन्नादेव हीमानि भूतानि जायन्ते वर्धन्ते.**' अर्थ स्पष्ट आहे. यज्ञ=पर्जन्येष्टि.

**रामानुज** विशेष सांगत नाहींत. यज्ञापासून पर्जन्य होतो हें मात्र शास्त्रानें समजतें; बाकीचीं सर्व प्रमाणसिद्ध आहेत.

**द्वैतवाद्यांचें** मत व **ज्ञानेश्वरांचें** मत सोळाव्या श्लोकाच्या शेवटीं सांगतों. ॥ १४ ॥

तच्च—

पुनः तें कर्मही

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ॥**

**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

**कर्म** ( यज्ञयागास उत्पन्न करणारें कर्म ) **ब्रह्मोद्भवं** ( शब्दब्रह्मापासून, वेदापासून उत्पन्न झालें आहे )–असें **विद्धि** ( जाण )–आणि **ब्रह्म** ( तो वेद ) **अक्षरसमुद्भवं** ( ज्याचा कधींही नाश होत नाहीं अशा अविनाशी तत्त्वापासून उत्पन्न झाला आहे हें ध्यानांत ठेव. ) **तस्मात्** ( म्हणून ) **सर्वगतं ब्रह्म** ( सर्वांस व्यापून टाकणारें हें शब्दब्रह्म अगर हें वेदत्रय ) **नित्यं** ( सदोदित ) **यज्ञे** ( यज्ञाचे ठायीं ) **प्रतिष्ठितम्** ( रममाण झालेलें आहे. ) सारांश, कर्म वेदा-

पासून व वेदत्रय हें त्या अविनाशी परमात्म्यापासून निर्माण झालें आहे. ह्मणून सर्वव्यापी वेद हे सदोदित यज्ञयागामध्यें गुंतून राहिलेले आहेत.

कर्मेति । कर्म ब्रह्मोद्भवं ब्रह्म वेदः स उद्भवः कारणं यस्य तत्कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि जानीहि, ब्रह्म पुनर्वेदाख्यमक्षरसमुद्भवम् , अक्षरं ब्रह्म परमात्मा समुद्भवो यस्य तदक्षरसमुद्भवं ब्रह्म वेद इत्यर्थः । यस्मात्साक्षात्परमात्माख्यादक्षरात्पुरुषनिश्वासवत्समुद्भूतं ब्रह्म तस्मात्सर्वार्थप्रकाशकत्वात्सर्वगतम् ।सर्वगतमापि सन्नित्यं सदा यज्ञविधि-प्रधानत्वाद्यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

**शिष्य**—गुरुजी ! कर्माचें जनन कसें झालें ?

**गुरु**—कर्माचें जनन शब्दब्रह्मापासून, वेदापासून झालें, असें ध्यानांत धर. पुनः हें ‘ वेद ’ नांवाचें ब्रह्म अविनाशी अशा परब्रह्माचें स्वरूप असणारा जो परमात्मा, त्यापासून उत्पन्न झालें आहे बरें ! सारांश, ज्या अर्थी अविनाशी अशा परमात्म्याच्या निःश्वासापासून वेदाची प्रत्यक्ष उत्पत्ति आहे, त्या अर्थी तो वेद सर्व पदार्थांवर उजेड पाडणारा, सर्व प्रश्नांचा उलगडा करणारा, तात्पर्य सर्वव्यापि आहे हें सांगावयास नकोच. असो; हें ब्रह्म सर्व-व्यापि आहे तरी, यज्ञकर्म हें सर्व कर्मांत प्रधान, श्रेष्ठ आहे; ह्मणून हें ब्रह्म यज्ञाचे ठिकाणीं सदैव साक्षित्वानें असतें.

**श्रीधर**—दुसऱ्या ओळींतील ‘ ब्रह्माचा ’ अर्थ परब्रह्म असा घेतात. पण हें न्याय्य नाहीं असें **धनपति** म्हणतात.

**मधु०**—‘ ब्रह्मोद्भवं=ब्रह्म, शब्दब्रह्म आहे प्रमाण ज्याचें असें कर्म. ‘ वेदालाही प्रामाण्य आलें तें अक्षर असें जें शुद्ध ब्रह्म, त्यापासून आलें आहे, म्हणून वेद हें अपूर्व साधन आहे. यज्ञ तेथें वेद व वेद तेथें ब्रह्म असें साहचर्य आहे. निष्पापी अशा परमात्म्याच्या विश्वासापासून सहजवृत्तीनें वेद निर्माण झाले ह्मणून वेद अपौरुषेय आहेत व ते तसे आहेत म्हणून त्यांत भ्रम, प्रमाद अपाटव विप्रलिप्सा (ठकविणें) वगैरे दोष नाहींत.

**मपाकार** व **चतुरजी** असेंच म्हणतात. देवांस सुद्धां सर्वगत ब्रह्माची प्राप्ति यज्ञमार्गानें होते हा यांनीं विशेष काढिला आहे. ‘ **यज्ञेन यज्ञमजयन्त देवाः** ’ अर्थ उघड आहे.

सर्वगामी प्रकाशाला आपलें पूर्णस्वरूप प्रकट करण्यास पारदर्शक पदार्थच विशेष उपयोगीं पडतात; अतएव देवांमध्यें ब्रह्माचें अस्तित्व सौकर्यानें प्रकट होतें असें **चतरजी** ह्मणतात.

**शंकरा०**—सर्व वर्णाश्रमांचीं कर्तव्यकर्में वेदाच्या अध्ययनानें समजतात असें 'यज्ञे प्रतिष्ठितम्' यानें सुचविलें !

**रामानुज**—'ब्रह्म'=प्रकृति. सारांश, कर्म हें प्रकृतीचा परिणाम जें शरीर व नामरूपादि अन्न, त्यापासून उत्पन्न होतें. 'अक्षर'=जीवात्मा. 'अन्नपानादिकांच्या योगानें तृप्त झालेला जो जीवात्मा त्याचें अधिष्ठान जें शरीर तें सर्व कर्म करण्यास समर्थ आहे.' असा अर्थ हे आचार्य कां करितात हें समजत नाहीं. कर्मठाला तरी हा अर्थ संमत होणार नाहीं.

**डेव्हिस साहेब** 'ब्रह्मदेव' असा ब्रह्माचा अर्थ करून "'वेद' या आचार्यकृत- अर्थीं ब्रह्मशब्दाचा उपयोग गीताकारानें कोठें केला नाहीं." असें म्हणतात. पण या बिचाऱ्या विदेशियास काय ठाऊक कीं, गीताशास्त्रकार येथें कर्मठांच्या सिद्धांतांचें परीक्षण करीत असतां त्यांच्या म्हणण्याचा अनुवाद करीत आहेत, व स्वमत सांगत नाहींत हें ? ॥ १५॥

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ॥**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

**एवं** ( याप्रमाणें ) **प्रवर्तितं चक्रं** ( अनादिकालापासून चालत असलेल्या जगच्चक्रानुसार)**यः इह न अनुवर्तयति** (जो कर्मठ येथें आपलें वर्तन ठेवीत नाहीं, या विश्वनियमानुसार जो कर्माधिकारी आपलें कर्तव्य करीत नाहीं ) तो **अघायुः** ( पापजन्मा, पापामध्येंच आपलें जीवितसर्वस्व खर्च करणारा )-व-**इन्द्रियारामः सः** ( आपल्या इंद्रियांस मात्र तुष्ट करणारा तो स्वार्थी मूर्ख पुरुष ) **पार्थ** ( हे पार्था ! ) **मोघं** ( व्यर्थ ) **जीवति** ( जगतो ). सारांश, इहलोकीं व परलोकीं कल्याणदायक होणारें व जगाचें चक्र व्यवस्थित रीतीनें चालविणारें जें कर्म, तें जो वर सांगितल्याप्रमाणें चालवीत नाहीं, सारांश, जो कर्मठ सृष्टिनियमाविरुद्ध चालतो, तो शुद्ध पापमूर्ति आणि केवळ आपल्या इंद्रियांचा, क्षणोक्षणीं उत्पन्न होणाऱ्या विकारांचा बंदा गुलामच होय ! अर्जुना ! याप्रमाणें

विश्वनियमाविरुद्ध कर्म करणाऱ्या पुरुषाचें ऐहिक व पारमार्थिक सार्थक न झाल्यामुळें असला कर्माधिकारी पुरुष ' आला, आला व्यर्थ जन्मासि आला ! गेला गेला, बापुडा व्यर्थ गेला ' याप्रमाणें व्यर्थ जन्मास आला असें ह्मणावयाचें दुसरें काय ?

एवमिति । एवमित्थमीश्वरेण वेदयज्ञपूर्वकं जगच्चक्रं प्रवर्तितं नानुवर्तयतीह लोके यः कर्मण्याधिकृतः सन्नघायुरघं पापमायुर्जीवनं यस्य सोऽघायुः पापजीवन इति यावत्, इन्द्रियाराम इन्द्रियैराराम आरमणमाक्रीडा विषयेषु यस्य स इन्द्रियारामो मोघं वृथा हे पार्थ स जीवति तस्मादज्ञेनाधिकृतेन कर्तव्यमेव कर्मेति प्रकरणार्थः । प्रागात्मज्ञाननिष्ठा योग्यताप्राप्तेस्तादर्थेन कर्मयोगानुष्ठानमधिकृतेनानात्मज्ञेन कर्तव्यमेवेत्येतत् ' न कर्मणामनारम्भात् ' इत्यत आरम्य ' शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्धेदकर्मणः ' इत्येवमन्तेन प्रतिपाद्य ' यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र ' इत्यादिना ' मोघं पार्थ स जीवति ' इत्येवमन्तेनापि ग्रन्थेन प्रासङ्गिकमधिकृतस्यानात्मविदः कर्मानुष्ठाने बहुकारणमुक्तं तदकरणे च दोषसंकीर्तनं कृतम् ॥ १६ ॥

याप्रमाणें वेदांनीं सांगितलेलीं यज्ञयागादिक कर्में करून ईश्वरनिर्मित जगाचें, विश्वाचें चक्र सुरळीत चाललें आहे तसेंच जो चालवीत नाहीं, विश्वाच्या नियमाप्रमाणें चालत नाहीं, तो पापी होय; त्याची शरीरयात्रा पापमूलक होय. केवळ इंद्रियांकरवीं विषयांचा उपभोग घेण्याकरितां --अथवा उपभोग तरी कसला? एकीकडून विषय घेऊन दुसरीकडून टाकण्याकरितांच तो केवळ जन्मास आला नव्हे काय?—' नळी फुंकिली सोनारें । इकडून तिकडे गेलें वारें ' या न्यायानें नळीप्रमाणेंच स्वतःच्या जन्माचा कोणताही उपयोग न करून घेणारा प्राणी तो होय.—तो व्यर्थ जन्मास आला. सारांश, त्याचा जन्म व्यर्थ गेला हा प्रकरणार्थ आहे.

**शिष्य**—महाराज ! असें आहे ह्मणून प्रत्येकानें कर्म केलेंच पाहिजे असें ईश्वराज्ञेनेंच ठरलें. सगळ्यांनींच कर्मनिष्ठ बनलें पाहिजे. आतां ज्ञाननिष्ठेला अवकाशच नाहीं ! अतएव ईश्वरप्रणीत वेदवाक्यांवरून ज्ञानमार्ग खोटा ठरला. व--

**गुरु**—थांब, थांब, अंमळ सावकाश, बोल व स्मरणशक्तीला थिजवून

टाकूं नकोस ! कर्माला अधिकारी असणाऱ्या अज्ञान्यासाठीं प्रकरण सुरू केलें आहे असें आरंभीं व आतांच श्लोकाचा अर्थ करितांना सांगितलें ना ? प्रवृत्तिमार्गांत राहणाऱ्या अज्ञ पुरुषानें अवश्येमव कर्म केलें पाहिजे असा हा तात्पर्यार्थ आहे. ज्ञानी पुरुषाचें प्रकरणच प्रस्तुत नाहीं. कर्माला मात्र अधिकारी असून जो कर्म करीत नाहीं तो व्यर्थजन्मा होतो असा अभिप्राय आहे. जोंपर्यंत आत्मज्ञानानें मुक्ति मिळविण्याची योग्यता प्राप्त झाली नाहीं, तोंपर्यंत ज्ञानमार्गास अनधिकारी अशा अविद्वान पुरुषानें सकामत्वानें अगर निष्कामत्वानें विहित कर्म केलेंच पाहिजे. सकाम कर्म केल्यास स्वतःचे व प्रसंगोपात्त जगाचें कल्याण होईल व स्वर्गलोकीं सुखही मिळेल, पण जन्ममरण सुटणार नाहीं. सारांश, कामुक पुरुष अनादि जन्ममरणात्मक संसारांत पडेल व जगाची रहाटी चालवील. पण विषयाचा, जगाचा खरा कंटाळा येऊन ज्यानें, चित्त निर्मळ व एकाग्र होण्यासाठीं, निष्काम कर्म करण्यास आरंभ केला त्याची चित्तशुद्धि सत्वरच होऊन तो ज्ञानमार्गास योग्य होतो, लोकहित करितो व अनुकूल प्रसंग प्राप्त झाल्यावर मुक्त होतो. याप्रमाणें अज्ञ पुरुषानें विहित कर्म केलेंच पाहिजे असें ठरलें. पण अज्ञ असूनही जो कर्मच करीत नाहीं किंवा विहित कर्म करीत नाहीं तो पापजन्मा होऊन जन्ममरणांतून सुटण्याच्या आशेंतून प्रायः मुक्तच होतो ! असो; तेव्हां ‘ अशा अज्ञ पुरुषानें धर्मोक्त कर्म करावें. ’ हा विषय ‘ कर्माचा आरंभच न केल्यानें ’ या चवथ्या श्लोकापासून तों ‘ कर्म केलें नाहींस तर शरीरयात्राही सिद्धीस जाणार नाहीं ’ या आठव्या श्लोकापर्यंत प्रतिपादन केला आहे. तथापि पुनः या विषयाच्या दृढीकरणार्थ पुष्कळशीं प्रमाणें दाखविण्याच्या, व कर्म केलें नाहीं तर कोणते दोष उत्पन्न होतात त्याचें संकीर्तन करण्याच्या हेतूनें ‘ यज्ञाशिवाय इतर कर्में करणाऱ्या ’ या नवव्या श्लोकापासून तों ‘ तो व्यर्थ जगतो ’ या सोळाव्या श्लोकापर्यंत आत्मज्ञान नसणाऱ्या आणि ह्मणून कर्माधिकारी असणाऱ्या पुरुषानें कर्तव्य कर्म केलेंच पाहिजे असें साहजिक रीतीनें सांगितलें आहे, ओघास आलें ह्मणून सांगितलें आहे.

अद्वैतटीकाकारांत ऐकमत्यच आहे. ‘ परब्रह्म, वेद, कर्मबुद्धि, कर्म, यज्ञ, पर्जन्य, अन्न, जीव, कर्मबुद्धि हें चक्र जो कर्मठ चालवीत नाहीं तो पापी होय. कर्मठानें मुक्तीसाठीं व लोकहितासाठीं कर्म केलेंच पाहिजे.

**रामानुज**हे कर्मठ व ज्ञानी या उभयतांनीं ही कर्म केलेंच पाहिजे असें या श्लोकानें ठरवितात. हे ज्ञानकर्मवादी आचार्य तिसरा श्लोक कसा विसरतात न कळे ! कर्म न करणाऱ्या कर्माधिकाऱ्यांचें आयुष्य पापमूलक, पापपरिणामी होतें, त्यास आत्मावलोकन करितां येत नाहीं, तो केवळ इंद्रियारामी ( विषयलंपट ) होतो, आत्मारामी होत नाहीं, हे विचार योग्यच आहेत.

**द्वैतवादी**:—श्लोक १४ ते १५:—'यज्ञामध्यें समर्पण केलेल्या हविर्भागांनीं पर्जन्याभिमानी देवता, प्रसन्न होऊन अग्नीच्या व वायूच्या साहाय्यानें पर्जन्यवृष्टि करितात. यज्ञ हें कर्म परमेश्वरानिर्मित आहे **'स एष साधु कर्म कारयति,** ( तोच ईश्वर मानवांकरवीं सत्कर्म करवितो. ) परमेश्वर हा अक्षरनामक वेदांनीं प्रतीत होतो. **'यश्छन्दसामृषभो विश्वरूपः'** सारांश, परमेश्वरच सर्व प्राण्यांस कर्म करण्याला प्रवृत्त करितो ! आणि जो पुरुष या परमेश्वरप्रेरणेनुरूप सत्कर्म करीत नाहीं, यज्ञयागादि कर्में करून जगच्चक्र व्यवस्थित रीतीनें चालविण्यास सहाय होत नाहीं, तो पाप करण्यासाठींच जन्मला, दुष्ट इंद्रियांच्या संगतीनें अचेतन विषयांमध्येंच रममाण होण्यासाठीं निर्माण झाला असें ह्मणावें. पूर्वजन्मांतील सत्कृत्यांनीं ज्याला मनुष्यजन्म लाधला त्यानें जर पापकर्म करण्यामध्येंच आयुष्यव्यय केला तर तो अचेतन भूतांपेक्षांही दुर्दैवी होय. असो; ईश्वरनिर्मितचक्र जर आपण सुरळीत चालविलें तर केवळ ईश्वराच्या अनंत वैभवासही भर घालण्याचें श्रेय आपल्यास मिळतें इतकेंच नव्हे, तर तें तसें करणें पुण्यजनक होऊन स्वतःचीही मोक्षसिद्धि होते. पापी माणसें मात्र जगाच्या विघाताला कारण होतात. अतएव प्रत्येक वर्णांतील व प्रत्येक आश्रमांतील ज्ञानी व अज्ञानी लोकांनीं कायिक, वाचिक, अगर मानसिक कर्म केलेंच पाहिजे !

**ज्ञानेश्वर**आचार्यांप्रमाणेंच व्याख्या करितात; कर्माधिकारी असून कर्म न करणाऱ्यासंबंधें ह्मणतातः—....जो कुकर्मे इंद्रियांसि । उपेगा ( इंद्रियांच्या उपयोगाला ) गेला ।। तें जन्मकर्म सकळ । अर्जुना ! अति निष्फळ । जैसें कीं अभ्रपटळ । अकाळींचें ! ।। कां गळां स्तन अजेचे ( शेळीचे ) । तैसेंच जियालें (जीवित) देखें तयाचें । जया अनुष्ठान स्वधर्माचें । घडेचि ना ! ।।

सर्वगत ब्रह्म यज्ञांतच कसें प्रकट होतें याविषयीं **पंडितांचे** दृष्टांत (गाईच्या सर्वांगांत दुग्ध असून तें स्तनांतच प्रादुर्भूत होतें; किंवा काष्ठामध्यें अग्नि असूनही तो मंथन केल्याशिवाय प्रकट होत नाहीं वगैरे ) मनोहर आहेत.

येथपर्यंत कर्ममार्गमहिमा व कर्ममार्गाचें परीक्षण झालें. यांत काय काय सांगितलें आहे, व नुसत्या कर्ममार्गानें मोक्ष मिळतो ह्याचें खंडन कसें केलें आहे याचा थोडक्यांत विचार करून पुढच्या मार्गक्रमणास लागतों.

भगवंतांनीं अर्जुनास ज्ञान व कर्ममार्गाचा उपदेश केला त्यावरून अर्जुनानें आपला असा मिथ्या समज करून घेतला कीं, मुख्य पुरुषार्थ जो मोक्ष तो साधण्याला ज्ञान व कर्म हीं दोन्ही साधनें आहेत; आणि ज्ञानापेक्षां कर्मांत भानगडी फार, तो मार्गही कमी योग्यतेचा, शिवाय आपल्या हातून घोरसंग्राम होऊन त्यांत कुलवध होणार व महापातकांचे मात्र आपल्यास धनी व्हावें लागणार, तेव्हां कर्माच्या खटपटींत पडण्यापेक्षां कर्मास आरंभच केला नाहीं किंवा कर्माचा आयत्या वेळीं त्यागच केला ह्मणजे ह्या सर्व भानगडी नाहींतशा होऊन फुकाचा मोक्ष आपल्या हस्तगत होईल ! ही पार्थाची मिथ्या समजूत नाहींशी करण्यासाठीं व ज्ञानमार्गाची योग्यता प्राप्त होण्यास कांहीं विशेष अधिकार यावे लागतात हें सिद्ध करण्यासाठीं, भगवान तिसऱ्या अध्यायाचा उपक्रम करून ज्ञानमार्ग ह्मणजे नुसता आळशी, नास्तिक, मंदवृत्तीच्या व कर्तव्यपराङ्मुख लोकांच्या तामसीवृत्तीनें शोधून काढलेला मार्ग आहे ह्या दुर्मताचेंही खंडन करण्यासाठीं ह्मणतात:—" अर्जुना ! ज्ञानमार्गानें जाणारास चित्तशुद्धीची व ज्ञानाची आवश्यकता आहे. हें साध्य झालें नसेल त्यानें कर्ममार्गाचेंच अवलंबन केलें पाहिजे. भलत्यानें भलता मार्ग स्वीकारल्यास इष्टकार्य सफल होणार नाहीं. अर्जुना ! कोणत्याही कर्माला आरंभच केला नाहीं, किंवा देहप्रारब्धानें, समाजप्रारब्धानें, अगर विश्वांतील परिस्थितीनें प्राप्त झालेलें कर्तव्यच आपण केलें नाहीं ह्मणजे ज्ञानमार्ग साध्य होतो, ही जी तूं आपली समजूत करून घेतली आहेस ती भ्रामक होय. कारण ज्याला ह्मणून जन्म प्राप्त झाला त्यानें ' मी कोणतेंच कर्म करणार अगर करविणार नाहीं ' असें ह्मटलें तर एक क्षणभरही चालावयाचें नाहीं. प्रकृतीचा, विश्वचक्रांत सांपडलेल्या वस्तूंचा धर्मच चलनवलन, कार्यप्रतिकार्य, करण्याचा आहे. स्वस्थ बसलें, जीव दिला, तरी तें तें कर्म होतेंच होतें. या विश्वांत स्थिर असें एका ब्रह्मावांचून कांहीं नाहीं. तेव्हां अज्ञानी जीवानें कर्म टाकून देईन असें ह्मटलें तर चालावयाचें नाहीं. ' मी इंद्रियव्यापारच करणार नाहीं ' असें अज्ञानी मनुष्य ह्मणाला तर चित्तशुद्ध न झालेल्या त्या पुरुषाच्या हातून

**मानसिककार्य** होतें, तो विषयाचें चिंतन करीत बसतो, तें तरी कर्मच! आणि हेंही जन्ममरणांत घालणारें कर्म होतें. मद्यमांसादिकांस स्पर्श केला नाहीं, किंवा प्रत्यक्ष व्यभिचार केला नाहीं, आणि मद्यमांसांचें अगर सुंदर परस्त्रियांचें नुसतें चिंतनच केलें तरीही अभक्ष्यभक्षणाचा व व्यभिचाराचा पूर्ण दोष या चिंतकाचे माथीं पडून पुनः वासना वाढते व तदनुसार कर्म होतेंच! यापेक्षां मनाला आळा घालून विहित कर्मे राजरोस करणारा पुरुष श्रेष्ठ होय. ह्मणून, अर्जुना! जोंपर्यंत तुझ्या वासनेचा क्षय झाला नाहीं, कुलसुखाची व धर्माधर्माची—स्वर्गादिसुखाची तुझी आशा नष्ट झाली नाहीं तोंपर्यंत तुला देहधारण केलेंच पाहिजे व तें करण्यासाठीं श्रुति, स्मृति, आचार, व्यवहार इत्यादिकांच्या अनुरोधानें तुला सत्कर्म केलेंच पाहिजे. हें सत्कर्म कोणतें ह्मणशील तर ज्याच्या योगानें स्वार्थबुद्धि दिवसानुदिवस कमी होत जाते तें होय. आपल्याशिवाय जे इतर लोक त्यांचा, पूर्वकालीन ऋषींचा व देवतांचा संतोष जेणेंकरून होईल अशीं यज्ञयागादिक कर्मे तुला अवश्य आहेत. हीं कर्मे मुमुक्षूंस बद्धक होत नाहींत, कारण यांच्या योगानें स्वतःच्या उपभोगाची वासना व अहंकार हीं नष्ट होत जातात. हीं नष्ट झालीं व नित्यानित्यविवेक जागृत होऊन आपल्या स्वस्वरूपांत जाऊन मिळण्याची तीव्र इच्छा झाली ह्मणजे तो पुरुष ज्ञानाला अधिकारी होतो." याप्रमाणें भगवंतांनीं ज्ञानमार्गाविरुद्ध येणारे आक्षेपांचें व स्वतःच्या अज्ञानानें किंवा लोकांस व आपणांस फसविण्याच्या दुष्ट हेतूनें ज्ञानमार्गाचा अपव्यय करणाऱ्या दुष्ट भोंदूंचें निराकरण केलें. नंतर ज्ञानमार्गास वस्तुतः साधन असणारा परंतु कर्मठांच्या अभिमानातिरेकानें मात्र मुख्यत्व पावलेला जो कर्ममार्ग त्याच्या प्रतिपादकांचें ह्मणणें सांगून एक शब्दांतच कर्ममार्गाची योग्यता एका दृष्टीनें मात्र ठरविली आहे. दुसऱ्या दृष्टीचा विचार पुढें करूं. कर्माची आवश्यकता सांगितल्यावर अर्थात् कर्मठांच्या ह्मणण्याचा विचार करणें जरूरच प्राप्त झालें. कर्मठ म्हणतातः—विश्वाची उत्पत्ति झाली, तेव्हांच यज्ञयागादिकांची उत्पत्ति होऊन जीवानें सत्कर्म करावें, आणि सत्कर्माच्या योगानें जीवास येथें, ह्या जन्मीं, अगर अन्य जन्मीं किंवा स्वर्गलोकांत सुख मिळावें, अशी योजना सृष्टिकर्त्यानें प्रथमपासूनच अस्तित्वांत आणिली आहे. येथें व अन्यत्र सुख, विषयसुख मिळवावें हाच आमचा मोक्ष होय! यज्ञयागादिकांनीं देवतांची अगर देवतारूपी महाभूतांची आराधना

केली असतां ते प्रसन्न होऊन कर्मकर्त्यास सुख, विषयसुख अथवा मोक्ष देतात. कर्म करणें व त्याचा उपभोग घेणें व तोही उपभोग देवतादत्त ह्मणून त्याचा स्वीकार करून पुनः कर्म करणें हेंच जीवांचें कर्तव्य आहे, यासच मोक्ष म्हणावें. ( पहा अ० ३ श्लोक १० ते १४. ) अपौरुषेय अथवा अनादिसिद्ध वेदांनीं हा मार्ग सांगितला आहे व तोच अनुसरणें श्रेयस्कर आहे. जे लोक पितर, ऋषि, देवता वगैरेंस प्रसन्न करणारीं कर्में न करितां केवळ स्वतःचें ह्मणजे स्वतःच्या इंद्रियांचें विषयसुख कसें वाढेल याची चिंतनिका करून तदनुसार कर्म करितात ते स्वतः चोर, पापी, व्यर्थजन्मी होतात, इतकेंच नव्हे, तर ते विश्वनियामकप्रणीत सद्व्यवस्थेच्या आड येऊन इतर लोकांसही तापदायक होतात. अतएव या 'दैविकदृष्टीनें कर्म केलें पाहिजे.' दैविकदृष्टीनें कर्म करणारा पुरुष हळूहळू निर्मळ होत जातो हा प्रकार निराळा; पण केवळ कर्ममार्गच म्हटला तर तो मोक्षद नाहीं असें '**सृष्ट्वा**' (उत्पन्न करून) '**इष्टकामधुक्**' (इष्ट मनोरथ सिद्धीस नेणारा) '**परस्परं भावयन्तः**' (एकमेकांस सुख देणारे होत्साते ,) '**इष्टान् भोगान्**' ( इष्ट असे विषयभोग, ) इत्यादि शब्दांनीं व 'कर्मापासून परंपरेनें जीवदशा व जीवापासून कर्म' ही जी परिणाममाला सांगितली आहे त्यावरून '**पुनरपि जननं पुनरपि मरणं**' हा या पंथाचा पुरुषार्थ आहे, विकारविरहित स्वरूपस्थिति ही नव्हे असें सुचविलें आहे. अहंकार व वासना जागृत ठेवणारा व आत्म्यास जन्ममरण आहे असें प्रतिपादन करणारा निवळ कर्ममार्ग आपल्यास संमत नाहीं, ज्ञान उत्पन्न करणारें तें एक साधन मात्र आहे, असें याच अध्यायाच्या सतराव्या, अठराव्या व एकोणिसाव्या श्लोकांवरूनही सिद्ध होणार आहे.

असो; तेव्हां अधिकार प्राप्त न झालेल्या पुरुषानें संन्यास करणें जितकें अप्रशस्त आहे, तितकेंच कर्मानें मात्र मोक्ष मिळेल असें ह्मणणें अप्रशस्त होय. ज्ञान आणि कर्म एका कालीं संभवत नाहींत हें मार्गेंच सांगितलें आहे. सारांश, ज्ञान होण्याला निर्मळ मनाची—विषयविरहित मनाची जी आवश्यकता आहे, ती कर्मानें ( काम्य कर्मानें नव्हे, निष्काम कर्मानें ) साध्य व्हावयाची आहे, ह्मणून अर्जुनासारख्या अज्ञानी पुरुषानें कर्मच केलें पाहिजे हें येथें दैविकदृष्टीनें, अपौरुषेय धर्मपुस्तकाच्या दृष्टीनें सिद्ध झालें. चांगलें कर्म कोणतें

त्याचा विचार विसाव्या श्लोकापासून पस्तिसाव्या श्लोकापर्यंत यथासांग केला आहे. Life is action and action is life. ( जीवित ह्मणजे कर्म आणि कर्म ह्मणजे जीवित ) असें खिस्तानुयायी ह्मणतात व कर्मानें मोक्ष आहे असाही एक त्यांचा एकपक्षी सिद्धांत आहे. त्याचें परीक्षण पस्तिसाव्या श्लोकानंतर करूं, असें सांगून हें कर्मविषयक परीक्षण संपवितों. ॥ १६ ॥

एवं स्थिते किमेवं प्रवर्तितं चक्रं सर्वेणानुवर्तनीयमाहो स्वित्पूर्वोक्तकर्मयोगानुष्ठानोपायप्राप्यामनात्मविदा ज्ञानयोगेनैव निष्ठामात्मविद्भिः सांख्यैरनुष्ठेयामप्राप्तेनैवेत्येवमर्थमर्जुनस्य प्रश्नमाशङ्क्य स्वयमेव वा शास्त्रार्थस्य विवेकप्रतिपत्त्यर्थमेतं वै तमात्मानं विदित्वा निवृत्तमिथ्याज्ञानाः सन्तो ब्राह्मणा मिथ्याज्ञानवद्भिरवश्यं कर्तव्येभ्यः पुत्रैषणादिभ्यो व्युत्थायाथ भिक्षाचर्यं शरीरस्थितिमात्रप्रयुक्तं चरन्ति, न तेषामात्मज्ञाननिष्ठाव्यतिरेकेणान्यत्कार्यमस्तत्येवं श्रुत्यर्थमिह गीताशास्त्रे प्रतिपिपादयिषितमाविष्कुर्वन्नाह भगवान्—

**शिष्य**—गुरु महाराज ! हें जें आतांपर्यंत आपण कर्ममार्गानें सृष्टीच्या नियमचक्राचें स्तोत्र गाइलें, त्यावरून प्रत्येक मनुष्यानें आपण सांगितलेली नियममाला अंगीकृत करून त्याप्रमाणें वर्तन केलेंच पाहिजे असें सिद्ध झालें ! अर्थातच 'ज्ञानयोगेन सांख्यानां' ( सांख्यांस ज्ञानमार्गानें पुरुषार्थ साध्य होतो ) वगैरे भगवंतांनीं जें प्रथमतः व्याख्यान दिलें तें व्यर्थच झालें ह्मणावयाचें ! उघडच आहे, कर्ममार्गाला खंडित करूं पाहणाऱ्या व जीवित हें कर्ममूलक व कर्मप्रधान असतांही कर्मत्याग करूं पाहणाऱ्या व ज्ञानी ह्मणवून घेणाऱ्या आलस्यग्रस्त पुरुषांची अशीच फजिती—

**गुरु**—थांब, थांब ! पुनः लागलास जिव्हा लांब करून शब्दांचे तारे तोडायाला ! काय जबरदस्त कर्मतृष्णा आहे तुझी ! असो; तुझ्यासारखाच प्रश्न अर्जुन करील हें सर्वसाक्षी व परमेश्वररूपी श्रीकृष्णास केव्हांच कळून चुकलें होतें. या प्रश्नाचें समाधान करण्यासाठींच पुढील दोन तीन श्लोकांची योजना भगवंतांनीं केली आहे.

**शिष्य**—किंवा गुरुजी ! आपण पूर्वी सांगितल्याप्रमाणें असेंही म्हणतां येईल कीं, निष्कामकर्मयोगाचें अनुष्ठान केल्यानें मात्र अज्ञानी म्हणजे आत्मतत्त्व न समजलेल्या पुरुषांस प्राप्त होणारी जी सांख्यनिष्ठा अगर जो ज्ञानमार्ग

आहे व ज्याचें अनुष्ठान आत्मज्ञान झालेले सांख्ययोगी लोकांस मात्र शक्य आहे त्या ज्ञानमार्गाला न पोहोंचलेल्या अज्ञानी लोकांनीं मात्र कर्मयोगाच्या साहाय्यानें हा ज्ञानमार्ग साध्य करून घ्यावा, ह्मणजे ज्ञानमार्गाच्या प्राप्तीसाठीं आत्मज्ञान न समजलेल्या अज्ञानी लोकांना ज्ञान व्हावें एतदर्थच हा आतांच सांगितलेला कर्ममार्ग अनुसरावा. सारांश, सर्वांनीं हा कर्ममार्ग अनुसरावा असा भगवंतांचा उद्देश आहे, किंवा ज्ञान न झालेल्या वासनायुक्त पुरुषांचा वासना-क्षय होऊन त्यांस ज्ञानमार्ग सांपडावा एतदर्थ कर्मयोग आचरावा असा त्यांचा उद्देश आहे ?

**गुरु**---आतां तूं अंमळसा शुद्धीवर आल्यासारखा दिसतोस. असो; असें कांहीं तरी अर्जुन विचारील असें भगवंतांस विदितच होतें म्हणून त्यांनींच पुढील श्लोक अवतीर्ण केले आहेत. शिवाय अज्ञानी पुरुषानें कर्ममार्गाचें अनुसरण करावें असें अनेक वेळीं विस्तारानें सांगितल्यानंतर अर्जुनासारख्या चाणाक्ष पुरुषास वरीलसारखी शंका येऊं नये असें धूर्त श्रोते ह्मणतील व संन्यासपूर्वक ज्ञानमार्गाची निष्ठा केली तरच मोक्षप्राप्ति होणार, अन्य-मार्गानें नाहीं, असा सिद्धांत करावयाचा आहे तो अपूर्वच आहे, याला प्रेरणापूर्वक झालेल्या उपनिषदादि ज्ञानमार्ग प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथाचा आधार नाहीं अशीही शंका श्रोते लोक कदाचित् घेतील त्या व ह्या शंकांचें निवारण करण्यासाठींही पुढील श्लोकांचा अवतार आहे. “ त्या नित्य, शुद्ध, बुद्ध आणि मुक्त अशा परब्रह्माचें ज्ञान झाल्यानंतर, मिथ्याज्ञानाचा लेश सुद्धां बाकी राहिला नाहीं असे ब्रह्मज्ञानी पुरुष काय करितात तें पहाः संसारांत असणारे आणि ह्मणून मायेच्या, अज्ञानाच्या भोंवऱ्यांत सांपडलेले जे देहा-भिमानी व कर्माभिमानी मूढ लोक आहेत ते ‘ मला पुत्र पाहिजे, वित्त पाहिजे, भार्या पाहिजे ’ अशा वासनांनीं युक्त होत्साते कर्म करावयास लागतात. ज्ञानी लोक मात्र ह्या कर्मांचा सर्वथा त्याग करून देहप्रारब्धानें* प्राप्त झालेल्या

* कर्मांचा उपभोगाशिवाय नाश होत नाहीं, असा हिंदुतत्त्वज्ञानाचा सिद्धांत आहे व हा सिद्धांत ‘ कारण उत्पन्न झालें असतां तें कार्यामध्यें परिणत झालेंच पाहिजे ’ या आधुनिक अनुभवजन्य सिद्धांताचें समर्थनच करितो. असो; देह प्राप्त होतो, तो पूर्वकर्मानें होतो, व ज्या कर्मानें हा देह उत्पन्न झाला व अमुक भोग भोगल्याशिवाय त्याचा पात व्हावयाचा नाहीं, असें ठरलें, तें कर्म संपल्याशिवाय मोक्ष नाहीं असें अद्वैताचें तात्त्विक म्हणणें आहे. यावरून आत्महत्या करणें वगैरे अपकृत्यें पुनः संसारांतच घालणारीं आहेत हें उघडच आहे.

कर्मांचा, देह कायम राहील व इतरांस ज्ञानमार्ग दाखवितां येईल, इतकाच अंगिकार करितात. बाकीच्या सर्व कर्मांचा त्याग करून ते लोक आत्मज्ञानाव्यतिरिक्त दुसरें कांहींएक करीत नाहींत." ही जी श्रुति आहे त्या श्रुतीचाच अर्थ गीताशास्त्रामध्यें सांगितला आहे, अपूर्व असें कांहीं सांगितलें नाहीं हें श्रोतृवृंदास स्पष्टपणें कळावें एतदर्थ ही पुढील श्लोकांची योजना आहे; समजलास! यांतच कोणी कर्म करावें, आणि कोणीं करूं नये याचा उलगडा झाला. आतां भगवान काय ह्मणतात तें ऐक:—

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ॥**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

**तु** ( परंतु ) **यः आत्मरतिः एव स्यात्** ( जो आत्मारामावर मात्र अत्यंत प्रीति करणारा असेल ) **च** ( आणि )—जो—**मानवः** ( पुरुष ) **आत्मतृप्तः** ( आत्मचिंतनामध्येंच समाधान पावला असेल ) **च** ( आणि ) **आत्मनि एव संतुष्टः** ( आत्मलाभामध्येंच आनंदित झाला असेल ) **तस्य** ( त्याचें ) **कार्यं न विद्यते** ( करावयाचें असें कर्तव्य असत नाहीं. ) सारांश, ज्याच्या प्रीतीचा सर्व ओघ आत्म्यावर वळून तेथेंच लीन झाला, आत्मलाभ झाल्यामुळें ज्याला समाधान प्राप्त झालें आहे व ह्या लाभानें सर्व पुरुषार्थ साध्य झाल्यामुळें ज्याला आनंदाचा सर्व निधिच सांपडला आहे त्याला करावयाचें असें कांहींच नसतें.

यस्त्विति । यस्तु सांख्य आत्मज्ञाननिष्ठ आत्मरतिरात्मन्येव रतिर्न विषयेषु यस्य स आत्मरतिरेव स्याद्भवेदात्मतृप्तश्चाऽऽत्मनैव तृप्तो नान्नरसादिना मानवो मनुष्यः संन्यस्यात्मन्येव च संतुष्टः । संतोषो हि बाह्यार्थलाभे सर्वस्य भवति तमनपेक्ष्याऽऽत्मन्येव च संतुष्टः सर्वतो वीततृष्ण इत्येतत् । य ईदृश आत्मवित्तस्य कार्यं करणीयं न विद्यते नास्तीत्यर्थः ॥ १७ ॥

परंतु, अर्जुना! जो आत्मज्ञानी झाला, ज्याची विषयांवरील भक्ति व वासना यांचा समूळ उच्छेद होऊन ज्याचें आत्मारामावरच निस्सीम प्रेम बसलें, अन्नरसामध्यें ह्मणजे खाण्यापिण्यामध्यें ज्याचें समाधान होत नाहीं, समाधानासाठीं जो आत्मचिंतनांत मात्र सदैव निमग्न असतो, हत्ती, घोडे, पैसा, स्त्री, कीर्ति, अधिकार इत्यादि मिळालीं असतां आनंदानें नाचूं उडूं

लागणारे सामान्य लोक असतात.) सामान्य लोकांस जो विषयानंद होत असतो त्याला लाथ मारून व सर्वत्र वासनाशून्य अथवा विरक्त होऊन जो नित्य, शुद्ध, अशा आत्मानंदांत विलीन होतो—सारांश, जो सर्वथा आत्मज्ञानी झाला असेल, त्याला करावयाचें अगर मिळवावयाचें असें कांहींच उरत नाहीं. तात्पर्य, त्याच्यासाठीं वर सांगितलेला कर्ममार्ग नाहीं. **ज्ञान्यास कर्म नाहीं** व **अज्ञान्यास आहे हा फलितार्थ होय.**

**मधु०—' आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेव ब्रह्मविदां वरिष्ठः '** ही श्रुति वरील अर्थ समर्थन करून असला सत्पुरुष सर्व ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहे, असें सांगते. **पर्वते** यांनीं आत्मा सुखरूप कसा यावर व विस्तृत व्याख्यान या श्लोकावर टीका करितांना लिहिलें आहे, तें भाविक मुमुक्षूंनीं अवश्य वाचावें. **प्रपा० श्रीधर, द्विवेदी** आचार्यांनुसारेंच अर्थ करितात. **शंकरानंदांनीं** या श्लोकावर विस्तृत व्याख्यान लिहून ' अपरोक्ष ज्ञान्यास स्वतःसाठीं अगर इतरांसाठीं कर्म करण्याची आवश्यकता नाहीं; कारण तो ज्ञानी स्वानुभवानें सर्वच ब्रह्म पाहतो म्हणजे दुसरे सर्वही प्राणी त्यास मुक्त झालेले दिसतात, व स्वतः तर तो मुक्तच असतो, अतएव त्याला स्वहित अगर परहित असें कोणतेंच साधावयाचें नसतें, ह्मणून त्याला कर्म असणें संभवत नाहीं, ' असा विशेष आग्रहाचा अर्थ केला आहे. जोंपर्यंत शरीर आहे तोंपर्यंत **शंकरानंद** ह्मणतात त्याप्रमाणें केवळ निष्क्रिय स्थिति होणें दुर्घट आहे हें पांचव्या श्लोकांत भगवंतांनीं सांगितलें आहे. देह दिसतो आहे तोंपर्यंत देहदृष्टीनें, इंद्रियदृष्टीनें, मन, बुद्धि, अहंकार इत्यादि दृष्टींनीं, सारांश सर्व अपूर्वदृष्टींनीं जगताचें भान होऊन भेदभाव दिसणारच व तो भेद नाहींसा करण्यासाठीं क्रिया करावी लागणार आहे. शुद्ध ब्रह्मदृष्टि झाल्यावर मात्र कर्म नाहीं हें सत्य आहे; पण शुद्ध ब्रह्मदृष्टि देहपात होईतोंपर्यंत साध्य व्हावयाची नाहीं असें मला वाटतें. तथापि जीवन्मुक्ताची स्थिति गीताशास्त्रांत व इतर ठिकाणीं वर्णन केली आहे; ह्मणजे जीवन्मुक्त मनुष्यें असू शकतात असें झालें. तेव्हां जीवन्मुक्ताचें, ब्रह्मनिष्ठाचें लक्षण असें समजावयाचें कीं, विचारदृष्टीनें त्यांनीं भेदबुद्धीचा नाश केला व अहंभाव ह्मणजे स्वार्थबुद्धि हिचाही सर्वथैव त्याग केला, त्यांचा स्वार्थ संपला हें खरें. पण यावरून ब्रह्मादिस्थावरांत सर्व विश्वापैकीं

प्रत्येकजण आपल्या स्वतःच्या दृष्टीनें मुक्त झालें अशी त्यांची कल्पना होणें कठिण—नव्हे—असंभवनीयच आहे. सारांश, मला असें वाटतें कीं, ब्रह्मनिष्ठांचें सर्व कर्तव्य संपलें, याचा अर्थ हा कीं, स्वतःच्या हिताचें, स्वार्थाचें, त्यांचें सर्व कर्तव्य संपलें; मला स्वतःला उपभोग पाहिजे अशा अर्थाचें त्यांचें कर्म संपलें. तात्पर्य, स्वतःच्या दृष्टीनें तो मुक्तच झाला. पण त्याच्यासारखें आत्मज्ञान ज्यांस झालें नाहीं, त्याच्यासारखी पूर्णदृष्टि ज्यांची झाली नाहीं, तेही मुक्त झाले असें त्यानें ह्मणणें ह्मणजे 'माझ्यासारखाच दूधभात हल्लींच्या दुष्काळांतही सर्वांनीं खावा' असा हुकूम सोडणाऱ्या राजाप्रमाणेंच होय ! सारांश, त्याचें स्वतःचें कर्म संपलें तरी त्याचें सामाजिक कर्तव्य संपत नाहीं. समाजच ब्रह्म आहे असें त्याची ज्ञानदृष्टि त्यास सांगेल हें खरें, पण नेत्र, कर्ण इत्यादि इंद्रियें त्याला तसें सांगणार नाहींत; आणि म्हणून स्वकर्माचा संन्यास केल्यानंतर त्यानें समाजाचा उद्धार करण्याचें व्रत निष्कामबुद्धीनें घेतलेंच पाहिजे. परमेश्वरांनींही हेंच केलें आहे. येथें मायेचा अंश थोडासा शिलक राहतो, पण ही शिलक देहप्रारब्धानें प्राप्त झाली आहे व असल्या पुरुषास मायाच वश असते, तो तिला वश असत नाहीं ह्मणून तो अलिप्तही राहतो. असो; याचा विचार आणखी एकदां करूं.

**चतरजी**—'एका दीपास प्रकाशासाठीं जशी अन्य दीपांची आवश्यकता नसते, तशीच कृतकृत्य झालेल्या ब्रह्मनिष्ठास सुखापेक्षेनें इतर वस्तूंचीही आवश्यकता नसते.'

**रामानुजांस** वरीलच अर्थ मान्य आहे. मात्र ते ह्मणतात कीं, जो साधनांशिवायच सम्यग्ज्ञानी झाला त्यासच हा श्लोक लागू आहे.

**द्वैतवादी आचार्यां**स व त्यांच्या अनुयायांस निदान येथें तरी कबूल करणें भाग पडलें आहे कीं, निर्विकल्पसमाधि अगर असंप्रज्ञातसमाधि दृढ झाल्या कारणानें परमात्मा जो श्रीभगवान विष्णु त्याच्याच ठिकाणीं निःसीम प्रेम, तेथेंच तृप्ति, समाधान, आणि तेथेंच परमानंद ज्याला उत्पन्न होऊं लागला, त्या अपरोक्ष ज्ञानी पुरुषाला कर्तव्य उरत नाहीं ! येथेंही परमात्म्याहून आत्मा भिन्न असतो असा भाव आणला आहेच, तथापि अशा ज्ञान्याचें श्रौतस्मार्त वगैरे कर्म द्वैतवाद्यांच्या मतें नष्ट झालें ही थोडकी गोष्ट नव्हे ! उपासना नष्ट होत नाहीं हा यांचा सिद्धांत येथेंही आहेच.

**ज्ञानेश्वर**—देखें असतेनि देहधर्में । एथे तोचि एक न लिंपे कर्में । जो अखंडित रमे । आपणपांचि ( आपल्याशीं ) ॥

**वामनपंडित**—ज्ञानी झाला, परंतु थोडीशी जर का विषयाकांक्षा **असली** तरी त्यावर कडाका पहाः—स्वपतीची आवडी । इतर पुरुषांचीही कांहीं **गोडी** । तरी त्या नारीची खोडी । व्यभिचारिणी म्हणावीच ॥.... अर्जुना! **पुरुषसृष्टि** । पतिव्रता **न** देखे काय दृष्टी? । परी विषयबुद्धीतें उष्टी । दृष्टी न करी कदापि ॥ यावरून पंडितांचा भाव लक्ष्यांत येईल. अर्थातच अशा आत्मज्ञाचें स्वोपकारक कर्म संपलें. तोच खरा मानव होय. बाकीचे सर्व पशुच होत !

**रंगनाथ** ह्मणतात—' रति, तृप्ति, संतुष्टता ' हीं अद्वैतीं आत्मज्ञान **नस**तात, फक्त साधारण मनुष्यांस आत्मसुख कसें असतें हें दर्शविण्यासाठीं **यांचा** आरोप आहे. **मधुसूदनीकारांचे** हे अनुयायी आहेत.

**गीताव्याख्यानकार***—ज्याणें विवेकवैराग्यबळें । प्रवृत्तीतें मार्गें लोटलें । मग येवोनि ठाणें घातलें । मोक्षपदीं । तेथें स्वानंदेंच धाला ॥ स्वसुखेंच तो संतोषला । मग पुढें काय तयाला। उरलें असे ॥ १७ ॥

किंच—

आणखी —

## नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥
## न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

**इह** ( ह्या दृश्य विश्वांत ) **तस्य** ( त्याला ) **कृतेन** ( कांहीं कर्म केलें तरी ) **अर्थः न** कोणताही लाभ नाहीं )—आणि **अकृतेन** ( कांहीं केलें नाहीं ह्मणून ) **कश्चन न** ( कोणताही हानिदायक—लाभ—नाहीं. ) **च**(आणि) **अस्य** ( ह्याला, ह्या ज्ञानी पुरुषाला-- ) **सर्वभूतेषु** ( ह्या चराचर भूत मालामध्यें ) **कश्चित् अर्थव्यपाश्रयः** ( ज्याच्यावर स्वकीय लाभ अगर हानि अवलंबून आहे असा पदार्थही नाहीं. )--सारांश, त्या कृतार्थ पुरुषाला कोणत्याही लौकिक अगर शास्त्रीय कर्तव्याची अपेक्षा नाहीं; किंवा कर्तव्य केलें नाहीं

*ह्या व्याख्यानकारांचें नांव माहित नाहीं. हे बहुधा गोपाळशिष्य असावे. पदें, अन्वय अर्थ असा क्रम धरून शेवटीं ओव्या घातल्या आहेत. ह्या पुस्तकाची लेखी प्रत मला रा. रा. विनायक लक्ष्मण भावे बी. एस. सी ठाणेकर यांच्या अनुग्रहानें मिळाली.

ह्मणून त्याची हानिही होत नाहीं. शिवाय या चराचर विश्वामध्यें असा कोणताही पदार्थ नाहीं किंवा पुरुष नाहीं कीं ज्याच्यावर अवलंबून राहून त्याला कांहीं तरी मिळावयाचें आहे. तात्पर्य, त्यानें कांहीं केलें अगर केलें नाहीं तरी त्याला लाभहानि नाहीं. शिवाय असें कोणतेंही लाभदायक कर्तव्य त्याला उरत नाहीं, कीं ज्याच्यासाठीं त्यानें दुसऱ्यावर–पुरुषावर अगर देवतेवर अवलंबून असलें पाहिजे. अर्थातच त्याच्या हातून जर कांहीं झालें तर तें सर्वथा स्वार्थशून्य असल्यामुळें इतरांस उपकारकारक होतें, त्याला मात्र त्याची खबर नसते. मागील श्लोकाचें समर्थन हा श्लोक करितो असें बऱ्याच टीकाकारांचें ह्मणणें आहे.

नैवेति । नैव तस्य परमात्मरतेः कृतेन कर्मणाऽर्थः प्रयोजनमस्ति। अस्तु तर्ह्यकृतेनाकरणेन प्रत्यवायाख्योऽनर्थो नाकृतेनेह लोके कश्चन काश्चिदपि प्रत्यवायप्राप्तिरूप आत्महानिलक्षणो वा नैवास्ति। न चास्य सर्वभूतेषु ब्रह्मादिस्थावरान्तेषु भूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रय : प्रयोजननिमित्तक्रियासाध्यो व्यपाश्रयो व्यपाश्रयणम्। कंचिद्भूतविशेषमाश्रित्य न साध्यः कश्चिदर्थोऽस्ति। येन तदर्थाक्रियाऽनुष्ठेया स्यात्। नत्वमेतस्मिन्सर्वतः संप्लुतोदकस्थानीये सम्यग्दर्शने वर्तसे ॥ १८ ॥

याप्रमाणें परब्रह्मामध्यें लीन होऊन परब्रह्मरूपी झालेल्या अहंकारशून्य व पूर्णानंदमग्न ज्ञाननिष्ठ पुरुषाला कोणत्याही लौकिक अगर वर्णाश्रमानुरूप शास्त्रीय कर्तव्याचें कारण उरत नाहीं. कारण त्याला कांहीं मिळावयाचें राहिलेलें नसतें. स्वर्गलोकसुख अगर योगलब्ध ऐश्वर्याचें सुख हीं ब्रह्मसुखापुढें निस्तेजच होतात.

**शिष्य**—पण, गुरुजी ! स्नानसंध्यादि शास्त्रीय व लौकिक नित्य कर्में त्यानें केलीं नाहींत, तर त्यास पाप नाहीं लागावयाचें ? निदान जें स्वरूप त्यास प्राप्त झालें आहे तें कायम ठेवण्यासाठीं तरी त्याला कर्म केलें पाहिजे ?

**गुरु**—नाहीं. स्वर्ग वगैरे देणारीं कर्में अगर ऋण फेडणारीं कर्में त्यानें केलीं नाहींत ह्मणून त्यास पापही लागावयाचें नाहीं.—आत्मलोकीं जाऊन राहिलेल्या मनुष्यास स्वर्गादिकांची काय पर्वा आहे किंवा ऋण तरी कसलें राहावयाचें आहे ? शिवाय ज्ञानानें आत्मलोकास गेलेल्या मनुष्यानें संसार उत्पन्न करणारें कर्म केलें नाहीं ह्मणून तो स्वरूपामधून कसा च्युत होईल ? अशी





शंका घेणें ह्मणजे कौमुदीवरील **शेखरापर्यंत** ग्रंथ ह्मटलेल्या वैय्याकरणानें 'रामो हरिः' ची संस्था नित्य घेतली नाहीं तर त्याचें व्याकरणज्ञान लुप्त होईल, अशी शंका घेण्याप्रमाणेंच अज्ञानदर्शक होय! असो; हें स्वतःवरच अवलंबून असणाऱ्या कर्माविषयीं झालें. आतां दुसऱ्याचें साहाय्य घेऊन त्याला कांहीं अर्थसिद्धि करून द्यावयाची असेल अशी शंका घेशील तर सांगतों कीं या दृश्यमात्र असणाऱ्या सर्व चेतनाचेतनात्मक विश्वामध्यें ब्रह्मदेवापासून तों थेट गवताच्या काडीपर्यंत अशी कोणतीही वस्तु नाहीं, किंवा कोणताही पुरुष नाहीं कीं दैवत नाहीं, कीं ज्याच्या आश्रयानें कर्म केलें असतां ज्ञानी पुरुषास आणखी कांहीं मिळवावयाचें आहे.–सारांश, पदार्थांचा आश्रय केला असतां कांहीं जास्त ज्ञान मिळेल अगर जास्त उपभोग मिळतील ह्मणून कर्म केलें पाहिजे, किंवा एक किंवा अनेक पुरुषांचा, फार काय परमेश्वराचाही आश्रय करून कांहीं विशिष्ट कर्म केलें असतां कीर्ति अगर सत्ता अगर ऐश्वर्य वाढून आत्मज्ञानांत अगर आत्मानंदांत विशेष भर पडेल असें ज्ञानी पुरुषास कांहींच उरलेलें नसतें. सारांश, अशा ज्ञानी पुरुषाला स्वतःसाठीं* करावयाचें असें कोणतेंच कर्म राहत नाहीं.

**शिष्य**—मग लोकांसाठीं कर्म करावें असें निष्पन्न होईल.

**गुरु**—होय. होईल. पण याचा विचार बाविसाव्या श्लोकांत सांगेन.

**शिष्यः**—तें असो; पण भगवंतांचीं ज्ञानवाक्यें सर्वथा कर्णरूपी होऊन ऐकणाऱ्या ज्ञानी व एकचित्त अर्जुनाला तरी कर्माची आवश्यकता कोठें राहते?

**गुरुः**—कोठें राहते, तें पुढील श्लोकांतच पहाः--अ० २ श्लोक ४६ मध्यें सर्वत्र ज्ञानमय झालेल्या जलसागरांचें वगैरे जें सांगितलें आहे तें ब्रह्मज्ञान, ती पूर्णदृष्टि अर्जुनास अवगत झाली नव्हती ह्मणून अर्जुनास कर्तव्यकर्म करणें अवश्यच होतें.

---

* आधुनिक वेदांत्यांस हा आचार्यांच्या व्याख्यानाचा अर्थ संमत होईल कीं नाहीं याची वानवा आहे. अज्ञानी लोकांसाठीं–कोणत्याही प्रकारानें स्वतःसाठीं नव्हे–कर्म केलें अगर अज्ञान्याकडून करविलें तर स्वार्थशून्यज्ञानी पुरुषांचा उद्धार होईल हें भगवंतांस व आचार्यांस संमत होतें असा मला या श्लोकांतून व भाष्यांतून अर्थ काढावयाचा आहे. हा अर्थ संमत नसता तर भगवंतांनीं २२, २३, २४, या श्लोकांचा अवतार केला नसता व आचार्यांनींही ज्ञानमार्गाचे मठ स्थापिले नसते. असो; याचा विस्तार पुढें करूं.

**मधु०**—'**परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमयान्नास्त्यकृतः कृतेनेति**' (हे सर्व स्वर्ग, मृत्यु, पाताळ इत्यादि लोक कर्मानें मात्र प्राप्त होणारे असें पाहून ब्रह्मनिष्ठ पुरुष स्वर्गादि भुवनांचा तिरस्कार करूं लागतो. कारण नित्य असा जो मोक्ष तो केलेल्या—नवीन उत्पन्न झालेल्या ह्मणजे अनित्य कर्मानें प्राप्त व्हावयाचा नाहीं अशी त्याची खातरी असते ) ही व '**नैनं कृताकृते तपतः**' ( याला विधेय किंवा निषिद्ध कर्में बाध करूं शकत नाहींत, ) तसेंच 'देवांचाही हा पुरुष आत्मा होऊन बसतो ह्मणून इंद्रादिक देव अगर पितर वगैरे कोणीही या पुरुषाला त्रास देऊं शकत नाहींत, अगर ब्रह्माकडे जाण्याला प्रतिबंध करूं शकत नाहींत.' वगैरे श्रुतींच्या समर्थनानें ज्ञानी पुरुषास कर्तव्य उरत नाहीं असें सिद्ध करितात. **मधुसूदनीकार** योगवासिष्ठामधून एक श्लोक उध्दृत करून, त्यावरून, ज्ञानाच्या सात भूमिका आहेत व सातव्या भूमिकेंत गेलेला व तुरीयावस्थेंत असणारा ज्ञानी पुरुष स्वहित अथवा परहित यांस ओलांडून ब्रह्म होऊन बसतो व त्याच्या देहधर्माची व्यवस्था इतरांस करावी लागते, असें सांगतात. सारांश, पूर्ण ब्रह्मनिष्ठ पुरुष स्वतःच्या संबंधानें नाहींसारखाच होतो असें यांचें मत दिसतें. याच अवस्थेचें वर्णन श्रीमद्भागवतांत आहे त्याचा तात्पर्यार्थ हा आहे कीं, ' स्वस्वरूपीं रममाण झालेल्या ब्रह्मनिष्ठाला स्वतःच्या देहाचेंही भान नसतें. दारू पिऊन उन्मत्त झालेल्या पुरुषास जशी स्वतःच्या वस्त्राची खबर नसते, तद्वतच शरीरसंबंधें ज्ञानी पुरुषाची स्थिति असते. ' प्रो० **द्विवेदीं**चा व **पर्वते** यांचा हाच अभिप्राय दिसतो.

**श्रीधर** आचार्यानुचारी आहेत. **शंकरानंद** हे कर्मामध्यें उपासनेचाही अंतर्भाव करून ब्रह्मनिष्ठाच्या संबंधें उपासनेचा निषेध करितात. '**ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः । नैवास्ति किंचित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्त्ववित्**' अर्थ उघड आहे. ' आपल्यास कांहीं कर्तव्य आहे असें वाटणारा पुरुष तत्त्ववेत्ता नव्हे, ' हें चिंतनीय आहे.

**प्रपाकार**—'**तदेतदृचाऽभ्युक्तमेष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न कर्मणा वर्धते नो कनीयान्**' ( ऋग्वेदामध्यें ब्रह्मज्ञ पुरुषाचा महिमा शाश्वत असतो, कर्मानें लहान किंवा मोठा होत नाहीं असें सांगितलें आहे. **बृहदा०** ) ऋग्वेदांतील ऋचा देऊन त्यावर असणारें **रावणभाष्य**ही **प्रपाकारांनीं** दिलें आहे, तें **रावणकृत** आहे म्हणून व ब्रह्मविचार ऋग्वेदकालींही होता

असें त्या भाष्यावरून दिसत आहे म्हणून हा प्रसंग चित्ताकर्षक होय. वाचकांनीं हें अवश्य वाचावें इतकें सांगणें मात्र येथें शक्य आहे. सायणभाष्यापूर्वी रावणभाष्य प्रचलित होतें, **प्रपाकार** सायणापूर्वी दोनशें वर्षें अगोदर होते, तेव्हां त्यांनीं रावणभाष्याचा उल्लेख करणें नीटच आहे. या रावणभाष्याचा कोणी शोध लावील काय ?

**द्वैतवाद्यांचा** येथें मतभेद नाहीं.

मराठी टीकाकारांत ऐक्यच आहे. **रंगनाथांचा** दृष्टांत—' इंद्रासी रंकाचे डोहाळे ! । किंवा गरुड ह्मणे धन्य हे काउळे ! । असो हें; ब्रह्मवेत्ता कर्मासि नातळे ! मानी अमंगळे स्वर्गादिकां ॥ हृदयंगम आहे.

**गीताव्याख्याकार**—हा तंव प्रकृतीवेगळा तत्साक्षित्वें निराळा । मग कर्मभाग झाला न झाला । तेणें यासी काय गुंती ? ॥ १८ ॥

यत एवम्—

असें आहे म्हणून—

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ॥**

**असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

**तस्मात्** ( म्हणून ) **सततं** ( सर्वदां, ज्ञानप्राप्ति होईपर्यंत ) **कार्यं कर्म** ( श्रुतिस्मृति इत्यादिकांनीं सांगितलेलें कर्तव्यकर्म ) **असक्तः** ( वासनाशून्य होऊन ) **समाचर** ( चांगल्या तऱ्हेनें, शास्त्रोक्त मार्गानें आचरण कर ); **हि** ( कारण उघडच आहे कीं ) **असक्तः पूरुषः** ( वासनाशून्य असणारा पुरुष ) **कर्म आचरन्** ( विहित कर्मांचें आचरण करीत असेल तर निर्मळ मनाचा हेऊन ) **परं आप्नोति** ( शेवटीं मोक्षाप्रत, श्रेष्ठ पुरुषार्थाप्रत मिळवितो ). सारांश. तुला जें शास्त्रोक्त कर्तव्य करावयाचें आहे तें निर्लोभ मनानें यथासांग कर. कारण स्पष्ट आहे कीं, जे लोक निर्लोभ मनानें आपआपलीं कर्तव्यें करितात, ते लोक निर्मळ मनाचे होऊन शेवटीं अत्यंत श्रेष्ठ पुरुषार्थ जो मोक्ष त्यास मिळवितात, ज्ञानस्वरूपी, ब्रह्मस्वरूपी होतात.

तस्मादिति । तस्मादसक्तः सङ्गवर्जितः सततं सर्वदा कार्यं कर्तव्यं

नित्यं कर्म समाचर निर्वर्तय । असक्तो हि यस्मात्समाचरन्नीश्वरार्थं कर्म कुर्वन्परं मोक्षमाप्नोति पुरुषः सत्त्वशुद्धिद्वारेणेत्यर्थः ॥ १९ ॥

ह्मणून, अर्जुना! सर्व प्रकारची आसक्ति, विषयवासना सोडून देऊन, तुझें जें शास्त्रोक्त नित्य, अवश्य व नैमित्तिक कर्तव्य आहे तें तूं यथाविधि व ज्ञान-प्राप्ति होईपर्यंत करीत रहा. कारण निर्लोभमनानें परमेश्वरास अर्पण करण्याच्या हेतूनें, जे अज्ञ लोक आपआपलीं कर्तव्यें करितात, ते लोक वासनाशून्य तर होतातच पण शेवटीं ब्रह्मप्राप्ति करून घेतात. तेथें कर्मानें मोक्ष मिळतो असें नाहीं, तर निष्कामकर्मानें चित्तशुद्धि, नंतर ज्ञान आणि शेवटीं मोक्ष अशी उत्तरोत्तर परंपरा आहे.

**मधु० प्रपा० द्विवे० पर्वते** व **चतरजी** हे आचार्यानुसारी आहेत. **शंकरा०**—‘ **धर्मेण पापमपनुदति** , ( धर्माचरणानें पापक्षय होतो. ) व पुढें ज्ञानप्राप्ति होऊन ‘ **ज्ञानादेव तु कैवल्यं** ’ ( ज्ञानानेंच मोक्ष मिळतो ) असे आधार देतात.

**रामा०**—जो स्वतः सिद्धतेनेंच मुक्त झाला नाहीं तो ज्ञानी असेल तरी त्यास देहयात्रेसाठीं कर्म केलेंच पाहिजे. कर्मानेंच त्यास मोक्ष मिळणार! असें ह्मणतात.

**द्वैतवादी**—मुक्तानें स्वेच्छापूर्वक कर्म करण्यास प्रत्यवाय नाहीं. अपरोक्ष ज्ञान्याशिवाय इतरांनीं संगविरहित विष्णूपासना केल्यानें मात्र मुक्ति ( सांनि-ध्यता ) मिळेल.

मराठी टीकाकारांची एकवाक्यता आहे. ‘ क्षत्रियास संन्यास नाहीं ह्मणून कर्म करूनच त्यांनीं मुक्त व्हावें ’ असा पुढील श्लोकाचा भावार्थ रंगनाथ सुचवितात. ॥ १९ ॥

यस्माच्च—

आणखी एक कारण, पुनः ऐतिहासिक अनुभव, एकः—

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ॥**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

**हि**( अनुभवही असेंच दाखवितो कीं ) **जनकादयः** ( जनकादिक क्षात्र-कुलोत्पन्न ज्ञानी ) **कर्मणा एव** ( कर्माच्या साहाय्यानेंच ) **संसिद्धिं** ( मोक्ष

नामक श्रेष्ठ पुरुषार्थाची सिद्धि ) **आस्थिताः** ( मिळविते झाले. ) **अपि** ( निदान) **लोकसंग्रहं एव** ( लोकांची कर्तव्यकर्माकडेच प्रवृत्ति असावी ). **संपश्यन्** ( हें पाहून, हें ध्यानांत ठेवून तरी ) **कर्तुं अर्हसि** ( आपलें कर्तव्य करण्यास तूं योग्य आहेस. ) सारांश, जनकाप्रभृति क्षात्रकुलोत्पन्न ज्ञानी पुरुषांनीं आपआपलें कर्तव्य केलें ह्मणूनच ते मोक्ष नामक सिद्धिप्रत प्राप्त झाले, हें तुला इतिहासज्ञानावरून अवगतच आहे. शिवाय अज्ञानी लोकांनीं कर्तव्यें करावीं उन्मत्त अगर उच्छृंखल होऊं नये एतदर्थ तरी तुला आपलें क्षात्रकर्तव्य केलें पाहिजे. तात्पर्य तुला कर्म केलेंच पाहिजे. (१) अज्ञानी असशील तर चित्तशुद्धीसाठीं कर्म केले पाहिजे व (२) ज्ञानी असशील तर लोककल्याण करावयाचें आहे, हें लक्ष्यांत ठेवून कर्म केलें पाहिजे.—

कर्मणैवेति ।कर्मणैव हि यस्मात्पूर्वे क्षात्रिया विद्वांसः संसिद्धिं मोक्षं गन्तुमास्थिताः प्रवृत्ता जनकादयो जनकाश्वपतिप्रभृतयः । यदि ते प्राप्तसम्यग्दर्शनास्ततो लोकसंग्रहार्थं प्रारब्धकर्मत्वात्कर्मणा सहैवासंन्यस्यैव कर्मसंसिद्धिमास्थिता इत्यर्थः । अथाप्राप्तसम्यग्दर्शना जनकादयस्तदा कर्मणा सत्वशुद्धिसाधनभूतेन क्रमेण संसिद्धिमास्थिता इति व्याख्येयः श्लोकः । अथ मन्यसे पूर्वैरपि जनकादिभिरप्यजानद्भिरेव कर्तव्यं कर्म कृतं तावता नावश्यमन्येन कर्तव्यं सम्यग्दर्शनवता कृतार्थेनेति तथाऽपि प्रारब्धकर्मायत्तस्त्वं लोकसंग्रहमेवापि लोकस्योन्मार्गप्रवृत्तिनिवारणं लोकसंग्रहमेवापि प्रयोजनं संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

**शिष्य**—गुरुजी ! अर्जुनास ज्ञान झालें नव्हतें ह्मणून त्यास चित्तशोधक कर्ममार्ग सांगितला तो सयुक्तिक आहे. पण ज्ञान्यासही कर्म करावें लागतें अशाविषयीं अनुभवाचा ऐतिहासिक दाखला आहे काय ?

**गुरु**—अरे हो ! तुला ठाऊक नाहीं काय ? **जगक, अश्वपति** वगैरे क्षत्रिय ब्रह्मज्ञानी कर्म करूनच, कर्ममार्गानेंच मोक्षसिद्धि मिळविते झाले !

**शिष्य**—वाहवा ! आपण बरेच वेळ मला सांगितलें आहे कीं, मोक्ष मिळतो तो कर्मत्याग करून, आणि आतां सांगतां कीं कर्म करून जनकादिकांनीं मोक्ष मिळविला ! ह्या विरोधाचा परिहार होणें आतां मात्र कठिणच दिसतें,

**गुरु**—हा वेड्या ! हा विरोध तुझ्या डोक्यांत कल्पनेनें, अज्ञानानें, मात्र उत्पन्न केला आहे. असें पहाः जनकादिक राजे जर पूर्ण ज्ञानी होते, त्यांस

ब्रह्मसाक्षात्कार होऊन ते स्वस्वरूपीं लीन झाले होते, असें धरलेंस तर त्यांच्या मुक्तीचा असा उलगडा करावा लागेल कीं, ते राजे पूर्णज्ञानी होते, तथापि ज्या पूर्वकर्मानें त्यांस देह प्राप्त झाला, तें कर्म देहधारण करूनच संपत नसल्यामुळें 'इतर लोकांस अधर्मानें जाऊं द्याव-याचें नाहीं' या हेतूनें, परार्थदृष्टीनें त्यांस कर्म करावें लागलें, त्यांस कर्माचा त्याग करितां येईना; तथापि ज्ञानमाहात्म्यानें त्यांस मुक्ति मिळाली. सारांश, त्यांस पूर्ण ज्ञान झालें असलें तरी लोकसंग्रहार्थ कर्म करावें असें त्यांचें देहप्रारब्धच होतें असें म्हटलें पाहिजे. ह्मणून त्यांस कर्मसंन्यास करितां आला नसेल; तात्पर्य, कर्म करून स्वतः जरी कांहीं मिळवावयाचें अगर रक्षण करावयाचें नव्हतें, तरी अज्ञानी लोकांच्या चित्तशुद्धीसाठीं जन-कादिकांस कर्म करावें लागलें असें समजलें पाहिजे. ( २ ) आतां त्यांस पूर्ण ज्ञान झालें नव्हतें असा अर्थ घेतला तर क्रम उघडच आहे कीं, कर्म करून त्यांनीं चित्तशुद्धता संपादन केली व पुढें गुरूपदेशानें व ईश्वरानुग्रहानें त्यांस ज्ञान होऊन ते मोक्षाप्रत गेले. कोणताही अर्थ घेतला तरी जनकादिकांच्या कर्माचा व मोक्षाचा उलगडा होतो. असो; "आतां जनकादिक राजे अज्ञानी होते, ह्मणून त्यांस कर्तव्यकर्म अवश्य होतें व तें त्यांनीं केलें; जो ज्ञानी आहे, ब्रह्मसाक्षात्कार होऊन जो कृतार्थ झाला आहे, त्याला कर्म करण्याचें कारण नाहीं आणि ह्मणून मलाही कारण नाहीं' असें अर्जुन म्हणेल असें वाटल्यावरून भगवान म्हणतातः' तूं ज्ञानी नाहींस, पण घटकाभर तुला ज्ञान झालें आहे, असें गृहीत धरलें तरी ज्या पूर्वकर्मानें तुला हा देह प्राप्त झाला आहे, त्या कर्माच्या नाशासाठीं तुला आपलें श्रुतिस्मृत्युक्त कर्तव्य केलेंच पाहिजे. तूं क्षत्रिय आहेस तेव्हां तुझें कर्तव्य म्हणजे प्रजाजनांनीं उन्मत्त होऊं नये व त्यांस अधर्मा-चरण करूं देऊं नये, त्यांच्या उन्मार्गप्रवृत्तीचें निवारण करावें, सारांश, लोकांची चित्तशुद्धि होऊन त्यांनीं मुक्त व्हावें एतदर्थ तुला कर्म केलेंच पाहिजे.' सारांश, पूर्ण ज्ञान झालेलें असेल तर इतर लोकांच्या उद्धारासाठीं स्वार्थशून्यबुद्धीनें कर्म केलें पाहिजे, ज्ञान झालें नसेल तर स्वतःच्या चित्त-शुद्धीसाठीं कर्म केलें पाहिजे, एवंच कर्म केलें पाहिजे, असा भगवंतांचा व आचार्यांचा अभिप्राय स्पष्ट दिसत आहे. संसारिक पुरुषांचें कर्म स्वतःचे उपभोग वाढवून इंद्रियांचें समाधान करण्यासाठीं होत असतें व ज्ञानी

पुरुषांचें कर्म स्वतःस व इतरांस त्यांच्या त्यांच्या अधिकाराप्रमाणें विषयसुखापासून निवृत्त करून आत्मसुखाचा अहंकारशून्यत्वानें अनुभव घेण्यासाठीं व घेवविण्यासाठीं होत असतें, अहंकार वाढविणारा तो अज्ञानी व अहंकार नष्ट करणारा तो ज्ञानी असा उभयतांत विशेष आहे. असो; याचा विचार पुढें करूं.

**मधु०**—क्षत्रियांस कर्मसंन्यास करण्याचा अधिकार नाहीं असें सुचवितात! व श्रुतिस्मृतींचे आधारही दाखवितात! '**स्वाराज्यकामो राजा राजसूयेन यजेत्**' ( स्वाराज्याविषयीं इच्छा करणाऱ्या राजानें राजसूय यज्ञ करावा ). ह्याचा, व जात्यभिमानपर टीकेचा मागें एकदां विचार केलाच आहे **पर्वते** यांनीं **मधुसूदनीकारांचें**अनुकरण केलें आहे. **द्विवेदी** यांचा अभिप्राय सर्व वर्णांस संन्यासाचा अधिकार, वासना नष्ट झाल्यावर आहे, असा आहे; हें विचारसरणीस योग्यच आहे व असाच श्रुतिकारांचा व भगवंतांचा अभिप्राय असला पाहिजे. **शंकरा०** व **प्रपा०** आचार्यानुसारी आहेत.

द्वैतवादी हे **आचार्यप्रमाणेंच** अर्थ करितात हें आश्चर्य होय. '**मुक्तानें** कर्म करावयाचें तें स्वतःस आनंदातिशय होण्यासाठीं किंवा लोकसंग्रहासाठीं होय. '**अज्ञानां ज्ञानदं कर्म ज्ञानिनां लोकसंग्रहात्**' अर्थ स्पष्टच आहे.

**ज्ञाने०**—मार्गीं अंधासारिसा । पुढें देखणा ( डोळस ) ही चाले जैसा । अज्ञानां प्रकटावा धर्म तैसा । आचरोनी ॥ हा गा ऐसे जरी न कीजे । तरी अज्ञानां काय उमजे । तिहीं कवणेपरी जाणिजे ? । मार्गातें या ॥ इतर मराठी टीकाकार विशेष सांगत नाहींत. ॥ २० ॥

लोकसंग्रहं कः कर्तुमर्हति कथं चेत्युच्यते—

**शिष्य**—गुरुजी ! ब्रह्मज्ञान होऊन जो कृतार्थ झाला त्याला लोकसंग्रहासाठीं, लोकांनीं मर्यादेला अनुसरून वागावें हें करण्यासाठीं, तरी कर्म करण्याची कां अवश्यकता असावी ? तसेंच त्यानें हें लोकसंग्रहाचें काम करावें तरी कसें ? व लोक तरी श्रेष्ठ पुरुषाचें अनुकरण कां करितात ?

**गुरुजी**—उत्तम प्रश्न विचारलेस. सांगतों ऐक:—

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः॥**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥ २१॥**

**श्रेष्ठः** ( श्रेष्ठ, विद्वान, पुरुष ) **यत् यत् आचरति** ( जें जें काहीं आचरण करितो ) **तत् तत् एव** ( तें–तेंच–आचरण ) **इतरः जनः** ( इतर सामान्य जन करितात. ) **सः** ( तो श्रेष्ठ पुरुष ) **यत प्रमाणं कुरुते** ( जें प्रमाण धरून चालतो, ज्या कित्त्याचा, नमुन्याचा अंगीकार करितो )—तोच कित्ता वळवून—**लोकः** ( सामान्य जन ) **तत् अनुवर्तते** ( त्याच मार्गाचें अनुसरण करून चालतात. ) सारांश, शिष्ट लोकांचें जसें वर्तन असतें, ते जो कित्ता वळवितात, तेंच वर्तन व तोच कित्ता, सामान्य लोक अंगीकृत करून तसें चालतात. जुन्या व नव्या पद्धतीला श्रेष्ठ मानणाऱ्या लोकाग्रणींवर केवढी थोरली जबाबदारी ही? ह्या लोकनायकांनीं आपलें वर्तन किती चोख व किती दूरवर विचार करून चालविलें पाहिजे?

यद्यदिति। यद्यत्कर्माऽऽचरति येषु येषु श्रेष्ठः प्रधानस्तत्तदेव कर्माऽऽचरतीतरोऽन्यो जनस्तदनुगतः । किं च स श्रेष्ठो यत्प्रमाणं कुरुते लौकिकं वैदिकं वा लोकस्तदनुवर्तते तदेव प्रमाणी करोतीत्यर्थः ॥२१॥

श्रेष्ठ पुरुष, प्रधान पुरुष, जीं जीं कर्में करीत असतात, तीं तीं सर्व कर्में अन्य लोक, त्या श्रेष्ठ पुरुषाचे अनुयायी, आपल्या आचरणांत आणीत असतात. इतकेंच नव्हे तर आणखी असें पहा कीं, तो श्रेष्ठ पुरुष व्यवहारामध्यें अगर धार्मिक कृत्यामध्यें जे ग्रंथ, जीं वचनें, प्रमाणभूत धरून चालतो, ते ग्रंथ व तीं वचनें सप्रमाण आहेत असें स्वबुद्धीनेंही ग्रहण करून सामान्य लोक त्याचप्रमाणें चालतात. सारांश, इतर सामान्य लोकांस विचार करण्याची फुरसत अथवा ऐपत नसल्यामुळें सर्वांनीं श्रेष्ठ मानलेल्या महापुरुषाप्रमाणेंच सामान्य लोकांचें वर्तन होत असतें. आईबाप, शिक्षक, पुराणिक, हरिदास, आचार्य, लोकनायक व राजे ह्या सर्वांनीं प्रस्तुत श्लोकांचीं अनेक पारायणें करून व त्यांतील रहस्य समजून घेऊन, ते स्वतः कृतार्थ असले तरी, त्यांनीं याप्रमाणें वर्तन ठेविल्यास पुनः सत्ययुगाचा उद्भव होणार नाहीं असें कोण ह्मणेल? आपले विचार, आपले उच्चार व आपले आचार या त्रयीवर समाजाची केवढी भिस्त असते व समाजाचें बरें वाईट होणें कसें सर्वस्वी अवलंबून असतें हें मातापितरांनीं व शिक्षकांनीं अवश्य समजून घ्यावें.

धनपति म्हणतात येथें केवळ धार्मिक नव्हे तर व्यावहारिक कर्मांचाही अंतर्भाव केला पाहिजे.

अद्वैतवाद्यांस सर्वत्र एकवाक्यता आहे.

**रामा**०—ज्ञानी पुरुषानें कर्म न केल्यामुळें जर त्याचे अनुयायी, जे अज्ञानी लोक हे, कर्माभावानें नाश पावले तर त्या लोकनाशाचें पातक ज्ञान्याच्या माथीं बसतें. श्रेष्ठ तो होय कीं जो हें सर्व जाणतो व धर्मोक्त आचरण करितो.

द्वैतवाद्यांचाही अर्थ **आचार्यांप्रमाणेंच** आहे. '**यत्प्रमाणं**' या शब्दांत प्रमाणग्रंथांचा व आचार्यांचा समावेश करितात.

**ज्ञानेश्वर**०—येथ वडील जे जे करिती । तया नाम धर्म ठेविती ।.... हें वाक्य आमची ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध मंडळी लक्ष्यांत घेईल काय?

**रंग**०—परी स्वतंत्रपणें कोणी नाचरती । परस्परें देखोविखीच (पाहून मात्र) सर्व वर्तती । या लागी तूं जरी राजा श्रेष्ठ सर्वार्थी । या लोकाप्रती देखी दाखवी (उदाहरण घालून दे) ॥

**गीताव्याख्या**०—या कर्मे तयां (ज्ञानी लोकांस) चाड नसे । परी हृदयीं दयालुत्व असे । 'जे हे अज्ञानजन जैसे तैसे । सोई लागोत ऐसेनें तरी' ॥ २१ ॥

यद्यत्र ते लोकसंग्रहकर्तव्यतायां विप्रतिपत्तिस्तर्हि मां किं न पश्यसि—

**शिष्य**०—महाराज! लोकांस धर्माच्या आळ्यांत ठेवणें, सारांश लोकसंग्रह करणें हें ज्ञानी पुरुषाचें, कर्मसंन्यास करण्याची योग्यता प्राप्त झालेल्या ब्रह्मज्ञाचें, कर्तव्य आहे असा कांहीं ऐतिहासिक दाखला आहे? मला तर निष्कामी पुरुषानें कर्म करणें विरोधात्मक दिसतें.

**गुरु**—हो! तुझ्यासारख्या स्वार्थैकतत्पर पुरुषाला विरोध दिसावयाचाच! भोग मिळावे तरी **स्वतःस**, मुक्ति मिळण्याचा योग आला कीं कर्म संपलें **स्वतःचें**, असें मानणाऱ्या स्वार्थनिष्ठांनीं भगवंताचें उदाहरण ध्यानांत ठेवावें. ऐका:—

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

भगवान म्हणतात:—**पार्था** (अर्जुना!) माझेंच उदाहरण पहासना।

पदाः—**त्रिषु लोकेषु** ( तिन्ही लोकांमध्यें, सर्व ब्रह्मांडामध्यें ) **मे** ( मला ) **किंचन कर्तव्यं** ( कोणतेंही कर्तव्य ) **न अस्ति** ( असत नाहीं. ) **अनवाप्तं** ( कांहीं न मिळालेलें ) **अवाप्तव्यं न** ( मिळवावयाचें आहे, असें नाहीं. )— तथापि—**कर्माणि** ( कर्मामध्यें ) **वर्ते एव च** ( मी वागतोंच आहें ! ) सारांश संपूर्ण त्रैलोक्यामध्यें मला कांहीं करावयाचें आहे, किंवा कांहीं न मिळालेलें मिळावयाचें आहे, असा मुळींच प्रकार नसून, सर्वप्रकारांनीं स्वतः पूर्ण असून हीं, मी सदैव कर्म करीत असतों हें कां पहात नाहींस ?

न म इति । न मे मम पार्थ नास्ति न विद्यते कर्तव्यं त्रिष्वपि लोकषु किंचन किंचिदपि । कस्मात्—नानवाप्तमप्राप्तमवाप्तव्यं प्रापणीयं तथाऽपि वर्त एव च कर्मण्यहम् ।। २२ ।।

अर्जुना, भुर्भूवर्स्वर्लोकांत अगर मनुष्य, पितृ, देवलोकांत अथवा सर्व ब्रह्मांडांमध्यें असें कांहीं एकही नाहीं कीं ज्याच्यासंबंधानें मला कांहीं कर्तव्य करावयाचें आहे.

**शिष्य**—असें कशावरून

**गुरु**—अरे ! एखादी अलभ्य किंवा अलब्ध वस्तु प्राप्त करून घ्यावयाची असेल तर कर्म करावयाचें कीं नाहीं ? भगवंतास काय मिळवावयाचें असणार? भगवान ह्मणतातः ' मला कांहीं मिळवावयाचें नाहीं, मी पूर्णच आहें; तथापि अर्जुना ! मी कर्मामध्यें वागत असतों, कर्म करीतच असतों, तें केवळ लोकहितासाठींच होय. आणि तुला तर अद्यापि साध्य करून घ्यावयाचें असें पुष्कळच आहे; तेव्हां मी कर्म करणार नाहीं हा तुझा हट्ट अविवेकाचाच होय. स्वतःसाठीं, निदान इतरांसाठीं, तुला कर्म केलेंच पाहिजे.

येथेंही अद्वैतवादी व द्वैतवादी आचार्यानुसारीच आहेत.

**रामा०**—' त्रिषु लोकेषु '=तिन्ही लोकांत ( देव, मनुष्यादि रूपें घेऊन स्वच्छंदानें संचार करणारा जो मी त्याला तिन्ही लोकांत कर्तव्य नाहीं. )

पंडितांनीं ' मनुष्य ' शब्दावर बरेंच व्याख्यान लिहून ' परमेश्वराचा मार्ग अनुसरतात तेच मनुष्य, बाकीचे पशूपेक्षांही नीच ' असा तात्पर्यार्थ आणिला आहे. ' पशु पडे अंधकूपीं । निघसें असाध्याचे तथापि । चरफडी निघावया, हे पापी । गृहांधकूपीं सुखमानिती ! ।। पशु पशुत्वापासूनी । सुटे, हे चौऱ्यांशीं लक्ष योनी । प्राप्त होती नरक भोगुनी, ऐसीं कर्में आचरती ! ' ।।

गीताव्याख्याकारांचा दृष्टांत पहाः—तृप्तीस भूक लागे । कीं अमृत कांहीं गोह (ड) मागें । न घडे; तेवी मज नलगे । कर्तव्य या प्रपंचीं ॥ २२ ॥

**यदि ह्यहं न वर्तेय जातु कर्मण्यतंद्रितः ॥**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥**

**हि** ( कारण असें पहा कीं ) **यदि जातु** ( जर कदाचित् ) **अतान्द्रितः** ( आलस्यशून्य, निरालस, होत्साता ) **कर्मणि न वर्तेय** ( कर्ममार्गाचें मीं अनुसरण केलें नाहीं; कांहींच केलें नाहीं; )—**तर—पार्थ** ( अर्जुना! ) **सर्वशः** ( सर्व प्रकारांनीं ) **मनुष्यः** ( सामान्य जन, प्राकृत आणि विचारशून्य लोक ) **मम वर्त्म** ( माझाच मार्ग, मी घालून दिलेला मार्गच ) **अनुवर्तन्ते** ( अनुसरण करितात. )—सारांश, आळस टाकून देऊन, उद्योगपूर्वक मी कर्मच करावयाचें जर कदाचित् सोडून दिलें, तर आतांच सांगितल्याप्रमाणें सामान्य लोक माझेंच सर्वथा अनुकरण करतील यांत शंका नाहीं.—तात्पर्य, मला सर्वेश्वराला लोकसंग्रह करून तरी काय कर्तव्य आहे असें म्हणशील तर काय अनर्थ होतील तें सांगण्यासाठीं तुला सांगितलें आहे.

यदि पुनरहं न वर्तेयं जातु कदाचित्कर्मण्यतन्द्रितोऽनलसः सन्मम श्रेष्ठस्य सतो वर्त्म मार्गमनुवर्तन्ते मनुष्या हे पार्थ सर्वशः सर्वप्रकारैः ॥ २३ ॥

**शिष्य**—लोकसंग्रहाची तरी परमेश्वरास कशाला हवी अपेक्षा ?

**गुरु**—कशाला हवी तें ऐकः—'हे पार्था!' भगवान् ह्मणतात; 'जर कदाचित् आलस्याचा त्याग न करितां आळसानें माझें कर्मच करावयाचें मी टाकून दिलें तर सर्वांत श्रेष्ठ असा जो मी सर्वज्ञ पुरुषोत्तम, त्या माझेंच अनुकरण कर्माधिकारी मनुष्यमात्र सर्वथा करूं लागतील; सारांश, '**अश्रेष्ठा श्रेष्ठानुसारी**' या न्यायानें 'सर्वज्ञ भगवानच कर्म करीत नाहीं, आपण तरी कशाला करावें' असें ह्मणून सर्व अज्ञानी लोक वागूं लागतील; तसें होऊं नये ह्मणून मी कर्म करितों. हें परमेश्वराचें कर्म कोणतें तें चवथ्या अध्यायांत स्पष्ट होईल.

अद्वैत व द्वैतसिद्धांत्यांत सर्वत्र एकवाक्यता आहे.

**चत०**—'मनुष्याच्या प्रत्येक कर्माचा परिणाम कर्त्यावर होतो. परमेश्वर मात्र निर्लेपपणानें कर्म करितो.' ॥ २३ ॥

तथा च को दोष इत्याह—

**शिष्य**—न करिनात बापडे लोक कर्म! त्यांत काय दोष आहे?

**गुरु**—हा वेड्या! काय अनर्थ होईल तें पहा:—

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः॥२४॥**

**अहं** (म्यां) **कर्म न कुर्यां चेत्** (जर कर्मच केलें नाहीं)—तर—**इमे लोकाः** (हे सर्व लोक, हीं सर्व भुवनें) **उत्सीदेयुः** (नाश पावतील, नष्ट होऊन जातील) **च** (आणि) **संकरस्य** (वर्णसंकर) **कर्ता स्याम्** (म्यां उत्पन्न केला असें होईल)—आणि—**इमाः प्रजाः** (हे सर्व लोक, हे सर्व जीव) **उपहन्याम्** (नष्ट होतील, यांच्या नाशाला मी कारण होईन.) सारांश, जर मीं कर्म केलें नाहीं तर सर्व ब्रह्मांडाचा नाश, वर्णसंकर आणि जीवमात्राचा नाश मीं केला असें होईल. कर्म केलें नाहीं तरी, अकर्मापासूनही, कर्म कसें उत्पन्न होतें, अकर्मक वर्तन सकर्मक कसें होतें तें पहा!—

उदिति। उत्सीदेयुर्विनश्येयुरिमे सर्वे लोका लोकस्थितिनिमित्तस्य कर्मणोऽभावात, न कुर्यां कर्म चेदहम्, किंच संकरस्य च कर्ता स्याम्। तेन कारणेनोपहन्यामिमाः प्रजाः प्रजानामनुग्रहाय प्रवृत्त उपहतिमुपहननं कुर्यामित्यर्थः। ममेश्वरस्याननुरूपमापद्येत॥२४॥

मींच जर कर्म केलें नाहीं, सर्व प्रजांची सुस्थिति कायम करणारें कर्म मींच जर केलें नाहीं, सारांश, विश्वाची स्थिति कायम ठेवून सुस्थिति करणारे कर्माचा जर अभाव झाला, तर हें सर्व विश्व नष्ट होईल, आणि सर्वत्र वर्णसंकर आणि जातिसंकर होईल.

**शिष्य**—झाला तर झाला!

**गुरु**—असें ह्मणून कसें चालेल? देवता रुष्ट होऊन अन्न मिळणार नाहीं, पुढें वर्णसंकर होईल! बाबा! श्रेष्ठ कर्म सोडल्यामुळें ब्राह्मणाचे सर्व शूद्र झाले, जातिसंकर झाला, मनुष्याचे पशु होऊन तेही वृक्षादिकांची स्थिति पावले, वृक्षादिकांनींही स्थावराचें, अचेतनाचें, स्वरूप धारण केलें; सारांश, सर्वत्र जर हें विश्व जड, प्रकृतिमय होऊन गेलं तर सर्व पदार्थमात्रांवर अनु-

ग्रह करून त्यास चैतन्यस्वरूपी, आत्मस्वरूपी करणारा जो मी, त्यानेंच सर्वांस अज्ञानस्वरूपी जडावस्थेंत नेलें असें होईल.

**शिष्य**—हा अनर्थ तर खराच, पण त्यांत ईश्वराचें काय नुकसान आहे ?

**गुरु**—नुकसान ? सर्व दयाघन परमेश्वराला, सर्वांचा उद्धार करणाऱ्या परमेश्वराला, ही जड स्थिति उत्पन्न करणें योग्य होईल असें तुला वाटतें ? कधीं वाटणार नाहीं. सारांश, कोणताही स्वार्थ नसतां दुसऱ्या जीवाची विषय-तृष्णा नष्ट करून त्यांस स्वस्वरूपाकडे नेणें हें प्रत्येक श्रेष्ठ पुरुषाचें कर्तव्यच आहे.

**मधु०**—२१ पासून २४ पर्यंतच्या श्लोकाची व्यवस्था आणखी एका प्रकारें लावितात ती अशी : 'लोकसंग्रहार्थ कर्म करावें येवढेंच नाहीं, तर जसा लोककल्याणकारी ईश्वर आपलें वर्तन ठेवितो, तसेंच इतरांनींही ठेविलें पाहिजे.' असें सांगण्यासाठीं या श्लोकांची योजना आहे. शंकरानंद, पर्वते, द्विवेदी आचार्यानुसारी आहेत. प्रपाकार ह्मणतात: मार्गभ्रष्ट झालेल्या दीन प्रवाशांस व्याघ्रचोरादिकांनीं उपद्रव देऊं नये म्हणून जसा मार्गदर्शक असावा लागतो, तद्वतच ज्ञान्याचें कर्म होय. कर्म न करितांही दुष्कर्म कसें उत्पन्न होतें याचें हें उत्तम उदाहरण आहे:—

**रामा०**—'ईश्वर कर्म करितो' यावरून ज्ञान्यानेंही कर्म केलें पाहिजे असें ठरलें. 'लोकसंग्रहासाठीं मात्र ज्ञान्यानें स्वहितशून्य वृत्ति ठेवून कर्म करावें' असें आपण आतांच ठरविलें आहे. स्वतःस मोक्ष मिळविण्यासाठीं हें कर्म नाहीं; इतरांस मोक्ष देण्यासाठीं आहे.

द्वैतवादी सरळच अर्थ करितात.

ज्ञाने०—आम्ही पूर्ण काम होउनी । जरी आत्मस्थिति राहुनी (आत्मस्थिति राहूं नि असा पाठ असेल काय ?) । तरी प्रजा हे कैसेनि । निस्तरेल ? (पार पडेल.!) ॥

**पांडे०**—भलत्यानें भलत्याचें कर्म करणें यास संकर ह्मणतात.

**रंगनाथ** व **गीताव्याख्यानकार** यांसही, अलिप्तपणें लोकसंग्रहासाठीं मात्र ज्ञान्यानें कर्म करावें, हाच अर्थ संमत आहे. ॥ २४ ॥

यदि पुनरहमिव त्वं कृतार्थबुद्धिरात्मविदन्यो वा तस्याप्यात्मनः कर्तव्याभावेऽपि परानुग्रह एव कर्तव्य इति—

**शिष्य**—भगवान कर्म कां करितात, याची मीमांसा झाली; पण अर्जुनानें अभिमानपूर्वक कर्म करावें, युद्ध करावें हें कसें ठरतें?

**गुरु**—ऐकः—भगवान म्हणतातः माझ्याप्रमाणेंच जरी तूं किंवा दुसरा कोणी कृतकृत्य झालेला असला, ब्रह्मज्ञ झालेला असला व **स्वतःसंबंधें** त्याचें कर्तव्य संपलें असलें, तथापि 'हें विश्व आहे' असें जोंपर्यंत अपूर्ण दृष्टीनें भान आहे—आणि तें जसें अज्ञाननाशापर्यंत असणारच.—तोंपर्यंत इतरांवर अनुग्रह करण्यासाठीं त्याला निरभिमान बुद्धीनें कर्म केलेंच पाहिजे कसें तें ऐकः—

**सक्तः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥**

**भारत** (श्रेष्ठ अशा भरतकुलामध्यें उत्पन्न झालेल्या अर्जुना!) **यथा** (ज्याप्रमाणें) **कर्मणि सक्ताः अविद्वांसः** (काम्यकर्मामध्येंच गुंग झालेले आणि ह्मणून अज्ञानी लोक) **कुर्वन्ति** (काम्यकर्में करितात) **तथा** (त्याप्रमाणें) **लोकसंग्रहं चिकीर्षुः** (लोकसंग्रह करूं इच्छिणाऱ्या) **विद्वान्** (आत्मज्ञान झालेल्या ब्रह्मज्ञानें) **असक्तः** (फलाकांक्षा न ठेवितां) **कुर्यात्** (कर्म करावें.) सारांश, अज्ञानानें फलासक्त झालेले सामान्य लोक काम्य कर्में करितात, त्याचप्रमाणें परंतु फलाविषयीं इच्छा न ठेवितां, विद्वान व लोककल्याणेच्छु पुरुषानें कर्म करावें.

सक्ता इति । सक्ताः कर्मण्यस्य कर्मणः फलं मम भविष्यतीति केचिदविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत, कुर्याद्विद्वानात्मवित्तथाऽसक्तः सन् । तद्वत्किमर्थं करोति तच्छृणु—चिकीर्षुः कर्तुमिच्छुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

**मीं** केलेल्या कर्माचें फल **मला** मिळालेंच पाहिजे असा अभिमान व अशी वासना धरून जे कर्म करितात, ते अज्ञानी होत. हे लोक कर्म करितात, तसेंच विद्वानानेंही कर्म करावें; मात्र मी कर्म करणारा व मला ह्या कर्माचें फल मिळेल वगैरे अभिमानाचा व वासनेचा त्याग करावा.

**शिष्य**—मग कर्म करा तरी कशाला ?

गुरु—फिरून **आपलेंच** ! कर्तृत्वाभिमान सोडून देऊन वासनाविरहित कर्म करावयाचें तें लोकसंग्रहासाठींच बरें ? स्वार्थबुद्धीचा सर्वस्वी त्याग व परोपकारप्रीत्यर्थ अलिप्तपणें कर्माचें आचरण हा मार्ग, हजारों वर्षांपासून स्वार्थबुद्धीनें कर्म करणाऱ्या सामान्य लोकांस, समजून द्यावा व इतरांसही आपल्या सारखें पूर्ण ज्ञान व्हावें एतदर्थ भगवंतांनीं ही मीमांसा चालविली आहे समजलास ?

**मधु०**—' भारत ' याचा अर्थ सर्व ज्ञानाला योग्य असा जो तूं, असा कारितात ! बाकी अर्थ एकच आहे. **द्विवेदी, शंकरानंद, मपाकार** व **पर्वते**ही असाच अर्थ कारितात.

वेदोक्त कर्माचा अभिमान बाळगणारे **भमिशर्मा** नामक एक टीकाकार आहेत, ते दुसऱ्या ओळींतील ' असक्त ' शब्दांतील ' अ ' कार काढून टाकून अर्थ करितात कीं ' विद्वानानेंही सक्त राहून, प्रीतिपूर्वक कर्म करावें; उदासीन वृत्तीनें कर्म करूं नये; कारण, उदासीनवृत्तीनें केलेलें कर्म इतर अज्ञान्यांसही औदासीन्य धारण करावयास लावितें. सारांश, पुनः अधर्मप्रचार होतो.' ही ओढताण कर्मठच करूं जाणत ! कारण, प्रयोजन नसतांना किंवा कर्मानुराग नसला तर कर्म होणेंच शक्य नाहीं, कर्मामध्यें आसक्त झाल्याविना कर्म होणेंच शक्य नाहीं असा प्राचीन व अर्वाचीन कर्मवादी लोकांचा सिद्धांत आहे. हा सिद्धांत मानसशास्त्रास व अनुभवास विरुद्ध आहे. पुष्कळ कर्मे अशीं आहेत कीं तीं अनासक्त होऊन केलीं तरच उत्कृष्ट वठतात; पण हा मानसशास्त्राचा विषय आहे व तो समग्र येथें देणें शक्य नाहीं. **उपनिषदें ब्रह्मसूत्रें, बेन, सिज्विक, स्पेन्सर** इत्यादि ग्रंथांतूनच हा समजून घेतला पाहिजे, गाणें ऐकणारा मनुष्य बहारीचें गाणें चाललें असतां ' मला येथें सुख झालें. तेथें सुख झालें ' अशी मानसिकमीमांसा आसक्तीनें करीत बसेल तर त्यास खरा आनंद होणार नाहीं. सारांश, अहंभाव टाकून दिल्याखेरीज खरें सुख नाहीं.

**रामा०**—' अज्ञानी लोक आत्मज्ञानासाठीं कर्मयोगाचें अभिमानपूर्वक अनुष्ठान करितात.' हा अर्थ गीताशास्त्रास संमत असणें दुर्घटच होय.

सामान्य मनुष्यें देहेंद्रियरूपी आत्म्याच्या उपयोगासाठीं मात्र अहंबुद्धीनें कर्म करितात, हें भगवंतांस दाखवावयाचें आहे.

**द्वैतवाद्यांचा** अर्थ सरळ असून ज्ञानी व अज्ञानी या उभयतांत कर्मा-विषयीं व कर्मफलविषयीं अभिमानशून्यता व अभिमान असणें हीं अनुक्रमें असतात, हा दोघांमध्यें विशेष आहे असें ह्मणतात तें नीटच आहे.

**मराठी टीकाकार** विशेष कांहीं सांगत नाहींत. **वामनपंडित** थोडें विप-थांत गेल्यासारखे दिसतात; पण त्याचा विचार पुढील श्लोकांत करूं. ॥२५॥

एवं लोकसंग्रहं चिकीर्षोर्न ममाऽऽत्मविदः कर्तव्यमस्त्यन्यस्य वा लोकसंग्रहं मुक्त्वा ततस्तस्याऽऽत्मविद इदमुपदिश्यते—

असो; याप्रमाणें लोकसंग्रहच करूं इच्छिणारा व सर्वदा आत्मज्ञानामध्यें रममाण असणारा जो मी या मला अगर दुसऱ्या ब्रह्मज्ञ पुरुषाला लोक-संग्रहाव्यतिरिक्त दुसरें कांहीं कर्तव्य नाहीं, हें सिद्ध झालें, आतां आत्मज्ञ पुरु-षानें वागावें कसें त्याचा विचार सांगतों:—

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ॥**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥२६॥**

**कर्मसङ्गिनां अज्ञानां** कर्मामध्यें सक्त होऊन मी कर्ता, मी भोक्ता इत्यादि अज्ञानास वश झालेल्या लोकांचा **बुद्धिभेदं** बुद्धिभेद; कर्तृत्व, भोक्तृत्व, बुद्धीचा भेद **न जनयेत्** उत्पन्न करूं नये —आणि—**युक्तः समा चरन्** ( श्रुति, स्मृति, आचार इत्यादिकांस संमत असेल तें कर्म निरभिमान, निरभिलाष, बुद्धीनें करून ) **सर्व कर्माणि** ( सर्व प्रकारचीं योग्य कर्मे ) **जोषयेत्** ( त्या अज्ञानी लोकांकडून करवावीं. )—सारांश, अज्ञानी लोकांचें अज्ञान कायम आहे तोंपर्यंत त्यांच्या बुद्धीला भ्रंश होऊन कर्मावरील त्यांची श्रद्धा उडेल असा त्यांस उपदेश करूं नये; तर आपण स्वतः शिष्टविहित कर्माचें आचरण निरभिमानपणानें करून आपल्या अनुयायांकडून हीं सत्कर्मे करवावीं.—

नेति । बुद्धेर्भेदो बुद्धिभेदो मयेदं कर्तव्यं भोक्तव्यं चास्य कर्मणः

फलमिति निश्चितरूपाया बुद्धेर्भेदनं चालनं बुद्धिभेदस्तं न जनयेन्नोत्पादयेदज्ञानामविवेकिनां कर्मसाङ्गिनां कर्मण्यासक्तानामासङ्गवताम् । किं तु कुर्याज्जोषयेत्कारयेत्सर्वकर्माणि विद्वान्स्वयं तदेवाविदुषां कर्म युक्तोऽभियुक्तः समाचरन् ॥२६॥

'मला हें कर्म करावयाचें आहे,' 'मला या कर्माचें फल भोगावयाचें आहे' याप्रमाणें आत्मा कर्ता आहे, भोक्ता आहे, वगैरे निर्विकार आत्म्यासंबंधानें ज्यांची बुद्धि निश्चित झाली आहे, ते लोक अज्ञानी होत, तेच लोक अविवेकी होत, कारण सारासार विचार न करितां त्यांनीं आत्म्यावर कर्तृत्वाचा, भोक्तृत्वाचा, व 'हें माझें' 'हा मी' वगैरे अनेक मिथ्यारोप आत्म्यावर नित्यानित्यविवेकशून्यबुद्धीनें केले आहेत. अर्थात कर्म करणें हेंच आपलें मुख्य व एकच कर्तव्य होय व फलाकांक्षा करणें व फल मिळविणें हाच मोक्ष होय असा त्यांच्या बुद्धीनें ग्रह घेतलेला असतो. असो; तेव्हां या प्रकारें ज्याची बुद्धि निश्चित झाली आहे, त्यांच्या बुद्धीचा भंग, त्यांचें अज्ञान (कर्तृत्व भोक्तृत्व बुद्धि), कायम आहे, तोंपर्यंत करूं नयें.

**शिष्य**—महाराज ! ज्ञानी पुरुष कर्म करावयाचा नाहींच. तो तें करीनासा झाला ह्मणजे त्याचें उदाहरण पाहून त्याचे अनुयायी कर्म सोडून देणारच. सारांश, याप्रमाणें कर्मावर अश्रद्धा उत्पन्न झाली ह्मणजे बुद्धिभेद व्हावयाचाच; नव्हे काय?

**गुरु**—'आतुरसंन्यासी' म्हणतात तें यालाच ! आपणास ज्ञान झाल्याबरोबर इतरांसही ज्ञान झालें, असें समजून जे लोक एकदम कर्मत्याग करितात व याचा परिणाम आपल्या पुत्रपौत्रादिकांवर, स्नेह्यांवर, सारांश, आपल्या अनुयायी वर्गावर काय परिणाम होईल याचा जे लोक विचार करीत नाहींत, त्यांची निंदा भगवंतांनीं परोक्ष रीतीनें करून लोकनायकांनीं कसें वागावें याचें दिग्दर्शन ते करितात तें ऐकः आपलें अज्ञानी अनुयायांचें अज्ञान कायम आहे तोंपर्यंत अज्ञानी लोक जें विहित कर्म फलाकांक्षेनें करितात तेंच कर्म आपण निरभिलाषरीतीनें करून आपल्या स्नेह्यांकरवीं आनंदानें तें कर्म आत्मनिष्ठ पुरुषानें करवावें. अर्थातच अज्ञानी लोकांची आपल्यावर येणेंकरून श्रद्धा बसेल; नंतर त्यास नित्यानित्यविवेक शिकवून त्यांस

मोक्षपंथास क्रमाक्रमानें व त्यांची शक्ति पाहून लावावें. अज्ञाननिवृत्ति झाली नाहीं तोंच ब्रह्मोपदेश केला तर कर्मावर अश्रद्धा उत्पन्न होईल व वासना-नाश न झाल्यामुळें ज्ञानही होणार नाहीं आणि 'इतो भ्रष्ट, ततो भ्रष्ट' अशी स्थिति होईल !

स्वतंत्र एकवाक्यता आहे. **शंकरानंद** मात्र '**कर्मसङ्गिनां**' (कर्मासक्त-लोकांचा) संबंध बुद्धिभेदाकडे न घेतां '**सर्वकर्माणि**' इकडे घेऊन 'कर्मा-धिकाऱ्यांचीं सर्व कर्में विद्वानानें करावीं' असा एक अर्थ सुचवितात. आचा-र्यांप्रमाणें त्यांनीं सरळ अर्थ केला आहेच.

**रामा०**—पूर्वजन्मार्जित अज्ञानाच्या योगानें ज्ञानप्राप्तीचा मार्ग ज्यांस समजणार नाही, त्यांचा बुद्धिभेद करूं नये. ह्मणजे कर्माशिवाय दुसरा कांहीं मार्ग आत्मदर्शनास उपयोगी आहे, असा त्याचा ग्रह करूं नये. पण यासाठीं हे आचार्य उपाय सांगतात तो मात्र ज्ञानसंमत होणार नाहीं. ते म्हणतात, 'ज्ञान्यानेंही कर्मयोगच आत्मदर्शनाचें साधन आहे अशी **बुद्धि-पूर्वक श्रद्धा** धारण करून ज्ञान्यानें कर्मयोगाचेंच आचरण करावें.' **ज्ञाने-श्वर, रंगनाथ, गीताव्याख्याकार,** व **वामन पंडित** म्हणतात: श्रद्धा नसेल तरी कर्मावर आपली श्रद्धा आहे, असें लोकांस **भासवून** इष्टकार्य म्हणजे लोकसंग्रह करावा ! सारांश, **रामानुजां**चा मार्ग ज्ञान्यानें अज्ञानी व्हावें असा आहे, आणि पंडितांचा मार्ग ज्ञान्यानें लोकांस फसवावें असा आहे ! यांत **पंडितां**च्या ह्मणण्याला जरी भारतांत व आधुनिक **सुखवादी** लोकांच्या ग्रंथांतून आधार सांपडतील तरी सात्त्विक दृष्टीनें हा मार्ग निंद्य आणि गर्हणीय होय; तसेंच **रामानुजा**प्रमाणें ज्याला आत्मसाक्षात्काराचें ज्ञान झालें याची कर्मावर श्रद्धा बसेल अशी अपेक्षा करणें केवळ दुर्घटच होय ! भग-वंतांचा मार्ग न्यायास व ज्ञान्यास अनुसरूनच आहे; तो असा कीं, ज्ञानी लोकांनीं **अलिप्तपणानें लोकसंग्रह करण्यासाठीं मात्र**—स्वतःच्या हिता-साठीं यत्किंचितही नव्हे—कर्म करावें. अर्थात लोकसंग्रहासाठीं हें कर्म आहे असें अज्ञानी लोकांच्या दृष्टीस पडल्यावर कांहीं वेळानें तरी 'विषयोपभोग घेऊन देहेंद्रियरूपी आत्म्याचें हित' करावयाची त्यांची निष्ठा कमी होत जाऊन ते लोक निवृत्तिमार्गाकडे वळतील यांत शंका नाहीं. 'लोकहित

करितों ' असें ह्मणणाऱ्या लोकनायकावर जर निःसीम श्रद्धा बसते, तर लोकांचें खरें हित साधणाऱ्या **आचार्य, रामदास** प्रभृति लोकनायकांवर केवढी जबरदस्त निष्ठा बसेल बरें !

द्वैत०—' युक्त ' याचा अर्थ ' परमेश्वरचरणीं चित्त ठेवून ' असा करितात.

सतराव्या व अठराव्या श्लोकांत आत्मज्ञानी पुरुषाला कर्म अगर उपासना करण्याचें कारण नाहीं असें सांगून एकोणिसाव्या श्लोकांत अर्जुनास, तो अज्ञानी होता ह्मणून, निष्काम कर्म करावयास सांगितलें व निष्काम कर्म कोणींही ह्मणजे ज्ञानी अगर अज्ञानी मनुष्यानें केलें असतां अनुक्रमें लोककल्याणकारक किंवा चित्तशुद्धिमूलक होतें; जनकादिक ज्ञानी पुरुषांनीं लोककल्याणासाठीं कर्म केलें तरी त्याच्या अद्वैतज्ञानाच्या जोरामुळें त्यांचें कर्म बद्धक झालें नाहीं, मी परमेश्वरही असेंच निष्कामकर्म लोकहितबुद्धीनेंच करितों, मला कर्म केलेंच पाहिजे, नाहीं केलें तर सर्व जगाची व्यवस्था मोडून अनवस्था प्राप्त होईल; कारण सामान्य मनुष्यें श्रेष्ठ व शिष्ट पुरुषाचें अनुकरण करीत असतात; अतएव लोकसंग्रहासाठीं ज्ञानी पुरुषानेंही कर्म करावें व तें अशा रीतीनें करावें कीं, तें कर्म आपणा स्वतःस बद्धक न होतां सामान्य लोकांची विहितकर्मावर श्रद्धा बसेल व शेवटीं त्यांचें चित्त शुद्ध करील; असा विषय विसाव्या श्लोकापासून तों २६ व्या श्लोकापर्यंत आणिला आहे.

ज्ञानी पुरुषांनीं कर्म करण्याचेंच टाकून दिलें तर सर्वत्र औदासीन्य माजून अव्यवस्था होईल अशी भीति स्थूलबुद्धीच्या द्वैतवादी व अद्वैतविद्वेषी लोकांस असते तिचा निरास करावा व ' आपण आतां मुक्त झाला, आतां आपल्यास कांहीं कर्तव्य राहिलें नाहीं ' असें ' स्वार्थापुरतें रामायण ' ऐकणाऱ्या व समाजाविषयीं उदासीन असणाऱ्या अर्धवट वेदांत्यांचीही येथें कानउघाडणी करावी या हेतूनें वरील श्लोकांचा अवतार आहे. आपण सुटलों ह्मणजे सर्व विश्व मुक्त झालें असें कांहीं वेदान्ती समजतात. असो, प्रकृतीशीं आत्म्याचा मायिक संबंध आहे, असें जोंपर्यंत वाटत आहे, तोंपर्यंत आपल्यास स्वतःकरितां, निदान लोकांकरितां तरी कर्म केलें पाहिजे. सारांश, जीवदृष्टीनें वर्तन चाललें आहे तोंपर्यंत स्वतःस व इतर जीवांस संसारांतून काढील असें कर्म आपण निर्लोभ मनानें केलें पाहिजे. स्वतःच्या अतिलोभामुळें, आलस्य अज्ञान किंवा अज्ञान किंवा औदासीन्य यांपैकीं एकाद्या राक्षसानें पछाडलें असल्यामुळें, जर ज्ञानी

म्हणवून घेणाऱ्या पुरुषानें कर्मच केलें नाहीं, उन्मत्त वृत्ति ठेविली, तर त्याचे सर्व अज्ञानी अनुयायी विहितकर्मांच्या अभावीं दुष्कर्म करितात, बुडतात आणि ज्ञानाचा टेंभा मिरविणाऱ्या पुरुषानें आपलें कर्तव्य आपल्यास कळत असूनही त्यानें तें केलें नाहीं म्हणून त्या ज्ञानोन्मत्त पुरुषालाही बुडवितात! अयोग्य मनुष्यास अयोग्य कर्म करावयास लावण्याचा हा परिणाम होय. ह्या असल्या विपथगामी, ज्ञानमत्त व शाब्दिकजाल उत्पन्न करणाऱ्या तर्कभांडांचा समाचार भगवंतांनीं परोक्षरीतीनें येथें घेतला आहे. स्वतःस पूर्ण करावयाचें त्याचप्रमाणें इतरांसही पूर्णत्व द्यावयाचें हीं ज्ञानी पुरुषांचीं कर्तव्यें आहेत.

**‘ आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तयांलागीं । ’**

ह्या तुकाराम महाराजांच्या अभंगवाणीला अनुरूपच ज्ञानी पुरुषाचें कर्तव्य असलें पाहिजे. हा विचार सुटला ह्मणूनच अद्वैतज्ञानरूपी अमृतकलशांत अद्वैती ह्मणून मिरविणाऱ्या ज्ञानभोंदूनीं आपल्या अर्धवट ज्ञानानें आलस्य व औदासिन्यरूपी विष कालविलें आहे. **श्रीकृष्ण, श्रीरामचंद्र, जनक, सनक-सनंदन, नारद, वसिष्ठ, वामदेव, व्यास, गौडपाद, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम** इत्यादि पूर्ण ज्ञानी महापुरुषांनीं कर्म केलें तें केवळ लोकोद्धारासाठीं केलें व लोकाची आपल्यावर पूर्ण श्रद्धा बसेल इतक्या निस्पृहतेनें केलें, हा सर्व ऐतिहासिक भाग विसरून जाऊन ‘ मी ब्रह्म झालों ’ ‘ आतां मला कांहीं कर्तव्य उरलें नाहीं ’ असें ह्मणणाऱ्या वेदांती शठांनीं वेदांतमार्गाचें जेवढें नुकसान केलें आहे, तेवढ्याचें वर्णन प्रत्यक्ष सहस्रवदन शेषाच्या अखंड जिव्हांनींही अनंतकालांत सुद्धां करवणार नाहीं. सत्कर्मावर श्रद्धा ठेवून अधिकारानुरूप वासना नष्ट करणारें कर्म प्राकृत मनुष्याच्या हातून करविण्याची अक्कल आमच्या आधुनिक वेदांत्यांतून नाहींशी झाली, ह्मणून परमार्थ साध्य करून देणारें संसाराचें जें एक उत्कृष्ट स्वरूप त्यास आम्ही आंचवलों आणि संसार केवळ दुःखमय आहे असें वाटविणाऱ्या निर्घृण-काळाच्या जबड्यांत जाऊन अडकलों आहों! असो; तेव्हां अमृत ह्मणून विषाचे पेले पाजणाऱ्या व्यक्तिघातक व समाजविघातक शत्रूंच्या दुष्ट मतांचा यथास्थित विचार घेऊन ज्ञानी पुरुषाला समाजाचा उद्धार करणें आहे, तो त्यानें कोणत्या मार्गानें करावा हें पंचवीस व सव्वीस श्लोकांत उत्तम रीतीनें सांगितलें आहे. स्वकर्तव्याची कोणत्याही तऱ्हेनें हानि करू न देतां प्रत्ये-

काची कर्तव्यसीमा वाढवून ज्याच्या त्याच्या अधिकारानुसार वासनेचा नाश करावयाचा हा लोकहिताचा व्यावहारिक, धार्मिक आणि तात्त्विक असा सोज्वल मार्ग आहे. युरोपियन लोकातही लोकहितांचें तत्त्व अवतीर्ण झालें आहे व त्यास धर्माचेंही पाठबळ आहे हें खरें; पण ब्रह्मज्ञानाची खरी ओळख त्यांस न झाल्यामुळें त्यांच्या सात्त्विकंमन्य व्यवहाराचें व धर्माचें पर्यवसान पुनः जीवास वासनारूपी संसारामध्यें ढकलिवणारें आहे आणि ह्मणूनच ह्यांतील साधुपुरुषांचें वर्तन रामदास, तुकाराम इत्यादिक साध्याभोळ्या संतांपेक्षांही कमी योग्यतेचें असें, आहे तात्त्विक दृष्टीनें ठरतें. सर्व चराचर विश्वास ज्ञानरूप आणि आनंदरूप, तात्पर्य एकरूप करून आपपरभेद नष्ट करावयाचा हें आमच्या तात्त्विक व ह्मणूनच अद्वैती सिद्धांतांचें पर्यवसान आहे व या अखंड कालाच्या ओघांत निराबाधपणानें चालणाऱ्या महासिद्धांतांस आधुनिक, अनुभवसिद्ध अशा विश्वगामी उत्क्रांतितत्त्वाचें उत्कृष्ट पाठबळ आहे. युरोपियन धार्मिक तत्त्वज्ञान अद्यापि भिन्नभावास वश आहे तें इतकें कीं, 'ही सर्व सृष्टि मानवी प्राण्याकरितां मात्र आहे, कारण त्यासच आत्मा आहे, इतर प्राण्यास नाहीं,' म्हणून स्वोन्नतिसाठीं मानवी प्राण्यानें इतर जीवांचा, श्रेष्ठ कोटींतील मनुष्यानें इतर माणसांचा संहार करण्यास प्रत्यवाय नाहीं ! असलीं एकदेशीय संकोचित तत्त्वें **मार्टिनो**-सारख्या महाचतुर लेखकांच्या ग्रंथांतून झळकतात ! असो; हा अन्य विषय आहे. तात्पर्य इतकेंच आहे कीं, लोकांचें जेणेंकरून पारमार्थिक कल्याण होईल व तें तें कल्याण प्रत्येकाच्या अधिकाराप्रमाणें समजावून देऊन श्रद्धेनें व एकनिष्ठेनें—मारूनमुटकून किंवा फसवून नव्हे—साध्य होईल असें होऊन वर्तण ार पुरुष खरोखर लोकनायक होय. त्यानेंच आपल्या व इतरांच्या जन्माचें सार्थक्य यथाशक्ति केलें; तोच वंद्य होय. तोच परमेश्वराचा अंश होय. असो, परमेश्वरा, आपआपला अभिमान सोडून व 'मी समजतों त्यापेक्षां आणखीही सत्यान्वेषणाचे व सात्त्विकवर्तनाचे मार्ग आहेत, सत्याचा मक्ता मींच घेतला नाहीं, असा निश्चय होऊन खरें सात्त्विक कर्म करण्याची प्रेरणा वरील भगवद्वाक्यांवरून तरी आमच्यामध्यें अवतीर्ण होईल काय ? ।। २६ ।।

अविद्वानज्ञः कथं कर्मसु सज्जत इत्याह—

**शिष्य**—महाराज ! अज्ञानी मनुष्य तरी कर्मामध्यें कसा लिप्त होतो ?

**गुरु**—पहा कसा होतो तें—

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ॥**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७ ॥**

**सर्वशः** (सर्वथा, सर्व प्रकारांनीं) **प्रकृतेः गुणैः** (प्रकृतीच्या, मूळ अविद्येच्या, सत्त्व, रज तमादि चंचल स्वभावी गुणांनीं ) **क्रियमाणानि** ( केलीं जाणारीं, होणारीं ) **कर्माणि** ( कर्मे जीं असतात त्यांचा ) **कर्ता** ( करणारा ) **अहं इति** (मी आहें असें ) **अहंकारविमूढात्मा** ( अहंकारानें मोहग्रस्त होऊन जीव-स्वरूप प्राप्त झालें आहे आत्म्यास ज्याच्या असा अज्ञानी पुरुष ) **मन्यते** ( मानितो. )—सारांश, प्रकृतीच्या अंगभूत असलेल्या गुणांनींच सर्वथा होत असलेलीं सर्व कार्यें ' मी करीत आहें ' असें अहंकारास वश होऊन गेलेल्या अज्ञानी पुरुषास वाटतें, अर्थातच तो कर्मासक्त होतो—

प्रकृतेरिति । प्रकृतः प्रकृतिः प्रधानं सत्त्वरजस्तमसां गुणानां साम्यावस्था तस्याः प्रकृतिर्गुणैर्विकारैः कार्यकरणरूपैः क्रियमाणानि कर्माणि लौकिकानि शास्त्रीयाणि च सर्वशः सर्वप्रकारैरहंकारविमूढात्मा कार्यकरणसंघातात्मप्रत्ययोऽहंकारस्तेन विविधं नानाविधं मूढ आत्माऽन्तःकरणं यस्य सोऽयं कार्यकरणधर्मा कार्यकरणाभिमान्यविद्यया कर्माण्यात्मनि मन्यमानस्तत्तत्कर्मणामहं कर्तेति मन्यते ॥ २७ ॥

**शिष्य**—गुरूजी ! प्रकृति म्हणजे काय ?

**गुरु**—वाहवा ! अद्यापपर्यंत तुला प्रकृति म्हणजे काय हें ठाऊक नाहीं ! अरे ! प्रकृति ह्मणजे कापिलसांख्याचें प्रधान, अथवा सत्त्व, रज, तम या गुणांची साम्यावस्था होय. समजलास ?

**शिष्य**—भगवन् ! कृपा करा, माझ्या अंतःकरणांत कांहींएक प्रकाश पडला नाहीं.

**गुरु**—बरें ऐक:--व्यवहारदृष्टीनें पाहूं लागलें ह्मणजे ही सृष्टि आपल्यास दिसतें, अशीच मूळपासून नाहीं. हा परिणाम आहे, ही उत्क्रांति आहे, असें सृष्टिशोधकांच्या--कपिलादि महामुनींच्या लक्षांत येऊन या परिणामाचा, या उत्क्रांतीचा उगम कोठें आहे असा जेव्हां त्यांनीं शोध केला, तेव्हां विचारदृष्टया त्यांच्या लक्षांत आलें कीं, पृथ्वी, जल वगैरे पंचमहाभूतें, तसेंच आपलीं पंच कर्म व

पंच ज्ञान अशीं दहा इंद्रियें, तसेंच पंचसूक्ष्मभूतें, आपली बुद्धि, आपला अहंकार, आपलें मन, हीं सर्व प्रकृतीच्या व्यक्त स्वरूपापासून उत्पन्न झालीं आहेत. सारांश, व्यक्त ह्मणजे नामरूपाप्रत आलेल्या एका तत्वापासून मानव-प्राण्यासुद्धां सर्व सृष्टि निर्माण झाली. हें व्यक्त तत्व मूळप्रकृतीपासून उत्पन्न झालें. ह्या मूळप्रकृतीलाच प्रधान, अव्यक्त, असें ह्मणतात. या अव्यक्ताचे अंगभूत सत्व, रज आणि तम असे तीन गुण आहेत. हे तिन्ही गुण सारखे असले म्हणजे, साम्यावस्थेंत असले ह्मणजे प्रधान शांत अथवा अव्यक्तस्वरूपी असतें; आणि गुणांमध्यें चलबिचल झाली म्हणजे प्रकृतीस व्यक्तत्व येऊन सृष्टीस आरंभ होतो. हें अव्यक्त व व्यक्त स्वरूप पाहणारा पुरुष किंवा आत्मा हें पंचविसावें तत्व होय. असो; तेव्हां व्यावहाहारिकदृष्टीनें व आत्मदृष्टीनें पाहिलें ह्मणजे सृष्टींत जी घडामोड होत आहे ती सर्व प्रकृतीच्या योगानें, प्रकृतीच्या गुणांनीं, इंद्रियादिकरवीं होत आहे; प्रकृति कारण व कर्म हें कार्य आहे, यांत आत्म्याचा बिलकूल संबंध नाहीं; कर्म लौकिक असो वा शास्त्रीय असो, तें सर्व प्रकृतिगुणांनीं होत आहे, तें अनात्मक आहे; असा खरा प्रकार ज्ञानी लोकांस समजतो; पण अज्ञानी लोकांस हें समजत नाहीं. त्यांस वाटतें कीं, हीं सर्व कृत्यें आपणच करणारे आहोंत व आपल्यासच फल मिळतें. अहंकाराच्या अभिमानानें, सारांश अविद्येमुळें, आत्माच कर्ता व भोक्ता आहे असें 'मी कर्ता, मी फल भोगणारा,' 'मला कर्म केलें पाहिजे, मला फल भोगिलें पाहिजे,'--असें ह्मणणारा पुरुष मिथ्या अभिमानाला वश झाला असल्यामुळें, सदैव ह्मणतो कीं, हीं सर्व कर्में आत्म्याचे द्वारा होत आहेत ! असें अज्ञान कां झालें म्हणशील तर त्याचें मुख्य कारण हें कीं 'माझाच आत्मा कर्माचें कारण आहे व कर्माचें फल भोगणारा आहे' या मिथ्या अहंकाररूपी ज्ञानाभासानें मनुष्याचा शुद्ध आत्मा अनेक प्रकारें मोहग्रस्त होतो. सारांश, अविद्येमुळें, अहंकाराच्या अभिमानामुळें अज्ञानी मनुष्य कर्मामध्यें लिप्त होतो. झालेंना आतां समाधान ? ही अज्ञानी मनुष्यांची स्थिति झाली.

**मधु०**—'ज्ञानी व अज्ञानी दोघेही कर्म करितात; पण त्यांत भेद आहे तो २७ व २८ श्लोकांत व्यक्त केला आहे.' आत्मस्वरूपाचें ज्ञान होण्यास असमर्थ आहे अंतःकरण ज्याचें तो विमूढात्मा असें **मधु०** व **शंकर०** ह्मणतात.

इंद्रियें प्रकृतीचे गुणच आहेत त्यांच्या ठायीं आत्मबुद्धि धरितो व करितो तोही विमूढच असें **प्रपाकार, शंकरानंद व पर्वते** ह्मणतात. **द्विवेदी** हेंच ह्मणतात. **रामानुज** ह्मणतातः अनात्मिकावर आत्म्याचा आरोप करणें हेंच मूर्खत्वाचें लक्षण होय.

**द्वैतवादी**—'प्रकृति' शब्दानें 'स्वतंत्र ईश्वर, ईश्वराधीन जीव, जडप्रकृति आणि देहेंद्रियें' असा अर्थ समजतात आणि कर्म होतें तें ईश्वर, परतंत्रजीव, जड वस्तु आणि इंद्रियें वगैरे या सर्वांच्या करवीं होतें, जीवाच्या एकट्याच्या हातून कांहीं होत नाहीं, असें असूनही 'मीच कर्ता' असा अभिमान ज्याला असतो तो मूर्ख होय असें ह्मणतात.

**ज्ञानेश्वरां**ची सरळ व्याख्या पहाः—'तैसीं शुभाशुभ कर्में । जियें निपजती प्रकृतिधर्में । तियें मूर्ख मतिभ्रमें । मी कर्ता ह्मणे ! ॥

**गीताव्या०**—नसतें घेइजे आपुल्या माथां । हें काय शाहाणपण पार्था ! आणि तेणेंचि ( आपलें नसतांही आपलें म्हणून उसनें घेतलेल्या कर्मानें ) मानिजे श्लाघ्यता । तरी काय अज्ञाना पार असे ? ॥ ही अज्ञानी मनुष्याची 'विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करीत बसण्याची' पद्धति होय ! ॥२७॥

यः पुनर्विद्वान्—

परंतु जो विद्वान आहे तो—

## तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः
## गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

**महाबाहो** ( आजानुबाहु अर्जुना ! ) **तु** ( परंतु ) **गुणकर्मविभागयोः** ( गुणापासून आत्मा निराळा आहे व कर्मापासूनही निराळा आहे असें गुणकर्मविभागाचें ) **तत्त्ववीत्** ( रहस्य जाणणारा, गुणकर्मव्यतिरिक्त आत्मा आहे असें तत्त्व जाणणारा विद्वान ) **न सज्जते** ( गुणांमध्यें किंवा कर्मामध्यें लिप्त होत नाहीं. )—काय समजून ?—**गुणाः** ( नेत्र, कर्ण इत्यादि व हस्त, पाद इत्यादि इंद्रियें ) **गुणेषु** ( रस, रूप वगैरे व सुख, दुःख वगैरे विषयांमध्यें ) **वर्तन्ते** ( वर्तत असतात, कर्म करितात ) **इति मत्वा** ( असें समजून. )—सारांश, गुणकर्माहून आत्मा भिन्न आहे व प्रकृतिजन्य इंद्रियें प्रकृतिजन्य विष-

यांमध्यें गुंतून पडतात, आत्म्याचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं असें खरें तत्त्व समजून कर्मामध्यें विद्वान् पुरुष लिप्त होत नाहीं:—

तत्त्वविदिति । तत्त्ववित्तु महाबाहो कस्य तत्त्ववित् गुणकर्मविभाग-योर्गुणविभागस्य कर्मविभागस्य च तत्त्वविदित्यर्थः । गुणाः करणा-त्मका गुणेषु विषयात्मकेषु वर्तन्ते नाऽऽत्मेति मत्वा न सज्जते सक्तिं न करोति ॥ २८ ॥

आतां विद्वान जो आहे तो काय करितो—

**शिष्य**—महाराज ! विद्वान कोण बरें ?

**गुरु**—अरे ! गुणांपासून आत्मा निराळा आहे व कर्मापासून आत्मा निराळा आहे असें खरें रहस्य जाणणारा तो खरा विद्वान किंवा तत्त्ववेत्ता होय. असो; हा विद्वान खरें तत्त्व समजतो कीं, कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें ह्मणजे विषयग्रहण करण्याचीं साधनें, गुणांमध्यें ह्मणजे विषयांमध्यें गुंतून पडतात; ह्याप्रमाणें त्यांच्या हातून, इंद्रियांकरवीं, कर्म होतें, यांत आत्म्याचा कांहींएक संबंध नाहीं. अशा प्रकारें आत्मज्ञान झालेला पुरुष अर्थातच कर्मामध्यें अहंकारा-भिमानानें गुंतून पडत नाहीं, इंद्रियांचें कर्म जे विषय ते उत्पन्न करून विषयो-पभोग घेणें हें इंद्रियें कारितात, आत्मारामाचा तेथें संबंध नाहीं असें समज-ल्यावर अर्थातच अभिमान नष्ट होतो.

**मधु०**--' गुणकर्मविभागयोः ' =गुण ह्मणजे देह, इंद्रियें व अंतःकरण; कर्म ह्मणजे या देहेंद्रियांचे व्यापार; सारांश, अनात्मक असे देहेंद्रियादिक व त्यांचे व्यापार तें गुणकर्म होय. विभाग ह्मणजे सर्व जडाहून भिन्न असणारा आत्मा; तेव्हां गुणकर्म आणि आत्मा यांचें तत्व जाणणारा तो याथात्म्यज्ञानी होय. असा अर्थ करून **आचार्यां**च्या अर्थांत समंजसत्व नाहीं असें म्हणतात. तात्पर्य एकच आहे, पण समास सोडविण्याचे मार्ग भिन्न आहेत. **मधुसूदनी**-कारांच्या मतें आचार्यकृत समासविग्रहानें विभाग शब्द निरर्थक होतो. धनपति ह्मणतात, **मधुसूदनी**कारांचा प्रयोग व्याकरणदृष्ट्या शुद्ध नाहीं ! असो; व्याकरणाच्या या खटपटींत आपण कशाला पडावें ! ' अर्थेरि तात्पर्थं ' या न्यायानें आपण अर्थाकडे लक्ष द्यावें. विभाग ह्मणजे आत्मा हा अर्थ अप्रसिद्ध होय. पर्वते व द्विवेदी मधुसूदनीकारांचे अनुयायी आहेत. **शंकारानंद** व **प्रपाकार** हे आचार्यानुवादी आहेत. दश्यामध्यें गुणाचा भाग किती, कर्माचा

भाग किती हें जो जाणतो तोही तत्ववेत्ता होय, असा एका पंडितानें अर्थ ढिला आहे !

द्वैत--' गुणविभाग ह्मणजे ईश्वर, जड प्रकृति, जीव इत्यादिकांचे गुण व परस्परांतील भेद ' आणि ' कर्मविभाग ह्मणजे ईश्वराचें स्वतंत्र कर्म, प्रकृतीचे ' विकार आणि जीवाचें पराधीन कर्म व त्या परस्परांतील भेद ' होत. हें जाणणारा तो तत्ववेत्ता होय. द्वैत्यांचा मुख्य पुरुषार्थ जो ईश्वर त्यासही त्याचे भक्त कर्म करावयास लावितात हें आश्चर्य होय !

**ज्ञाने० व पांडि०**--ज्ञानी पुरुष केवळ साक्षिरूपानें असतो. **'गाई चरती तृण । दोन्ही नव्हे द्रष्टा आपण ।** ' हा पंडितांचा दृष्टांत किती समर्पक आहे ! रंगनाथांचेही दीप व आकाशाचे दृष्टांत चांगले आहेत.

**गीता**व्याख्याकारांची कोटी पहा:-जरी स्वरूपीं ( आत्म्यामध्यें ) कर्तृत्व असतें । तरी नेत्रेवीणही पहाणें घडतें ॥ हस्तेवीण अरतें परतें । होतें ( झालें असतें ) देणें घेणें ! ॥........ह्मणोनि निर्धार । आत्मा अकर्ता स्वयें ॥ २८ ॥

ये पुनः—

पुनः जे—

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ॥**
**तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥**

**प्रकृतेः** (प्रकृतीच्या, अविद्येच्या) **गूणसंमूढाः** ( गुणांनीं, इंद्रियांनीं किंवा विषयांनीं पूर्ण मोहित झालेले अज्ञ लोक ) **गुणकर्मसु** ( इंद्रियांचीं विषयोपभोगरूपी कर्में, त्यांत ) **सज्जन्ते** ( मग्न होऊन जातात. ) **अकृत्स्नविदः** पूर्ण ज्ञान न झालेल्या ) **मन्दान्** (--व--मंदबुद्धीच्या ) **तान्** ( त्या लोकांस ) **कृत्स्नवित्** ( पूर्ण दृष्टीच्या आत्मज्ञानें ) **न विचालयेत्** ( चाळवूं नये, त्यांचा बुद्धिभेद करूं नये )—सारांश, विषयाला लुब्ध झालेले लोक इंद्रियांच्या कर्मांत निमग्न होतात; अशा मंद बुद्धीच्या अज्ञानी लोकांची कर्मश्रद्धा ज्ञानी पुरुषानें नाहींशी करूं नये.—

प्रकृतेरिति । प्रकृतेर्गुणैः सम्यङ्मूढाः संमोहिताः सन्तः सज्जन्ते गुणानां कर्मसु गुणकर्मसु वयं कर्म कुर्मः फलायेति, तान्कर्मसङ्गि-

नोऽकृत्स्नविदः कर्मफलमात्रदर्शिनो मन्दान्मन्दप्रज्ञान्कृत्स्नविदात्मवित्स्वयं न विचालयेद्बुद्धिभेदकरणमेव चालनं तन्न कुर्यादित्यर्थः ॥ २९॥

प्रकृतीच्या मोहक गुणांनीं म्हणजे मनोहर विषयांनीं ज्यांची प्रकृतिमय बुद्धि भ्रष्ट झाली असे लोक प्रकृतीचेच गुण जीं इंद्रियें त्या इंद्रियांच्या कर्मामध्यें गुंग होऊन जातात, ह्मणजे इंद्रियांकरवीं होणारीं कर्मे आत्माच करितो, असा खोटा अभिमान धरून '**आम्ही** आत्मस्वरूपानें **कर्म** करितों व तें कर्म **फल मिळावें** एतदर्थ करितों'! असें बडबडावयास लागून कर्मासक्त होतात. असल्या, कर्म व कर्मफल येथपर्यंतच ज्यांची दृष्टि चालते, त्याच्यापलीकडे जात नाहीं अशा अर्धवट विचारी, अनात्मज्ञ अथवा मंदबुद्धीच्या लोकांस गूढ व गहन विचार सांगून पूर्ण दृष्टीच्या ज्ञानी मनुष्यानें त्यांच्या कर्मश्रद्धेंत चळवळ करूं नये. त्यांच्या बुद्धींत भेद उत्पन्न करणें, त्यांची निश्चितबुद्धि अनिश्चित करणें, यालाच चळवळ ह्मणावयाचें. असो; तेंव्हां अभिमान आहे तोंपर्यंत अज्ञान्यास ब्रह्मोपदेश केला तर इष्ट फल न मिळतां अनर्थ मात्र उत्पन्न होतील असें सांगण्याचा भाव आहे.—

**मधु०**—ज्याला आत्मज्ञान झालें आहे तो पूर्णज्ञानी व बाकीचे अपूर्णज्ञानी असाही भाव येथें सुचविला आहे. द्वैतांत ज्ञानसमाप्ति होत नाहीं. घट समजला तर पट समजत नाहीं, दोन्ही समजलें तरी रज्जु समजत नाहीं. असें द्वैतभान असल्यानें ज्ञान अपूर्णच राहतें. **पर्वते** व **द्विवेदी**:—'इंद्रियांस आत्मा ह्मणणारे किंवा आत्म्यासच इंद्रियें आहेत असें ह्मणणारे ते अज्ञानी होत; मोह यांनाच होतो.' येथें ज्ञान्यानें लोकसंग्रहासाठीं उद्योग करावा तो कसा ह्या विषयाची परिसमाप्ति झाली. **शंकरानंद** व **श्रीधर**:---'कामना ठेवून कर्म करूं नये, मिळणारें फळ असत् ह्मणजे अनित्य आहे,' वगैरे उपदेश कर्मासक्तांस करूं नये, असें म्हणतात. **प्रपाकार**:---'अकृत्स्नविद'= एक एक इंद्रियाची उपासना करणारे, एकदेशी आणि ह्मणून अज्ञानी. ह्या अर्थसमर्थनार्थ शातपथी श्रुति देतात.

**रामानुजाचार्य** हे या श्लोकांतूनही असा निष्कर्ष काढितात कीं, भगवंतास ज्ञानयोगापेक्षां कर्मयोगच श्रेष्ठ आहे असें प्रकट करावयाचें आहे! अर्थ सरळच आहे.

**द्वैतवादी** गुण शब्दाचे व प्रकृति शब्दाचे अनेक अर्थ घेतात. '**शब्दा**-

**द्या इन्द्रियाद्याश्च सत्त्वाद्याश्च शुभानि च। अप्रधानानि च गुणा निगद्यन्ते निरुक्तगैः॥'** गुण= (१) शब्दादि विषय, (२) ज्ञानेंद्रियें,(३) चांगलें तें,(४)जें प्रधान-मुख्य नव्हे तें; असे अनेक अर्थ आहेत. प्रकृति =ईश्वर, जड वस्तु, देहेंद्रियें असे भिन्न अर्थ मागें दिलेच आहेत. असो; 'तेव्हां स्वतंत्र ईश्वर इच्छामात्रेंकरून प्रवर्तविणारा, सर्वस्वीं अचेतन प्रकृति आणि सत्वरजादि गुण यांच्या करवीं सर्व कर्में होत असतां 'मीच कर्माचा स्वतंत्र अधिकारी' असें जो म्हणतो तो अज्ञानी होय. प्रवर्तक ईश्वर आहे, इंद्रियें विषयांकडे जाणारीं आहेत, जीवांचें कर्म विष्णुभाक्ति हेंच आहे, असें जाणून निराभिमानपूर्वक, निर्लोभमनानें, जो वागतो तो ज्ञानी होय.' बाकीचा अर्थ सरळ आहे.

**मराठी**टीकाकार विशेष सांगत नाहींत. प्रकृतीचे सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण पुरुषामध्यें अनुक्रमें मन, इंद्रियें आणि देह येथें असतात, व या तिन्ही ठिकाणीं अज्ञान्यांची अहंबुद्धि असते असें **पंडित** म्हणतात. **चतुरंजी**-येथपर्यंत इतकें ठरलें कीं, ब्रह्मज्ञान्याशिवाय इतर सर्वांनीं कर्म केलेंच पाहिजे, कारण त्यांची वासना नष्ट झालेली नसते. विद्वानाची वासना नष्ट झाली असते ह्मणून त्यास कर्म नको; लोकसंग्रहासाठीं मात्र त्यांनीं कर्म केल्यास हरकत नाहीं. ॥२९॥

कथं पुनः कर्मण्याधिकृतेनाज्ञेन मुमुक्षुणा कर्म कर्तव्यमित्युच्यते—

**शिष्य**—गुरुमहाराज! तर मग जो अज्ञानी आहे, ह्मणजे कर्मच करण्याचा ज्याला अधिकार आहे, त्याला मोक्ष मिळण्याची आशाच खुंटली ह्मणावयाची!

गुरु-कांरे बाबा?

**शिष्य**—कारण कर्मानें मोक्ष मिळत नाहीं असें आपण सिद्ध केलें आहे! व आतां अज्ञाला कर्माशिवाय दुसरा अधिकारच नाहीं असें आपण सांगतां, तेव्हां कर्म करणाऱ्या अज्ञाला नैष्कर्म्यानें प्राप्त होणारा मोक्ष साध्य होणेंच नाहीं असें नाहीं कां ठरलें?

गुरु-अरे! तूं वराच तर्कटी आहेस! असो; सर्वदयाघन प्रभूनें या अज्ञास सज्ञ करण्यासाठींच मार्ग ठेविला आहे तो सांगतों ऐकः—

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ॥**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥**

**अध्यात्मचेतसा** ( परमात्मा आणि आपला जीव यांमध्यें परस्पर कोणता संबंध आहे याच विचारामध्यें गुंताविलेल्या मनाच्या साहाय्यानें ) **सर्वाणि कर्माणि** ( यच्चावत् सर्व कर्में ) **मयि** ( माझ्या ठायीं, परमेश्वराचे ठायीं ) **संन्यस्य** ( ठेवून) –व–**निराशीः** ( आशाशून्य, वासनाशून्य )–व–**निर्ममः** ( ममत्वशून्य )**भूत्वा** ( होत्साता ) **विगतज्वरः** ( निश्चित झालेला जो तूं )—त्या—त्वां **युध्यस्व** ( युद्ध करावें )—सारांश, परमेश्वरचरणीं लक्ष्य ठेवून परमेश्वराजवळ आपलीं सर्व कर्में ठेव; आणि वासना व ममत्व यांचा त्याग करून निश्चिंतपणानें युद्ध करण्याची, श्रुतिस्मृतिविहित कर्म करण्याची, तयारी कर; तात्पर्य युद्धास सज्ज हो.—

> मयीति । मयि वासुदेवे परमेश्वरे सर्वज्ञे सर्वात्मनि सर्वाणि कर्माणि संन्यस्य निक्षिप्याध्यात्मचेतसा विवेकबुद्ध्याऽहं कर्तेश्वराय भृत्यवत्करोमीत्यनया बुद्ध्या किंच निराशीस्त्यक्ताशीर्निर्ममो ममभावश्च निर्गतो यस्य तव स त्वं निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरो विगतसंतापो विगतशोकः सन्नित्यर्थः ॥ ३० ॥

सर्वांवर सत्ता चालविणारा, सर्वज्ञानी आणि सर्वांच्या अंतर्यामीं राहून सर्वांस आत्मत्व देणारा व सर्वांचें नियमन करणारा जो मी वासुदेव नामक परमेश्वर, त्या माझे ठायीं आपलें प्रत्येक कर्म अर्पण करीत जा, मला अर्पण करीत जा—मग तें कर्म व्यावहारिक असो वा धार्मिक असो–ह्मणजे–

**शिष्य**—पण कृत्यें परमेश्वराला कशीं अर्पण करावयाचीं ?

**गुरु**—तेंच सांगतों ऐकः—अर्जुनास हा उपदेश केला आहे, ह्मणजे अर्जुनास प्रतिनिधि करून प्रत्येक अज्ञानी कर्माधिकाऱ्यास हा उपदेश केला आहे, असें समजावें. असो; भगवान म्हणतातः तूं सेवक आहेस आणि मी तुझा स्वामी आहें, अशा विवेकबुद्धीनें अथवा वेदांतश्रवणानें जसा इमानी सेवक आपलें जीवितसर्वस्व व मनःसर्वस्व यजमानास अर्पण करून त्याच्यासाठीं मात्र कर्म करीत असतो, तसें परमेश्वराधीन सर्व आहे असें समजून सर्व कर्म मला अर्पण करीत जा. ह्याचप्रमाणें स्वतःविषयीं जय, सुख इत्यादिविष-

यक वासना असते व 'हें माझें, तें माझें' अशी ममता असते त्या दोहींचाही निर्वंश करून युद्ध करावयास लाग. ह्या युद्धकर्मानें मला शोक होईल, संताप होईल अशी यत्किंचितही भीति मनांत बाळगूं नको. सारांश, 'परमेश्वरच सर्व कर्ता, करविता, भूत-भविष्य-वर्तमान जाणणारा आणि जीवमात्राचा उद्धार करणारा आहे' तें तत्व लक्ष्यांत बाळगून श्रुतिस्मृतिविहित कर्म मी करावयास सांगतों ह्मणून तें करण्यास आरंभ कर. अज्ञानी कर्माधिकाऱ्याला निवृत्तिपंथाकडे नेण्याचा हाच पहिला धडा आहे.

**श्रीधर, प्रपा॰** व **मधु॰** आचार्यानुसारीच आहेत. 'केवळ निर्ममत्व व विगतज्वरत्व हें अर्जुनास युद्धसंबंधानें सांगितलें आहे, सर्वांस एवढें लागू नाहीं, बाकी सर्व आहे' असें ह्मणतात. **पर्वते** व **द्विवेदी** आचार्यानुसारी आहेत. **द्विवेदींनीं** 'परब्रह्मच सर्वत्र एकरसत्वानें भरलेलें आहे, कर्ताकरविताही आभासमात्रेंकरून परमेश्वररूपानें तेंच आहे तेव्हां सर्व कर्म त्याला, परमेश्वराला समर्पण कर,' असें **शंकरानंद**मताला अनुसरून जास्त सांगितलें आहे. येणेंकरून चित्तपरिपाक, ज्ञान आणि मोक्षसिद्धि होईल असें **शंकरानंद** ह्मणतात.

**भीम॰**—'मित्बुद्धीनें मला सर्व कर्में अर्पण कर.'

**रामा॰**—'**अन्तः प्रविष्टः शास्ता जनानां सर्वात्मा**' (अंतर्यामीं राहून सर्व जनांचें नियमन करणारा सर्वात्मा) '**अन्तः प्रविष्टं कर्तारमेतं य आत्मनि तिष्ठन्नात्मनोन्तरोयमात्मानं वेद**' (सर्वांच्या अंतर्यामीं असून सर्वकर्ता व सर्वकरविता, आत्म्याच्या आंत वास करणारा जो परमात्मा त्यास ज्यानें जाणिलें) अशा अनेक श्रुति परमेश्वरच सर्व आहे असें दाखविण्यासाठीं देतात. आत्मा हा कर्ता, आत्मा हेंच कारण आणि आत्म्यासाठीं हें सर्व आराधनादिक कर्म करावयाचें असें आत्मबुद्धीनें कर्म केलें ह्मणजे अर्थातच ममत्वशून्यता, निराभिलाष, शोकशून्यत्व प्राप्त होऊन आत्मज्ञानानें मोक्ष मिळतो. आत्म्यामध्यें जें चित्त तें अध्यात्मचेतस होय.

**द्वैत॰**—'भ्रांतीनें जीवावर आरोपिलेलीं सर्व कर्में परमेश्वरच कारितो असें समजून भक्तिपूर्वक मला माझें कर्तृत्व अर्पण कर. कोणतेंही विहित कर्म ईश्वरी प्रेरणेनें केलें तरी ती हरीची पूजा आहे असें जाण.' 'अध्यात्म' = सर्वांहून अतिश्रेष्ठ जो आत्मा = परमात्मा.

**पंडितांनीं** या श्लोकांत केवळ निर्गुणोपासकांवर, केवळ अद्वैतसिद्धांत्यांवर बराच मोठा कोरडा ओढिला आहे. निर्गुणाची उपासना सगुण उपासनेशिवाय साध्य नाहीं असें सुज्ञ वेदांती ह्मणतात. सगुण उपासनेनें चित्त स्थिर झालें म्हणजे निर्गुण उपासना आपोआपच उत्पन्न होते. सगुण उपासना हें शुद्धज्ञानाचें साधन आहे, हा सिद्धांत विसरून केवळ शाब्दिकज्ञानाच्या जोरावरच वितंडवाद करून जे उपासनेचा अगर कर्माचा उपहास करितात, ते पंडितंमन्य व वेदांताभिमानी लोक **पंडितांच्या** वाग्बाणांस गोचर होतात हें नीटच आहे. ॥ ३० ॥

यदेतन्मतं कर्म कर्तव्यमिति सप्रमाणमुक्तं तत्तथा—

हें जें मीं आपलें प्रमाणसिद्ध मत ' कर्म केलेंच पाहिजे व तें परमेश्वरार्पण बुद्धीनें केलें पाहिजे असें ' सांगितलें, त्या मताप्रमाणें जे लोक वागतात त्यांस फलप्राप्ति काय होते ती पहाः—

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः॥३१॥**

**इदं मे मतं** ( ह्या प्रकारचें हें माझें मत ) **ये श्रद्धावन्तः अनसूयन्तः मानवाः अनुतिष्ठन्ति** ( विश्वास ठेवून व निर्मत्सरबुद्धीनें जे मनुष्य चालवितात, ह्या मताप्रमाणें जे लोक चालतात ) **ते अपि** ( ते सुद्धां ) **कर्मभिः** ( कर्मापासून, कर्मबंधापासून ) **मुच्यन्ते** ( मुक्त होतात. ) सारांश, मीं सांगितलेल्या ह्या मतावर विश्वास ठेवून निर्मत्सरबुद्धीनें जे लोक आचरण करितात, ते लोक सुद्धां चित्तशुद्धि होऊन ज्ञान झाल्यामुळें सर्व कर्मबन्धापासून मुक्त होतात.

ये म इति । ये मे मदीयमिदं मतमनुतिष्ठन्त्यनुवर्तन्ते मानवा मनुष्याः श्रद्धावन्तः श्रद्दधाना अनसूयन्तोऽसूयां च मयि गुरौ वासुदेवेऽकुर्वन्तो मुच्यन्ते तेऽप्येवंभूताः कर्मभिर्धर्माधर्माख्यैः ॥३१॥

**गुरु**—वत्सा ! भगवान या मताची फलश्रुति सांगावी या उद्देशानें ह्मणतातः " अर्जुना ! जे जे ह्मणून पुरुष पूर्ण भक्तिभावानें आणि मत्सरशून्य बुद्धीनें मीं प्रतिपादन केलेल्या या मताप्रमाणें आचरण करतील, ज्यांच्या मनामध्यें म्यां वासुदेवानें हें मत कां सांगितलें अथवा वासुदेवासच सर्व कर्में कां अर्पण

करावीं असें किल्बिषही येणार नाहीं, ते सर्व लोक कर्माधिकारी असूनही, धर्मविहित व धर्मानिषिद्ध कर्म करीत असतांही त्यांस सात्त्विक ज्ञान होऊन त्या ज्ञानानें मुक्त होतील."

**शिष्य**—भगवन्! येथें 'मत्सर' शब्द कां बरें?

**गुरु—अरे!** शहाणपणाचा अभिमान जळतो आहेना प्रत्येक ठिकाणीं? दृष्ट गोष्टींतही जर ऐकमत्य होत नाहीं, तर अदृष्ट गोष्टींत कोठून येणार? तेव्हां प्रत्येक मनुष्यास स्वतःच्या ज्ञानाची घमेंडी असावयाची आणि ह्मणूनच 'हा कोण हें मत प्रतिपादन करणार?' असें काकवत् च्छिद्रान्वेषण करून ह्मणणारे दोषैकदृष्टि असावयाचेच! तेव्हां त्यांस अनुलक्षून भगवंतांनीं 'असूयाशून्यत्व' या अर्थाचा शब्द घातला आहे.

**भपाकार**—आचार्यानुवादी आहेत.

**मधु०**—'नित्य' = ( १ ) अनादि, ( २ ) आवश्यक, ( ३ ) सर्वदा असे तीन अर्थ देतात. तिन्ही येथें युक्त होतात. श्रद्धा=गुरूनीं केलेल्या उपदेशावर पूर्ण विश्वास; आपल्यास अनुभव नाहीं तरी गुरूनीं हें सांगितलें आहे ह्मणून तसेंच असलें पाहिजे असा जो विश्वास ती श्रद्धा. संकट प्राप्त झालें असतां किंवा दुःखोत्पादक कर्म करण्याचा प्रसंग आला असतां 'ईश्वर करुणापूर्ण नाहीं, कारण त्यानें आम्हांस दुःखांत घातलें' ही जी संशयमूलक द्वेषबुद्धि तिलाही असूया ह्मणतात.

**शंकरा०**—येथपर्यंत अज्ञान्यास चित्तशुद्धीसाठीं व ज्ञान्यांस लोकसंग्रहासाठीं कर्मयोग कसा अवश्य आहे हें सांगितलें. आतां ह्या श्लोकांत फलश्रुति सांगतात. यांचा व **श्रीधरां**चा अर्थ सरळ आहे. 'अपि' शब्दानें 'जन्मापासूनही मुक्त होतात' असा ध्वनि काढितात.

**पर्वते** व **द्विवेदी मधुसूदनीकारां**चे अनुयायी आहेत. **चतरजीः**—अदृश्य आणि तर्कागोचर वस्तूच्या संबंधानें साक्षात्कार झालेल्या गुरूवर विश्वास ठेविला पाहिजे. हा विश्वास ह्मणजे श्रद्धा होय.

**रामा०**—अर्थ सरळ करितात. 'अपि' शब्दावरून असें अनुमान करितात कीं, ज्यांचा ह्या उपनिषत्सारभूत गीताशास्त्रावर विश्वास आहे, द्वेषबुद्धि नाहीं, त्यांसही वर सांगितल्याप्रमाणें कर्म करण्याची बुद्धि होऊन ते ज्ञानमार्गानें मुक्त होतील.

**द्वैत०**—श्रद्धा=आस्तिक्यबुद्धि. ‘ कर्मांशिवाय ज्ञान नाहीं आणि ज्ञानसाक्षात्कार ( परमेश्वराचें प्रत्यक्ष दर्शन ) याशिवाय मोक्ष नाहीं ’ असें म्हणतातसें दिसतें.

**ज्ञाने०**—‘ श्रद्धायुक्त लोकांनीं वर सांगितलेलें कर्म केलें तरी ते कर्मशून्यच असतात.’ **पंडितः** ‘ श्रद्धा =भक्ति. ‘ असूया ’=पक्षपाताच्या योगानें उत्पन्न झालेला द्वेष. ‘ जगांत विषमता व नैर्घृण्य ( दयाशून्यता ) दिसतात, त्याचें निराकरण पांचव्या अध्यायांत केलें आहे. ’॥ ३१ ॥

## ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ॥
## सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

तु ( परंतु ) **एतत् अभ्यसूयन्तः** ( ह्या मताचें मत्सरदृष्टीनें अवलोकन करणारे—लोक—) **मे मतं** ( माझें मत ) **न अनुतिष्ठन्ति** ( ग्रहण करून त्याप्रमाणें वर्तन ठेवणार नाहींत ) **सर्वज्ञानविमूढान् तान्** ( ज्ञानपूर्ण जें ब्रह्म तें प्राप्त करून घेण्याच्या साधनाविषयीं मोहित होऊन पुनः पुनः संसारांत पडणारे त्या लोकांविषयीं—असें-- ) **विद्धि** ( समज--कीं )–ते **अचेतसः नष्टान्** ( विवेकशून्य लोक ‘ मुक्ति ’ नामक पुरुषार्थाला मुकलेले आहत )— सारांश, अज्ञानानें, अहंकारानें व मत्सरबुद्धीनें मोहित होऊन या सर्वोपयोगी शुद्ध मताचें अनुसरण जे लोक दोषदृष्टि असल्यामुळें करणार नाहींत ते विवेकशून्य लोक पुरुषार्थाला मुकले, सारांश नाहींतसे झाले असें समज.—

ये त्विति । ये तु तद्विपरिता एतन्मम मतमभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति नानुवर्तन्ते मे मतं सर्वेषु ज्ञानेषु विविधं मूढास्ते, सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टान्नाशं गतानचेतसोऽविवेकिनः॥ ३१ ॥

परंतु वर सांगितलेल्या श्रद्धावंत लोकांहून निराळे असणारे व निर्दोष मत असलें तरी त्यांत दोष उत्पन्न करणारे जे मत्सरी लोक मोक्षमार्गास नेणाऱ्या या माझ्या मताप्रमाणें वागणार नाहींत, त्यांना सर्व ज्ञानाविषयीं, व सर्वांत श्रेष्ठ जें मोक्षज्ञान त्याविषयीं अनेक प्रकारचे मोह प्राप्त होतात.

**शिष्य**—अनेक प्रकारचे मोह कोणते ?

**गुरु**—अरे ! श्रुतिस्मृतिसिद्ध जें भगवंताचें मत आहे तें टाकून दिलें म्हणजे

(१) कोणता ग्रंथ अगर कोणते ग्रंथ प्रमाणभूत मानावे याविषयीं मोह; (२) कोणती गोष्ट सिद्ध करावयाची याविषयीं मोह. (३) कोणत्या मार्गानें सिद्ध करावयाची याविषयीं मोह असे नानाप्रकारचे मोह उत्पन्न होतात. असो; या नानाविध मोहांमुळें व विवेकशून्य झाले असल्यामुळें ( चांगलें कोणत व वाईट कोणतें हें समजण्याची अक्कल नसल्यामुळें ) त्या लोकांचा सर्वस्वीं नाशच झाला, ज्ञानस्वरूपी मोक्ष मिळण्याऐवजीं त्यांस जडस्वरूपी प्रकृतित्व प्राप्त झालें असें समज; सारांश, ते अचेतनच झाले असें समज.

**मधु० श्रीधर** व **पर्वते** आचार्यांसारखाच अर्थ करितात. 'अचेतस्'= दुष्ट. 'नष्ट'=सर्वपुरुषार्थभ्रष्ट.

**प्रपा०**—'अचेतस्' भ्रांतिमान्.

**शंकरा०**—निष्कर्मरूपी कर्ममार्ग अत्यंत कष्टदायक आहे व त्याचें फलही दिसत नाहीं असें समजून अज्ञानी असतांही एकदम संन्यासमार्गाचें अवलंबन करणारे पुरुष सर्वपुरुषार्थभ्रष्ट होतात. सारांश, अधिकारानुरूप वर्तन न करणारे व ईश्वरप्रणीत मार्गाचें अनुसरण न करणारे लोक नष्टप्रायच होत.

**द्विवेदी**—जो ज्ञानी नसून कर्मयोगाची वरील उत्कृष्ट व्यवस्था मान्य करीत नाहीं तो भ्रष्टच झाला.

**रामानुज** व **द्वैतवादी** यांचा अर्थ सरळ आहे.

**ज्ञानेश्वर** अज्ञानी नष्टांविषयीं म्हणतात:—जे मोहमदिरा ( मोहरूपी दारू तिनें ) भुलले । विषय विषें धारले ( व्यापिले ) । अज्ञानपंकीं बुडाले । निभ्रांत मानीं ॥ देखें शवाच्या हातीं दिधलें । जैसें कां रत्न वायां गेलें । नातरी जात्यंधा, पाहिलें । प्रमाण नोहे ! ॥ कां चंद्राचा उदय जैसा । उपयोगा न वचे ( येत नाहीं ) वायसा । मूर्खा, विवेक हा तैसा, । रुचेल ना ॥

**पंडितांनीं** शब्दानें मात्र वेदांताचें अवडंबर घालणाऱ्यांची व जैमिनीआदि काम्य कर्मानेंच पुरुषार्थ साध्य होतो असें म्हणणाऱ्या कर्मठांची यथेच्छ निंदा योग्य रीतीनें केली आहे. ॥ ३२ ॥

कस्मात्पुनः कारणात्त्वदीयं मतं नानुतिष्ठन्ति परधर्माननुतिष्ठंति स्वधर्मं च नानुवर्तन्ते त्वत्प्रतिकूलः कथं न बिभ्यति त्वच्छासनातिक्रमदोषात्, तत्राऽऽह—

**शिष्य**—गुरुमहाराज! असलें हें मोक्षदानी मत तिरस्कृत करून आपल्यास योग्य अशा धर्माची, मोक्षमार्गाची, अवहेलना करून व आपला नाश करण्याकडे व परधर्माचा अंगिकार करण्याकडे लोकांची आपल्यास अयोग्य अशी घातुक प्रवृत्ति कां व्हावी बरें? मनुष्यास स्वभावतःच प्राप्त झालेली विवेकबुद्धि या लोकांचे ठायींच कां लुप्त व्हावी? श्रीकृष्णासारख्या सर्वदयावन प्रभूच्या विरुद्ध त्यांनीं कां जावें? ईश्वराच्या आज्ञेचें आपण उल्लंघन करून पापकर्म स्वीकारल्यास आपल्याला शिक्षा होईल अशी भीति त्यांस कां वाटूं नये? सारांश, आपलें हित म्हणून किंवा अन्यमार्गानें गेल्यास आपल्यास दंड होईल या भीतीनें तरी लोकांनीं परमेश्वरीमताचा कां अंगीकार करूं नये.

**गुरु**—उत्तम प्रश्न विचारलास? अर्जुनासही हीच शंका आली होती. असो; समाधान ऐक—

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥**

**ज्ञानवान् अपि** (ज्या पुरुषाला विवेक आहे असा पुरुष सुद्धां) **स्वस्याः प्रकृतेः सदृशं** (आपल्या स्वतःच्या प्रकृतीप्रमाणें) **चेष्टते** (वर्तन करितो.) **भूतानि** (भूतमात्र, यच्चावत् वस्तु) **प्रकृतिं यान्ति** (प्रकृतीच्या अनुरोधानें वागतात.) **निग्रहः** (—तेथें—निग्रह) **किं करिष्यति** (काय करीतील?) सारांश, जन्मतः जो स्वभाव प्राप्त झाला तदनुसार ज्ञानी पुरुषासही वागावें लागतें; मग इतर प्राणी व सर्व वस्तुजात, आपआपल्या गुणधर्माप्रमाणें वागतात यांत काय आश्चर्य आहे? आपण कितीही निरोध केला तरी तो व्यर्थच होय. तात्पर्य कुमार्गानें जाण्याची जी प्रवृत्ति असते ती स्वाभाविकच असते.

सदृशमिति । सदृशमनुरूपं चेष्टते कस्याः स्वस्याः स्वकीयायाः प्रकृतेः, प्रकृतिर्नाम पूर्वकृतधर्माधर्मादिसंस्कारो वर्तमानजन्मादावभिव्यक्तः सा प्रकृतिस्तस्याः सदृशमेव सर्वो जन्तुर्ज्ञानवानपि किं पुनर्मूर्खः । तस्मात्प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति मम वाऽन्यस्य वा ॥३३॥

**गुरु**—वत्सा! सर्व प्राणीचसे काय पण ज्ञानी सुद्धां तदनुसार वर्तन करीत असतो.

**शिष्य**—कशाच्या अनुसारानें?

**गुरु**—अरे आपल्या प्रकृतीच्या!

**शिष्य**—महाराज, प्रकृति ती कोण आणखी?

**गुरु**—प्रकृति ह्मणजे पूर्वजन्मीं किंवा पूर्वजांनीं पापपुण्यात्मक जीं कांहीं कृत्यें केलीं असतील अगर ज्ञान प्राप्त होण्याची खटपट केली असेल त्यांचे संस्कार जीवाच्या प्रस्तुत जन्मांत कांहींएक अपूर्व योजनेनें प्रकट होतात. त्यांसच प्रकृति किंवा स्वभाव ह्मणावें. जन्मतःच हा स्वभाव प्राप्त होतो; आणि सर्व प्राणिमात्र आपआपल्या स्वभावानुसार वर्तन करीत असतात. अगदीं उत्तम ज्ञानी, गुणदोष समजणारा असला तरी त्यास सुद्धां आपल्या स्वभावाचें अतिक्रमण अपूर्व मार्गाशिवाय कारितां येत नाहीं, मग सामान्य जनाची अथवा मूर्खाची गोष्ट कशाला पाहिजे? ह्मणून भगवान म्हणतात कीं, 'कळत असून किंवा कळण्याची ऐपत असूनही केंव्हां केंव्हां प्राणी आपल्या विवेकबुद्धीनें सांगितलेल्या सन्मार्गास झुगारून देऊन दुर्मार्गाचें अनुसरण कारितातः हा सर्व प्रकृतीचा अथवा पूर्वलब्ध संस्काराचा खेळ आहे. येथें मी किंवा आणखी कोणीं कडक शासनाचे नियम केले तर त्याचा कांहीं कायमचा उपयोग होत नाहीं.' समजलास? 'स्वभावाला औषध नाहीं' ह्याचा तरी अर्थ हाच होय.

अद्वैतवादी टीकाकारांत सर्वत्र ऐकमत्य आहे. "**तं विद्याकर्माणि समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च**" ( पूर्वसंस्कार, ज्ञान आणि कर्म हीं कार्याला प्रवृत्त कारितात ) ही श्रुति **मधुसूदनीकार** देतात. प्रारब्ध संपेपर्यंत ज्ञान्यास कर्म करावें लागतें तें यासाठींच.

**रामा०**—कर्मयोग सोपा, प्रमादराहिल्यानें होणारा आहे, ज्ञानयोग अवघड आहे, तेथें चुक्या होण्याचा संभव, शिवाय प्रकृतीचा संबंध असणारेच सर्व प्राणी आहेत, ह्मणून निरपेक्ष बुद्धीनें ज्ञान्यानें, व सकाम अगर निष्कामत्वानें अज्ञान्यानें कर्म करावें असा या व पुढील श्लोकांचा भावार्थ आहे व पुढें ज्ञानयोगांत चुक्या होण्याचा कसा संभव आहे हें भगवंतांनीं सांगितलें आहे. प्रकृति व तज्जन्य वासना अनादि आहेत, ह्मणून कर्म केलेंच पाहिजे व ज्ञानी पुरुषानें तें भगवंतास अर्पण केलें पाहिजे असें ह्मणतात.

**द्वैतवाद्यांचाही** प्रारब्धाची सत्ता अप्रतिहत आहे असा अर्थ आहे.

**पंडितांचा** अर्थ असाच आहे. ज्ञानी पुरुषांस इंद्रियें, मन वगैरे जड आहेत असें कळतें तरी भोगल्याशिवाय प्रारब्ध संपावयाचें नाहीं असें समजून त्या त्या काळापर्यंत तो इतरांसारखाच वागतो.

**गीताव्याख्याकार** ह्मणतात कीं, पूर्वलब्ध संस्काराप्रमाणें ज्ञान्यासही ह्या जन्मीं वागलें पाहिजे. मात्र ह्या मानवजन्मी पशूपेक्षां आपल्यास विशेष ज्ञान आहे ह्मणून ह्या जन्मांत मात्र पुढें भोग उत्पन्न होतील असें कर्म करूं नये.॥३३॥

यदि सर्वो जन्तुरात्मनः प्रकृतिसदृशमेव चेष्टते न च प्रकृतिशून्यः कश्चिदस्ति ततः पुरुषकारस्य विषयानुपपत्तेः शास्त्रानर्थक्यप्राताविद-मुच्यते—

**शिष्य**—महाराज! आतां मात्र मी जबरदस्त शंका घेणार बरें! प्रभो! जर प्रत्येक प्राणी आपापल्या स्वभावानुसार वर्तन करितो, आणि पूर्वसंस्कार-शून्य असा जर कोणीही जन्मासच येत नाहीं, सारांश, ज्ञानी अज्ञानी, मनुष्य, पशुपक्षी इत्यादि सर्व चौऱ्याशीं लक्ष योनींतील जंतु जर प्रकृतीच्या स्वाधी-नच झालेले आहेत, तर, दयानिधे! पुरुषाच्या प्रयत्नास शून्यत्वच आलें, ह्मणजे प्राक्तनाप्रमाणेंच सर्व व्हावयाचें असें ठरवून प्रयत्नाचें वैफल्यच होणार! अर्थातच ‘अमुक करावें’ ‘तमुक करूं नये’ ‘ज्ञान संपादन करावें,’ वगैरे सर्व विधिशास्त्रें व्यर्थच होत. ‘अमुक व्हावयाचेंच आहे,’ असें ठरल्या-वर ‘तें कर, किंवा करूं नको,’ असे विधिनिषेधात्मक नियम करण्याचें स्वार-स्य तें काय राहिलें? सारांश, पूर्वीं ठरल्याप्रमाणेंच जर सर्व आचरण व्हावयाचें आहे, तर पुरुषप्रयत्न व्यर्थच झाला! क्षमा करा, मला जी शंका आली ती नि-वेदन केली आहे.

**गुरु**—शाबास! तूं बराच कुशाग्रबुद्धीचा आहेस. हा आक्षेप मनांत आणूनच पुढील श्लोकाची योजना केली आहे.

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ॥**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥३४॥**

**इन्द्रियस्य अर्थे** (इंद्रियाचे जे जे विषय त्या संबंधानें) **इन्द्रियस्य** (इंद्रियाचे)

**रागद्वेषौ** ( लोभद्वेष हे ) **व्यवस्थितौ** ( ठरलेले आहेत. ) **तयोः** ( त्या राग-द्वेषांच्या)**वशं न आगच्छेत्** (आपण स्वाधीन होऊं नये. ) **हि** (कारण) **तौ** (ते दोघे ) **अस्य** (ह्या पुरुषाचे ) **परिपान्थिनौ** ( मार्गरोध करणारे आ-हेत. )—सारांश, शब्दस्पर्शादि जे इंद्रियांचे विषय त्यांच्या ठिकाणीं कर्णत्वचादि इंद्रियांचा लोभ अगर द्वेष उत्पन्न होतो. पुरुषानें ह्या काम क्रोधांच्या स्वाधीन होऊं नये, कारण ते मनुष्याचे शत्रु आहेत.

इन्द्रियस्येति । इन्द्रिस्येन्द्रियस्यार्थे सर्वेन्द्रियाणामर्थे शब्दादिविषय इष्टे रागोऽनिष्टे द्वेष इत्येवं प्रतीन्द्रियार्थे रागद्वेषाववश्यंभाविनौ । तत्रायं पुरुषकारस्य शास्त्रार्थस्य च विषय उच्यते । शास्त्रार्थे प्रवृत्तः पूर्वमेव रागद्वेषयोर्वशं नाऽऽगच्छेत् । या हि पुरुषस्य प्रकृतिः सा राग-द्वेषपुरःसरैव स्वकार्ये पुरुषं प्रवर्तयति तदा स्वधर्मपरित्यागः परधर्मा-नुष्ठानं च भवति । यदा पुनारागद्वेषौ तत्प्रतिपक्षेण नियमयति तदा शास्त्रदृष्टिरेव पुरुषो भवति न प्रकृतिवशः । तस्मात्तयो रागद्वेषयोर्वशं न गच्छेत् । यतस्तौ ह्यस्य पुरुषस्य परिपन्थिनौ श्रेयोमार्गस्य विघ्न-कर्तारौ तस्कराविवेत्यर्थः ॥ ३४ ॥

आपलीं कर्ण, नेत्र इत्यादि जीं सर्व इंद्रियें आहेत, त्यांचे शब्द, रूप इत्यादि विषय आहेत. या इंद्रियांस अनुकूल असा विषय प्राप्त झाला ह्मणजे हीं त्या विषयावर लोभ करितात. प्रतिकूल विषय प्राप्त झाला असतां त्याचा तिरस्कार करितात, क्रुद्ध होतात. याप्रमाणें इष्ट, अनिष्ट जसा विषय येईल, तदनुसार काम किंवा क्रोध व त्यांचेच अनुषंगी लोभ-मोह व मद-मत्सर हे अवश्य उत्पन्न व्हावयाचेच, समजलास ?

**शिष्य**—पण माझ्या शंकेचें निवारण—

**गुरु**—अरे होय ! इतका उतावळेपणा कां ? ऐक लक्ष्य देऊनः राग-द्वेषांची उत्पत्ति बाह्य विषयांच्या अनुकूलतेवर व प्रतिकूलतेवर अवलंबून आहे, म्हणजे अनुकूल विषय असला ह्मणजे हर्ष व प्रतिकूल विषय असला ह्मणजे द्वेष, असे हे हर्षद्वेष उत्पन्न होतात. पण इंद्रियांचे जे बाह्य विषय ते नसले म्हणजे रागद्वेषांचा उद्भव होत नाहीं. झालें ? तेव्हां शास्त्राकडे विचारदृष्टि वळवून तदनुसार वर्तन करावयाचें असा ज्याचा निश्चय ठरला, त्यानें इंद्रियांच्या

आवडीनावडीप्रमाणें उत्पन्न होणाऱ्या कामक्रोधांच्या स्वाधीन, ह्या आपल्या शास्त्रविहित आचरण करणाऱ्या पुरुषानें, होऊं नये; धर्माचरण करीत असतां प्रयत्न करून त्यानें रागद्वेषांचा निर्वंश करावा. आहे येथें पुरुषप्रयत्नाचा उपयोग ?

**शिष्य**—नाहीं, महाराज ! मला नीटसें समजलें नाहीं.

**गुरु**—नीटच आहे; विषयकाठिण्यामुळें तुला समजत नाहीं, हें बरोबर आहे. हें पहा, पूर्वसंस्कारांनीं उत्पन्न झालेला जो स्वभाव तो पुरुषाला प्रकृतीच्या राज्यांतील कोणतें तरी कार्य करण्यास प्रवृत्त करितो, तें कशाच्या जोरावर करितो ?

**शिष्य**—रागद्वेषांच्या जोरावर, म्हणजे विषयानुराग किंवा विषयद्वेष असला तरच व्यवहारांतील सर्व कृत्यें करण्यास प्राणी प्रवृत्त होतो.

**गुरु**—बरोबर समजलास ! कार्य करण्यास प्रवृत्त होणें हें रागद्वेषपुरःसर होत असतें, आणि रागद्वेष उत्पन्न होतात ते इंद्रियांनीं ह्मणजे सर्व कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें ( मन, बुद्धि, वासना यांसकट सर्व ) यांनीं ग्रहण केलेल्या किंवा ग्रहण करण्यासारख्या विषयासंबंधानें होतात हें आतांच सांगितलें आहे. होयना ? बरें तर, या पूर्वसंस्कारजन्य रागद्वेषांमुळें पुरुष आपला स्वधर्म सोडून देतात व परधर्माचा अंगीकार करितात ह्मणजे विवेकदृष्टि सोडून देतात व परधर्माचा अंगीकार करितात ह्मणजे विवेकदृष्टि सोडून देऊन जें करावयाचें तें करीत नाहींत आणि करूं नये तें करितात. समजतें आहेना नीट ? आतां विषयग्रहण करण्याच्या आधींच ह्मणजे रागद्वेष उत्पन्न होण्याच्या पूर्वींच, विवेकदृष्टि धारण करून अथवा आपण कोण, आपला खरा पुरुषार्थ काय हें रागद्वेषशून्य व प्रकृतीस अगोचर अशा आत्मज्ञानदृष्टीनें ठरवून जेव्हां पुरुष वर्तन करावयास लागतो, तेव्हां तो प्रथम काय करील ?

**शिष्य**—विषयाकडे प्रवृत्ति करावयास लावणारे जे रागद्वेष त्यांचें नियमन करील.

**गुरु**—शाबास ! येथें पुरुषप्रयत्नाची आवश्यकता उत्पन्न झाली कीं नाहीं ? अर्थात् झाली आणि ती ज्ञानदृष्टीनें किंवा विधिनिषेध-शास्त्रांच्या दृष्टीनें झाली. ठीक आहे ? तेव्हां ज्ञानदृष्टीनें किंवा रागद्वेषशून्यदृष्टीनें प्रवृत्त होणारा पुरुष अर्थातच प्रकृतीला वश न होतां ज्ञानमार्गानें किंवा कर्ममार्गानें

ठरविला जो मार्ग, त्या मार्गानेंच प्रवृत्त होईल. ह्मणून भगवंतांनीं सांगितलें आहे कीं, रागद्वेषांच्या स्वाधीन न होणें ह्मणजे पुरुषप्रयत्नाचें सार्थक्य करणें होय. रागद्वेषांस वश न होणें हें आपल्या स्वाधीन आहे. रागद्वेषांच्या स्वाधीन होऊं नये, कारण मोक्षमार्गाचा प्रतिरोध करणारे हे दुष्ट चोर आहेत. मार्गांत जसे वाटपाडे असतात व पांथस्थांस इष्ट वाटेनें जाऊं देत नाहींत, तसेच हे कामक्रोध मोक्षमार्गाला विघ्न करणारे चोर आहेत. असो; याप्रमाणें प्रकृतीला वश झालेला प्राणीही विवेकदृष्टिपूर्वक स्वप्रत्ययानें प्रकृतीच्या बाहेर कसा पडूं शकतो हें सांगितलें. सारांश, ज्ञानमार्ग किंवा निष्काम उपासनापूर्वक ज्ञानमार्ग यांचें अनुसरण करण्याचें स्वातंत्र्य व सामर्थ्य मनुष्यास आहे. हें झालें ह्मणजे प्रकृतीच्या विकारानुसार प्रवृत्ति स्तब्ध होते.

**मधुसूदनीकार, भपाकार, श्रीधर, शंकरानंद, पर्वते** वगैरेंनीं असाच अर्थ केला आहे. आत्म्यास जें इष्ट तें प्रकृतीस अनिष्ट आणि आत्म्यास अनिष्ट तें प्रकृतीस इष्ट हा विवेक ईश्वरभजनानें, निष्काम कर्माचरणानें व '**आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यः**' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं आणि शेवटीं ईश्वरी अनुग्रहानें सिद्ध होऊन स्वधर्माप्रमाणें आचरण करण्यास मनुष्याला स्वातंत्र्य येतें असें ह्मणतात. नदीच्या महापुरांत उडी टाकण्यापूर्वी जसा सावध मनुष्य नौकेचा आश्रय करितो, तद्वतच हें होय. **द्विवेदी, चतरजी**ही हाच अर्थ आधुनिक पद्धतीनें प्रतिपादन करितात.

**रामानुज** रागद्वेषांस प्रबल होऊं देऊं नये असें ह्मणतात.

**द्वैतवादी**ही **आचार्यां**सारखाच अर्थ करितातः '**संस्कारो बलवानेव ब्रह्माद्या अपि यद्वशाः । तथाऽपि ह्यन्यथाकर्तुं शक्येतातिप्रयत्नतः**'॥ (पूर्वसंस्कार फार बळवंत असतात, ब्रह्मदेवादि सर्वांस त्यांलाच वश व्हावें लागतें, तथापि अतिप्रयत्नानें ह्या संस्कारांसही अन्यथा करितां येतें.) ऑगस्टाइन नामक ख्रिश्चियन तत्त्ववेत्त्याप्रमाणें द्वैतवाद्यांनीं परमेश्वरी अनुग्रहावर भिस्त ठेविली नाहीं, हा ख्रिस्तभक्तांवरही त्यांचा विशेष होय. ज्ञान होण्यास व मोक्ष मिळण्यास भगवदनुग्रह पाहिजे हें खरें, पण तो अनुग्रह पुरुषप्रयत्नाशिवाय साध्य होत नाहीं.

**ज्ञानेश्वरांचें** व्याख्यान अतिमधुर आहेः इंद्रियांच्या लाडासंबंधें ह्मणतातः—

हां गा! सर्पेसीं खेळों येईल? । कीं, व्याघ्रसंसर्ग सिद्धी जाईल? । सांगें हाला हाल (जालीम विष) जिरेल । सेविलिया काई? ॥ देखें खेळतां अग्नी लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला (भडकलेला)। तैसा इंद्रियां लळा दीधला । भला नोहे ॥....ह्मणोनि केवळ देहभरण। ते जाणे उघडी नागवण। ह्मणोनि येथें अंतःकरण । देयावेना ॥ इंद्रियांच्या संगतीसंबंधानें म्हणतातः.... पारि तो सेव चोराचा (सावासारख्या चोराचा) सांगात । जैसा नावेक (क्षण-भर स्वस्थ) जंव नगराचा प्रांत । सांडिजेना ॥ बापा ! विषयाची मधुरता । क्षणी आवडी उपजे चित्ता । तो परिणाम विचारितां। प्राण हरी ॥ देखें इंद्रियीं काम असे । तो लावी सुखदुरासे (सुखाप्रमाणें वाटणाऱ्या दुराशेला) । जैसा गळीं मीन (मासा) आमिषें । भुलविजे गा! ॥ आणखी पुष्कळ आहे, पण विस्तारभयास्तव हात आंखडितों!

**पंडितांनीं** या व 'मयि सर्वाणि कर्माणि' या श्लोकाचा संबंध उत्तम बस-वून दिला आहे. पूर्वसंस्कारामुळें भोग भोगण्याचें जरी आलें, तरी ज्ञान्यानें भोगविषयांत रागद्वेष धरूं नये. रागद्वेष हे आपल्या, पुरुषप्रयत्नाच्या, स्वाधीन आहेत, पूर्वसंस्कारांनीं उत्पन्न होणारे परिणाम आपल्या स्वाधीन नाहींत; तेव्हां आपण रागद्वेषांच्या स्वाधीन न होतां परमेश्वरास प्रिय त्या गोष्टी मात्र परमेश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धीनें कराव्या. सारांश, कामक्रोध वर्ज करावे. हेच मोक्ष-मार्गामध्यें आडविणारे चोर आहेत.

**मधुसूदनीकारांस** अनुसरणारे **रंगनाथस्वामी** म्हणतात कीं, विषयभोग हे प्रारब्धाधीनच आहेत. पण तेथें रागद्वेष उत्पन्न होणें न होणें हें पुरुषाधीन आहे. पुरुषाचे ज्ञानास शास्त्रदृष्टीचा व गुरूपदेशाचा संस्कार झाला ह्मणजे रागद्वेषांची निवृत्ति होते; व विहितकर्माचे ठिकाणीं मात्र आवड उत्पन्न होते. सारांश, शास्त्राची व गुरूची आवश्यकता येवढ्यासाठींच आहे कीं, तीं विष-याचे ठायीं ज्ञानी पुरुषास रागद्वेष होऊं देत नाहींत. ही नसतीं तर ज्ञानी, अज्ञानी, पशुपक्षी यांत कांहींच विशेष न राहून सर्वच प्रकृतिमय झालें असतें!

**गीताव्याख्याकार** ह्मणतात कीं, शास्त्रें पुरुषाचे डोळे उघडतात. स्वध-र्मीप्रमाणें आचरण करण्याची अवश्यकता उत्पन्न होते ती यामुळेंच होय. ॥३४॥

तत्र रागद्वेषप्रयुक्तो मन्यते शास्त्रार्थमप्यन्यथा परधर्मोऽपि धर्मत्वाद-नुष्ठेय एवेति तदसत्—

आतां इतका विस्तार करून सांगितला आहे तथापि ‘ माझें तेंच खरें ! ’ असें ह्मणणारा कोणी पुरुष अभिमानानें किंवा द्वेषानें प्रेरित होऊन जर ह्मणूं लागेल कीं ‘ शास्त्राचा अर्थ हे लोक करितात, तसा तो नाहीं, किंवा शास्त्राचा जो विषय आहेसा भासवितात, तसाही तो नाहीं. त्याचप्रमाणें परधर्म तरी धर्मच आहे ह्मणून परधर्मप्रमाणें वागण्यासही प्रत्यवाय नसावा, स्वधर्मप्रमाणेंच परधर्मावर भक्ति ठेवूनही वागावें. ’ तर हें त्यांचें रागद्वेषमूलक ह्मणणें खोटें आहे; हें सिद्ध करण्यासाठीं सांगतातः—

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

**स्वधर्मः** ( आपल्या स्वतःचा धर्म ) **विगुणः** ( वैगुण्ययुक्त आहे तरी ) **स्वनुष्ठितात् परधर्मात्** ( उत्कृष्टरीतीनें संपादन केलेल्या परधर्मापेक्षां ) **श्रेयान्** ( जास्त लाभदायक असतो, श्रेष्ठ असतो ) —**स्वधर्मे** ( आपल्या धर्मामध्यें ) **निधनं श्रेयः** ( मरण प्राप्त झालें तरी तें उत्तम होय)—**परधर्मः भयावहः** ( परकीयधर्म भय उत्पन्न करणारा आहे. )—सारांश, दुसऱ्याच्या धर्माप्रमाणें आपण उत्तम आचरण केलें तरी त्यापेक्षां स्वधर्मांतील कसें-बसें आचरण विशेष लाभदायक होतें. स्वधर्म आचरणांत मरण प्राप्त झालें तरी तें उत्तम होय. कारण परधर्मानें अनेक भीतिजनक संकटें उत्पन्न होतात.

श्रेयानिति । श्रेयान्प्रशस्यतरः स्वो धर्मः स्वधर्मो विगुणोऽपि विगतगुणोऽप्यनुष्ठीयमानः परधर्मात्स्वनुष्ठितात्साद्गुण्येन संपादितादपि । स्वधर्मे स्थितस्य निधनं मरणमपि श्रेयः परधर्मे स्थितस्य जीवितात्, कस्मात्परधर्मो भयावहः नरकादिलक्षणं भयमावहति यतः ॥ ३५ ॥

आपल्या धर्मामध्यें जें कर्तव्यकर्म ह्मणून सांगितलें आहे तें यथास्थित रीतीनें झालें नाहीं तरी स्वकर्तव्य करणें हें परकीय धर्मांतील कर्तव्यांचें उत्कृष्टरीतीनें, सर्वगुणपूर्वक, आचरण करण्यापेक्षां, विशेष लाभदायक, विशेष गुणकारी आहे. स्वधर्मानें कर्तव्य करीत असतां त्यांत मरण आलें तरी तें परकीय कर्तव्याचरण करून जिवंत राहण्यापेक्षां श्रेयस्कर आहे. कारण परधर्मांतील

कर्तव्य हें भीति उत्पन्न करणारें आहे, परकीय कर्तव्याचें उत्तम अनुष्ठान केलें तरी स्वतःचें कर्तव्य नष्ट झालें म्हणून व कदाचित् परधर्मांतील कर्तव्यामध्येंही चुक्या होण्याचा संभव असल्यामुळें नरकादि महानीच स्थिति प्राप्त होण्याचा संभव आहे.

**मधु०-श्रीधर, शंकरा०**-रागद्वेषपूर्वक विषयाची आराधना केली असतां जशी पुरुषार्थहानि होते, त्याचप्रमाणें आपलें कर्तव्य आपणास आवडत नाहीं व इतर कर्तव्य आवडतें ह्मणून परधर्माचें अनुष्ठान सांगोपांग केलें तरी तें अधर्मासच कारण होतें. कर्तव्याकर्तव्यांचा विचार पुरुषांची योग्यता पाहूनच सांगितलेला आहे. एतद्विरुद्ध जाणें ह्मणजे रागद्वेषांचा अंगीकार करून धर्माचरण करणें होय; आणि हें तर निषिद्ध आहे. सात्त्विक धर्म जरी चांगला असला तथापि स्वपुरुषार्थतत्पर राजसप्रकृतीच्या क्षत्रिय पुरुषानें त्याचा अंगीकार करणें युक्त नव्हे, अनर्थोत्पादी आहे. कारण राजस पुरुषाची बुद्धि परिपक्व झालेली नसते. सौभाग्य, सौंदर्य इत्यादि गुणांनीं युक्त अशा परमातेपेक्षां कुरूप, दरिद्री असलेली स्वमाताच जशी जास्त कल्याणप्रद होते, तद्वत् अहिंसाजनक परधर्मापेक्षां स्वतःच्या प्रकृतीस ( व ज्यामुळें प्रकृति तशी बनली तशा माता, पितर, कुळ जाति, देश व पूर्वसंस्कार इत्यादिकांस ) अनुकूल अशा हिंसाजनक स्वधर्माचें अनुष्ठान श्रेयस्कर होतें. ' हें **प्रपाकारांचें** सदृष्टांत ह्मणणें सयुक्तिकच आहे.

प्रो० **द्विवेदी** यानीं **रामानुजा** प्रमाणेंच या श्लोकाचें उत्कृष्ट विवरण केलें आहे, त्याचा तात्पर्यार्थ मात्र गुर्जरभाषानभिज्ञ लोकांसाठीं येथें देणें शक्य आहे: योग्यता व अधिकार पाहून धर्मानें निरनिराळे मोक्षमार्ग सांगितले आहेत. अधिकार पाहून धर्मकर्म केलें असतां हळूहळू—या जन्मीं नाहीं तर पुढील जन्मीं तरी—कार्यसिद्धि होते म्हणजे मोक्ष मिळतो. अधिकार नसतां श्रेष्ठ मार्गानें जाणें ह्मणजे घोड्यावर बसतां न येणाऱ्या मनुष्यानें—घोड्यावरील स्वार इष्ट ग्रामास लवकर पोंचतो ह्मणून—खंद्या घोड्यावर बसून तो भरांधव पिटाळण्यासारखें अप्रयोजक, असमंजस आणि अनर्थोत्पादि आहे. येथें स्वधर्म ह्मणजे शैव, वैष्णव, बौद्ध, मुसलमानी, ख्रिस्ती, सारांश आपल्यास वंशपरंपरेनें प्राप्त झालेला संप्रदायच असा अर्थ घेणें असमंजस होय. आपल्या अधिकारानुरूप व स्वतःच्या योग्यतेप्रमाणें कर्म, उपासना, ज्ञान यांपैकीं कोणता तो

मार्ग स्वीकारावा. येथें अभिमान धरणें हें जितकें सौख्यदर्शक आहे तितकेंच अधिकाराशिवाय भलतेंच कर्म करावयास लागणें हेंही होय.' **आचार्यां**चा हाच अर्थ आहे. **द्वैतवाद्यां**नीं सरळ अर्थ केला आहे.

**ज्ञाने**०--दुसऱ्याच्या चांगल्या घराचा व परकीय सुंदर वनितेचा दृष्टांत देऊन पुनः ह्मणतात.

....हां गा साकर आणि दूध। हे गौल्यें (गोडीनें) कीर [खरोखर] प्रसिद्ध। परी कृमि दोषें [जंत झालेल्या मनुष्यानें]। घेणें [ घ्यावें ] कैंवीं?॥

**पंडित, रंगनाथ, गीताव्याख्याकार** कांहीं विशेष सांगत नाहींत; मात्र शेवटचे दोघेजण प्रो. **द्विवेदीं**च्या वाग्बाणास विषय होतात.

मागच्या श्लोकावलींत लोकांचें खरें कल्याण करणाऱ्या सत्पुरुषानें कोणता मार्ग स्वीकृत करावा हें सांगून सर्व जनसमूहाची प्रवृत्ति, निवृत्तिमार्गाकडे सुखरूपपणानें कशी वळवावी याचाही विचार प्रत्येक मनुष्याच्या अधिकारानुरूप कथन केला. त्याच विषयाचा आणखी थोडा विचार करून **२७ ते २९** मध्यें ज्ञानी व अज्ञानी, किंवा पूर्णाधिकारी व मन्दाधिकारी लोकांमध्यें तारतम्यभाव सांगतातः आत्म्याशिवाय भासमान मात्र होणारें सर्व विश्व हें मायानिर्मित आहे म्हणजे बुद्धि, अहंकार, मन, सर्व इंद्रियें व त्यांचे विषय, हे सर्व अनादि परंतु सांत असणाऱ्या व अज्ञानामुळें मात्र सत्स्वरूपानें भासमान होणाऱ्या, मायेचें कृत्य आहे, यांत आत्म्याचा अथवा खऱ्या पुरुषार्थसिद्धीचा कोणताही संबंध नाहीं, हें सर्व दृश्यमान विश्व नष्ट झालेंसें दिसलें तरी आत्म्याच्या नित्य व निर्विकार स्वरूपामध्यें बालाग्रही अंतर पडणार नाहीं; हें खिस्तभक्तांसही शिरसा वंद्य होणारें ( पहा मार्टिनोकृत धर्म-पुस्तक ) तत्त्व, ज्ञानी पुरुषास विदित असतें असा सिद्धांत या भरतखंडामध्यें तीन हजार वर्षांपूर्वींच भगवंतांनीं प्रकट केला. हा सिद्धांत समजून त्याप्रमाणें आचरण करणारा तो ज्ञानी होय. मायेच्या मोहजालांत अडकल्यामुळें, व सर्व पुरुषार्थाची सिद्धि या मायामय ह्मणून नश्वर आणि प्रायः अनीश्वर विश्वांतच साध्य होणार असा अज्ञानी पुरुषाचा समज असल्यामुळें, जगांत माझ्या संबंधानें जें काय होत आहे त्याचा कर्ता व भोक्ता मीच आहें असा निश्चय ठरतो; व पुढें बुद्धि, मन व विकार वगैरे अनात्मक शत्रूंच्या व विशेषतः बुद्धीस व मनासही स्वाधीन करून घेणाऱ्या विषयलोलुप विकारांच्या

सर्वथा स्वाधीन होतो. खऱ्या सुखापेक्षां भासमान दुःखाची संख्या व सामर्थ्य हीं आपल्या अज्ञानामुळें जास्तच आहेत असा अनुभव संसारांत येत गेल्यामुळें अर्थातच दुःखांचाही कर्ता व भोक्ता मीच असें अज्ञानी पुरुषास वाटतें. एवंच तो दुःखमयच होतो. सारांश, येथील दिसणारीं सर्व सुखें दुःखजन्य व दुःख-परिणामी आहेत असा प्रत्यय नित्य येत असतांही वासनेच्या व आशेच्या जाळ्यांत गुंतून मोहग्रस्त झाल्यामुळें माझें कल्याणच होईल असा समज होतो हेंही अज्ञानच होय. असो; तेव्हां या अज्ञानजन्य गुणकर्मांमध्येंच घोटाळून त्यांतच सुख मानणाऱ्या मनुष्यास एकदम परमार्थाच्या, श्रेष्ठ पुरुषार्थाच्या, मार्गाला नेण्याचा प्रयत्न केल्यास अर्थातच तो निष्फळच — नव्हे !— दुष्फल-प्रदच— होईल ! खरेंच आहे; बैलांनीं ओढणाऱ्या गाडीला जर कोणी दुधखुळ्या माणसानें वाफेचा संस्कार देऊन आगगाडीप्रमाणें माझा गाडा चालवीन असा दुराग्रह धरिला तर तो नेमलेल्या गावास तर जाणारच, नाहींच पण भलताच प्रसंग गुदरून सर्व गाड्याचा चुराडा होईल व स्वतःचाही तो हात-पाय मोडून घेईल ! याकरितां मनुष्याची योग्यता पाहून त्या त्या मानानें त्यास सन्मार्गाचा उपदेश करावा हा लोककल्याणकारी पुरुषाचा खरा मार्ग होय. या मार्गाचा पहिला ' ओनामा ' म्हणजे सर्वकर्त्या परमेश्वराच्या चरणा आपआपलीं सर्व कर्में निस्पृह व निर्लोभ मनानें समर्पण करणें हा आहे. हा निवृत्तिमार्गाचा श्रीगणेशा फारसा अवघडही नाहीं. पहाः दुःख भोगण्याचा प्रसंग, आपणच अहंकार धरून केलेल्या कर्मानें प्राप्त झाला असतां ज्याप्रमाणें ' परमेश्वराची मर्जी ! ' असें ह्मणून भोग भोगीत असतांही परमेश्वराकडे कर्तृत्व देऊन आपण मोकळे होऊं पाहतो, त्याचप्रमाणें सुखाच्या कर्तृत्वाची वांटणी करीत असतां परमेश्वरावरच सर्वकर्तृत्वाचा हवाला टाकावयाचा आहे. हा पहिला धडा होय. नंतर पूर्ण भक्ति, पुढें आत्मचिंतन, या पुढें आशाशून्यत्व आणि शेवटीं ' माझेपणाचा नाश ' असा क्रम आहे. हा मार्ग कंठीत असतांना देहप्रारब्धानें प्राप्त झालेलीं अधिकारानुरूप विहित कर्में मनुष्यानें केलींच पाहिजेत. त्याप्रमाणें प्रापंचिक परमार्थ अथवा पारमार्थिक प्रपंच सिद्ध करण्याचा हा मार्ग आहे. प्रवृत्तीमधून निवृत्तीकडे जाण्याला किंवा कर्म करितां करितां ज्ञान संपादन करण्याला याशिवाय दुसरा मार्ग निघणें शक्यच नाहीं. विश्वांतील चमत्काराची ओळख करून घेऊन जीवांची जीव-

यात्रा सुलभ करण्यास व त्यांस स्वरूपाकडे नेण्यास याशिवाय दुसरें साधन सांपडणें अशक्य आहे. जीवयात्रा जितकी दुःसाध्य तितका परमार्थाकडे ओढा कमी हा प्राकृत लोकांच्या संबंधानें खरा सिद्धांत आहे. ह्मणून परमार्थज्ञान वाढवावयाचें असें ज्या मनुष्यास खरोखर वाटतें व त्याप्रमाणें आचरण करण्यासही जो तयार होतो त्या मनुष्यानें सामान्य लोकांच्या अन्नपाण्याची चांगली सोय लागेल, ते आपआपले व्यवहार शास्त्रशुद्ध मार्गानें यथाशक्ति करीत जातील, अहंकारवृत्ति लुप्त होऊन सात्त्विक वृत्ति त्यांच्या अंगांत भक्तिपूर्वक खिळून राहील अशा मार्गानेंच त्यांस—त्यांचें अज्ञान हळूहळू कमी करून नेलें पाहिजे. जगणें अगर जगविणें हाच पुरुषार्थ नसून आपला सर्व विश्वसंसार ब्रह्ममय होऊन जाईल असें आपल्या मनांत बाणेल तरच जीवाची खरी सुधारणा होणार आहे. असो; तेव्हां भगवान ३१ व ३२ श्लोकांत स्पष्टपणानें सांगतात कीं, वर सांगितलेल्या मार्गानें, श्रद्धापूर्वक व निरहंकारी सात्त्विकभावासहित, जे जाऊं लागतील, ते स्वतःही कर्मपाशांतून सुटतील व दुसऱ्यासही सोडवितील. अभिमानमदानें उन्मत्त झाल्यामुळें 'माझ्याशिवाय इतर सर्व लोक गाईचे बाप आहेत; मी प्रतिपादन करितों, त्यापेक्षां इतर सर्व सिद्धांत, सर्व मतें व सर्व समजुती कवडी मोलाच्या आहेत, मी वागतों त्याहून इतर मार्ग दुःखमूलक आहेत,' अशी अहंकारत्रयी ज्या अभिमत्त पुरुषाच्या अंगांत पूर्णपणें भिनून गेली, तो व त्याचे अनुयायी आपल्यास व आपल्याबरोबर इतर भोळ्या लोकांसही गाड्याबरोबर नळ्याला यात्रा या न्यायानें दुःखरूपी अगाध नरकांत नेऊन ढकालितात! सात्त्विक मार्ग एकदा सुटला ह्मणजे '**भवति विनिपातः शतमुखः**' (हजारों दिशांनीं पतन प्राप्त होतें) असें भगवंतांनीं सांगितलें आहे. तसेंच आलीकडच्या १९ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं सुधारणेच्या शिखरास जाऊन जगद्वंद्य झालेल्या लोकांच्या लोकनायकांमध्येंही जें तत्त्व पूर्ण बाणलें नाहीं, ह्मणजे भेणेंभावानें, दपटशाहा दिल्यानें कार्यसिद्धि होत नाहीं, भक्तिभावानें मात्र कार्य होतें, असें अद्यापिही समजलें नाहीं, तें तत्त्व श्रीकृष्णांनीं ३३ व्या श्लोकांत प्रकट करून पूर्वकर्मानुसार जीवांचा स्वभाव घटतो, दंडानें हा बदलायाचा नाहीं, प्रेमरूपी वज्रभेदी रज्जूनेंच सात्त्विकमार्गाकडे लोक वळतील, इत्यादि कालाबाधित व स्थलाबाधित सिद्धांत प्रकट केले आहेत.

'पूर्वकर्मीनें जर वर्तमानस्थिति सिद्ध होते, तर पुरुषास वर्तनस्वातंत्र्य नाहीं, तो केवळ निमित्तमात्रच असून ईश्वराचा किंवा तन्निर्मित विश्वपरिस्थितीचा अनन्य दास ( बंदा गुलाम ) आहे; एवंच त्याला कांहीं करणें नको, नशीबावर हवाला देऊन त्यानें स्वस्थ असावें;' अशी घातुक कल्पना अज्ञानी मनुष्याच्या मनांत उत्पन्न होण्याचा संभव आहे तिचें निवारण करण्यासाठीं भगवान ३४ व्या श्लोकांत सांगतात कीं, 'विषयकल्पना उत्पन्न होण्याच्या पूर्वीं किंवा ते विषय आपल्यास प्रत्यक्ष झाले असतां विषयाला लंपट होणें किंवा त्यापासून निवृत्त होणें या दोन्ही गोष्टी मनुष्याच्या स्वाधीन आहेत.' पुरुष स्वतंत्र आहे कीं नाहीं यावर यूरपखंडांतील तत्त्ववेत्यांमध्यें आज दोन हजार वर्षेंपर्यंत भयंकर रण माजलेलें आहे व अद्यापपर्यंतही या प्रश्नाचा धडसा निकाल झाला नाहीं आहे. पण आमच्या इकडे भगवंतांनीं याचा निकाल केव्हांच करून टाकिला आहे. आम्ही मात्र आमच्या अज्ञानजन्य दैवदुर्विलासानें या चिंतामणीस उकिरडयावर फेंकून दिलें आहे ! सच्चिदानंदस्वरूपी आत्मा स्वतंत्रच आहे. जीवांस मात्र अज्ञानीदशेंत स्वातंत्र्य नसतें व तो प्रकृति नाचवील तसा नाचत असतो; आणि पुनः हें समजतो कीं, जें काय करितो आहे, तें मी स्वतंत्रपणानेंच करीत आहें ! स्वतंत्र असतांही पारतंत्र्य स्वीकारणें व परतंत्रता स्वीकारल्यानंतर आपण स्वतंत्र आहों असें समजणें ह्यापेक्षां जास्त बालिशस्त कोठें तरी पहावयास सांपडेल काय ? असो आत्मा स्वतंत्र आहे; प्रकृतीचा संसर्ग झाला असतां अज्ञानानें पारतंत्र्य येतें आणि ह्या पारतंत्र्यांत आपण स्वतंत्रच आहों या मूर्खत्वाच्या समजुतीमुळें प्रकृतीच्या अवास्तविक दास्याची सांखळी दुप्पट जोरदार होते. **शोपेनहार** नामक जर्मन तत्त्ववेत्त्यानेंही हें मत खरें आहे असें प्रसिद्धपणें म्हटलें आहे. सारांश, आत्मज्ञानपूर्वक व्यवहार कोणत्याही मनुष्यानें केव्हांही केला तरी तो स्वतंत्रपणानें होतो; अज्ञान असलें म्हणजे मात्र सर्वस्वी प्रकृतीच्या आधीन आपण होतों; एतावता मुमुक्षूला केव्हांही स्वातंत्र्यच आहे, असे भगवंतांनीं सर्वगामी सिद्धांत प्रकट करून ३५ व्या श्लोकांत आपल्यास आपल्या पूर्वकर्मानें उत्पन्न झालेल्या सात्विक, राजस अगर तामसी गुणान्वयेंच आपण परमार्थाकडे वळावें, इसापनीतींतील 'कुत्रा, गाढव आणि धनी' या गोष्टींतील गर्दभाप्रमाणें आपण वागूं नये; अर्थात दुसऱ्यास जें हितकर तें

आपल्यास पथ्यकरच होईल असा नियम नाहीं, ह्मणून सात्विकानें सात्विक-धर्माचा व राजसानें रजात्मक धर्माचा अवलंब करावा हाच खरा पक्ष आहे असें सांगितलें आहे.

कांहीं लोक, 'हिंदुधर्म' 'शैवधर्म' 'उपासनापंथ' इत्यादि अनेक अर्थ 'धर्म' शब्दाचे करितात हा असमंजस प्रकार होय. भगवंतांनीं गीताशास्त्र केवळ हिंदुलोकांकरितां, त्यांतूनही वैष्णव लोकांकरितां किंवा कलियुगाकरितां सांगितलें आहे असें नाहीं. सर्व जीवांसाठी गीताशास्त्राचा अवतार आहे व सात्विकधर्म सर्व जगभर प्रसृत व्हावा असा त्याचा उद्देश आहे; योग्यताही तशीच आहे; तेव्हां अशा सर्वत्र व सर्वदा अनुग्रह करण्यास समर्थ असणाऱ्या भगवन्निर्मित गीताशास्त्रासारख्या सर्वांसच गुरुस्थानीं असणाऱ्या अनंतमोली ग्रंथाला काळ, स्थळ व प्रसंग यांच्या शृंखला अडकविणें अत्यंत अप्रयोजक होय. सर्व जगास प्रकाश देणाऱ्या सूर्यदेवतेसंबंधानें 'हा हिंदूंचा सूर्य, हा मुसलमानांचा सूर्य, हा विलायती लोकांचा सूर्य' असे प्रलाप करणें जितकें गैरसमजुतीचें, तितकेंच वरील अज्ञानी लोकांचें ह्मणणें होय. शुद्ध सात्विक मार्ग अधिकारानुरूप प्रकट करणाऱ्या निर्मळ शास्त्रांत आपण अहंकाररूपी माती आपल्या अभिमानानें कालवीत आहोंत. हिंदुस्थानांत या शास्त्राचा उदय झाला ह्मणून हा हिंदुलोकांचा मात्र धर्म, असें म्हणणें ह्मणजे, छापण्याची कला प्रथमतः यूरोप खंडांत प्रकट झाली ह्मणून छापण्याचे कलेवर आमचेंच स्वामित्व आहे असें बडबडण्यासारखें होय. असो; तेव्हां अभिमान सोडून व अज्ञानाचा त्याग करून आपल्या गुणास योग्य अशा मार्गानें सात्विक गुण उत्पन्न करण्याचा क्रम अनुसरावा, कोणावर जबरी करूं नये, प्रत्येकाच्या मनामध्यें हळूहळू भक्ति उत्पन्न करतील असे संस्कार देऊन जीवांचें कल्याण करावें हा भगवंतांचा खरा मार्ग आहे. या मार्गानें जातील ते तरतील, जे जाणार नाहींत, त्यांस पुनः कर्मपाशाची उजळणी करावी लागेल, असा विषय या श्लोकावलींत आला आहे. मुमुक्षु वाचकं याचा विचार करोत. ॥ ३९ ॥

**अर्जुन उवाचः—**

यद्यप्यनर्थमूलं ध्यायतो विषयान्पुंसो रागद्वेषौ ह्यस्य परिपन्थिनाविति चोक्तं विक्षिप्तमनवधारितं च तदुक्तं तत्संक्षिप्तं निश्चितं चेद-

मेवेति ज्ञातुमिच्छन्नर्जुन उवाच ज्ञाते हि तस्मिंस्तदुच्छेदाय यत्नं कुर्यामिति—

**अर्जुनः**—भगवंता! जरी आपण 'विषयांचें ध्यान करणाऱ्या पुरुषाचे' (श्लोक ६२ अध्याय २) व 'लोभ आणि क्रोध हे जीवाचे शत्रु आहेत' वगैरे रागद्वेषांविषयीं दोनदां उल्लेख केला तथापि आतां एकदां, मग एकदां, असा विस्कळित रीतीनें पुष्कळ कारणांचा उल्लेख आला म्हणून माझे लक्ष्यांत तो उपदेश चांगला राहिला नाहीं, ह्मणून कृपा करून या प्राणिमात्राच्या मुख्य शत्रूंचें एके ठिकाणीं व निश्चित असें वर्णन ऐकण्याची माझी इच्छा आहे. आपण कृपा करून सांगाल तर ह्या दुष्ट शत्रूंचा उच्छेद करण्याविषयीं मी प्रयत्न करून पाहीन. मला समजेल असें सांगण्याची विनंती करण्याचें कारण नाहींच!

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥३६॥**

**वार्ष्णेय** (वृष्णिकुलोत्पन्न श्रीकृष्णा!) **अथ** (तर मग) **केन प्रयुक्तः** (कोणा-दुष्टाच्या-प्रेरणेला वश) **बलात् इव नियोजितः** (बळवंत होऊन जसा कांहीं सामर्थ्याच्या स्वाधीन होऊन) **अयं पूरुषः** (हा मनुष्यप्राणी) **अनिच्छन् अपि** आणि (स्वतःची इच्छा नसतांनाही) **पापं चरति** (पापकर्मे करितो.!) सारांश इच्छा नसतांही पापाचरण करण्याची जी मनुष्यास बळकट प्रेरणा होते ती कशामुळें बरें? भगवन्, हें मला सांगावें.—

अथेति। अथ केन हेतुभूतेन प्रयुक्तः सन्राज्ञेव भृत्योऽयं पापं कर्म चरत्याचरति पूरुषः स्वयमनिच्छन्नपि हे वार्ष्णेय वृष्णिकुलप्रसूत बलादिव नियोजितो राज्ञेवेत्युक्तो दृष्टान्तः ॥ ३६ ॥

श्रीवष्णिकुलोत्पन्न श्रीकृष्णा! वाईट आज्ञा असेल तेव्हां इच्छा नसतांही राजाची आज्ञा जशी शिरसा वंद्य करून प्रजाजन राजाज्ञा पाळण्यास भेणे-भावानें प्रवृत्त होतात, तसा मानवी प्राणी इच्छा नसूनही पाप करण्यास प्रवृत्त होतो, गुलामासारखा बिनतक्रार पापकर्म करण्यास तयार होतो, हें काय आहे? कोणाचा असा वरपगडा असतो कीं ज्याच्यामुळें मानवप्राणी

कुमार्गास प्रवृत्त होतो? इच्छा नसूनही अनिष्ट गोष्ट समंजस मनुष्यानें करावी हें आश्चर्य आहे.

**शंक**०—'अथ' यानें निराळया प्रश्नाचा प्रस्ताव केला. 'वार्ष्णेय' = ब्रह्मवेत्त्यांवर ब्रह्मानंदाचा वर्षाव करणारा! **मधु**० व **रंगनाथ** म्हणतातः—वृष्णिकुलांतच, भगवंता! तुझा व माझा जन्म आहे व ह्मणून तुझी माझी मैत्री आहे! बाकी सर्वत्र ऐकात्म्य आहे. ॥ ३६ ॥

**श्रीभगवानुवाचः—**

शृणु त्वं तं वैरिणं सर्वानर्थकरं यं त्वं पृच्छसि—

**श्रीकृष्ण**—सर्व अनर्थाचें उत्पत्तिस्थान जो मानवीशत्रु तो **कोण** आहे तो सांगतों ऐक:—

**शिष्य**—महाराज! श्रीकृष्णास भगवान् कां ह्मणतात?

"ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः। वैराग्यस्याथ मोक्षस्य षण्णां भग इतीङ्गना" ॥ ऐश्वर्यादिषट्कं यस्मिन्वासुदेवे नित्यमप्रतिबद्धत्वेन सामस्त्येन च वर्तते।

"उत्पत्तिं प्रलयं चैवभूतानामागतिं गतिम्। वेत्तिविद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति" उत्पत्त्यादिविषयं च विज्ञान यस्य स वासुदेवो वाच्यो भगवानिति ॥

**गुरु**—ऐक कां ह्मणतात तें:—सर्व ऐश्वर्य, सर्व धर्म, सर्व कीर्ति, सर्व संपत्ति, पूर्ण वैराग्य आणि मोक्ष या सहांस 'भग' अशी संज्ञा आहे, समजलास? आतां हें ऐश्वर्य वगैरे सहाही गुण वासुदेव नामक परमपुरुषाचे ठायीं नित्य, अखंड आणि पूर्ण अशा स्वरूपानें असतात ह्मणून त्यास भगवान असें ह्मटलें. भगवान शब्दाची दुसरी एक व्युत्पत्ति आहे तीही ऐकून ठेवः—सर्व भूतमात्राची उत्पत्ति व विलय, पदार्थमात्र आले कोठून व जाणार कोठें, हें सर्व त्यास विदित असतें, तसेंच ज्याला ब्रह्मज्ञान (पूर्ण दृष्टीचें ज्ञान) आणि दृश्यज्ञान (अपूर्ण दृष्टीचें ज्ञान) हेंही विदित असतें त्याला भगवान असें ह्मणावें. आतां उत्पत्ति, स्थिति वगैरे सर्व ज्ञान आणि विज्ञान वासुदेवास होतें ह्मणून त्यास भगवान असें ह्मटलें आहे. आलें तुझ्या लक्ष्यांत? असो; भगवान काय ह्मणतात तें ऐकः—

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ॥**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

**एषः कामः** ( हा शत्रु कामरूपी आहे ) **एषः क्रोधः** ( हा क्रोधरूपी आहे. )—हा—**रजोगुणसमुद्भवः** ( रज नामक प्रकृतीचा एक गुण आहे त्याच्यापासून ह्याची उत्पत्ति आहे. )—हा—**महाशनः** (मोठा खादाड आहे. ) **महापाप्मा** ( मोठा पापी आहे ). **इह** ( या संसारामध्यें ) **एनं** ( ह्याला ) **वैरिणं** ( जीवाचा दीर्घद्वेषी शत्रु—असें—) **विद्धि** ( जाण ). **सारांश,** रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा काम, हा क्रोध ( कामक्रोधरूपी शत्रु ) आहे. ह्याची तृप्ति कधीं होत नाहीं, ह्मणून हा पापप्रवर्तक आहे. सर्व प्राण्यांचा मुख्य शत्रु हाच आहे, अशी खुणगांठ बांधून ठेव.—

काम इति । काम एष सर्वलोकशत्रुर्यन्निमित्ता सर्वानर्थप्राप्तिः प्राणिनां स एष कामः प्रतिहतः केनचित्क्रोधत्वेन परिणमते । अतः क्रोधोऽप्येष एव । रजोगुणसमुद्भवो रजश्च तद्गुणश्च स रजोगुणः स समुद्भवो यस्य स कामो रजोगुणसमुद्भवो रजोगुणस्य वा समुद्भवः । कामो ह्युद्भूतो रजः प्रवर्तयन्पुरुषं प्रवर्तयति । तृष्णया ह्यहंकारित इति दुःखितानां रजःकार्ये सेवादौ प्रवृत्तानां प्रलापः श्रूयते । महाशनो महदशनमस्येति महाशनोऽत एव महापाप्मा । कामेन हि प्रेरितो जन्तुः पापं करोति, अतो विद्ध्येनं काममिह संसारे वैरिणम् ॥ ३७॥

सर्व प्राणिमात्राचें कल्याण करणारा व सर्व अनर्थजातींचें बीज असणारा हा काम, ही तृष्णा, वासना, आहे बरें ?

**शिष्य**—क्रोध नाहीं का मनुष्यांचा शत्रु ?

**गुरु**—क्रोधचसा काय, पण आणखी लोभ, मोह वगैरे सहा प्राणिमात्राचे शत्रु आहेत. पण हे सर्व कामाचेच अवतार आहेत. इच्छा किंवा वासना यांच्या आड कोणी आलें, तृष्णाविघात झाला कीं हे कामाजीपंतच क्रोधाचें स्वरूप धारण करितात; म्हणून काम हाच क्रोध असें समज. भगवंतांनीं एकवचनी शब्दाची योजना केली आहे ती येवढ्याचसाठीं कीं, प्राणिमात्राच्या प्रवृत्तींतील सर्व व्यवहार व विशेषतः पापमूलक व्यवहार या कामापासून उत्पन्न होतो हेंमुमुक्षूंस

समजावें. या पापाचें मूळ, उत्पत्तिस्थान, रज आणि त्याचे गुण आहेत. राजसगुणामुळें इच्छा उत्पन्न होते. मायेच्या घरच्या विचित्र खेळ कसा आहे पहाः—या कामापासून, अनावर तृष्णेपासून, रजोगुणाचा उद्भव होतो ! ह्मणजे वासना उत्पन्न झाली असतां पुरुषाच्या, प्राण्याच्या, मनांत रजोगुणाचें प्राबल्य होऊन तो प्राणी कर्म करण्यास प्रवृत्त होतो ! गुलामाच्या सेवेसारखीं नीच कर्मे करवयास लागलेलीं दुर्दैवी मनुष्यें 'आमची वासना अनावर, ह्मणून आम्हीं करूं नये तें करीत आहों' असा आक्रोश करितात तें नित्य आपल्या कानांवर येतेंच कीं नाहीं ?—सारांश, रजोगुण हा कामाचा पिता आणि काम हा रजोगुणाचा उत्पादक असा झालाच कीं नाहीं खेळखंडोबा ?—असो; हा काम, किंवा ही वासना कधींही तृप्त होणार नाहीं. वासना पूर्ण करायाला गेलें कीं ती वाढलीच ह्मणून समज. खावयाला घातलेला अग्नी जसा वाढतो तशीच कामचीही गति आहे ! ह्याची खळी ह्मणून कधीं भरावयाची नाहीं. हा अर्थातच दुष्ट कर्माचा प्रवर्तक होतो व याच्या नादीं लागलेले प्राणी पापकर्में करितातः यांत काय आश्चर्य आहे? ह्मणून भगवान ह्मणतात, बा अर्जुना ! संसारामध्यें याच्यासारखा दुष्ट शत्रु हाच, याची सर दुसऱ्या कोणाला यावयाची नाहीं—सारांश, यांच्याशिवाय शत्रुच नाहीं असें समज.

**मधु० व श्रीधर**—'**काममयोऽयं पुरुषः**' ( पुरुष उत्पन्न झाला, अथधा ब्रह्मापासून, पूर्णापासून सुटला, तो कामाच्या म्हणजे इच्छेच्याच योगानें होय )' अशा अर्थाच्या अनेक श्रुतींचें सार भगवंतांनीं या श्लोकांत आणून व हा काम रजोगुणात्मक आहे, तेव्हां सात्विक वृत्तीनें मात्र याचा निरास होईल असें सांगून भगवान पापप्रवर्तक अशा मुख्य कारणाचा निर्देश करितात. सामदामादिकांनीं याचा नाश होणें नाहीं हेंही महाशन इत्यादि विशेषणांनीं सांगितलें आहे. बाकी सर्वांचा सर्वत्र आचार्यानुवाद आहे.

**रामानुज व द्वैतवादी** यांत व **आचार्यमतांत** विरोध नाहीं.

**भीम०**—कामामुळें विवेकशून्यत्व येतें व मनुष्य पाप करितो; ह्मणून कामाचा त्याग करून धार्मिक स्वकर्म करावें.

**ज्ञानेश्वरांनीं** येथें फारच मनोहर विस्तार केला आहेः कामक्रोधांसंबंधें ह्मणतातः—हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरींचे वाघ । भजनमार्गींचे मांग । मारक ( मारेकरी ) जे ॥ हे देहदुर्गींचे धोंड । इंद्रियग्रामींचें कोंड ( गांवकुसूं ) ।

यांचें व्यामोहादिक ( अज्ञानादिक ) बंड (दळवाड ?, सैन्य ?) जगावरीं ॥.... धायपण ( दाईपणा ) ययांचें । अविद्या ( अविद्येनें ) केलें ॥....महापाप्मासंबंधें कविराज म्हणतातः—जेणें सत्याचा भोकसा काढिला । मग असत्य तृणकुटा ( गवताचा सांगडा ) भरिला । तो **दंभ** रूढविला । जगीं इहीं ॥ साध्वी शांती नागविली ॥ मग माया मांगी शृंगारिली । तियेकरवीं विटाळिलीं । साधुवृंदें ॥ इहीं विवेकाची त्राय ( आश्रयस्थान ) फोडिली । वैराग्याची साल काढिली । जितया मान मोडिली । उपशमाची ॥ इहीं संतोषवन खांडिलें । धैर्यदुर्ग पाडिले । आनंदरोप सांडिलें । उपडूनियां ॥ इहीं बोधाचीं रोपें लुंचिलीं ( तोडिलीं ) । सुखाची लिपीही( नांव सुद्धां )पुसिली । जिव्हारीं आगी सूदिली । ( घातली ) तापत्रयाची ॥....हे जळेंवीण बुडविती । आगीवीण जाळिती । न बोलतां कवळिती । प्राणियांतें ॥ हे शस्त्रेंवीण साधिती ( मारितात ) दोरें-वीण बांधिती । ज्ञानियासी तरी वधिती । पैज घेऊनि ॥ हे चिखलेंवीण रोंविती । पाशेंवीण गोंविती । हे कवणाजोगे न होती ( यांस उपमाच नाहीं !)। आंतुवटपणें ( अंतरवर्ती असल्याकारणानें, बळकटपणें.)आहे कीं नाहीं **ज्ञानाचें ऐश्वर्य** येथें ?

**पंडितांनीं** कामनाशाची एक खाशी तोड काढिली आहे ती ही कीं, मनुष्यास जन्माबरोबरच प्राप्त होणाऱ्या कामाची योजना परमेश्वरभक्तीकडे करून या कामरूपी कुऱ्हाडीनेंच विषयवनाचें खंडन करावें ! ईश्वरास अर्पण न केलेलीं सकाम कर्में ह्या व पुढील जन्मीं बद्धक होतात व ज्ञान झालें असलें तरी तीं भोग भोगण्यास लावितात.

**रंगनाथ** व **व्याख्याकार ज्ञानेश्वरांचे** मार्गानेंच गेले आहेत. ॥ ३७ ॥

कथं वैरीति दृष्टान्तैः प्रत्याययति—

**शिष्य**—आपण इतके निग्रहानें सांगत आहां, तेव्हां हा खरोखरच मोठा शत्रु असेल; पण मला त्याचें शत्रुत्व नीटसें समजलें नाहीं.

**गुरु**—नीटच आहे तुझा प्रश्न. ऐक—ह्या पुढील ३८ व्या श्लोकांत भगवंतांनीं दिलेल्या दृष्टांतांनीं तरी तुझी समजूत पडेल:—

**धूमेनाऽऽव्रियते वन्हिर्यथाऽऽदर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनाऽऽवृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥**

**यथा** (ज्याप्रमाणें) **धूमेन वह्निः आव्रियते** (धुराच्या योगानें अग्नी झांकला जातो) **च** (आणि) **मलेन** (धुराळ्यानें) **आदर्शः** (आरसा)—(बराच निरुपयोगी होतो)—किंवा **यथा** (ज्याप्रमाणें) **उल्बेन** (चर्मानें) **गर्भः** (गर्भ) **आवृतः** (आच्छादिला जातो) **तथा** (त्याप्रमाणें) **तेन** (कामानें) **इदं** (हें—ज्ञान—) **आवृतम्** (आच्छादून टाकिलें असतें.)—सारांश, धुराच्या योगानें तेजस्वी अग्नीचें दाहकत्व कमी होतें, किंवा धुराळ्यानें मळीण झालेल्या स्वच्छ आरशाचा पारदर्शकपणा बराच कमी होतो; किंवा वारेनें ज्याप्रमाणें उदरांतील गर्भ सर्वच्या सर्व झांकून जातो, तद्वतच या कामानें ज्ञानास लोपवून टाकिलें आहे.—

धूमेनेति । धूमेन सहजेनाऽऽव्रियते वह्निः प्रकाशात्मकोऽप्रकाशात्मकेन यथा वाऽदर्शो मलेन च यथोल्बेन गर्भवेष्टनेन जरायुणाऽऽवृत आच्छादितो गर्भस्तथा तेनेदमावृत्तम् ॥ ३८ ॥

अग्नीबरोबरच उत्पन्न होणाऱ्या तमोमय धुरानें जसें प्रकाशवंत अग्नीचें स्वरूपांत हिनत्व येतें, किंवा केरकचऱ्यानें अगर धुराळ्यानें स्वच्छ आरसा स्वरूप दाखविण्याच्या कामीं बराच निरुपयोगी होतो, किंवा गर्भाच्या सभोंवार असणाऱ्या वारेनें जसा गर्भ सर्वस्वीं आच्छादून टाकलेला असतो, त्याचप्रमाणें या दुष्ट कामानें ज्ञानास आच्छादून टाकिलें आहे.

**मधु०, द्विवेदी, पर्वते** ही मंडळी या श्लोकांतील दृष्टांतांची **अशी** व्यवस्था लावितातः शरीर उत्पन्न होण्याच्या अगोदर व अंतःकरणवृत्ति जन्मण्याच्या अगोदर सूक्ष्मरूपानें असणारा काम, शरीरारंभक, कर्मानें शरीर व अंतःकरण प्राप्त झाल्यावर, स्थूलरूप धारण करितो. यास दृष्टांत धुराचा. धूर अग्नीबरोबरच निर्माण होऊन अग्नीचें स्वरूप आच्छादितो तरी त्याची दाहकशक्ति कमी करीत नाहीं. असो; आतां कामास स्थूलतर स्वरूप प्राप्त झालें म्हणजे मळ चढलेला आरसा जसा प्रतिबिंब धारण करीत नाहीं तथापि प्रतिबिंबधारणशक्तीला सर्वथा आंचवत नाहीं, तशी ज्ञानाची स्थिति असते. कामाचें स्थूलतम स्वरूप म्हणजे ज्ञानाचें संपूर्ण आवरण होय. यास गर्भाचा व गर्भासभोंवतालच्या कातड्याचा दृष्टांत योग्यच आहे. सारांश, कामाच्या या तीन स्वरूपामुळें एकस्वरूपी ज्ञानासही मानवी ह्मणजे अपूर्ण दृष्टीनें वैचित्र्य येतें.

**शंकरानंद** अचेतनाचा चेतनावर कसा लेप चढतो हें दाखवितात. **श्रीधर, मधाकार** व **रामानुजाचार्य** यांचा अर्थ सरळ आहे.

**द्वैतवादी** 'अग्नी ह्मणजे परमेश्वर. आदर्श ह्मणजे अंतःकरण, गर्भ ह्मणजे जीव असें रूपक कल्पून, अग्नि स्वयंप्रकाश असतो तरी तो जीवास कामामुळें दिसत नाहीं, अंतःकरण परमेश्वरास पहात नाहीं व शास्त्राभ्यासानेंही जीवास ज्ञान होत नाहीं असे भेद सुचवितात.'

**पंडित**—'काम' = प्रारब्धामुळें उत्पन्न झालेली **वासना असा अर्थ** करून शमदमादिक फुंकाऱ्यानें अग्नि पेटवून धूर नष्ट करावा, आरसा घांसून स्वच्छ करावा असें ह्मणतात. गर्भास गर्भनाळ जसें आवश्य आहे, तसेंच जीवांबरोबर कर्म येणें सहज आहे. जन्म झाल्याबरोबर जसें नाळ छेदितात तसेंच भोग भोगून प्रारब्ध नष्ट करावें व नवीन कर्म परमेश्वरास समर्पण करावें. ॥ ३८ ॥

किं पुनस्तदिदंशब्दवाच्यं यत्कामेनाऽऽवृतमित्युच्यते—

**शिष्य**—भगवन्! वरील श्लोकांत 'हें' या अर्थीं शब्द आहे त्याचा आचार्यांनीं व आपण ज्ञान असा अर्थ केला तो कशावरून?

**गुरु**—ऐक त्याचें प्रमाण:—

## आवृत्तं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
## कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

**कौन्तेय** (कुंतीपुत्रा!) **ज्ञानिनः** (ज्ञानी लोकांचा) **नित्यवैरिणा** (रात्रंदिवस द्वेष करणाऱ्या) **एतेन कामरूपेण** (ह्या काम ह्मणजे इच्छा हेंच आहे स्वरूप ज्याचें अशा)—शत्रूनें—**ज्ञानं** (ज्ञान) **आवृतं** (झांकून टाकिलें आहे.)—हा कसा आहे? **दुष्पूरेण** (तृप्त होण्यास अत्यंत कठिण) **च** (आणि) ह्मणून **अनलेन** (अलं=पुरेंपणा, तो ज्याला नाहीं तो अनल ह्मणजे असंतुष्ट आहे.)—सारांश, ज्ञानी लोकांचा नित्य शत्रु, इच्छास्वरूपी, अतृप्त असंतुष्ट असा आहे. अशा या शत्रुनें ज्ञान झाकून टाकिलें आहे—ह्मणून पापाचरणाकडे मनुष्यें व प्राणी प्रवृत्त होतात.

आवृतमिति । आवृतमेतेन ज्ञानं ज्ञानिनो नित्यवैरिणा । ज्ञानी हि जानात्यनेनाहमनर्थे प्रयुक्तः पूर्वमेवेति । दुःखी च भवति नित्यमेव ।

ह्यसौ ज्ञानिनो नित्यवैरी न तु मूर्खस्य । स हि कामं तृष्णाकाळे मित्रमिव पश्यंस्तत्कार्यं दुःखे प्राप्ते जानाति तृष्णयाऽहं दुःखित्वमापादित इति न पूर्वमेवातो ज्ञानिन एव नित्यवैरी । किंरूपेण कामरूपेण काम इच्छैव रूपमस्येति कामरूपस्तेन दुष्पूरेण दुःखेन पूरणमस्येति दुष्पूरस्तेनानलेन नास्यालं पर्याप्तिर्विद्यत इत्यनलस्तेन ॥९

हा काम जो आहे तो ज्ञानी लोकांचा हाडवैरी आहे. कारण ज्ञानी पुरुषाला पूर्वीपासूनच ठाऊक असतें कीं ह्या कामानें, या इच्छेनें, मला अनर्थांत, अनात्मक ह्मणून मिथ्या संसारांत, ढकलून दिलें आहे; हें त्याला ठाऊक असतें ह्मणून तो सदैव दुःखी असून कामास आपला हाडवैरी समजतो. मूर्खाची गोष्ट तशी नाहीं. मनांत इच्छा उत्पन्न झाली कीं मूर्खास मोठा आनंद होऊन काम हा आपला खरा मित्र आहे असें त्या अज्ञान्यास वाटूं लागतें. झालें; पुढें या कामाच्या नादीं लागून फसला, दुःखांत पडला, म्हणजे मग पश्चात्तापानें डोळे उघडून ह्मणायाला लागतो कीं 'मला या वासनेनें दुःखांत नेऊन ढकलिलें !' या बिचाऱ्याला कामाची कुटिलता पूर्वीच समजत नाहीं. सारांश, तो नेहमीं कामास शत्रुत्वानें लेखीत नाहीं, ज्ञानी पुरुष मात्र तसें लेखीत असतो.

**शिष्य**—याचें स्वरूप तरी कसलें आहे ?

**गुरु**—अरे ! इच्छा हेंच याचें स्वरूप होय. या इच्छेची किंवा कामाची कधीं संतोषवृत्ति म्हणून असावयाची नाहीं. कधीं तृप्ति झाली असें वाटेल तर संतोष किंवा समाधान उत्पन्न होईल कीं नाहीं ? 'अलं' =पुरे असें हा कधीं म्हणावयाचा नाहीं ह्मणून यास अनल असें ह्मटलेंआहे.—अनल ह्मणजे अग्नी हा अर्थ तुला विदितच आहे. अग्नीचा संतोष कधीं झाला आहे असें तूं ऐकिलें आहेस ?

**मधु०, श्रीधर**—आचार्यानुगामी आहेत. '**न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्तते ॥**' (कामाची शांति उपभोगानें न होतां उलट तो तूप ओतलें जाणाऱ्या अग्नीप्रमाणें वृद्धिंगतच होतो.) ह्मणून त्याचे ठिकाणीं सर्वांनीं दोषदृष्टिच ठेवावी.

**मधुसू० द्विवेदी, रंगनाथः** 'ज्ञान' = अंतःकरण.

**प्रपा०**—शतपथांतील एक श्रुति देतात. 'काम हा दुःख देणारा आहे'

ह्याच अर्थ आहे. **शंकरा०** 'कामरूपेण' ( कामविषय हें प्रकट करण्याचें स्वरूप आहे ज्याचें असा काम, इच्छा. )

**रामा०**—विषयमोहाच्या रूपानें हा ज्ञान्यांचा वैरी आहे.

**द्वैत०**—'दुपूष्रेण = ज्याची तृप्ति करण्यासाठीं अत्यंत कष्ट भोगावे लागतात; तृप्ति झाली तरी पुनः कामोद्भव आहेच हें अनल शब्दानें सुचविलें. ज्ञान म्हणजे शास्त्रानें उत्पन्न झालेलें ज्ञान, पूर्ण साक्षात्काराचें नव्हे.

पंडितांचें व रंगनाथांचें हीं व्याख्यानें पंडितत्वास योग्य अशींच आहेत. ३९

किमधिष्ठानः पुनः कामो ज्ञानस्याऽऽवरणत्वेन वैरी सर्वस्यत्यपे—
क्षायामाह ज्ञाते हि शत्रोराधिष्ठाने सुखेन शत्रुनिवर्हणं कर्तुं शक्यत इति—

**शिष्य**—गुरुजी! ज्ञानावरही आवरण घालणारा, सर्व प्राणिमात्रांचा वैरी जो हा काम याचें राहण्याचें ठिकाण तरी कोणतें?

**गुरु**—कां रे? असें कां विचारतोस?

**शिष्य**—अशासाठीं, कीं या अनर्थकारी शत्रूचें स्थान समजलें म्हणजे त्याचें उच्चाटन किंवा हनन करण्यास सोयीचें पडेल नव्हे?

**गुरु**—होय, होय. शाबास! भगवंतांनीं हीच शंका अर्जुन घेईल म्हणून त्यानें विचारावयाच्या आधींच तुझ्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे.

## इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते॥
## एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥४०॥

**इन्द्रियाणि मनः बुद्धिः** ( सर्व इंद्रियें, मन आणि बुद्धि हीं ) **अस्य** ( या शत्रूची ) **अधिष्ठानं उच्यते** ( राहण्याची जागा आहे, असें म्हटलें आहे ) **एतैः** ( ह्यांच्या साहाय्यानें ) **एषः** ( हा काम ) **ज्ञानं आवृत्य** ( ज्ञानाला झांकून टाकितो--आणि--) **देहिनं** ( देही जो जीव त्याला ) **विमोहयति** ( अनेक प्रकारच्या मोहांत घालितो ) सारांश, आपलीं आश्रयस्थानें जीं मन, बुद्धीसह इंद्रियें, यांस वश करून घेऊन ह्यांच्या साहाय्यानें हा काम जीवाला भुरळ पाडितो.

इन्द्रियाणीति । इन्द्रियाणि मनो बुद्धिश्चास्य कामस्याधिष्ठान-
माश्रय उच्यते, एतैरिन्द्रियादिभिराश्रयैर्विमोहयति विविधं मोहयत्येष
कामो ज्ञानमावृत्याऽऽच्छाद्य देहिनं शरीरिणम् ॥४०॥

ह्या कामरूपी शत्रूचें आश्रयस्थान, निवासस्थान, कोणतें म्हणून विचारशील तर ऐकः आपलीं सर्व इंद्रियें, आपलेंच संकल्पविकल्पात्मक मन, आणि विषयाचा निश्चय करणारी आपलीच बुद्धि हीं सर्व या कामाचीं वसतिस्थानें आहेत. असो; या घरभेद्या व विषयव्यापार करणाऱ्या इंद्रियगणाच्या साहाय्यानें हा काम ज्ञानास आच्छादित करितो; ज्ञानास निःसत्त्व करितो आणि मग देहाभिमानी जीवाला हा नानाप्रकारें मोह घालून त्याचा नाश करितो. ज्ञानच निःसत्त्व झाल्यावर जीवाचा नाश होतो, हें नीटच आहे.

**यदा पञ्चवतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा** सह । **बुद्धिश्च न विचेष्टततामाहुः परमां गतिम्** ( जेव्हां पंचज्ञानेंद्रियें, यांचें फल व व्यापार मनासकट बंद होतील, बुद्धिही आपला व्यापार बंद ठेवील, तेव्हां मोक्षमार्ग मिळालाच ह्मणावयाचा. ) ह्या समर्थक श्लोकानें मूळ श्लोकाचा अर्थ दृढ होतो. विषयज्ञान होण्यास विषय, इंद्रियें, मन आणि बुद्धि यांची अत्यंत अवश्यकता आहे, याशिवाय दृश्यज्ञान ह्मणजे विषयज्ञान होणें नाहीं असा सिद्धांत गेल्या शतकांत प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कॅंट यानें काढिला त्याचा भगवद्वाक्याशीं किती तंतोतंत मेळ बसतो तो पहा.

**अद्वैतवादी आचार्यां**नुगामी आहेत.

**रामानुजा**०—हें 'देहिनं=' देह धारण करणारे ज्ञानी व अज्ञानी या सर्वांचा अंतर्भाव करितात.

**द्वैतवादी** सरळ अर्थच करितात. **राघवेंद्रयति** मात्र 'उत्पन्न होणारें **ज्ञान** प्रतिबद्ध करून किंवा झालेल्या ज्ञानाला कार्य करण्यास असमर्थ करून प्राण्यास मोहांत घालितो' असा व 'ज्ञान स्वयंभू नाहीं, उत्पन्न होतें' या अर्थाचा प्रस्तव करणारा भांडखोर अर्थ करितात.

**पंडितही** देही शब्दांत ज्ञानी व अज्ञानी यांचा अंतर्भाव करून ज्ञानी लोकांस मोह होतो तो केवळ भोगकाळीं त्यांची ब्रह्मैक्यात्मबुद्धि नष्ट होते ह्मणून होतो असें म्हणतात.

इच्छा उत्पन्न झाल्यावर इंद्रियें विषयांचें दर्शन घेतात, किंवा इंद्रियांनीं विषयग्रहण केल्यावर काम उत्पन्न होतो हा एक मजेचा प्रश्न **रंगनाथांनीं** काढिला आहे.

**व्याख्याकार**—'त्रिगुणात्मक माया असतांना तिची रजावर व तमावर इतकी भक्ति कां, व सत्त्वावर मुळींच कां नाहीं? याचें कारण इतकेंच कीं, रजानें व तमानें प्रपंच वाढतो, सत्वानें प्रपंचाचा नाश होतो ह्मणून मायेचे आवडते गुण रज आणि तम होत ॥ ४० ॥

यत एवम् —

हीं कामाचीं आश्रयस्थानें आहेत म्हणून:—

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ॥**
**पाप्मानं प्रजहिह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

**तस्मात्** ( ह्मणून ) **आदौ** ( प्रथमतः ) **इन्द्रियाणि नियम्य** ( इंद्रियांचें संयमन करून, इंद्रियें स्वाधीन करून घेऊन ) **भरतर्षभ** ( भरतकुलांतील पुंगवा! श्रेष्ठ पुरुषा! अर्जुना! ) **ज्ञानविज्ञाननाशनं** ( ज्ञानाचा व विज्ञान ह्मणजे स्वानुभव त्याचा, नाश करणाऱ्या ) **एनं** ( ह्या ) **पाप्मानं** ( पापप्रवर्तक दुष्ट शत्रूस ) **प्रजहिहि** ( सर्वथा टाकून दे )---सारांश, अर्जुना! प्रथमतः तूं आपलीं इंद्रियें आपल्या स्वाधीन करून घे आणि नंतर ह्मणजे कामाचीं आश्रयस्थानें काबीज करून घेतल्यानंतर या दुष्ट, व ज्ञान आणि स्वानुभव यांचा नाश करणाऱ्या महाशत्रूस हद्दपार करून टाक. त्याचें पुनः नांव ऐकावयास येणार नाहीं, इतका लांब त्यास झुगारून दे.—

तस्मादिति । तस्मात्वमिन्द्रियाण्यादौ पूर्वं नियम्य वशीकृत्य भरतर्षभ पाप्मानं पापाचारं कामं प्रजहिहि परित्यज एनं प्रकृतं वैरिणं ज्ञानविज्ञाननाशनं ज्ञानं शास्त्रत आचार्यतश्चाऽऽत्मादीनामवबोधः, विज्ञानं विशेषतस्तदनुभवस्तयोर्ज्ञानविज्ञानयोः श्रेयःप्राप्तिहेतोर्नाशनं प्रजहिह्यात्मनः परित्यजेत्यर्थः ॥ ४१ ॥

ह्मणून हे भरतकुलश्रेष्ठा! प्रथम तुला या इंद्रियांचें दमन केलें पाहिजे. हीं आपल्या स्वाधीन करून घेतलीं‌स ह्मणजे कामाचा आश्रय नाहींसा होईल; त्याला राहण्याला ठिकाणच मिळणार नाहीं. ह्मणून मोह होण्याच्या पूर्वींच, प्रथमतःच इंद्रियांस वश करून घे. नंतर या कामाला दूर टाकून दे; सर्वथा त्याचा त्याग कर. हा महादुष्ट आहे. हा शत्रु मोठा अनर्थ करणारा आहे.

**शिष्य**—अनर्थ कसला?

**गुरु**—अरे! ज्ञानविज्ञानाचा नाश करणें हा काय लहान अनर्थ आहे? या विश्वांत तसा दुसरा अनर्थ होणें शक्यच नाहीं.

**शिष्य**—भगवन्! ज्ञानविज्ञान तें काय?

**गुरु**—वत्सा! वेदांतशास्त्राच्या अर्थपूर्वक पठणानें व गुरूचा अनुग्रह होऊन त्यांनीं वरदहस्त मस्तकीं ठेविला ह्मणजे आत्म्याचें जें परोक्षज्ञान होतें त्यास ज्ञान म्हणतात. आणि गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें व वेदांतपठणाच्या मननानिदिध्यासानें जें अपरोक्ष ज्ञान होतें, जो स्वानुभव होतो, ब्रह्म आणि आत्मा एकच असें जें स्वानुभवाचें विशेष ज्ञान होतें, त्यास विज्ञान म्हणतात. समजलें? या ज्ञानविज्ञानांचा, व मुक्ति देणाऱ्या कारणांचा नाश करणारा जो शत्रु काम त्याला झुगारून दे. 'त्याचा नाश कर, कारण तो ज्ञानविज्ञानांचा नाश करितो हें प्रसिद्धच आहे,' असाही कोणी अर्थ करितात.—

**मधु०, श्रीधर, शंकरानंद, द्विवेदी, पर्वते, ज्ञानेश्वर, पंडित, रंगनाथ**—'येथें इंद्रिय शब्दानें सर्व इंद्रियें, मन व बुद्धि, यांचा संग्रह करावा, किंवा मन व बुद्धि, इत्यादिकांचे व्यापार इंद्रियाशिवाय होत नाहींत, म्हणून इंद्रियांचें दमन केलें ह्मणजे अर्थात् मन व बुद्धि यांचेंही दमन होतें. (पहा श्लोक ६।७ अध्याय ३.) असा अर्थ करितात.

**प्रपाकार**—सरळ अर्थ करितात.

**द्विवेदी** म्हणतात कीं, 'येथें ब्रह्मज्ञानाचाही नाश करणारा काम आहे, असें सांगितलें आहे; तें केवळ कामाचें शत्रुत्व पूर्णत्वानें प्रकट व्हावें एतदर्थ सांगितलें आहे; वस्तुतः ब्रह्मज्ञानाचा नाश करण्याचें सामर्थ्य कामामध्यें नाहीं.'

**रामानुजः**—'सर्व इंद्रियांचा उपशम करून, त्यांस स्तब्ध करून, ज्ञानयोगास आरंभ केला असतां ज्या अर्थीं काम हा अनेक विषय पुढें आणून पुरुषास आत्मज्ञानविमुख करितो, त्या अर्थीं प्रकृतीच्या संसर्गांत राहणाऱ्या अर्जुना! कर्मयोगामध्येंच राहून तूं इंद्रियांचें नियमन कर आणि मग ज्ञानाचे पाठीमागें लाग. सारांश, कर्मयोगासह ज्ञानयोग साधण्यासाठीं तूं इंद्रियदमन कर.'

**द्वैतवादींपैकीं राघवेंद्रयति** ह्मणतातः—'तूं इंद्रियांस विषयांकडे जाऊं देऊं नको, दिलें तरी विषयांचा व मनोबुद्धीचा संगम होऊं देऊं नको, संगम झाला तरी मनोबुद्धीमध्यें क्षोभ उत्पन्न होईल, असें करूं नको.'

**गीतान्वयाख्याकार**—' इतर विषयांकडे इंद्रियांस जाऊं न देतां परमेश्वरार्पण बुद्धीनें तरी स्वधर्माचरण कर ह्मणजे क्रमाक्रमानें इंद्रियांचा उपशम होईल.' परमेश्वरार्पण बुद्धीनें तरी स्वधर्म आचरावा. यांत इच्छा-' थोडी कां होईना ' पण-आहेच. तिचा उपशम ब्रह्मसाक्षात्कार झाल्यावरच होतो. ॥४१॥

इन्द्रियाण्यादौ नियम्य कामं श० जहिहीत्युक्तं तत्र किमाश्रयः कामं जह्यादित्युच्यते—

**शिष्य**—इंद्रियादिकांचा प्रथमतः निग्रह करून काम नांवाच्या शत्रूस सोडून दे किंवा मारून टाक असें सांगितलें; त्यास कोणाचा आश्रय घेऊन कोणाचें साहाय्य घेऊन, या कामाला हद्दपार करावें बरें?—**मपाकार** व **श्रीधर**—म्हणतातः--इंद्रियें, मन, बुद्धि हीं कामाकडचींच आहेत; ह्मणून त्यांपेक्षां निराळ्या बलवत्तर वस्तूचा आश्रय हवा आहे.'

**गुरु**—भगवान सांगतात तें ऐकः—

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

**इन्द्रियाणि** ( इंद्रियें, सर्व इंद्रियें ) **पराणि** ( श्रेष्ठ—आहेत असें )—**आहुः** ( म्हणतात ) **इन्द्रियेभ्यः** ( त्या इंद्रियांपेक्षां ) **मनः परम्** ( मन हें श्रेष्ठ आहे ) **तु** ( परंतु ) **मनसः परा बुद्धिः** ( या मनापेक्षांही बुद्धि श्रेष्ठ आहे )—आणि--**यः** ( जो ) **बुद्धेः परतः** ( बुद्धीपेक्षांही श्रेष्ठ आहे ) **सः** ( तो-आश्रयाला घे-). सारांश, रूप, रस, गंध इत्यादि विषयांपेक्षां इंद्रियें श्रेष्ठ आहेत; त्यांच्यापेक्षां मन श्रेष्ठ आहे, मनापेक्षां बुद्धि श्रेष्ठ आहे, पण बुद्धिपेक्षां जो श्रेष्ठ आहे, सारांश श्रेष्ठतम आहे त्याचा आश्रय करून कामाला सोडून दे ह्मणजे मारून टाक.—

इन्द्रियाणीति । इन्द्रियाणि श्रोत्रादीनि पञ्च देहं स्थूलं बाह्यं परिच्छिन्नं चापेक्ष्य सौक्ष्म्यान्तरस्थत्वव्यापित्वाद्यपेक्ष्य पराणि प्रकृष्टान्याहुः पण्डिताः । तथेन्द्रियेभ्यः परं मनः संकल्पविकल्पात्मकम् । तथा मनसस्तु परा बुद्धिर्निश्चयात्मिका । तथा यः सर्वदृश्येभ्यो बुद्ध्यन्तेभ्योऽभ्यन्तरोऽयं देहिनमिन्द्रियादिभिराश्रयैर्युक्तः कामो ज्ञानावरणद्वारेण मोहयतीत्युक्तं स बुद्धेर्द्रष्टा परमात्मा ॥ ४२ ॥

विद्वान पंडित असें ह्मणतात कीं, इंद्रियें हीं देहापेक्षां श्रेष्ठ आहेत.

**शिष्य**---कां बरें ?

**गुरु**---स्पष्टच आहे. देह स्थूल आहे, बाह्य ह्मणजे नेहमीं विषयरूपानें राहणारा आहे आणि शिवाय 'अमुक एक जागा व्यापणारा' असा परिच्छिन्न ह्मणजे मर्यादित आहे. पण इंद्रियें म्हणजे कर्णनेत्रादि पांच इंद्रियें हीं सूक्ष्म आहेत, आंत राहणारीं ह्मणजे विषयांस पाहणारीं आहेत आणि शिवाय सर्व विषयांस व्यापणारीं अशीं आहेत. तेव्हां स्थूलापेक्षां सूक्ष्म श्रेष्ठ, विषयांपेक्षां विषयद्रष्टा श्रेष्ठ व परिच्छिन्न आणि व्यापिलेल्यापेक्षां अनंत व व्यापक श्रेष्ठ म्हणून ज्ञानाचीं जीं साधनें इंद्रियें हीं, जड जे विषय त्यांपेक्षां श्रेष्ठ आहेत हें म्हणणें सयुक्तिक व शास्त्रानुकूलच आहे. आतां इंद्रियें विषय ग्रहण करितात; मात्र तो विषय काय आहे ह्याचा विचार करण्याचें अगर त्याच्या संबंधानें काल व आकाश यांचा निश्चय करावयाचें काम मनाकडे आहे. विषयग्रहण होत असतांनाच मन काय करितें तें ऐक; तो विषय अमुक असावा, अमुक नसावा, असा विचार करण्यास व असे संशय घेण्यास तें मन सुरवात करितें. ह्मणून विषयज्ञान ठरविण्याच्या तयारीला लागणारें जें मन तें विषयग्राहकांपेक्षां श्रेष्ठ असलेंच पाहिजे. समजतें आहेना ? आणि पुनः बुद्धि जी आहे ती, हा विषय अमुकच आहे असें निश्चयानें ठरविते--किंवा त्या विषयासंबंधानें सिद्धांत सांगूं लागते--म्हणून ती बुद्धि संकल्प करणाऱ्या मनापेक्षां श्रेष्ठ आहे. शिवाय मनाला पाहणारी किंवा मनाचें काम पाहणारी बुद्धिच आहे: ह्मणून ती श्रेष्ठ होय. तसेंच आत्मदृष्टीनें पाहिलें असतां मन जसें इंद्रियांच्या आलीकडचें आहे, तशीच बुद्धिही मनाच्याही आलीकडची आहे. आतां बुद्धीचा द्रष्टा व विषयांपासून तों थेट बुद्धीपर्यंत आणि बुद्धीसुद्धां सर्व विषयांचा ह्मणजे दृश्यांचा जो द्रष्टा आत्मा तो या सर्वांच्या आलीकडे असला पाहिजे आणि तोच सर्वांत श्रेष्ठ असला पाहिजे. हा सर्वांचा द्रष्टा जो आत्मा त्यासच देही ह्मणतात. यालाच कामाख्य शत्रु मोहीं पाडितो.

**शिष्य**--तो कसा ?

**गुरु**---अरे, मागें सांगितलें ना ? इंद्रियें, मन, बुद्धि यांचा आश्रय घेऊन हा काम जो आहे तो उपाधिविशिष्ट आत्म्यास ह्मणजे जीवास स्वस्वरूपाचा विसर पाडून,--ज्ञानावरच एक आपण निर्माण केलेलें झांकण घालून--जीवास

( ६ ) अध्यायाच्या शेवटीं अर्जुनानें प्रश्न विचारला आहे तो अत्यंत महत्वाचा होय. ' महाराज ! ' अर्जुन ह्मणतो, ' अधिकार नसतांनाही आपल्यास अधिक कांहीं असावें असें मनुष्यास कां वाटतें व पापकर्म करण्यास, अयोग्य कर्म करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो तो कां बरें? . सारांश, पापप्रवृत्तीचा उदय कोठें व कसा होतो ? ' अशा अर्थाचा हा प्रश्न आहे. सर्वदयाघन, सच्चिदानंद, सर्वशक्ति आणि सर्वज्ञ प्रभूनें जर हें विश्वचक्र निर्माण केलें आहे तर येथें ह्मणजे परमेश्वरसत्तेनें चाललेल्या या लोकीं पापाचा, दुःखाचा, प्रादुर्भाव कसा होतो ही शंका चार्वाकादि, मिल्ल, हकसले-प्रभृति नास्तिकांसच आली होती, असें नाहीं; तर मोठमोठ्या धर्मश्रद्धालु भक्तशिरोमणींस व सामान्य मनुष्यासही केव्हां केव्हां अज्ञानानें असली शंका उत्पन्न होते. पुष्कळ वेळीं व विशेषतः संकटकाळीं आपणही परमेश्वरी दयेच्या, परमेश्वरी शक्तीच्या अगर परमेश्वरी ज्ञानाच्या संबंधानें साशंक होतों व ' तो आहे कीं नाहीं याची पडली आम्हां भ्रांति । ' अशी आपली मनःस्थिति होते. अतएव हा विषय अत्यंत महत्वाचा आहे. पापाच्या उद्भवाची व पापनाशक मार्गाची योग्य समजूत पडून ज्ञानानुरूप शुद्ध आचरण झालें तर दुःखविमोचन होईल असें मला वाटतें म्हणून या विषयास अत्यंत महत्व आहे असें मी ह्मणतों.

भगवंतांनीं ३४ व्या श्लोकांत या प्रश्नास आगाऊ उत्तर सुचविलें आहे, तथापि, प्राकृत जनास बालबोधपणानें हा विषय कळावा ह्मणून अर्जुनाकडून पृच्छा करवून भगवंतांनीं ३७ ते ४३ श्लोकांत या प्रश्नास यथास्थित उत्तर दिलें आहे. भगवान काय म्हणतात त्याचा सारांश देण्याच्या अगोदर ३४व्या श्लोकांत अंतर्भूत असलेली एक गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे: ती ही कीं, आपलें स्वतःचें कल्याण करून घेण्याचें प्रत्यक्ष सामर्थ्य सर्वशक्ति प्रभूनें मनुष्यकोटीस मात्र दिलें आहे. आपल्यास वर्तनस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य आहे ह्मणूनच पाप, पुण्य, सुख, दुःख इत्यादि शब्दांस सार्थकत्व येतें. स्वातंत्र्यच नसतें तर हे शब्द अर्थशून्य झाले असते. चांगल्या मार्गानें जावें हें कळत असतां व त्या मार्गानें जाण्याचें सामर्थ्य असतांही जर एखादा मनुष्य विपथगामी झाला तर तो पुरुष पाप करितो असें होतें. दुसरा मार्ग ठाऊक नाहीं व ठाऊक असला तरी त्या मार्गानें जाण्याचें सामर्थ्य नाहीं, असें असेल तर सर्वथा पराधीन

पुरुष पापकर्म करितो असें ह्मणतां यावयाचें नाहीं. दोन वर्षांच्या मुलानें पीठ सांडलें तर आपण त्यास शिक्षा करीत नाहीं याचें इंगित तरी हेंच होय. असो; तेव्हां मनुष्यास थोडेंबहुत स्वातंत्र्य आहे हें लक्षांत ठेवून आपण भगवन्मीमांसेचा विचार करूं.

आपली योग्यता असेल तिच्यापेक्षां जास्त अधिकाराची, जास्त सुखाची आशा करणें याचें नांव काम होय. ही आशा उत्पन्न होऊन ती साध्य करण्यासाठीं जो उद्योग होतो, तो पापात्मक आहे. दैवयोगानें असल्या प्रसंगीं आपले हेतु सिद्धीस गेले तर आपण उन्मत्त होतों आणि उलटपक्षीं आपण संतप्त होतों. योग्य गुण असल्यानंतर जें सुख, जे अधिकार, जी जबाबदारी आपले नैसर्गिक गुणांस उन्नत करिते, तीच सुखादिक सर्व मालिका योग्यता नसेल तर पापात्मक होते ह्मणजे सुखप्राप्तीसाठीं आपले प्रयत्न होतात ते अन्यायमूलक होतात. सद्गुणांचा अंगीकार करून घेऊन नंतर सद्विकारासाठीं प्रयत्न करणें हा योग्य मार्ग सोडून देऊन योग्यता नसतां 'मी मोठा आहें' व 'मला सर्व करितां येतें' अशा वृथा गर्वानें आभाळास हात लावण्याचा प्रयत्न करणें हें पापात्मक होय. पण मानवी आशा आणि मानवी मत्सर हीं दुर्निवार आहेत, सुखाची आशा प्राणिमात्रास असतेच; पण मानवी प्राण्याची ही आशा प्रबळ असून तिच्याबरोबरच विचार करण्याचें प्रगल्भ सामर्थ्य व वर्तनस्वातंत्र्य ह्या दोन गोष्टी सर्वज्ञ प्रभूच्या ईशसत्तेनें मनुष्याला प्राप्त झाल्या आहेत. हें स्वातंत्र्य आहे ह्मणून त्याचा जर अत्याशेनें आपण दुरुपयोग केला तर पापप्रवृत्ति होते, आपल्या योग्यतेनुसार जें आपल्यास मिळण्यासारखें आहे, त्यावर संतुष्ट होऊन योग्यतेनुसार कर्म करण्याचें सोडून देणें आणि आपल्या अधिकाराबाहेरच्या वस्तूंचा अभिलाष करणें व ज्याजवळ त्या वस्तु असतील त्याच्याविषयीं संतापपूर्वक मत्सरभाव धरणें या मनोवृत्तींमुळें पापाचा उद्भव होतो. सारांश, आपल्या हितासाठीं ज्या स्वातंत्र्याचा मनुष्यास लाभ झाला, त्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग करण्याची दुर्बुद्धि त्यास उत्पन्न होते! ही व्यर्थ अभिमानामुळें व विषयवासनेपासून होते. विषयापासून निवृत्त होण्यासाठीं जें स्वातंत्र्य आम्हांस मिळालें आहे, त्याचा उपयोग आपण अयोग्य विषयप्राप्तीकडे करितों! ही अत्याशा, किंवा अज्ञानापासून उत्पन्न झालेले हे कामक्रोध, मनुष्याचे शत्रु आहेत.

या कामक्रोधांची तृप्ति करण्यासाठीं अनंत विषयांचा होम केला तरी यांची तृप्ति होणार नाहीं! या कामक्रोधांमुळें ज्ञान नष्ट होतें. सारांश, सर्वपरीनें अनर्थास कारण होणारे हे कामक्रोधादिक षड्रिपु आहेत. आपण होऊन यांच्या स्वाधीन जीव झाला ह्मणजे जीवयात्रा कधीं संपावयाचीच नाहीं! पण ह्यांस आपल्या स्वाधीन ठेविलें तर अज्ञानी जीव ही जीवन्मुक्त होऊं शकेल. तेव्हां पाप करण्यास प्रवृत्त करणारे कोण, याचें उत्तर असें आहे कीं 'अयोग्य वस्तूची प्राप्ति करून घेण्याचा अभिलाष धरून तदर्थ प्रयत्न करण्यास लावणारे कामक्रोध ( अथवा एकटा कामच ) पापप्रवर्तक आहेत.' हे उत्पन्न होतात याचें कारण आपल्यास मिळालेल्या विचारस्वातंत्र्याचा अभिमानकृत व वासनाकृत दुरुपयोग हें होय. अधिकाराप्रमाणें आचरण ठेवणें व अधिकाराची वृद्धि करून नंतर श्रेष्ठप्रतीचें कर्म करणें यासाठीं विचारस्वातंत्र्य व वर्तनस्वातंत्र्य लब्ध झालें त्याचा आपल्या दुराशेनें विपरीत भाव करून अधिकार नसतां श्रेष्ठमार्गानें जाण्याची हांव धरणें व हांवेनुसार अत्याचार करणें ह्याचें नांव पाप होय. सारांश, विपरीत आशा म्हणजेच पापजननी होय. ह्या बाईचीं वसतिस्थानेंही अनेक आहेत. ही बाई इंद्रियांचे ठिकाणीं राहून आपल्या स्थूल देहाचें मातेरें करिते; मनाचे ठिकाणीं वास्तव्य करून लिंगदेहास बिघडविते आणि बुद्धीचे ठिकाणीं राहून कारणशरीराची घडी विसकटिते. प्रत्येक मानवास तीन देह अगर वेदांतपद्धत्यनुसार तीन दृश्य आत्मे आहेत. स्थूलात्मा, लिंगात्मा आणि कारणात्मा असे हे तीन आत्मे होत. या उत्तरोत्तर श्रेष्ठ अशा तिन्ही आत्म्यांचा नाश एका अत्याशेनें, अमर्याद आशेनें होतो. उपभोगाच्या आशेनें, प्रथम इंद्रियें ह्मणजे स्थूलात्मा, मग मन ह्मणजे लिंगात्मा व पुढें बुद्धि ह्मणजे कारणात्मा हे पतित होतात. ह्मणून आशेचा त्याग करणें हें समंजस पुरुषाचें प्रथम कर्तव्य आहे. प्रथम इंद्रियदमन, पुढें मनोनिग्रह व नंतर बुद्धिस्थैर्य हे आशेच्या नाशाचे मार्ग आहेत. आशा नष्ट झाली ह्मणजे कर्मबुद्धीचा अथवा उन्नतस्थितीचा नाश होईल अशी भीति बाळगावयाचें कारण नाहीं. कारण गुणानुसार आपली योग्यता ठरतच असते; आणि योग्यतेप्रमाणें फलही येथें किंवा अन्यत्र मिळतच असतें. तेव्हां निर्विकार असें जें आपलें स्वस्वरूप तिकडे दृष्टि ठेवून क्रमाक्रमानें आपली सात्विक योग्यता वाढवावयाची, आ-

पल्या अधिकाराचा व योग्यतेचा कधींही अतिक्रम करावयाचा नाहीं, असा निश्चय ठेवून वर्तन चालविलें असतां या पापोत्पादी आशाराक्षसीचा संहार होऊन आपलें स्वस्वरूप आपल्यास प्राप्त होईल यांत शंका नाहीं. परमेश्वराचाही हाच संकल्प आहे. स्वातंत्र्य देऊन अधिकार, योग्यता, वाढविणें हें एक परमेश्वरास मात्र शक्य आहे. आपल्यास स्वातंत्र्य दिलें आहे व पुनः मोहही ठेविले आहेत, त्यांचा हेतु आपण शुद्ध, निर्लेप व पूर्ण व्हावें असा आहे. हा हेतु ज्यांस समजत नाहीं, तेच नास्तिक होत. असो; भगवंताप्रमाणेंच ख्राइस्ट, सेंटपाल, कांट, हेगेल इत्यादिकांचाही हाच अभिप्राय आहे हें तीन हजार वर्षांपूर्वीं 'अवतीर्ण' केलेल्या गीताकारांस केवढें भूषण आहे? (पहा म्याकेंझीकृत नीतिसार Mannual of Ethics; Makenzie ).

सारांश, स्वातंत्र्यचा सदुपयोग केला ह्मणजे आपलें कर्म निष्काम होऊन आपलें निजरूप आपल्यास सांपडतें व आपल्या आचरणानें इतर लोकांचाही उद्धार होतो. पण जर आपण त्या स्वातंत्र्याचा दुरुपयोग केला तर आपण आपल्या अनुयायांसह पतित होऊन संसारचक्रांत सांपडतों व शेवटीं जडस्थितीस जातों. भगवंतांनीं सहाव्या अध्यायाच्या पांचव्या श्लोकांत हेंच सांगितलें आहे. 'तुला स्वातंत्र्य दिलें आहे; तरून जाणें किंवा बुडणें हें तुझ्या हातांत आहे.' हेंच या अध्यायाचें सार होय.

याप्रमाणें तिसऱ्या अध्यायांत स्वसुखवादी (Egoists) सकाम याज्ञिक, कर्मठ, उपासक व लोकसंग्राहक Ulilitarians इत्यादि नीतिमार्गांचा येथें विचार केला. स्वसुखवादानें मनुष्यास शुद्ध सुख मिळत नाहीं व पूर्णत्व येत नाहीं. सकामकर्मानें चित्तशुद्धि होत नाहीं आणि लोकसंग्रहापुरतेंच निष्काम कर्म केलें तरी मुक्ति मिळत नाहीं, असें सांगितलें. खरी चित्तशुद्धि करून अद्वैतज्ञानाचा बोध झाल्याशिवाय मोक्ष नाहीं ह्या सिद्धांतास अनुलक्षून अनेकविध कर्मांचा विचार केला व कर्मास लागणारें स्वातंत्र्य मनुष्य प्राण्यास मिळालेलें आहे असें सांगून पापबुद्धिही स्वातंत्र्यापासूनच उत्पन्न होते, तेव्हां मुमुक्षूनें सावध राहून प्रकृतीहून पलीकडे असणारें जें नित्य, शुद्ध व पूर्ण असें आत्मस्वरूप तिकडे दृष्टि ठेवावी व निवृत्तिमार्गानें जावें अशी सूचनाही देऊन ठेविली; सारांश, सुखकारी कर्म पापात्मक आहे, सकामकर्म प्रपंचांत

घालणारें आहे, लोकसंग्रहाचें निष्कामकर्म चित्तशोधक आहे, परमेश्वरार्पित कर्मानें विश्वस्वरूप प्राप्त होऊन पापाचें निर्मूलन होतें व ज्ञानविज्ञानास अधिकार पोहोंचतो हें या अध्यायाचें तात्पर्य होय. विज्ञान संपादन करण्यापूर्वी हीं कर्में आहेत हें सांगावयास नकोच.

असो; या विवेचनावरून सुखवाद ( मग तें सुख स्वतःचें असो, वा इतरांचें असो, ) खरें सुख देण्यास असमर्थ आहे, कर्तव्यप्रीत्यर्थ कर्म करणें ह्यानें चित्तशोधन मात्र होतें, खरें सुख प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर अद्वैत-सिद्धांतांचें श्रवण, मनन, करून निदिध्यास व गुरूपदेशासह परमेश्वरी अनुग्रह संपादन केला पाहिजे, व पुढें साक्षात्कार होईपर्यंत हा अभ्यास चालविला पाहिजे हें जर लक्ष्यांत येईल, तर इतर धर्मांपेक्षां अद्वैतधर्म श्रेष्ठ आहे व इतर नीतिवादांपेक्षां आमचे धर्मशुद्ध नीतिसिद्धांत श्रेष्ठ आहेत ही समजूत दृढ होईल.

चवथ्या अध्यायांत कर्मांची मीमांसा, आध्यात्मिक यज्ञयाग इत्यादि मनोरंजक विषय येणार आहेत असें सांगून, सर्व जगास संमत होतील अशा नीतितत्वांचा बोध तात्विक व सात्विक रीतीनें करणाऱ्या तिसऱ्या अध्यायाची रजा घेतों.

ॐतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु.

# व्यावहारिक उपसंहार

अथवा

## ( उपक्रांत वर्षाविषयीं दोन शब्द. )

आज माझ्या 'श्रीमद्भगवद्गीतेला' पहिलें वर्ष संपून दुसरें वर्ष लागलें! गीतेसारख्या त्रिभुवनसुंदरीचा अवतार लोकांचा उद्धार करण्यासाठीं आहे, तेव्हां जन्मोत्सवाप्रमाणेंच दुसऱ्या वाढदिवसाच्याही वेळीं अर्थातच ज्ञानी व सामान्य लोकांच्या मनाला औत्साहिक प्रेमाचें भरतें येऊन जिकडे तिकडे आनंदामृताचा वर्षाव व्हावयाचा हें सहज आहे. परंतु 'ज्याचे अंगीं थोरपण। तया यातना कठीण' या व्यावहारिक नियमान्वयें, तत्वाविवेचन करणाऱ्या ईश्वरनिर्मित गीताशास्त्राचें उद्घाटन करूं इच्छिणाऱ्या प्रस्तुत लेखकाच्या अल्पबुद्धि मानवी मनाला त्रिविधतापांचे अनेक तडाखे बसल्यामुळें तेथें तत्त्व-विघातक चांचल्य केव्हां केव्हां उत्पन्न होतें व थोर आणि निर्विकारी गीताशास्त्रासही यातना होते त्याचा उल्लेख या मासिकपुस्तकासंबंधानें एक दोन शंकांचें निरसन व एकदोन किरकोळ गोष्टींचें दिग्दर्शन करून एकंदरींत वर्षाच्या व्यावहारिक कारभार आटपून टाकावा या उद्देशानें प्रकृत लेखास आरंभ केला आहे.

२. सन १८९७ सालापासून दुष्काळानें आणि अपूर्व ह्मणून अज्ञात व अद्यापपर्यंत ज्याचें किंचितहि निदान कळलें नाहीं अशा ह्या प्लेगरूपी महामरकीनें आमच्या महाराष्ट्रांत जो धुडकूस घातला आहे तो कांहीं पुसूं नये. केवळ पर्जन्यावरच अवलंबून राहणाऱ्या आमच्या अनाथ व संपत्तिहीन लोकांस अलीकडे दुष्काळाची चांगलीच ओळख झाली आहे. चारदोन वर्षांनीं हे पाहुणे हिंदुस्थानच्या कोणत्या तरी भागांत आपलें बिऱ्हाड आणून ठेवितातच. यांचें आदरातिथ्य करण्यासाठीं शेतकऱ्यांजवळ निदान एक वर्षाची तरी सामुग्री असावी अशाप्रीत्यर्थ राजा व प्रजा या उभयतांकडून बरीच खटपट झाली, पुष्कळ वाटावाट झाली, तथापि सरकारचा अखंड सारा आणि रयतेचें अज्ञानजन्य जन्मदारिद्य यांच्यामध्यें समीकरण होण्यासारखी तजवीज अजून उत्पन्न

न झाल्यामुळें अद्यापि मूळरोगावर रामबाण असें औषध लागू पडलें नाहीं. 'बुडत्याचा पाय खोलांत' या म्हणीस अनुसरून दिवसानुदिवस रयतेची व तिच्याबरोबरच सरकारचीही दैना जास्त वाढत चालली आहे; व दुष्काळ महाराज आपलें बिऱ्हाड कायमचेंच येथें ठेवितात व हिंदुधर्मच स्वीकारतात कीं काय ही भीति जास्तच दुणावत चालली आहे. इतक्यानेंही हिंदुलोकांच्या पूर्वपापाचा उलगडा होत नाहीं, असें समजूनच कीं काय कोण जाणे—पण आमच्या येथें पुष्कळच प्रेमबद्ध झालेल्या पटकीसही बरें म्हणविणाऱ्या एका अपूर्व रोगानें आपलें ठाणें १८९७ सालापासून महाराष्ट्रांत बसविलें आहे. या मूर्तिमंत, सर्वगामी, मृत्युरूपी राक्षसानें आजपर्यंत जितके बळी घेतले, तितके अठराव्या शतकाच्या अखेरीला यूरपखंडांत व हिंदुस्थानामध्यें जीं भयंकर रणकंदनें झालीं, त्यांतही इतके—बळी—मृत्युमहाराजांनीं घेतले नसतील! सारांश, आजमित्तीला तरी अकारण वाटणारा हा प्लेगजन्य मृत्यु अत्यंत निर्घृण आहे. गेल्या तीन वर्षांत यानें हजारों दांपत्यांची, मायलेंकरांची, पितापुत्रांची, इष्टमित्रांची ताडातोड केली आहे; कुटुंबपोषक कर्ता पुरुष गेल्यामुळें, संसाराची व्यवस्था सुरळीत ठेवणाऱ्या गृहिणीचा अंत झाल्यामुळें, सर्व संसारास आनंदाचें स्वरूप देणाऱ्या बालकांचा संहार झाल्यामुळें, उपयोगीं पडणारे मित्र नाहींतसे झाल्यामुळें, सदुपदेश करणारे, दान करणारे, समाजाची उन्नति करण्यास झटणारे अनेक राजमान्य व लोकमान्य सत्पुरुष अस्तंगत झाल्यामुळें, किती कुटुंबें उघडीं पडलीं, किती देशोधडीस लागलीं, किती नामशेष झालीं, किती अनाथ झालीं, समाजाचें किती परोपकारी बळ नष्ट झालें, व हा सर्व भीति व करुणा उत्पन्न करणारा असामान्य प्रकार अवघ्या तीन सालांत कसा घडून आला ह्याचें एखाद्या चतुर, सत्यप्रिय व सहृदय लेखकानें अक्षरी चित्र हुबेहुब रेखाटलें तर तें किती हृदयद्रावक व उद्वेगजनक होईल बरें? या मृत्यूच्या प्राणघातक 'हुतुतू' मध्यें देशाचें चालतें भांडवल किती नाहींसें झालें, व रसातळास गेलें, याचा अंदाज तरी करितां येईल काय? मृत्यूचा भयानक जबडा उघडलेला पाहून मरण येण्यापूर्वींच चिताग्नीनें हजारों वेळ मेलेल्या लोकांच्या अपरंपार काळजीचें व धसधसीचें कोणी तरी बरोबर गणित करूं शकेल काय? परमेश्वरा! इतकाही झालेला प्रकार पुरवता, मृत्यूच्या भयानें व सरकारच्या करुणाप्रेरित

दपटशहानें प्राप्त झालेला दारुण वनवासही पुरवता, पण या सर्वोपरी भयंकर महामारीनें गेल्या तीन वर्षांत हिंदुलोकांच्या अब्रूचें मातेरें करून त्यांचें काय-मचें भांडवल बहुतेक ठार केलें ही घोर हानि मात्र लवकर भरून येणें शक्य नाहीं असें वाटतें रे! देवा! काय आमची ही स्थिति! प्रसंग पडला म्हणजे स्वतःचें दुःखमय जीवित लांबविण्यासाठीं प्रत्यक्ष नवऱ्यानें आजारी बायकोस टाकावें, बायकोनें आजारी नवऱ्यास खोलींत कोंडून आपण पोबारा करावा, आईबापांचीं प्रेतें तशींच टाकून देऊन मुलांबाळांनीं पळून जावें, इष्टमित्रांस विचारूं नये, चहाड्या कराव्या, खोट्या गप्पा उठवाव्या वगैरे निव्वळ स्वदेहप्रीतीचे जे अनन्वित प्रकार घडून आले त्यांवरून एकमेकांमधील प्रेमबंधनें अद्यापि फारच ढिलीं आहेत असें उघड दिसून आलें आणि 'प्रसंगीं ज्याचा तोच' या प्रेमशून्य ह्मणण्याला दुजोरा आला ही गोष्ट फार वाईट झाली. पण याहीपेक्षां विशेष मातब्बरीची हानि ह्मणजे 'सर्वगामी व सर्वशक्ति' सरकारास आम्हांविषयीं जबरदस्त संशय आला हें होय. सभोंवार होत असलेल्या संहारानें सदैव अश्रु ढाळणाऱ्या लोकांच्या पाठीमागें सरकारी संशयाचा जेव्हां 'ससेमिरा' लागला, हजारों अब्रूदार गृहस्थांच्या निष्पाप कीर्तीचें मातेरें एका क्षणांत होण्याचा जेव्हां भया-नक रंग दिसूं लागला, दुबळ्या लोकांची दीन दैना विसरून जाऊन सर्वज्ञ सरकारास जेव्हां जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं सात्र लोकही शत्रु दिसूं लागले, तेव्हां प्रलयकालचाच दारुण समय ओढवून सर्व महाराष्ट्र देश व विशेषतः पुण्यनगरी आतां खास बेचिराख होणार असा दुर्धर प्रसंग येऊन ठेपण्याची भीति पडली यांत काय आश्चर्य आहे ?

३. परंतु आमचें सरकार शहाणें! सुतावरून स्वर्ग गांठणाऱ्या सरकारास लवकरच आपण साप साप ह्मणून दोरीसच व्यर्थ धोपटींत होतों, असा प्रत्यय आला व अभ्रानें आच्छादित झालेलें आकाश लवकरच ह्मणजे १८९९ सालच्या भयंकर प्लेगमध्येंही निर्मळ होईल असा संभव दिसूं लागला आहे! आमचे मराठी लोकही दमाचे! इतर राष्ट्रांतील कोणत्याही लोकांवर ही असली दारुण अनर्थपरंपरा कोसळून पडती तर खचित खचित त्या लोकांचा चुराडाच होऊन गेला असता; आह्मी मराठे लोकच म्हणून टिकलों. 'कसें तरी आपल्या साडे तीन हात देहाचेंच संरक्षण करावें' या समाजविध्वंसक स्वार्थासुरानें

जरी आम्हांस कांहीं वेळ सामाजिक मृत्यूकडे खेचीत नेलें तथापि १५००, १६००, १७०० व १८०० सालांप्रमाणें याही वेळीं थोर मनाच्या अनेक लोकांनीं अनेक प्रकारें दीन व दुबळ्या लोकांची कींव करून त्यांस यथाशक्ति मदत केली आणि परोपकारबुद्धि अद्यापि समूळ नष्ट झाली नाहीं असें दृष्टोत्पत्तीस आणलें आहे. गीताशास्त्रांत प्रणीत केलेल्या शुद्ध व सात्त्विक धर्मरूपी रत्नावर आमच्या आळसानें व अज्ञानानें जरी स्वार्थरूपी दुर्गंधी उकिरडा अवाढव्य माजला आहे, तरी भगवंतास आमची काळजी विशेष ह्मणून व या अदृश्य झालेल्या लुप्त धर्माला सुद्धां आमचें तारण करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें पूर्वीं अनेक कठिण प्रसंगीं जसें यांनीं आमचें संरक्षण केलें, तसेंच सद्यःप्रसंगींही केलें आहे, व पुढेंही करितील अशी मला स्वतःला अतिशय बळकट आशा आहे. ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें सकाममूर्तिपूजेपासून तों थेट निष्काम ब्रह्म-चिंतनापर्यंत प्रत्येक प्राण्यास सात्विक धर्माचा उपदेश करावा व आपण त्याप्रमाणें आचरण करून दाखवावें यासाठीं आमच्या लोकांची उत्पत्ति आहे व ह्मणून गीताशास्त्राचें प्रकटन आर्यभूमींत झालें आहे. 'आम्ही खास जिवंत राहणार' असा आम्हांस जो दम आहे, जो धीर आहे, त्याचें हेंच गुप्त रहस्य होय. सारांश, अत्यंत विपन्न स्थितीमध्येंही आम्ही आपलें स्वत्व सर्वथा सोडिलें नाहीं हा आमच्यावर परमेश्वरी अनुग्रह होय!

४. १९ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं ही जी त्रिविधतापत्रयाची थोर-पड आमच्या मागें लागली आहे याचें इंगित काय असावें याविषयीं अनेक सामाजिक धन्वंतऱ्यांनीं अनेक प्रकारें चिकित्सा केली आहे; व आपआपल्या परीनें निदानेंही ठरविलीं आहेत. अस्वच्छता, मोकळ्या हवेचा व उजेडाचा अभाव, शहरांची बकाली वस्ती, घाणेरड्या संवयी, प्रवासाची सुलभता, समुद्रयान, राष्ट्राराष्ट्रांचें दळवळण, एकाच ठिकाणीं फार शतकेंपर्यंत मनुष्य-वसति असल्यानें हवेमध्यें उत्पन्न होणारा दुष्टपणा, जास्त सुधारलेल्या समाजाची संगति, निःसत्व अन्न, मिठाचा दुष्काळ, यज्ञयागादिकांचे संक्षेप, स्वधर्मा-विषयीं अश्रद्धा, नास्तिकता व त्यामुळें उत्पन्न होणारा ईश्वरी प्रकोप वगैरे अनेक कारणें आजतागाईत कारणाच्या सदरांत नमूद झालीं आहेत; पण अद्यापि या प्रश्नाचा खरा उलगडा नाहीं. असो; या असल्या बुद्धीस प्रायः अगोचरच असणाऱ्या अमानुष विषयाची चिकित्सा व निदान करणें व औषधयोज-

नेची खटपट करणें हें एक व्यक्तीच्या दृष्टीनें पाहिलें असतां साहसच होय; तथापि माझ्या अल्पबुद्धीचा जेथपर्यंत प्रवेश होऊं शकतो, तेथपर्यंत जाऊन मला जें काय वाटतें तें मी सांगतों.

६. असल्या विश्वगामी परिणामाचा उद्भव एकाच कारणानें झाला असेल असें ह्मणणें ह्मणजे आपला कोता स्वभाव प्रकट करणें होय. वर नमूद केलेल्या सर्व व आणखीही अनेक कारणांनीं आमच्यावर हा दुर्धर प्रसंग ओढवला आहे, हें खरें आहे; तथापि आम्ही आपल्या धर्माचें मुख्य रहस्य विसरून जाऊन भलत्यास अनित्य पुरुषार्थाचे मागें फाजील जोरानें वहावयास लागलों आहों, हें स्पष्टपणानें दाखविण्यासाठीं दयाळू परमेश्वरानें ही जालीम मात्रा आपल्यास दिली असावी असें मला वाटतें. परमेश्वराच्या सदय हेतूंचे परिणाम अनंत कालामध्यें केव्हां तरी प्रकट होत असल्यामुळें, त्या सर्वज्ञ परमेश्वराचा हेतु अमुकच आहे, असें जरी निश्चयात्मक रीतीनें मानवी बुद्धीस सांगतां येत नाहीं, तथापि मायाळू पण दीर्घदर्शी पिता ज्याप्रमाणें आपल्या दुर्व्यसनी परंतु सालस पुत्राला ताळ्यावर आणण्यासाठीं प्रसंग पाहून सौम्य अगर कडक उपायांची योजना करितो, त्याचप्रमाणें स्वभावतः सात्विक परंतु अज्ञानानें तमोगुणाचा आश्रय केलेल्या आमच्या महाराष्ट्रीय लोकांस 'हा संसार क्षणभंगुर आहे; कच्च्या मडक्याइतकीही जीवाची शाश्वती नाहीं; स्वतःचा जीव आणि शरीर एकत्र ठेवणें हाच काय तो पुरुषार्थ नव्हे; विषयोपभोग अनावर झाला असता अनेक शारीरिक, मानसिक, सामाजिक व दैविक भोग उत्पन्न होतात; दया, क्षमा, शांति, न्यायबुद्धि, परोपकार या सद्गुणांचा योग्य विस्तार व कामक्रोधादिकांचें योग्य दमन हीं साध्य झाल्याशिवाय सामाजिक व पारमार्थिक पुरुषार्थ सिद्ध होत नाहींत; निष्कामकर्म करून व परमेश्वराचें निष्काम व सप्रेम आराधन करून नंतर ब्रह्मचिंतनाचा अभ्यास करावा व ब्रह्म व्हावें हाच खरा पुरुषार्थ आहे; धर्म, अर्थ, काम हे पुरुषार्थ केवळ परंपरेनें मोक्षाचे पोषक उपाय आहेत, वगैरे तत्त्वें यथास्थित कळावीं व आर्य लोकांनीं सात्त्विक सद्धर्माचा सात्त्विक रीतीनें विस्तार करावयाचा हें जें त्यांचें मुख्य काम, तें साध्य करून घेण्यासाठीं मात्र इतर शुद्ध, सात्त्विक व ज्ञानवर्धक कर्मांचें साहाय्य घ्यावें, एतदर्थ ह्या तीव्र अंजनाची त्या सर्वज्ञ व सर्वदृष्टि, सर्वशक्ति व सर्वदयाघन प्रभूनें योजना केली असावी असें

दिसतें. स्वतःचा व स्वतःच्या मताविषयींचा अतिरिक्त अभिमान सोडून देऊन आत्मस्वरूपानें एकच परंतु देहानें मात्र भिन्न दिसणाऱ्या इतरांचें व इतरांच्या मतांचें यथार्थ परीक्षण शुद्ध भावानें करावें, सत्याचा प्रसार करावा व होईल तितका परोपकार निर्लोभ मनानें करून आपली व इतरांची चित्तशुद्धि करावी, आणि शेवटीं आपल्या मानवी बंधूस त्यांच्या त्यांच्या अधिकारानुसार परमार्थाकडे वळवावें हेंच आपलें खरें कर्तव्य आहे. एकमेकांचा द्वेष करणें व करविणें हा पुरुषार्थ नव्हे असें जर आमच्या लोकांस सर्वतोपरी कळेल, तर एकोणिसाव्या शतकांतील नव्वदीसालाच्या या अपूर्व कहरानेंही आमचें अपूर्व कल्याण केलें असें आपले वंशज मोठ्या अभिमानानें गात बसतील.

६. दुसरा वाढदिवस करण्याची सोन्यासारखी संधी आली असतां एकंदरीनें या मासिकपुस्तकास बरे गेलेल्या बारा महिन्यांचा आढावा काढून या व्यावहारिक विषयांचा समारोप करावयाचा तें सोडून देऊन गीताशास्त्रास अत्यंत अप्रस्तुत अशा गोष्टींचा उल्लेख करण्याच्या आडरानांत शिरण्याची बुद्धि मला कोठून सुचली अशी या पुस्तकाचे भाविक वाचक कदाचित् पृच्छा करतील; त्यांस एवढेंच उत्तर द्यावयाचें आहे कीं, गीताशास्त्रांत अमुक विषयाचा अंतर्भाव होत नाहीं असें म्हणणें भ्रामक होय. गीताशास्त्राची सीमा इतकी व्यापक आहे कीं, तें शास्त्र व्यावहारिक, शास्त्रीय व पारमार्थिक वगैरे सर्व विषयांचा अंतर्भाव सुखानें करितें; व गीताशास्त्रांतील सिद्धांत इतके खरे आहेत कीं, बुद्धीच्या साहाय्यानें व्यावहारिक ज्ञानाची मर्यादा वाटेल तितकी अवाढव्य वाढवा, आत्मज्ञानानें स्वस्वरूपाची हवी तेवढी मीमांसा करा, त्या व्यावहारिक व त्या पारमार्थिक ज्ञानानें सिद्ध होणारे कोणतेही खरे सिद्धांत गीताशास्त्रांतर्गत सिद्धांतास हरताळ लावूं शकणार नाहींत इतकेंच नव्हे, तर उलट ते आपापल्या परीनें गीतासिद्ध सिद्धांतांचे पोषक मात्र होऊन बसतील! तेव्हां स्वार्थबुद्धि जोरावर झाली आहे हें प्रकट करण्यासाठीं उत्पन्न झालेलीं दुष्काळ, पटकी व प्लेग इत्यादि अनेक दुर्धर संकटें व्यक्तीची हानि करीत आहेत हें खरें; पण तीं सर्व समाजाचें शेवटीं कल्याणच करणारीं आहेत. हें सामान्यतः दाखविण्यासाठीं वरील विवेचन केलें आहे. "संतसंघ येती घरा। तोचि दिवाळी दसरा" या न्यायानें प्रस्तुतच्या घोर प्रसंगींही आपण समा-

धान धरून दुसऱ्या वाढदिवसाचे वेळीं आनंदच प्रकट केला पाहिजे, व तो तसा प्रकट करण्याविषयीं वाचकांस मी विनंती करितोंही !

७. प्रस्तुत मासिकपुस्तकांत ‘ पुनर्जन्मा ’ संबंधानें कांहीं मतें प्रकट केलीं होतीं तीं एक दोन भाविक वाचकांचा मस्तकशूळ उठविण्यास कारण झालीं हें चांगलें झालें नाहीं. गैरसमज नष्ट व्हावा ह्मणून पुनः कारण सांगतों कीं, पुनर्जन्म आहे कीं नाहीं असा वाद नाहीं. दोन्ही पक्षांस पुनर्जन्म ( पूर्वजन्म ) संमतच आहे. उभयतांसही उपनिषदांसारख्या सर्वमान्य ग्रंथांचा आधार आहे. जीवानें केलेल्या पुण्यपापांचा परिणाम सुखदुःखदायक होतो यांतही मतभेद नाहीं. तसेंच सर्व विश्व मायानिर्मित आहे, मिथ्या आहे, असें स्वानुभवानें समजून ब्रह्मचिंतन करणाऱ्याला या वादाची किंमतही नाहीं ! असो; वाद काय तो इतकाच आहे कीं, जीवानें अहंतापूर्वक केलेल्या पापपुण्यात्मक कर्मांचा परिणाम त्या एकट्या जीवासच या देहीं व अन्यत्र भोगावा लागतो, किंवा या देहांतच त्या कर्त्यास पापपुण्याचें झाडे द्यावे लागून शिवाय त्याच्या संगतीस असणाऱ्या अनेक जीवांसही प्रत्येक मनुष्यानें केलेल्या कर्मांचें प्रायश्चित भोगावें लागतें ? एकाच जीवानें कर्मोपभोग घेण्यासाठीं अनेक देह धारण करणें हा प्राचीन धार्मिक पक्ष आहे. एका जीवानें केलेल्या कर्मांचा उपभोग त्या जीवास त्या देहांत व त्या वेळीं विद्यमान असलेल्या व पुढें येणाऱ्या जीवास अवश्यक रीतीनें घ्यावा लागतो हा आधुनिक शास्त्रीय पक्ष आहे. सारांश, याप्रमाणें वादाची सीमा फारच आकुंचित आहे. ह्मणजे एकाच जीवास अनेक देह घ्यावे लागतात, किंवा पाठीमागील जीवांच्या व सृष्टीच्या कर्मानें पुढील जीव उत्पन्न होतात, व त्यांचीं कर्में त्यांच्या वंशजांस भोगावीं लागतात, इतकाच वाद आहे. आणि कोणताही पक्ष सिद्ध झाला तरी गीताशास्त्रास कसलाही बाध उत्पन्न होत नाहीं. उलट मी अशी प्रतिज्ञा करितों कीं, या विश्वांतील कोणत्याही विषयाच्या संबंधें अनुभवानें सिद्ध झालेल्या सयुक्तिक महासिद्धांतांची संख्या जितकी जास्त वाढेल तितकें गीताशास्त्राचें सत्यत्व जास्त शुद्ध रीतीनें प्रकाशित होणार आहे. ज्ञानमार्गाचा उपदेश करणारें शास्त्र कोणत्याही शुद्ध मार्गानें प्राप्त झालेल्या ज्ञानाचा प्रतिरोध करील असें व्हावयाचें नाहीं. यास्तव या पुस्तकाच्या वाचकांस व सर्व भाविक लोकांस मी नम्रतापूर्वक विनंती

कारितों कीं, त्यांनीं ज्ञानाच्या विस्ताराला कधींही भितां कामाचें नाहीं. मनाची समता ढळूं देण्याचें येथें कांहीं कारण नाहीं. बावन्नकशी शुद्ध सोन्यास प्रज्वलित अग्नीचा ताव दिला असतां जसें तें जास्तच खुलून जास्तच प्रकाशक व आनंदकारक होतें, महासाध्वी सीतामातेवर घाणेरडे आरोप केल्यामुळें त्यां देवीला करावयास लागलेल्या दिव्यानें जशी त्या महापतिव्रतेची अखंड कीर्ति सर्व विश्वभर झाली, तसाच प्रकार गीताशास्त्राचा व उपनिषदांचा आहे. सारांश, गीतेचें व वेदान्त ग्रंथांचें खरें रहस्य समजून घेणें इष्ट असेल तर प्रत्येक जीवानें अनुभवज्ञानाची सीमा निःसीम करण्यासाठीं अवश्यतः अखंड झटलें पाहिजे. केलेल्या कृत्यांचा परिणाम उपभोगाशिवाय नष्ट होत नाहीं, निरहंकारतेनें केलेलीं व झालेलीं स्वतंत्र म्हणजे ज्ञानपूर्वक कर्मे सर्वच चित्तशुद्धीस कारण होतात हें सांगण्याचा मुख्य उद्देश आहे व तो कोणताही पक्ष घेतला तरी साध्य होत आहे; असें आहे तर ब्रह्माचे ठिकाणीं लीन झालेल्या स्थल, काल इत्यादिक अनित्य गोष्टींचा अभिमान धरून ब्रह्मजिज्ञासु लोकांनीं विनाकारण क्रोधवश कां व्हावें हें मला समजत नाहीं. असो; कोणी सुधारक असो वा दुर्धारक असो, कोंकणस्थ असो वा देशस्थ असो, अर्वाचीन असो वा प्राचीन असो, जोंपर्यंत तो 'तत्त्वमसि' या महासिद्धांताच्या आड येत नसून त्या सिद्धांताचें समर्थनच केव्हां वेदान्त-वाक्यांनीं तर कधीं बायबल, कुराण, धम्मपद वगैरे धर्मांतील वचनांनीं, अनु-भवजन्य सिद्धांतांनीं करीत आहे, जोंपर्यंत त्याची इच्छा जगांत भासणारें दुःख खरे रीतीनें कमी व्हावें, नष्ट व्हावें, अशी आहे, जोंपर्यंत तो वेदांतमहावाक्यांस, युक्तीस व अनुभवास धरून निर्लोभ मनानें व निरहंकारबुद्धीनें सत्सिद्धांतांचें प्रणयन सात्विक मार्गानें करीत आहे, तोंपर्यंत तो पुरुष गीताशास्त्राची, सात्विक आर्यधर्माची व नित्य, सिद्ध वेदांतमहावाक्यांची महतीच वाढवीत आहे, हें आपण विसरूं नये. शिवाय 'पुनर्जन्माचा' अमुकच एक ठामचा सिद्धांत असेंही मीं ठरविलें नाहीं. फक्त दोन पक्ष दिले आहेत, तेव्हां ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

९. माझा एक अजमास चुकला हें वाचकांस सांगणें अवश्य वाटतें. तीन वर्षांत गीताशास्त्राचा सर्व कारभार उरकून टाकीन अशी जी मला घमेंड होती ती समूळ नाहींशी झाली ! वसंतसेनेच्या अनेक—चौकी वाड्यांत शिर-

त्यानंतर त्या बिचाऱ्या ब्राह्मण विदुषकाची जशी धांदल उडाली—तो जसा एकाहून एक सरस असे चौक पाहून भांबावून गेला, तद्वतच माझीही स्थिति झाली आहे. अनेक मनोहर व उपयोगी नवे विषय नित्य गीताशास्त्ररूपी कामधेनूपासून निर्माण होतात व त्यांतील पुष्कळांस 'नको, सोय नाहीं' असें मोठ्या कष्टानें सांगावें लागतें ! तथापि कांहींची तरी सोय यथास्थित लागावी ह्मणून पूर्वीच्याच किंमतींत आजपर्यंतच्या ३२ पृष्ठांचीं ४० पृष्ठें १३ व्या अंकापासून करणार आहें व आचार्यांव्यतिरिक्त इतर टीकाकारांस बारीक टाईपाचें नाजुक वस्त्र लेवविणार आहें; इतकें करूनही तीन वर्षांत परमेश्वरकृपेनें माझ्या निमित्तेंकरून अठरा महासागरांचें आलोडन मुमुक्षु वाचकांस झालें तर मी आपल्यास धन्य मानीन ! आरंभिलेल्या कामाचा समारोप ज्याच्या त्याच्या हातूनच व्हावा हा उत्तम पक्ष होय व तसें करण्याचा प्रयत्नही मी करीत आहें. असो; भगवदिच्छा असेल तसें होईल, आपण मनोभावानें कर्तव्य करावें हेंच आपणा मानवांचें 'बिरुद' आहे.

एक दोन सद्गृहस्थांनीं छापतांना चुक्या होतात असें ममतापूर्वक सांगितलें हें संतोषदायक होय. चुक्या होऊं नयेत, ह्मणून खटपट चालू आहे. पण आमच्या येथील उपकरणांची स्थिति, सध्यां उत्पन्न झालेली त्रिस्थळी वगैरे अनेक अडचणींनीं निरुपाय झाला आहे. तथापि वाचकांच्या हातांत स्वच्छ परिटघडी वस्त्र देण्याची मी कसूर करणार नाहीं, इतकें मात्र आज मितीस सांगणें मला शक्य आहे. अंक बरोबर वेळेवर न पोहोंचण्याच्या प्रत्येक महिन्यांत आठ दहा तक्रारी उत्पन्न होऊन वाचकांस व व्यवस्थापकास दुप्पट भूर्दंड भरावा लागतो. असें कां होतें हें अजून कळत नाहीं. बरोबर व्यवस्था करून सर्व अंक रवाना केले असतां दहापांचांनींच कोठें तरी बुडी कां मारावी हें अद्यापि समजत नाहीं. तपासांत आहें.

९. सरतें शेवटीं, ज्या सद्गृहस्थांनीं मला या अवघड ह्मणून अवजड कामांत हस्तेंपरहस्तें साहाय्य केलें आहे व प्रोत्साहन दिलें आहे, त्यांची एकंदर नांवानिशी देणें प्रायः दुर्घटच होय. तेव्हां शेवटचा उपाय ह्मणजे या सर्वांचे आभार नम्रतापूर्वक मानणें येवढाच होय.

५६

तथापि प्रो० चांदोरकर, प्रो० बाळ गंगाधर टिळक व रा० रा० हरि नारायण आपटे, रा० रा० ग० धों० वेलणकर, माझे तरुण स्नेही रा० रा० गो० म० वैद्य, यांचे व वऱ्हाड व नागपूर प्रांतांतील गीताभक्त वाचक मंडळींचे साक्षात् आभार मानल्याखेरीज मला चैनच पडावयाचें नाहीं, ह्मणून पंक्तिप्रपंच करीत आहें व त्यांचा प्रत्यक्ष नामनिर्देश करून मी आपली कृतज्ञता प्रकट करीत आहें. वे० शा० सं० बाळकृष्णशास्त्री उपासनी या आनंदाश्रमांतील होतकरू व सौजन्यशील शास्त्रीबुआंचें नित्यसाहाय्य मला नसतें, तर हें कार्य हातीं घेण्याची प्रेरणा होऊनही मीं तें स्वीकारलें असतें कीं नाहीं याची मला शंकाच आहे! असो, तेव्हां त्यांचे आभार प्रस्तुतच्या लेखकानें व वाचकांनीं कृतज्ञतापूर्वक मानिले किंवा दुसरें कांहीं केलें तरी त्यांच्या साहाय्याची उतराई होणें शक्य नाहीं. तथापि आभार मानणें हें आपलें कर्तव्य आहे. व ह्मणून मी तसें शिष्यभावानें कृतज्ञता व नम्रतापूर्वक करितों.

जगद्धितेच्छूचे मालक रा. रा. गोंधळेकर व इंदिरा छापखान्याचे मालक रा. रा. आवटे यांचेही आभार मानणें योग्य आहे. अडचणीच्या वेळीं पुष्कळ सवलतीनें या गृहस्थांनीं वेळच्या वेळीं अंक काढून दिले याबद्दल त्यांचे ऋणी असणें योग्यच होय.

ज्या सच्चिदानंदघनाच्या सत्तेनें ही अघटित-घटना-संपादक माया निर्माण झाल्याचा भास होतो, त्या परब्रह्माचें आभारपूर्वक अखंड चिंतन करणें हेंच मानवी बुद्धीच्या कृतज्ञतेस योग्य आहे व असें चिंतन करण्याचा प्रत्येक मुमुक्षूनें प्रयत्न केला तरच अनादि परमात्म्यानें जन्म घेतलासें दाखवून शुद्ध धर्माचें रहस्य गीताद्वारें प्रकट केलें त्याचें सार्थक्य होणार आहे.

अनेक गीताभक्तांनीं 'श्रीमद्भगवद्गीतेच्या' प्रकाशनास यथाशक्ति साहाय्य देऊन पुढच्या सालीं अधिक उत्साहानें काम करण्यास सार्थ प्रोत्साहन दिलें त्या या पुस्तकाच्या प्रेमळ वाचकांचे आभार मानणें केवळ पुनरुक्तीसारखेंच होय.

१० असो; याप्रमाणें सर्व कारभार आटपला. यंदांच्या वर्षी सर्वदृष्टि व सर्वन्यायी प्रभूनें आमची संकटद्वारानें कडक परिक्षा घेतली आहे व त्यांत आम्ही थोड्याशा तरी नेटानें उत्तीर्ण झालों. एवढ्या परीक्षेवरच परमदयाघन परमेश्वराचें समाधान व्हावें व ज्या थोर महत्कृत्यास आपण सर्वांनीं हात

वाढून अवाढव्य कारभार अल्पमतीनें आरंभिला आहे, तो यथास्थित रीतीनें सिद्धीप्रत जावा, व माझ्या सर्व देशबंधूंस त्यांच्या आयुष्यांतील बाकीचीं वर्षे सत्कर्मांत ह्मणजे अर्थातच सुखासमाधानांत जावीं याबद्दल त्या सच्चिदानंद-घनाची शुद्धभावानें करुणा भाकून वाचकांसही असें सुचवितों कीं, त्यांनींही आपआपल्या परीनें त्या प्रभूस नित्य शुद्ध मनानें आळवीत जावें, ह्मणजे सर्व संकटांचा परिहार होईल, निदान संकटनिरसनाचें धैर्य व बळ यांचा आप-ल्यामध्यें संचार होऊन तीं संकटें दूर करण्याचेंही सामर्थ्य आपल्यास येईल. म्हटलें आहे:

**सत्यसंकल्पाचा दाता भगवान। सर्व करी पूर्ण मनोरथ॥**

**"मंगलमूर्ति मोरया!"**